मे हैदरकुलीखान गुजरातवर दाखल.
ऑगस्ट ३० गिरिधरबहादूर नेमणूक माळव्यावर.
ऑक्टो० २ निजामाचें माळव्याकडे प्रयाण.
" " ८ बाजीरावाचें उत्तरेच्या स्वारीस प्रयाण.
" " २४ हैदरकुलीखान गुजरातेंतून परत.
" डिसें० ५ बाजीराव-ऐवजखान भेट, खानदेशांत.
१७२३ जाने० निजाम माळव्यात दाखल.
" फेब्रु० १३ निजाम-बाजीराव भेट, बदकशा.
" मे १५ निजाम माळव्यातून परत दिल्लीस निघाला; अजीमुल्लाची माळव्यावर नेमणूक.
" जुलै ४ निजाम दिल्लीत; बादशहाशीं भेट.
" जुलै १८ चंद्रसेन-संताजी पांढरे ल०, संताजी मृ.
" डिसेंबर ७ निजामानें वजिरी पुत्रास देऊन दक्षिणेकडे प्रयाण केलें.
१७२४जाने० २७ बाजीराव साताऱ्याहून स्वारीस माळव्यात; मुबारीजखानाची शाहूवर चढाई.
" फेब्रु० २४ निजामाचें आगऱ्याहून प्रयाण.
" " २७ शाहूची सरदारांस बोलावणी.
" मार्च २७ सुमंतास शाहूनें ऐवजखानाचे भेटीस पाठविलें.
" मे १८ बाजीराव-निजाम भेट, नालछा.
" जून २ गिरिधर बहादूर सुभेदार उज्जनीस दाखल.
" " ११ निजामानें औरंगाबाद घेतलें.
" जुलै २७ कमरुद्दीनाची वजिरीवर नेमणूक.
" " २९ सरदारांस तटस्थ राहण्याची शाहूची आज्ञा.
" सेप्टें० ३ औरंगाबादेहून निजामाची चाल मुबारीजखानावर.
" " ३० फत्तेखेड्याची लढाई, मुबारीजखान मृ०, निजामशाहीचें स्वातंत्र्य.
१७२५ जाने० निजाम हैदराबादेस दाखल.
१७२५ जून २ गिरिधर बहादूर उज्जनीस सुभा
१७२५ जून २० निजामाची दक्षिणेवर नेमणूक बादशहाकडून. बाजीरावास बादशाही फर्मानें.

# २

# बादशाही अहवाल

| | |
|---|---|
| **१ सय्यदांची पीछेहाट** | **२ खांडव्याची लढाई** |
| **३ बाळापुरची लढाई** | **४ सय्यदांची समाप्ति** |
| **५ रतनचंद, हिंदूंचा पुरस्कार** | **६ निजामाची वजिरी** |
| **७ निजामाचा दैवोदय** | **८ साखरखेडल्याचें फत्तेखेडी** |

**१ सय्यदांची पीछेहाट.**—दिल्ली राजधानीच्या घडामोडींचें व्यवधान ठेवल्याशिवाय बाजीरावाच्या उद्योगाचें रहस्य कळणार नाही. त्यासाठी पूर्वीच्या भागांत वर्णिलेली सय्यदांची कारस्थानें लक्षांत आणावीं लागतात. ता. २८ फेब्रुवारी, स. १७१९ रोजीं फर्रुख्सियर पदच्युत होऊन नंतर दोन महिन्यांनीं मारला गेला, त्या अवधींत दिल्लीच्या दरबारांत पुष्कळ धामधूम चालली. सय्यदांनी स. १७१९ च्या फेब्रुवारींत तख्तावर बसविलेला शहाजादा रफीउद्-राजत क्षयरोगानें लगेच जून महिन्यांत मरण पावला, तेव्हां त्यांनी त्याचा वडील भाऊ रफीउद्दौला याची बादशाहीवर स्थापना केली. हा दुसरा बादशाह देखील आजारी पडून ता. १७ सेप्टेंबर रोजी मरण पावला आणि बहादुर-शाहचा पुत्र खुजिस्ता अख्तार याचा मुलगा रोशन अख्तार म्हणून होता त्यास सय्यदांनी सिंहासनावर बसवून त्याचें नांव महमदशहा असें ठेविलें, (ता. २८ सेप्टेंबर, १७१९ ). या वेळीं राजपूत राजांना खुष करणें सय्यदांस जरूर वाटल्यावरून त्यांनीं अजितसिंगास अजमीर व गुजरात या सुभ्यांवर नेमिलें. जयसिंगासही त्यांनीं पुष्कळ नवीन मुलूख दिला. आपल्या राज्याची वृद्धि करण्याला त्या दोघांना ही संधि चांगली आली.

स. १७१५ त निजाम उल्मुल्क दक्षिणचा कारभार सोडून उत्तरेंत गेला, तो वरील राज्यक्रांतीच्या समयीं दिल्लींत होता. त्याचें व सय्यदांचें रहस्य नव्हतेंच. त्याला कारभारांत प्रमुखपण पाहिजे होतें तें सय्यदांनीं दिलें नाहीं. त्याला दक्षिणचा कारभार हवा होता, तोही सय्यद त्याला देईनात. त्यांनीं बिहार प्रांतावर त्याची नेमणक केली. पण तिकडे तो गेला नाहीं पढें त्याची नेमणक

माळव्याचे सुभ्यावर होऊन, ता. १५ मार्च, १७१९ रोजीं तो उज्जनला निघून गेला, त्या वेळीं आपणास माळव्यांतून तरी पुनः बदलूं नये असें वचन त्यानें सय्यदांपासून घेतलें. कोठें तरी कायमपणा त्याच्या भावी उद्देशास जरूर होता. माळव्यांत गेल्यावर स. १७१९ चा पावसाळा संपतांच, त्यानें पुष्कळशी फौज ठेवून युद्धाची तयारी चालविली. याचें कारण हुसेन सय्यदानें त्यास विचारलें, तेव्हां निजामानें उत्तर कळविलें कीं, मराठ्यांनीं माळव्यांत ठाणें दिलें असून त्यांस हुसकून देण्यासाठी फौजेची अत्यंत जरूर आहे. परंतु ही गोष्ट हुसेन सय्यदास पटली नाही. त्यानें दिलावरअली नांवाच्या आपल्या सरदारास निजामाचे हालचालींवर लक्ष ठेवण्यास पाठविलें; आणि निजामास माळव्याच्या कारभारावरून काढून परत दिल्लीस बोलाविलें. स. १७१८ त हुसेनअली दिल्लीस गेला तेव्हां त्यानें आपली बायका मंडळी औरंगाबादेसच ठेविली होती, ती परत आणण्यास आपण जात आहों असा बहाणा करण्याची दिलावरअलीस ताकीद होती. निजामाचा चुलत भाऊ अमीनखान आगऱ्याचे सुभ्यावर होता, त्यानेंही निजामास लिहिलें कीं, 'सय्यद आपल्या दोघांच्या नाशावर आहेत. बादशहा सुद्धां त्यांचे जाचास कंटाळला आहे, त्यांचा प्रतिकार आपण जरूर केला पाहिजे.' याबरोबरच खुद्द बादशहा व त्याची आई यांची पत्रें निजामास आलीं, कीं "कसेंही करून आम्हास या सय्यदांचे जाचांतून सोडवावें." निजामास आपण असा मोकळा सोडला ही चूक केली असें पुढें सय्यदांस वाटलें. इकडे दक्षिणचा सुभेदार आलमअली औरंगाबादेस होता, त्यास हुसेन-अलीनें चांगल्या बंदोबस्तानें राहण्यास लिहिलें. दिलावरअली व आलमअली या दोघांनीं दोहींकडून चालून येऊन मध्यें निजामाचा संहार करण्याचा बेत ठरविला. येणेंप्रमाणें सय्यदांचा व निजामाचा सामना जुंपला. या दोन पक्षांतून जो निभावेल, त्याच्या हातांत पुढील कारभार जाणार हें उघड होतें. सय्यदांच्या हातांत सत्ता व वजन होतें; परंतु धूर्तता व धोरण या बाबतींत ते कमी पडले. अब्दुल्ला विलासी व थंड स्वभावाचा होता. हुसेनच्या अंगीं शौर्य व तडफ हे गुण होते; परंतु तो उतावळा व उद्दाम वृत्तीचा असल्यानें दूरवर विचार करून मनांतील भाव प्रगट न करतां धूर्ततेनें वागण्याचें कसब त्यास नव्हतें. निजामाची शक्ति कमी होती; परंतु खोल विचार, धूर्तता, मनाचा थांग लागूं न देण्याचा स्वभाव व प्रसंग पाहून वागण्याचें सामर्थ्य त्यास चांगलें होतें. या स्वभावानुसार पुढें परिणाम घडून आले.

निजामानें माळव्यांत आपला दरबार भरवून सर्व मंडळीचा सल्ला घेतला. सय्यदांशीं उघड विरोध करावयाचा नाहीं, हुकूम येतील ते सन्मानपूर्वक शिरसावंद्य करावयाचे, परंतु प्रसंग पडल्यास लढण्याची तयारी जय्यत ठेवावयाची, असा आपला वर्तनक्रम त्यानें सर्वांच्या विचारें ठरविला. दक्षिणेंत जावें लागल्यास अशीरगड किल्ला ताबडतोब आपल्यास मिळावा अशी तजवीज आंतून किल्लेदारास वश करून त्यानें केली. प्रस्तुत त्यास सय्यदांचा हुकूम आल्याप्रमाणें माळव्याचा कारभार सोडून दिल्लीकडे निघून जाण्याचा बहाणा त्यानें केला. दोन तीन मुक्काम तो गेलाही. दोराह येथें पोंचतांच एकदम परत दक्षिणेंत जाण्याचा हुकूम त्यानें आपल्या लोकांस सोडिला. ता. ८ मे, १७२० रोजीं त्यानें अकबरपुरच्या उतारावर नर्मदा नदी ओलांडिली. ही बातमी दिल्लीस कळतांच हुसेनअलीनें निजामाचा हा बंडावा मोडण्यासाठीं आपण एकदम त्याजवर चालून जावें असें योजिलें. त्यास अबदुल्ला व खान डौरान यांनीं विरोध केला. ते म्हणाले, 'निजामाचा समाचार घेण्यास दिलावरअली व आलम-अली पुरे आहेत. उगाच घाई धरून आपण येथें घाबरेपणा दाखविल्यानें काम बिघडेल.' असा विचार करून सय्यदांनी दिलावरअलीस निजामाचे पाठीवर ताबडतोब जाण्याचा हुकूम सोडिला, आणि राव भीमसिंग हाडा, गजसिंग नरवरकर वगैरे कित्येक सरदारांस दिलावरचे मदतीस पाठविलें. आलमअलीसही दक्षिणेंतून निजामावर चालून येण्याची आज्ञा त्यानें केली. उद्देश असा, कीं दिलावरनें उत्तरेंतून व आलमअलीनें दक्षिणेंतून एकदम निजामावर दोहोंकडून चालून येऊन मध्यें कात्रींत पकडल्याप्रमाणें त्याचा फन्ना पाडावा.

बऱ्हाणपूरच्या नजीकच अशीरगड किल्ला नर्मदेच्या दक्षिणेस सुमारें ४५ मैलांवर आहे. दक्षिणच्या प्रवेशाचें तें द्वारच म्हटलें तरी चालेल. गुप्त हेरांच्या मार्फत पैसे चारून निजामानें आपला मुलगा गाझीउद्दीन फिरूझजंग यास पाठवून त्याजकडून ता. २० मे, १७२० रोजीं किल्ला हस्तगत केला आणि किल्लेदारास कैद केलें. लगेच मागून बीजागड-खरगोण मार्गानें स्वतः निजामही अशीरगडावर आला आणि तेथें आपले दोन मुलगे बंदोबस्तास ठेवून आपण तापीच्या उत्तर किनाऱ्यावर बऱ्हाणपुरास लालबागेंत येऊन उतरला. वऱ्हाडचा हुशार अंमलदार ऐवजखान म्हणून होता तो आपल्या फौजेसह येऊन निजामास मिळाला.

या [illegible] बातमी आलमअलीस पोचतांच त्यानें अन्वरखान व रावरंभा निंबाळकर या दोन सरदारांस [illegible] पाठविलें. ते तेथें पोंचतांच निजामानें त्यांस पकडून कैद केलें. सय्यदांचा धाकटा भाऊ सैफुद्दीन अलीखान म्हणून दिल्लीच्या मुभ्यावर मुरादाबाद येथें होता, त्याची आई याच वेळी औरंगाबादेहून मुरादाबादेस जात असता बऱ्हाणपुरास निजामाचे हातांत सांपडली. ती निजामास आपले सर्व दागदागिने देऊन सुखरूप सोडण्याची विनवणी करूं लागली. त्यावरून निजामानें तिच्या संपत्तीस हात न लावितां उलट तिला बंदोबस्तानें पुढें रवाना केलें. राजकारणांत अशा उदार धोरणाचा मोठा उपयोग होत असतो.

**२ खांडव्याची लढाई** ( १९ जून, १७२० ).—आलमअली केवळ वीस वर्षांचा तरुण व तडफदार गृहस्थ होता. त्यास हुसेन अलीकडून खबर येतांच त्यानें निजामावर चालून जाण्याची तयारी चालविली; मराठे सरदारांस आपल्या मदतीस घेतलें आणि दिलावरअली उत्तरेकडून येतांच आपण औरंगाबादेहून पुढें चालून जावयाचा बेत ठरविला. त्याजपाशी एकंदर तीस हजार फौज असून तींत पंधरा सोळा हजार मराठे होते. ता. ७ जून, स. १७२० रोजीं आलमअलीनें औरंगाबादेहून उत्तरेकडे कूच केलें. तिकडून दिलावर-अलीदेखील हंडिया येथें नर्मदा उतरून मोठ्या जोरानें निजामावर चालून आला. हें पाहून ता. ६ रोजी निजामानें तापी उतरून दक्षिण कांठावर आपली छावणी दिली; आणि दिलावरअली व आलमअली यांचा मिलाफ होऊं न देतां एक एकास वेगळे गांठण्याचा बेत त्यानें ठरविला. या वेळी बाजीरावास नुकती पेशवाई मिळाली होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

दिलावरअली उतावळा व मानी होता. सय्यदांनी ढिलाईबद्दल त्यास टोंचून लिहिलें तें सहन न होऊन रागारागानेंच तो निजामावर चालून आला, आणि दारूच्या धुंदींत त्यानें चीड येण्याजोगें पत्र निजामास लिहिलें. ता. ७ जून रोजी निजाम पुनः तापीच्या उत्तरेकडे त्याजवर चालून गेला. निजामाबरोबर तोफखाना असून अशीरगडावर त्यानें आपला सर्व बंदोबस्त पक्का ठेवला होता. बऱ्हाणपुरच्या उत्तरेस सोळा सतरा कोशांवर रतनपुर गांवानजीक निजामानें आपला तळ दिला. दिलावरची फौज तेरापासून सतरा हजारपावेतों उत्तरेकडून निजामावर चालून आली, ती चांगली कसलेली होती. निजामाकडेही पुष्कळ अनुभवी सरदार होते. त्यांत कैद करून ठेवलेला रावरंभा निंबाळकर यासही

त्यानें दिलावरचे फौजेवर पाठविलें. खांडवा व हुसेनपुरच्या नजीक पांढरा डोंगर आहे तेथें उभयतांची लढाई झाली, ती खाडव्याची लढाई म्हणून प्रसिद्ध आहे. ता १९ जून, १७२० रोजीं दोन प्रहरनंतर मोठें तुंबळ रणकंदन होऊन त्यांत दिलावरअली व त्याचे सर्व मोठेमोठे सरदार मारले गेले. मागें सांगितलेले राजपूत राजे भीमसिंग व गजसिंग हेही पडले आणि निजामास जय मिळाला. खांडव्याची ही लढाई म्हणजे सय्यदाच्या कारभाराचा पहिला बुडता पाय होय. दिलावरअलीचा नाश झाला तरी दक्षिणेकडून आलमअली बऱ्हाणपुरावर चालून येत होता, त्याजला तोंड देण्यास निजामानें लगोलग आपली फौज रवाना केली. आलमअलीस दिलावर पडल्याची बातमी कळतांच तो जागच्याजागीं थबकून राहिला, पुढें चालून गेला नाही.

दिलावरअलीचा पाडाव झाल्याची बातमी तारीख ५ जुलै रोजी सय्यदांस दिल्लीस कळली. तेव्हां ते गोंधळून गेले. पुढें काय करावे हें त्यांस सुचेना. हुसेनची बायकामुलें औरंगाबादेस होती, ती शत्रूच्या हातांत पडतील अशी त्यांस भीति होती. तेव्हा तूर्त निजामास चिडवूं नये आणि सलोखा दाखवून त्यास कबजात आणावे, असा विचार ठरवून त्यानीं त्यास पत्र लिहिलें कीं, ' दिलावरअलीनें आमच्या हुकुमाबाहेर वर्तन केलें; त्यास फक्त कबिले घेऊन येण्याची ताकीद होती. त्याने बंडखोरपणा केला, त्याचें प्रायश्चित्त त्यास मिळालें.' असें पत्र निजामास लिहून शिवाय बादशहाकडूनही एक लांबलचक फर्मान सय्यदाना निजामास लिहविलें, आणि त्याची समजूत करण्याकरितां दक्षिणच्या सुभ्यावर निजामाची नेमणूक केल्याचा हुकूम पाठविला. तसेंच आलमअलीस सय्यदांनी लिहिलें कीं, ' तूर्त तुम्ही पडतें घ्यावें आणि निजामाशी गोडीनें वागून राहावें. ' असा हा भलताच प्रकार घाबरेपणानें सय्यदांनीं अवलंबिला, तेणेंकरून निजामाच्या पक्षास अनायासें जोर आला. आलमअली बंडखोर ठरला.

सय्यदांच्या मनाची सारखी तारांबळ उडाली. त्यांस पुढें काय करावें हें समजेना. दक्षिणेंत निजामावर स्वारी करावी, तर मागें दिल्लीत काय प्रकार होईल त्याचा नेम नाहीं; न जावें तर तिकडे निजाम बलवान होतो; अशा विवंचनेंत बराच काळ गेला. घटकेंत बादशहास बरोबर घेऊन सर्वांनीं निजामावर चालून जाण्याचा, तर घटकेंत एकट्या हुसेनअलीनेंच जाण्याचा, असे अनेक बेत झाले. निजामाचा चुलतबंधु महंमद अमीनखान याचें दिल्लीत बादशहाजवळ वजन असून त्याचें अंतस्थ सूत निजामाकडे असल्यामुळें सय्यदांस मोठी भीति

पडली. येथून पुढें निजामाप्रमाणें अमीनखानानेंही मोठ्या सावधगिरीनें वागून बाहेरून सय्यदांशीं मित्रभाव ठेविला, आणि अंतस्थ रीतीनें त्यांचा पाडाव करण्याचा उद्योग आरंभिला. उत्तरोत्तर अमीनखान व हुसेनअली एकमेकांचा जीव घेण्यास सिद्ध झाले. बाहेरून मात्र ते मित्रभाव दाखवीत.

दक्षिणेंत आलमअलीची मोठी कुचंत्रणा सुरू झाली. माघार घेणें अशक्य होऊन त्यानें निजामाशीं संग्राम करण्याचें ठरवून सुभेगिरी सोडली नाहीं. खांडव्याची लढाई आटोपल्यावर २७ जून रोजीं निजाम बऱ्हाणपुरास आला. तेथून त्यानें आलमअलीशीं नरमाईचें बोलणें सुरू केलें. 'तुम्ही सुभेगिरी आमच्या स्वाधीन करीत नाहीं, तर आतां आम्हांस जगून तरी काय करावयाचें आहे ? आम्ही आतां मक्केस जाऊन राहिलेलें आयुष्य ईशचिंतनांत घालविणार !' अशी गप्प उठवून त्यानें लोकांस रजा दिल्याचे हुकूम सोडिले. पण हा केवळ कपटव्यूह होता. आलमअलीच्या सल्लागारांनीं व विशेषतः मराठे सरदारांनीं त्यास अशी मसलत दिली कीं, 'तूर्त समोर लढण्याचा प्रसंग आणूं नये. आपण सर्वांनीं कांहीं वेळ माघार घेऊन औरंगाबादेस किंवा त्याही अलीकडे अहंमदनगरावर येऊन राहावें ; आणि तेथून मराठ्यांच्या फौजांनीं रात्रंदिवस छापे घालून निजामास हैराण करावें.' पण असला नामर्दपणा आपण कधी करणार नाहीं असें बोलून, आलमअलीनें एकदम चालून जाऊन निजामाशी समोर सामना करण्याचा निश्चय केला. निजामानें आलमअलीचा हा उतावळा स्वभाव पुरता ओळखून त्यास चीड येणारीं पत्रें लिहून आगींत तेल ओतलें; आणि बऱ्हाणपुरावरून आपली छावणी पूर्णेच्या उत्तर कांठीं आणिली. आलमअलीचा तळही तेथून नजीकच पूर्णेच्या दक्षिण कांठीं 'तलाव हरताळा' येथें पडला. पावसाळा जोराचा व रस्ते चिखलानें दुर्गम झालेले असल्यामुळें, दोन्ही दळें नदीच्या दोन बाजूंस कांहीं दिवस आपापल्या जागीं तटस्थ राहिलीं. कोणासही नदीस उतार मिळेना. निजामानें होड्यांचा पूल तयार केला तो पावसानें वाहून गेला. तेव्हां नदीकांठानेंच निजाम कांहीं मुक्काम पूर्वेकडे गेला. दक्षिणची पूर्ण माहिती असलेला ऐवजखान नांवाचा सरदार निजामाकडे होता, त्यानें बाळापुरच्या बाजूस नदीस उतार आहे अशी माहिती आणली, त्याबरोबर तेथें नदी उतरण्याची तजवीज निजामानें केली. कांठावरून आलमअलीची फौजही निजामावर गोळीबार करीत वर गेली. ता. १५ पासून २० जुलैपावेतों निजामाची सर्व फौज नदी उतरून अलीकडे शेवगांवनजीक

छावणी करून राहिली. पावसाची संतत धार चालू असल्यामुळें लोकांस दाणावैरण बिलकूल मिळेना. नागपुरकर कान्होजी भोसल्यानें निजामाच्या फौजेवर सर्व बाजूंनी छापा घालून त्यास हैराण केलें. रुपयास दोन शेर आटा मिळेना अशी स्थिति झाली. जनावरांच्या दृष्टीस गवताचें पानही पडेनासें झालें. अशा स्थितीत बाळापुरास येऊन निजामानें मुक्काम केला, तेव्हां तेथें त्यास धान्य वगैरे मुबलक मिळालें.

इकडे आलमअलीनें आपली तयारी फार चांगली केली. त्याच्याजवळ अनेक मोठमोठे सरदार जमा झाले. वाटेल तसा खर्च करण्यास कमी करूं नये, अशी त्यास सय्यदांचीही सूचना आली. त्याप्रमाणें त्यानें पैसा खर्च करून पुष्कळ लोक जमविले. त्यांत कांहीं लोक निजामाचे गुप्त हेर असेही होते. आलमअलीस मराठ्यांची चांगली मदत होती. संताजी शिंदे, खंडूजी दाभाडे, शंकराजी मल्हार, कान्होजी भोसले ही मंडळी शाहूच्या हुकुमानें १७-१८ हजार फौजेनिशीं आलमअलीच्या मदतीस आली होती.

**३ बाळापूरची लढाई** (ता. १० ऑगस्ट, स. १७२०).—उभय दळांच्या अशा हालचाली चालू असतां निजामास दक्षिणच्या सुभ्यावर नेमल्याचें फर्मान आलें. निजामानें सामोरें जाऊन फर्मानाचा मोठा आदर केला, आणि लगेच त्याची नक्कल आलमअलीकडे पाठवून, ' तूं आतां कारभार सोडून तो आमचे हवालीं कर. तुम्हांस व सय्यदांचे बायकामुलांस सुखरूपपणें दिल्लीस जाऊं देतों, ' असें निजामानें आलमअलीस कळविलें. वास्तविक हें फर्मान निजामाची बाहेरून समजूत करण्याकरितां धादलींनें पाठविलेलें होतें. तथापि त्यामुळें आलमअलीच्या फौजेंत घोटाळा उडाला. हा वेळपावेतों निजाम बंडखोर समजला जात असे, परंतु आतां या फर्मानामुळें निजाम कायदेशीर सुभेदार होऊन आलमअली बंडखोर ठरला. निजामानें बादशहास व सय्यदांस स्नेहभावाचीं लांबलचक पत्रें लिहिलीं. ' मराठे बळजोर झाल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी आपला हुकूम नसतां एकदम माळवा सोडून दक्षिणेंत येणें आम्हांस भाग पडलें. आमच्याकडून बादशहाची यत्किंचित् अवज्ञा होणें शक्य नाहीं. आम्हांसही आतां कामाचा कंटाळाच आला आहे. मराठ्यांचा एवढा बंदोबस्त झाला म्हणजे आम्ही निघून मक्केस जाणार ! आतांच गेलों असतों, पण आमची नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर झाल्यानें काम सोडून जाणें म्हणजे हुकुमाची अवज्ञा होते. बादशहाचे हुकूम परमेश्वराच्या

पेक्षांही आम्हांस ज्यास्त वंद्य आहेत.' असें बादशहास लिहून हुसेनअलीसही त्यानें असेंच गोडीचें पत्र लिहिलें. 'तुमच्या बायकामुलांची मला अत्यंत काळजी आहे. मी औरंगाबादेस पोंचतांच, त्यांस लवकरच बंदोबस्तानें तुमच्याकडे रवाना करतों.' हें नरमाईचें धोरण निजामाच्या फार उपयोगी पडलें.

ता. ९ ऑगस्ट, स. १७२० रोजी बाळापुराहून दोन तीन कोसावर निजामानें लढाईच्या इराद्यानें आपली फौज व्यवस्थेनें उभी केली. हें पाहून आलम-अलीखान हत्तीवर बसून तोफखाना पुढें ठेवून ता. १० ऑगस्ट रोजी चालून आला. परंतु निजामानें जोराचा हल्ला केल्यावर आलमअलीचे बरेच सरदार पडले. त्याला स्वतःला गोळी लागली आणि त्याचा हत्ती पळून जात असतां पुनः एक बाणाची जखम लागून खुद्द आलमअली मारला गेला. निजामाच्या सरदारानें आलमअलीचें शीर कापून नेले. शंकराजी मल्हार जखमी होऊन निजामाचे हातात कैद झाला. आलमअलीचें सर्व सामान निजामास सांपडलें; आणि त्याचे पुष्कळसे सरदारही आपापल्या जमावासह निजामास जाऊन मिळाले. हैदराबादचा कारभारी मुबारीजखान व त्याचा भाऊ दिलावरखान हे सय्यदांच्या पक्षाचे होते. पण आलमअली मेलेला पाहून तेही निजामास मिळाले; त्याचप्रमाणें सय्यदांकडील दुसरा एक प्रमुख सरदार तुरुकताजखान निजामास सामील झाला. ऐवझखान व निजामाचा पुत्र गाझीउद्दीन यांनीं वरील लढाईत कसून मेहनत केली. लढाईत मराठ्यांचे एकंदर ६३४ लोक पडले, तरी त्यांनी हिय्या करून थेट निजामाच्या मुक्कामापर्यंत चाल करून पुष्कळसा खजिना लुटून आणिला. मराठ्यांची फार मोठी फौज या वेळीं आलमअलीचे मदतीस आली होती, परंतु तिला मागे ठेवून तो स्वतःच पुढें घाईघाईनें चालून गेला तो मारला गेला नसता तर मराठ्यांनीं निजामाचा चांगलाच समाचार घेतला असता. हा संग्राम म्हणजे सय्यदांच्या विनाशाचा प्रारंभ होय.†

**४ सय्यदांची समाप्ति.**—बाळापुरच्या लढाईची बातमी ता. २६ ऑगस्ट रोजीं सय्यदांस आग्रा येथें कळली, तेणेंकरून ते अत्यंत कष्टी झाले. निजामाचा चुलतभाऊ महंमद अमीनखान बादशहाजवळ होता, त्यास कारभारांतून काढण्याचा त्यांचा विचार चालला होता, परंतु वरील अरिष्टानें

† Irvine, Later Mughals.

खचून जाऊन त्यांनी त्याच्याशीं नरमाई धारण केली. पण तोही कपट-वर्तन करून आंतून सय्यदांचे नाशास प्रवृत्त झाला. बादशाह व सय्यद हुसेनअली यांनी निजामाचें पारिपत्य करण्यासाठी दक्षिणेंत जावें, आणि सय्यद अबदुल्लानें दिल्लीस जाऊन तेथील बंदोबस्त ठेवावा, असा बेत आग्रा येथें ठरला. सय्यदबंधूंची ही फाटाफूटच त्यांच्या नाशास कारण झाली.

अजमीरच्या रस्त्यानें राजपूत राजांची मदत मिळवीत दक्षिणेंत जाण्याचा बेत ठरवून बादशहाची स्वारी ता. ११ सेप्टेंबर रोजी आग्र्याहून निघाली. पुढें सांगितलेला राजा रतनचंद स्वारीबरोबर होता. शिवाय महंमद अमीनखान, हैदरकुलीखान व सादतखान हे तीन प्रमुख सरदार बरोबर असून, त्यांचे हुसेन सय्यदास मारून टाकण्याचे अंतस्थ बेत चालू होते. ता. ८ ऑक्टोबर, १७२० रोजीं जयपुरच्या पूर्वेस ६० मैलांवर 'तोडाभीम' यथें बादशहाचा मुक्काम झाला असतां हुसेनअलीचा खून झाला. तें काम वर सांगितलेल्या तीन सरदारांनी सिद्धीस नेलें. लगेच बादशहानें दरबार भरवून बक्षिसें वांटलीं, आणि वरील तिघांस मोटमोठ्या मनसबी दिल्या. सय्यदांच्या जाचांतून सुटल्याबद्दल बादशहास व लोकांस आनंदीआनंद झाला. बादशहाची स्वारी लगेच परत दिल्लीस निघाली. रस्त्यांत महंमदखान बंगश त्यास मिळाला. हळूहळू बादशहाचा जमाव फार मोठा झाला. निजाम उल्मुल्क, राजा गिरिधर बहादूर, सवाई जयसिंग व लाहोरचा सुभा अब्दुस्समदखान या सर्वांस खूष-खबरींचीं पत्रें लिहून बादशहानें मोठा धीर दिला. सर्वांनी जबाबही त्याच मासल्याचे पाठविले. बादशहाची स्वारी दिल्लीस पोंचल्यावर अब्दुल्ला सय्यदाचें व त्याचें खूपच वाकडें आलें. अब्दुल्लानें दुसरा शहाजादा तख्तावर बसवून लढाईची तयारी केली. बादशहानें महंमद अमीनखानास वजीर नेमिलें. या वेळीं हैदरकुलीखान, खानडौरान, सादतखान, महंमदखान बंगश, महंमद अमीनखानाचा मुलगा कमरुद्दीनखान व सवाई जयसिंग इत्यादि मोठमोठे सरदार बादशहास अनुकूल झाले, त्यांचीं नांवें पुढील कारभारांत यावयाचीं आहेत. दिल्ली व मथुरा याचे दरम्यान यमुनेच्या कांठीं हसनपुर येथें ता. १४ नोव्हेंबर, स. १७२० रोजीं लढाई होऊन अब्दुल्ला सय्यद कैद झाला, तेणेंकरून सय्यदांची कारकीर्द संपली. पुढें दोन वर्षांनीं ता. ११ ऑक्टोबर, १७२२ रोजीं अब्दुल्लाचा खून झाला.

हिंदुस्थानच्या इतिहासांत व विशेषतः मराठ्यांच्या संबंधानें, सय्यदांचा दहा वर्षांचा कारभार मोठा क्रांतिकारक समजला जातो. बाळाजी विश्वनाथानें मोठ्या युक्तीनें निजाम व सय्यद यांजमधील फुटीचा आपल्या राजकारणाकडे उपयोग करून घेऊन आपला डाव साधला. बादशहाच्या कमकुवतपणामुळें जरी सय्यदांना क्रूरपणाचें वर्तन ठेवावें लागलें, तरी रयतेच्या संबंधानें त्यांचा कारभार दोषास्पद नव्हता. धर्मानें ते शियापंथी असून हिंदूंशीं त्यांचा प्रेमभाव पुष्कळ होता. राजपूत व मराठे त्यांना सर्वथा अनुकूल होते. सुंनीपंथाचा कडवा धर्मद्वेष त्यांचे ठिकाणीं नव्हता. उलट त्यांचें वर्तन बहुतेक हिंदु धर्तीचें होतें. तथापि राज्यकारभारांतलें दूरदृष्टीचें धोरण अंगीं नसल्यामुळें त्यांचा नाश झाला. निजामाच्या कावेबाज स्वभावापुढें ते हार गेले. त्यांच्या कारभाराचा दृश्य परिणाम म्हणजे बादशाहींत मराठ्यांचें व राजपुतांचें प्राबल्य वाढलें हा होय. निजामासारखा दुसरा कोणी गृहस्थ बादशाहीच्या कारभारावर असता तर मराठ्यांचा उत्कर्ष इतक्या सुलभ रीतीनें उत्तरेंत झाला नसता. कदाचित् बाळाजी विश्वनाथाचा सर्वच व्यूह ढांसळला असता. यासाठीं सय्यदांची हकीकत विस्तारानें समजून घ्यावी लागते.

सय्यदांचा पाडाव करण्यांत महंमद अमीनखान प्रमुख असून तोच पुढें वजीर झाला. हा निजाम उल्मुल्कचा चुलता होय. बापाचा खून होऊन अमीनखान पंचवीस वर्षांचा असतां स. १६८६ च्या सुमारास बुखाऱ्याहून औरंगजेबाकडे आला. बादशहानें त्यास नोकरींत घेऊन चुलतभाऊ गाजीउद्दीन याजबरोबर ठेविलें; आणि पुढें त्यास चीनबहादुर अशी पदवी दिली. निजामाइतका तो धाडसी नसून अंग बचावून वागत असे. फर्रुखसेयरनें त्यास दुय्यम बक्षीची जागा दिली तेव्हांपासून तो बादशाहींत निरनिराळ्या कामी वावरत होता.

**५ रतनचंद, हिंदूंचा पुरस्कार.**—मराठ्यांचा प्रवेश दिल्लींत होऊन त्यांचीं कारस्थानें यशस्वी होण्यास तेथील अंतःस्थिति दृष्टीसमोर ठेविली पाहिजे. दिल्लींतील कित्येक हिंदी गृहस्थ मराठ्यांस अनुकूल होते. त्या वेळीं मोगल बादशाहींत मोठमोठ्या मुसलमान अधिकाऱ्यांजवळ अनेक हुशार हिंदु गृहस्थ कामास असत. चिटणिसी, हिशेबी, वकिली वगैरे कामें, खलबतें व त्यांतील खुब्या हें समजून घेण्यास परकी भाषा बोलणाऱ्या मुसलमान अधिकाऱ्यांस हिंदूंचाच उपयोग विशेष होई. सय्यदांचे कारभारांत तर हिंदूंचा

पगडा विशेष होता. सबब अशा कांहीं व्यक्तींचे उल्लेख स्वतंत्रतेनें करणें जरूर आहे. दक्षिणेंतल्याप्रमाणें दिल्लीकडे सुद्धां कित्येक हिंदु कुटुंबें मुसलमान सरदारांजवळ पिढ्यानुपिढ्या कामें करून नांवाजलेलीं होतीं.

वसुलाच्या व हिशेबाच्या कामांत निपुण असून शिवाय दिल्लींत राहून राज्याच्या उलाढाली करणाऱ्या मंडळींत बनिया रतनचंदाचें नांव प्रमुख होतें. अबदुल्ला सय्यदाचा तो केवळ उजवा हात असून त्याच्याच बरोबर तोही नाश पावला. दिवाण-इ-खालिसा म्हणजे वसूल व हिशेब या कामांवर रतनचंदाची नेमणूक वजीर अब्दुल्लानें कांहीं दिवस करविली होती. स. १७१७ त या जागेवर बादशहानें औरंगजेबाच्या तालमेंत तयार झालेला इनायतुल्ला यास नेमिलें. हा इनायतुल्ला हिंदूंचा द्वेष्टा असून, सय्यदांचे वेळेस हिंदु कामगारांचें माहात्म्य बरेंच वाढलें, तें इनायतुल्लास खपलें नाहीं. रतनचंदाच्या शिफारसीनें जिझिया कर बंद झाला होता तो इनायतुल्लानें पुनः सुरू केला; आणि हिंदूंच्या जागिरी पुष्कळ कमी केल्या. हा प्रकार रतनचंद व दुसरे अंमलदार यांस खपला नाहीं. त्यांनीं वजिराकडे तक्रारी केल्या. तेणेंकरून वजिराचें व बादशहाचें ज्यास्तच वांकडें आलें. रतनचंदास नोकरींतून काढून टाकण्याचा बादशहानें हुकूम केला, तो अब्दुल्लानें मानिला नाही. अब्दुल्लाचे उद्योग रतनचंदामुळेंच यथास्थित चालले. पुढें फर्रुखसेयर बादशहास पकडण्यास सय्यदांनीं जनानखान्यांत फौज पाठविली, तिजवर रतनचंद मुख्य होता. बादशहास त्यांनीं ता. २८ फेब्रुवारी, स. १७१९ रोजीं कैद करून पुढें ठार मारिलें; आणि नवीन कारकीर्द सुरू झाली, तेव्हां रतनचंद, अजितसिंग व कोट्याचा भीमसिंग यांच्या आग्रहावरून सय्यदांनीं लगेच जिझिया कर माफ केला. पुढें कांहीं काळ दोघां सय्यद बंधूंचें आपसांत वाकडें आलें होतें तें रतनचंदानें उभयतांची समजूत घालून मिटविलें. राजा गिरिधर बहादूरची व सय्यदांची लढाई अलाहबादेस झाली, तेव्हां त्या दोघांचा तह घडवून आणण्याची महत्त्वाची कामगिरी रतनचंदानें उत्तम बजावून गिरिधरसारखा शूर सरदार त्यानें सय्यदांच्या बाजूस आणिला. अशा रीतीनें हा रतनचंद हिंदूंचा पुरस्कर्ता असून मराठ्यांचा दिल्लींत प्रवेश होण्यास त्याची मदत चांगली झाली.

रतनचंदाचा शेवट मात्र वाईट झाला. ता. ८ ऑक्टोबर, स. १७२० रोजीं जयपुरच्या पूर्वेस साठ मैलांवर बादशहाचा मुक्काम असतां हुसेनसय्यदाचा

खून झाला, आणि त्याची छावणी व संपत्ति सर्व लुटली गेली. त्या गर्दींत हुसेनसय्यदाचे सरदार, ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे चालते झाले. त्यांत पुष्कळांनीं रतनचंदास पळून जाण्यास सांगितलें असतां त्यानें तें मानिलें नाहीं. एकाएकी धन्याचा खून झालेला पाहून तो अगदीं वेडा होऊन गेला. मात्र हुसेनचा खून झाल्याची बातमी त्यानें ताबडतोब अब्दुल्ला सय्यद दिल्लीस वजीर होता त्यास कळविली. राजा गिरिधरचा बाप दयाराम हा अमीनखाना-जवळ होता, त्यास पाठवून अमीनखानाने रतनचंदास पकडून हालहाल करीत आपल्यापुढें आणिलें; आणि कांहीं काळ त्यास मोगल लोकांच्या पहाऱ्यांत ठेविलें. पुढें अब्दुल्ला सय्यद व बादशहा यांची लढाई चालू असतां बादशहानें रतनचंदास आपल्या समोर आणून ता. १३.११.१७२० रोजीं त्याचा शिरच्छेद करविला. मुसलमान ग्रंथकारांचा अभिप्राय असा आहे, कीं सय्यद स्वतः स्वभावानें चांगले होते; परंतु रतनचंदाच्या संगतीस लागून त्यांनीं अनुचित कृत्यें केलीं. रतनचंदाचे बहिणीचा नवरा केशवराय हाही एक गृहस्थ दिल्लीत मोठ्या कामावर होता. मराठ्यांच्या उद्योगाचे अंतस्थ धागे समजण्यास या हकीकती उपयोगाच्या आहेत.

६ **निजामाची दहा महिन्यांची वजिरी.**—निजामाचा चुलत भाऊ अमीनखान सय्यदांचे पश्चात् वजिरीवर होता तो चार महिन्यांनीं स. १७२१च्या फेब्रुवारींत मरण पावला, तेव्हां बादशहानें अनेकांची सल्ला घेऊन त्या जागीं निजामाची योजना मनांत आणिली, आणि त्यास ताबडतोब उत्तरेंत येण्याचें फर्मान पाठविलें. तेव्हां निजामाचें मन अत्यंत द्विधा झालें. वजिरीच्या भानगडींत पडल्यानें आपला फायदा नाहीं, उगाच सय्यदांसारखा जिवावर कठिण प्रसंग येण्याचा संभव जास्त, त्यापेक्षां दक्षिणेंत जम बसत चालला आहे तो टिकवून तिकडेच आपला कार्यभाग सिद्धीस न्यावा असें त्याचें मन त्यास सांगत होतें. मुबारीजखानाचाही त्यास तसाच आग्रह पडला, त्यावरून त्यानें पुनः कर्नाटका-कडे प्रयाण सुरू केलें. इतक्यांत दिल्लीहून पुनः निकडीचीं बोलावणीं आलीं, तीं अमान्य केल्यास आतांच कठिण प्रसंग उद्भवेल असा पोक्त विचार ठरवून त्यानें इकडे मुबारीजखानास आपला दुय्यम नेमून ता. २१ ऑक्टोबर, स. १७२१ रोजीं औरंगाबादेहून उत्तरेकडे प्रयाण केलें. या एकंदर बनावावर बाजीरावाची टेहळणी असून त्याचे वकील व बातमीदार ठिकठिकाणीं हुशारीनें

कामें करीत होते, त्यांच्या मार्फत सर्व प्रकार त्यास भरपूर कळत होते. शाहूनें आनंदराव सुमंत यास निजामाबरोबर दिल्लीस पाठविलें.§

मुबारीजखानाचे हाती अधिकार येतांच त्यानें त्वेषानें मराठ्यांचा उच्छेद सर्वत्र सडकून चालविला. तुम्हांस चौथाईचा वसूल देत नाहीं असा स्पष्ट जबाब त्यानें शाहू व बाजीराव यांस पाठविला, त्याबरोबर बाजीरावाचे हात मोगलाईवर ताव मारण्यास मोकळे झाले. आपण होऊन मुबारीजखानानें करार मोडला हें त्याच्या पथ्यावर पडलें. आपण आपले हक्क स्वतःच्या हिमतीवर वसूल करण्यास समर्थ आहों हें त्यानें सिद्ध करून दाखविलें.

ऑक्टोबर स. १७२१ पासून बरोबर दोन वर्षे निजाम उत्तरेंत होता. तेवढ्या अवधींत बाजीरावानें चहूंकडे चढाईचें धोरण स्वीकारून आपली दहशत बसविण्याचा जोराचा प्रयत्न केला. अर्थात्च हा अननुभवी तरुण राज्याचें तारूं भलतीकडे नेऊन फोडील अशी धास्ती शाहूला पडल्याचें खालील पत्रावरून दिसतें. पत्रावर सन १७२२ दिला आहे, त्याचा संशय वाटतो. असें खरमरीत पत्र लिहिण्यास विशिष्ट कारण काय झालें असावें त्याचा बोध होत नाहीं.

" राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे—

तुम्ही विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कित्येक निष्ठेचे अर्थ लिहिले, ऐशास, कित्येक अर्थ समक्ष बोलावे म्हणोन तुम्हांसच हुजूर येण्याची आज्ञा करून वरचेवर पत्रें सादर जालीं असतां, अद्याप येण्याचा विचार दिसत नाहीं. यावरून काय म्हणावें ! निष्ठेचें निदर्शन स्वामींस यावें म्हणोन तुम्हांस वारंवार लिहिलें व भेटीसही येण्याची आज्ञा केली असतां, आळस होऊन दिवस घालवितां. ये गोष्टीचा विचार तुम्हांजवळच असावा. तुम्हींच उद्योग केलीया अगाध नाहीं. परंतु हैगैनें घडत नाहीं. दुसरें, स्वामिसन्निध उभयपक्षींचे कल राखून चालण्यास एक चांगला योजावा म्हणोन लिहिलें, त्याचाही विचार तुम्हींच करावयाचा तोही न घडला. यामुळें कितेक राज्यभारसंबंधीं कार्यें तटलीं. तुमचेही प्रत्ययास येऊन, त्याची उत्तरें प्रत्युत्तरें तुम्हींच करितां त्यांची विस्मृति. तेव्हां तुमचे लक्षांत हे गोष्ट नाहींसें वाटतें. हे कच्चे कप्पे वरचेवर लिहून तुम्हांस जागृत करण्याविषयीं स्वामीस आळस नाहीं. तुम्ही आज कराल, उद्यां कराल म्हणोन कालहरणही हुजुरून होत नव्हतें. प्रत्यय तुम्हांस नाहीं. असें असोन नबाबाकडीलही बोलणीं पडलीं, याजकरितां सुचविलीं. तथापि

§ पे. द. २२.३

तुम्हीं कळकळ धरून राज्यभार-संरक्षणार्थ सावधता करावयाची हें सदैव पत्रीं किती लिहावें ! यास्तव एक वेळ तुम्हीं येऊन समजोन घेऊन करावें. हें आळस असतां घडत नाहीं, हेंच आश्चर्य करितों. असो. कांहीं दिवस एक वेळ समक्ष झाल्या व्यतिरिक्त कोणतेंही कर्तव्य स्वामीस नाहीं. पुढें तुम्हांपासोन घडतच नाहीं असा निश्चय जालीया, स्वामींस विचार करणें प्राप्त येईल. तो दिवस अवघड वाटेल, मग धावाधाव करूं लागाल, म्हणोन वारंवार सुचवितों. तुमचे वडिलांनीं निष्ठा धरून चालल्या अकल्याण जालें न जालें हें तुम्हींच चित्तांत आणावें. जाणिजे. " ‡

निजाम आतां दिल्लीस जाऊन काय उपद्व्याप करतो त्याजवर बाजीरावाचें पुढील धोरण अवलंबून होतें. ता. १८ जानेवारी, स. १७२२ रोजीं निजाम दिल्लीस पोंचला आणि १३ फेब्रुवारी रोजीं बादशहानें त्याची भेट समारंभानें घेऊन त्यास वजिरीचीं वस्त्रें दिलीं. नंतर सुमारें दहा महिने निजामीचा मुक्काम दिल्लींत झाला, पण त्या अवधींत अनेक कारणांनीं धनी व चाकर यांचा जम बसला नाहीं. उलट ते एकमेकांस पाण्यांत पाहूं लागले, आणि निजामानें ता. २ ऑक्टोबर, स. १७२२ रोजीं दिल्लीतून पाय काढून दक्षिणची वाट धरली. त्यानें बादशहास कळविलें, कीं मराठे प्रबळ झाले, ते माळव्यांत पाय टाकीत आहेत, हा त्यांचा पाय लगोलग काढून टाकला नाहीं तर ते समग्र बादशाही गिळून बसतील, त्यासाठीं सर्व दक्षिणची मुखत्यारी तर मजकडे द्याच, पण त्याशिवाय माळवा व गुजरात हे दक्षिणच्या बंदोबस्ताचे व उत्पन्नाचे प्रांत मजकडे द्या, तरच मराठ्यांना आळा बसेल. हीं सूत्रवाक्यें त्यानें पांचचार वर्षे सारखीं झळकत ठेविलीं. हे तीन प्रांत हाताशी घालून आपण मोगल बादशहापासून फुटून स्वतंत्र राज्य स्थापावें हा अंतःकरणांतला मुख्य हेतु पुष्कळ काळ गुप्त ठेविला. जयसिंह वगैरे कित्येक मुत्सद्दी निजामाचा हा कावा चांगला ओळखून होते. निजाम औरंगजेबाच्या तालमेंत वागलेला; बाप आजारी पडल्यावर औरंगजेबानें पुकारा केला कीं दारा मुसलमानी धर्माचा द्वेष्टा असल्यामुळें त्याचा पाडाव करून मुराद यास बादशाहीवर स्थापून आपण स्वतः मक्केस जाऊन धर्मसेवेंत आयुष्य वेंचणार, तसाच जाहिराणा या वेळीं निजामानेंही केला

‡ रा. खं. ६.१६. स. १७२२ त दसरा झाल्यावर बाजीराव खानदेशकडे असून ता. ५ डिसेंबरास ऐवजखानाची व त्याची भेट झाल्याचा उल्लेख आहे. ऐवजखान हा निजामाचा मोठा हुशार सहायक होता.

कीं मराठे बळावले, बादशाही बुडणार, सबब त्या बादशाहीची व्यवस्था लावून आपण मक्केस जाऊन ईशचिंतन करणार. या उद्देशानें त्यानें बादशहापासून सत्ता, पैसा, फौज, साहित्य सर्व कांहीं भरपूर मागून घेतलें, आणि त्याचाच उपयोग त्यानें पुढें स्वतंत्र राज्य स्थापण्याकडे केला. प्रथम बादशहाला त्याचा मोठा भ्रम होता. 'तुम्हांवाचून हुजूरचा बंदोबस्त अशक्य आहे,' § असें बादशहा बोलून त्यास दाखवी. पण कांहीं काळ प्रत्यक्ष अनुभव आल्यावर बादशहाचा हा गैरसमज दूर झाला. निजामाचा व्यूह त्यानें ओळखला, त्यामुळें उभयतांचा बेबनाव होऊन ते एकमेकांस विरोध करूं लागले.

बाजीरावाची नजर दिल्लींतील घडामोडींवर खिळलेली होती. त्याचे हस्तक ठिकठिकाणीं डोळ्यांत तेल घालून वावरत होते. महादेव भट हिंगणे बादशहाच्या दरबारीं, माळव्यांत उदाजी पवार व होळकर, नर्मदेअलीकडे अंबाजी त्रिंबक अशांच्या टेहळणीवर बाजीराव आपलें अनुसंधान ठरवीत होता. स. १७२२ च्या दसऱ्यास महाराजांची रजा घेऊन बाजीराव खानदेशांतून मकडाईवरून माळव्यांत उतरून धारच्या बाजूस गेला असतां, निजामही त्याच वेळीं गुजरात व माळवा हे दोन प्रांत हाताखालीं घालण्यास उत्तरेकडून चालून आला. बरोबर फौजही तोलदार होती. मराठ्यांसही याच दोन प्रांतांत चौथाई बसवायची होती. त्यासाठीं बाजीरावानें कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड यांस गुजरातेंत व उदाजी पवारास माळव्यांत पूर्वीच रवाना केलें होतें. पण निजामानें निराळाच उपक्रम मांडिला, तो पुढें कळेल. इकडे मुबारीजखानानें दक्षिणेकडून मराठ्यांस चेपण्याचें काम चालविलें होतें, त्यांत संताजी पांढरे व चंद्रसेन यांचें युद्ध होऊन संताजी मारला गेला त्याचा वचपा काढण्यासाठीं ता. २८ जुलै, स. १७२३ रोजी शाहूनें सरदारांस जाहीर ताकिदी पाठविलेल्या आढळतात. ¶

सय्यदांचा पाडाव झाल्यावर बादशहानें हैदरकुलीखान यास गुजरातचा सुभेदार नेमून तेथें काम करणारा मारवाडचा राजा अजितसिंग यास दूर केलें. हैदरकुलीखान बादशहाचे विशेष मर्जीतला असून वजिरी सुद्धां निजामास न देतां यासच द्यावी असा त्याचा विचार होता. परंतु अनेकांच्या भिडेस्तव निजामास वजिरी देण्यांत आली, तेव्हां हैदरकुलीखान गुजरातेंत जाऊन

§ पे. द. ३०.२९

¶ शा. रो. ९.

स. १७२२ च्या मे महिन्यांत कामावर दाखल झाला. दुसरा बादशहाचा सरदार सादतखान त्याचा साह्यकर्ता होता, त्यानें अलाहबादचा सुभा मागितला, तो त्यास देऊन तेथचा अंमलदार गिरिधर बहादुर यास माळव्यांत बदलिलें. ३० ऑगस्ट स. १७२२ रोजी गिरिधर बहादुर या कामावर दाखल झाला. इकडे गुजरातेंत हैदरकुलीनें स्थानिक अधिकाऱ्यांस व बादशाही जागीरदारांस द्रव्याकरितां नव्या नव्या प्रकारांनीं छेडण्यास सुरुवात केली. अशा स्थितींत गुजरात प्रांत आपल्याकडे असावा अशी तीव्र आकांक्षा निजामाची होती, तेव्हां त्या संबंधानें बादशाहाचें मन वळवून त्यानें ता. २४ ऑक्टोबर, स. १७२२ रोजीं हैदरकुलीस काढविलें आणि गुजरातचा सुभा आपल्या नांवानें करून घेऊन लगेच आपला अंमल बसविण्यासाठी दिल्ली सोडून निजाम निघाला तो स. १७२३ च्या जानेवारीत माळव्यांत सारंगपूर येथें आला. फेब्रुवारींत त्याचा मुक्काम धारेस होता. निजामापुढें हैदरकुलीचा कांही एक इलाज न चालल्यामुळें वेडाचें सोंग करून तो दिल्लीकडे पळून गेला. त्यास पकडण्याच्या वगैरे भानगडीत निजाम पडला नाही. मुद्दाम आपण वर्दळीस न येता शक्य तितक्या नरमाईने तीन मोठे बादशाही प्रांत हाताखाली घालून आपण स्वतंत्र व्हावें हा निजामाचा मुख्य उद्देश होता. अर्थात् बादशहाला हा त्याचा व्यूह बिलकूल पटला नाही. शिवाय तो क्षणोक्षणीं कडक भाषणें बादशहास बोले त्यामुळें तो त्यास जवळ नकोसा झाला. हैदरकुलीखान मुकाट्यानें निघून गेल्यानें गुजरात प्रांत सहज निजामाचे हस्तगत झाला. तेथच्या कारभारावर त्यानें आपल्यातर्फेनें आपला मामा हमीदखान यास नेमिलें. गुजरातेंत उतरण्यासाठी निजाम झालोदपर्यंत गेला होता, तो परत माळव्यांत आला. तेथें दोन महिने मुक्काम करून माळव्याच्या सुभेदारीवर त्यानें आपल्या तर्फेचा अझीमुल्लाखान यास नेमिलें; आणि तेथील सर्व व्यवस्था लावून निजाम परत गेला, तो जुलै महिन्यांत दिल्लीस जाऊन पोहोचला. इकडे गिरिधरबहादुर माळवा सोडून गेला.

याच सुमारास बाजीराव पेशवा दक्षिणेंतून माळव्यांत येऊन दाखल झाला हें वर सांगितलेंच आहे. औरंगाबादेस ऐवजखानास भेटून तो पुढें खानदेशांतून माळव्यांत शिरला. दिल्ली दरबारांत निजामाचें आसन डळमळित झालें होते. साहजिकच आणीबाणीची वेळ ठेपल्यास बादशाहीचे शत्रू आपल्या कच्छपीं असलेले बरे या उद्देशानें निजामानें बाजीरावाची

झाबवानजीक¶ बदकशा (बोलाशा) येथें भेट घेतली. ता. १३ फेब्रुवारी ते १९ फेब्रुवारीपर्यंत बोलणीं चालणीं सौरस्यानें होऊन बाह्य रंग उत्कृष्ट उतरला.†

वरील भेट औपचारिक पद्धतीची झाली तींत विशेष निष्कर्ष ठरला असें दिसत नाहीं. दोघेही आपले अंतस्थ हेतू लपवीत होते. निजामास बादशाहीविरुद्ध आपला पक्ष तयार करावयाचा होता म्हणून साहाय्यक पाहिजे होते आणि त्याकरितां तो मराठ्यांच्या जुजबी मागण्या कबूल करण्यास तयार होता. उलट पेशव्यास गुजरात, माळवा व दक्षिण हे तीनही प्रांत निजामाच्या हातांत जावे हें मुळीच पटलें नाहीं. उत्तरेंत माळव्यांत आपला जम बसवून तिकडून व खालून कर्नाटकांतून निजामास दक्षिणेंतच चेपावें, असा बाजीरावाचा डाव होता.

गुजरात व माळवा हे दोन प्रांत कबजांत घेऊन आणि तेथें लष्करी बंदोबस्त ठेवून निजामानें ता. १५ मे रोजी दिल्लीकडे कूच केलें. ता. ४ जुलै रोजीं त्याची व बादशहाची भेट झाली, पण उत्तरोत्तर त्यांजमध्यें उघड बेवनाव उत्पन्न झाला. बादशहा रंगेल स्वभावाचा चैनींत निमग्न असे. तो प्रकार गंभीर स्वभावाच्या निजामास खपेना असें या विरोधाचें निदान तत्कालीन लेखांत नमूद आहे. पण दुसरें अंतस्थ कारण असें होतें, कीं सय्यदांप्रमाणेंच निजामानेंही बादशहास निर्माल्यवत् बनवून गुजरात, माळवा व दक्षिण हे तीन मोठे प्रांत तोडून घेऊन स्वतंत्र होण्याचा उद्योग चालविला, तो आतां झांकून ठेवणें त्यास अशक्य झालें. एवढे तीन प्रांत हातचे घालवणें बादशहास खपलें नाहीं. बादशहानें दक्षिणच्या सुभ्यावर आपल्या पुत्राची आणि अयोध्येच्या प्रांतावर निजामाची नेमणूक केली, त्यामुळें निजाम नाराज होऊन त्यानें ता. ७ डिसेंबर, स. १७२३ रोजीं वजिरी सोडून दिली आणि अयोध्येकडे प्रयाण केलें. नंतर रस्त्यांतून बादशहास सांगून पाठविलें कीं, “ मराठ्यांनीं माळवा, गुजरात प्रांत घेतले आहेत, ते सोडविले पाहिजेत. मी त्यांजवर चालून जाऊन त्यांना

¶ दोहदच्या दक्षिणेस वीस मैल. † मुसलमान दगेखोर असा त्या वेळीं सामान्य समज प्रचलित असल्यामुळें बाजीरावास पुष्कळांनीं धास्ती घातली कीं भेट समक्ष घेऊं नये. पण अशा धास्तीनें डगमगणारा बाजीरावाचा स्वभाव नव्हता. तथापि जोतिर्लिंग-बावा म्हणून एक फकीर होता त्याचा आशीर्वाद भेटीपूर्वीं बाजीरावानें मिळविला. कदाचित् आशीर्वादाचें हें पत्र १७३२ तील असूं शकेल. पे. द. १०-२५.

घालवून देतों." अशा रीतीनें स. १७२४ च्या फेब्रुवारींत निजाम बिगर-हुकमानें आग्रा सोडून दक्षिणेस निघाला आणि लांब लांब मजलांनीं उज्जनीस दाखल झाला. बाजीरावाला या हालचाली पूर्ण कळल्या. आपण पुढें जाऊन निजामास अटकाव करावा अशा विचारानें ता. २७ जानेवारी, १७२४ रोजीं सातारा सोडून त्यानें उत्तरेकडे प्रयाण केलें. दोन महिने नेमाडांत काढून ता. ८ मे ला अकबरपुरच्या उतारावर तो नर्मदापार झाला आणि निजामा-वर टेहळणी ठेवीत बढवाहाजवळ मुक्काम करून राहिला. निजामानें आपली छावणी सिहोर येथें केली.

निजामाची ही दांडगाई बादशहाला बिलकूल खपली नाहीं. सय्यदांचाच प्रकार पुनरपि उपस्थित झाला. कसेंही करून निजामाचा पाडाव केलाच पाहिजे असें ठरवून बादशहानें मुबारीजखानाम दक्षिणच्या सुभेदारीवर कायम करून आणखी कळविलें, 'हा निजाम बंडखोरीस प्रवृत्त झाला आहे, तुम्ही लढून त्याचा पाडाव करा, कारभार त्याचे हवालीं करूं नका.' शाहूलाही बादशहानें कळविलें. 'हो आणीबाणीची वेळ आहे, तुम्हीं निजामाचा पाडाव करण्यांत सर्वतोपरी आमचें साह्य करावें, म्हणजे तुमचे जे काय मनोदय असतील ते सर्व पुरे करूं.' शाहूला हा एक नवीनच पेंच उत्पन्न झाला. निजामाकडूनहो त्याजकडे संदर्भाचें बोलणें आलें. कोणाचें मान्य करावें आणि कोणास नकार द्यावा याची पंचाईत उत्पन्न झाली. निजाम व मुबारीजखान दोघेही झुंजार, दोघेही मराठ्यांचे पक्के विरोधक, उद्यां यांचें झुंज होऊन काय निकाल लागतो कोणीं सांगावें, असा बिकट प्रसंग उद्भवला.

**७ निजामाचा दैवोदय.**—शाहू रोजनिशींतले कित्येक कागद या वेळची तारांबळ स्पष्ट दाखवितात. ता. ८ जानेवारी, स. १७२४ रोजीं शाहू सेनापति दाभाडे वगैरे सरदारांस लिहितो, 'मनसबा उतावळीनें न करणें. भागानगरकर मोगल फौज तोलदार सामानपुरा आहे. त्यास उतावळी करून गांठ घालूं नये. कान्होजी भोसले यास सामील करून घेणें. बाजीराव प्रधान यांसही तुम्हांकडे पाठवीत आहों.' त्यानंतर १७ जानेवारीच्या पत्रांत मजकूर आहे तो असा,– 'नबाब ऐवजखान औरंगाबाद शहराबाहेर येऊन राहिले आहेत, आनंदराव सुमंत यांस सत्वर पाठवणें म्हणून पत्रें येतात, त्यांची रवानगी करणें अवश्यक, तरी त्यांजबरोबर जाण्यास दोनशें स्वार ताबडतोब

पाठविणें.' हा ऐवजखान निजाम उल्मुल्कचा आत्मलिंग. त्यानें शाहूच्या मार्फत मराठ्यांची मदत निजामासाठीं मागविली असली पाहिजे. त्यापूर्वी मुबारीजखान चालून आला होता, त्याचा प्रतिकार करावयाचा होता. म्हणजे कोणत्या पक्षास मिळण्यांत आपला मतलब साधेल याची निश्चिति नव्हती. त्यानंतर ता. १७ फेब्रुवारीस सरदारांस निकडीचीं पत्रें पाठवून शाहूनें फौजेनिशीं सामील होण्याची आज्ञा केली, आणि भागानगर प्रांतें जाण्यास सांगितलें. यावरून मुबारीजखानावर चालून जाण्याची शाहूनें तयारी केली हें उघड होतें. पुढें ता. २७ मार्च रोजीं शाहू लिहितो, 'आनंदराव सुमंत यास नबाब ऐवजखानाकडे नाजूक कामास पाठविले आहेत त्यांजबरोबर जमाव देणें.' ता. ११ एप्रिलला मुधोळकडून शाहूला खबर आली कीं, 'गनीम या प्रांतें आला त्यास नतीजा पोंचविला.' म्हणजे मुबारीजखानास तंबी दिली असें दिसतें. स. १७२४ च्या जानेवारींत बाजीराव सातार्‍याहून निघाला. खानदेशांत लांबकानीजवळ १४ मार्चला युद्ध करून तसाच पुढें माळव्यांत गेला. ता. १८ मे, स. १७२४ रोजीं धारेजवळ नालछा येथें त्याची व निजामाची भेट झाली. मुबारीजखानास सामील न होतां आपलें साह्य करावें अशी विनंती याप्रसंगीं निजामानें बाजीरावास केली असावी. §

थोडे दिवसांपूर्वी आनंदराव सुमंत नाजूक कामासाठीं ऐवजखानास जाऊन भेटला, त्याचा व बाजीरावाचा उद्देश एकच असला पाहिजे. ज्या पक्षाला मदत करायची त्याजकडून आपले मतलब प्रथम साधून घ्यावयाचे होते. हे मतलब स्पष्ट दाखविणारा महत्त्वाचा पुढें द्यावयाचा कागद उपलब्ध असून, त्यांतील कलमें उगवून घेणें हेंच महत्त्वाचें काम पेशवा व सुमंत दोघेही करीत होते. दोघांच्याही हातांत त्या कलमांचा मसुदा असला पाहिजे. संदर्भावरून हा कागद मार्च स. १७२४ चा आहे असें निखालस म्हणतां येतें. 'पातशहाचे कामावर नजर देऊन राजा शाहूच्या फौजांस सामील होऊन निजाम उल्मुल्कास तंबी पोहोचविणें' असें प्रयोजन या कागदांत वारंवार नमूद आहे आणि या मदतीबद्दल शाहूनें आपल्या कित्येक मागण्या उगवून घ्यावयाच्या असा मतलब या कागदाचा आहे. पण बाह्यतः निजामास तंबी पोंचवायची अशी भाषा असली तरी, मराठी दरबारची अंतस्थ खटपट

§ शा. रो- ४-८ व १०; पे. द. ३०. ३११.

मुबारीजखानाचा पाडाव करण्याची होती असें स्पष्ट दिसतें. भेटीच्या प्रसंगीं निजामास साह्य करण्याचें वचन बाजीरावानें दिलें होतें, तें त्यानें पार पाडिलें.

पे. द. १०. १ चा कागद या वेळच्या भानगडी उकलण्यास उपयोगी पडतो. स. १७१९ च्या सनदा घाईघाईत कशा तरी आल्या, लागोपाठ दोन तीन बादशहांच्या घालमेली होऊन मोगल दरबारांत निश्चिति उरली नव्हती. तदुत्तर सय्यदांचा पाडाव होऊन महंमदशहाचा जम बसत चालला. सादतखान, अमीनखान, निजाम उल्मुल्क, जयसिंह, अजितसिंह इत्यादि प्रमुख मंडळीची राज्यांत स्थिरता झाली, तेव्हां पुनः आपल्या पूर्वीच्या मागण्या पूर्णपणें कायम करून घ्याव्या, असा प्रयत्न या वेळी मराठ्यांकडून करण्यांत आला. शाहूनें दक्षिण, गुजरात व माळवा या तीनही सधन प्रांताच्या चौथाई व सरदेशमुखीचे हक्क या वेळीं बादशहाकडे मागितले. पांच वर्षांपूर्वीच्या बाळाजीच्या सनदा फक्त दक्षिणेपुरत्या होत्या. 'पेशजीप्रमाणें' म्हणजे पूर्वी ठरल्याप्रमाणें हे शब्द वरील कागदाच्या कित्येक कलमांत आहेत व कित्येकांत नाहींत. यावरून हल्ली नवीन मागण्या कोणत्या केल्या त्याची निश्चिति होते. "चंदीचें राज्य पूर्वी कदीम स्वराज्याचा भाग. हाली मोगलाईत गेलें आहे तें आमचें आम्हांस बहाल करावें. आम्ही दक्षिणची सुभेदारी मुक्रर करून पाठवूं त्याप्रमाणें मोगली सुभा पाठवून द्यावा." हीं कलमें विशेष उल्लक्षणीय आहेत. दक्षिणचा कारभार करणारा सुभेदार शाहूच्या पसंतीनें नेमण्यांत यावा, अशीही रोखठोक मागणी शाहू व बाजीराव यांनीं केली आहे. ज्या सुभ्याशीं मराठ्यांचा हंमेशचा व्यवहार चालणार, तोच जर पदोपदीं आपणास अडवूं लागला तर निभाव कसा लागावा! आम्ही सुचवूं तोच इसम बादशहानें नेमला म्हणजे उभयतांचे व्यवहार सुरळीत चालून प्रांतांत आबादानी नांदेल, अशी मराठ्यांची सूचना होती. बाळाजी विश्वनाथ पेशवाईवर आल्यास दहा वर्षे झालीं. या अवधींत अनेक प्रचंड उलाढाली झाल्या आणि देशांतील निर्नायकी तर कायमच राहिली. तो प्रकार बंद व्हावा म्हणून वरील उपाय मुद्दाम सुचविण्यांत आला. आम्ही मराठे बादशहाच्या ताबेदारींत राहण्यास राजी आहों, पण आमच्या घरांत आम्हांस पूर्ण मुखत्यारपण असलें पाहिजे, हा जो शाहूचा व पेशव्यांचा मुख्य कटाक्ष तो या ठिकाणीं स्पष्टपणें उच्चारलेला दिसतो. कोल्हापुरकर संभाजीशीं दक्षिणच्या सुभ्यानें संधान करूं नये, जंजिरा येथील हबशानें मोगलांचे नांवावर मराठी मुलूख दाबला आहे तो परत

द्यावा, हीं दोन जास्त कलमें तहांत घालून संभाजी व हबशी हे दोन हंमेश अंगास खुपणारे जवळचे कांटे बोथट करण्याची ही मागणी मराठी राज्याला पोषक होती. वरचीं दोनही प्रकरणें आस्ते आस्ते विकोपास जाऊन त्यांचा निकाल शस्त्रबलावर पुढें कसा लावावा लागला तें आपण जाणतों. एकंदरींत निजाम व मुबारीजखान यांच्या झोंबींत आपले मतलब उगवून घेण्याची ही शाहूची व त्याच्या दरबारची शक्कल विचारपूर्वक काढलेली होती हें स्पष्ट कळतें. निजामानें मराठ्यांची पायधरणी करून आपल्या संकटसमयीं त्यांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला, तसा मुबारीजखानानें केलेला दिसत नाही. तो खान इभ्रतीस बळी पडून शेवटीं नाश पावला आणि बाजीराव व निजामयांचाच संबंध कायमचा जडला.

वरील प्रचंड मोगल उमरावांच्या झगड्यांत शाहूला जरी आकाश कोसळल्याप्रमाणें झालें असलें, तरी बाजीरावाला आत्मविश्वासामुळे त्याची क्षिति वाटली नाहीं. ता. १८ मे रोजीं त्याची व निजामाची भेट माळव्यांत झाल्यावर एक महिन्याचे आंत तो पुण्यास आला. ता. २३ जून रोजी शाहू त्यास लिहितो, 'तुम्ही पुण्यास जाऊन राहिलां, राजश्री स्वामीचे दर्शनास साताऱ्यास गेलां नाहीं हें कार्याचें नाही. याउपरी दिवसगत लावूं नये '† पुण्यास तसेंच कांहीं निकडीचें काम असावें. दिल्लींतून बादशहानें निजामाच्या बंडाळीचा सडकून निषेध केला; ता. २७ जुलै रोजी गाजीउद्दिनास दूर करून कमरुद्दीनखानाची नेमणूक वजिरीवर केली आणि निजामाचा संहार करावा असे निकडीचे हुकूम सर्वत्र पाठविले. माळवा प्रांतावर निजामानें आपला हस्तक अजीमुल्ला नेमिला होता त्यास दूर करून बादशहानें गिरिधर बहादूरची पुनः तेथें नेमणूक केली. मराठ्यांशीं लढावें लागेल या बुद्धीनें चांगली तयारी करून गिरिधर बहादूर उज्जनीस ता. २ जून, स. १७२५ रोजीं दाखल झाला. बरोबर त्यानें चुलतबंधु दयाबहादूर यासही आणिलें. माळव्यांत मोगलांचा असा जोर वाढल्यामुळें मराठ्यांनी गुजरातच्या कार्यभागाकडे तूर्त जास्त लक्ष दिलें आणि पालखेडावर निजामास शह दिल्यावर मग माळव्याचा उद्योग पुनरपि हातीं घेतला.

प्रस्तुत प्रसंगीं बाजीरावानें आपल्या सहायकांशीं बलाबलाचा योग्य विचार करून या मोगली युद्धांत कोणत्याच पक्षाचा अवलंब न करितां तटस्थच

† पे. द. १७.२

राहावें असें ठरवून बाजीरावानें सातार्‍यास जाऊन महाराजांची भेट घेतली आणि त्यांची तत्संबंधीं समजूत करून सर्वांनीं एक विचारानें बचावाचें धोरण सांभाळून वागावें असे हुकूम सोडिले. ता. २९ जुलै, स. १७२४ रोजीं शाहूनें कान्होजी भोसल्यास कळविलें, " निजाम उल्मुल्क व शहामतखान यांनीं युद्ध आरंभिलें आहे, तर तुम्ही कोणाकडेही न जाणें. "§ बाजीरावानें मोगल यादवीचा फायदा घेतला. तो चिमाजी आपास लिहितो, 'बर्‍हाणपुरचा अंमल उठला. मोगलांनीं सख्ती केली आहे. तुमची वाट बर्‍हाणपुरावरूनच आहे, तरी तेथील अंमल पहिल्याप्रमाणें सुरळित चालेसा करणें. ठासून अंमल राखावा. गई न करणें. '¶ बर्‍हाणपुर हेंच मोगलांचें दक्षिणेंतलें मुख्य ठाणें तें या वेळी मराठ्यांचे आटोक्यांत आलें.

**८ साखरखेडल्याचें फत्तेखेर्डा.**—मुबारीजखान व निजाम यांची झोंबी निकरावर येत चालली, तिची मुख्य कळ औरंगाबादेवरून दाबली जात होती. ज्याच्या कबजांत तें नाकें, तो हा डाव जिंकणार ही गोष्ट उभय पक्षांस स्पष्ट दिसत होती. ऐवजखान हा हुशार अंमलदार औरंगाबादच्या बंदोबस्तास असून तो आपल्या अंतःकरणाचा ठाव कोणासच लागूं देत नव्हता. मुबारीजखान हा त्याचा निकटवर्ती वरिष्ठ, त्याचीच हुकमत त्याला पाळणें अवश्य होतें. पण त्याचें अंतःकरण निजामाचे पक्षास असून अखेरपर्यंत त्यानें मुबारीजखानास आपला थांग लागूं दिला नाही. खान त्याजवर विसंबून गाफील राहिला.

निजाम चालून येतो हें मुबारीजखानास हैदराबाद येथें कळलें. लगेच त्यास अडविण्यासाठीं मुबारीजखान जंगी तयारी करून उत्तरेकडे पुढें आला, तेव्हां ऐवजखान औरंगाबाद हातचें जाऊं देणार नाहीं अशा समजुतीवर तो पश्चिम बाजूस न वळतां पूर्व बाजूनें सरळ बर्‍हाणपुराकडे चालला. दरम्यान निजामानें त्वरेनें औरंगाबादेस येऊन ता. ११ जून रोजीं त्या राजधानीचा ताबा घेतला, अर्थात् ऐवजखान त्यास सामील झाला. म्हणजे ता. १८ मे ला निजाम धारेजवळ होता तो तीन आठवड्यांत औरंगाबादेस दाखल झाला, एवढी त्याची शिताफी त्यास उपयोगी पडली. स्वतः मुबारीजखान औरंगाबादेस येता तर तेथें त्याची व्यवस्था उत्कृष्ट राहून निजामास वेळेवर तंबी पोंचली असती. या एका

§ शा. रो. २२

¶ पे. द. १०. ३०. या पत्राचा काळ संशयास्पद वाटतो.

चुकीनें मुबारीजखानाचा घात झाला आणि निजामाची बाजू सावरली. निजामानें त्यास लिहिलें, 'असें आपसांत लढणें चांगलें नाहीं; बादशहाचे हुकूम निरर्थक आहेत. माझी नेमणूक दुसरे कोठें झाल्याबरोबर मी दक्षिण सोडून जाईन, परंतु आतांच मला तसें करतां येत नाहीं,' असे अनेक हितवाद निजामानें मुबारीजखानास लिहून कळविले, परंतु ते त्यानें जुमानले नाहींत. त्यास या वेळीं बराच त्वेष चढला असून एकदाचा लढाईनें सोक्षमोक्ष करून घ्यावयाचा त्यानें निश्चय केला. कान्होजी भोसल्यास कांहीं रक्कम चारून त्याची मदत घ्यावी, अशी सल्ला खानास त्याचे स्नेह्यांनीं दिली, पण ती त्यानें मानिली नाही. इकडे निजामानें आपली तयारी करून, मुबारीजखानास दिल्लीहून मदत येत होती ती पोंचण्यापूर्वीच त्यास गांठणें श्रेयस्कर असें ठरवून, बाजीराव व मराठी फौज जमली होती ती बरोबर घेऊन ता. ३ सेप्टेंबर रोजीं औरंगाबादेहून कूच केलें. तेथून पूर्वेस सुमारें ५० मैलांवर पूर्णेच्या कांठीं मेहकर तालुक्यांत साखरखेडलें येथें उभयतांचा सामना सुरू झाला. त्या प्रसंगीं मराठ्यांचें धोरण काय होतें हें समजणें अगत्याचें आहे. बाजीराव एका हस्तकाला ता. ९ सप्टेंबरास लिहितो, "मोगल साखरखेडल्यांत शिरला म्हणोन तुम्ही सांगोन पाठविलें, त्यास झुंजायाची धमक असती तर गांवांत न शिरता. तोंड देईल न दे हा भरंवसा नाहीं. राती बिराती पळायची तजवीज करतील की काय नकळे. तरी तुम्ही खबरदारीनें राहून खबर वरचेवर पाठवीत जाणें. आम्ही आजी नबाबास सांगोन येथेंच मुकाम करविला. काल रात्री रंभाजी निंबाळकराकडे कांहीं मराठे आले म्हणून ऐकिलें, तर सत्यमिथ्या लिहून पाठविणें." §

उपरांत छ २३ मोहरम, ता. ३० सेप्टेंबर रोजीं दोघां मोगल पक्षांचें तुंबळ युद्ध झालें. मुबारीजखानानें लढण्याची पराकाष्ठा केली. कर्नूळचा नबाब इब्राहीमखान पन्नी ( दाऊदखान पन्नीचा भाऊ ) ऊर्फ बहादूरखान, आरकाटचा नबाब सादुल्लाखान व कडाप्पाचा नबाब अबुल फत्तेखान हे सर्व प्रांतिक अधिकारी मुबारीजखानाचे साह्यास आले होते. ¶ खुद्द तो व त्याचे दोन मुलगे मारले गेले. फौजेचा मोठा संहार झाला. अठरा हत्ती व सामान निजामास मिळालें. "स्वामीच्या दैवयोगानें आम्ही हा बंडवाला मारला," असें पत्र लिहून निजामानें खानाचें शीर बादशहाकडे पाठवून दिलें; आणि

§ पे. द. ३०.३४. ¶ Dr. Khan's Nizam-ul-mulk, p. 156.

ज्या ठिकाणीं लढाई झाली त्या गांवास फत्तेखेडा असें नवीन नांव दिलें तेंच हल्ली चालतें.

या लढाईत मराठ्यांनी भाग घेतला कीं नाहीं हा महत्त्वाचा प्रश्न आहे. दाभाडे, कान्होजी भोसले, बाजीराव वगैरे प्रमुख सरदार जवळ हजर होते. खुद्द शाहूची आज्ञा कोणत्याच बाजूस सामील होऊं नये अशी होती. मात्र उभय पक्षांकडून बोलावणें आलेले त्यास उघड नाकारणें शक्य नव्हतें. प्रसंगी बादशहास मदत करणें या मुख्य अटीवरच शाहूचें एकंदर अस्तित्व अवलंबून होतें. पण दोघां प्रतिष्ठित सरदारांचें झुंज सुरू झालें म्हणजे त्रयस्थांची उगाच त्रेधा उडते तसा प्रकार या वेळी मराठ्यांचा झाला. खुद्द बाजीरावाचा ओढा निजामाकडे होता; कारण मुबारीजखानानें स्वतःच्या घमेंडीत राहून मराठे सरदारांना कैक वर्षे त्रस्त करून सोडलें होतें. कान्होजी भोसल्याचा तर खानानें पुष्कळच नाश केला. बाजीराव पेशव्याच्या हाताखालील मराठी फौजांनी कौशल्याच्या हालचाली करून खानास साखरखेडल्यांत कोंडलें आणि नंतर निजामाच्या सैन्यानें त्याचा फन्ना उडवला. शाहूचें धोरण मात्र मराठ्यांनीं तटस्थता राखावी असें होतें.

"छ २३ मोहोरम आश्विन व० ११ मुक्काम साखरखेडलें येथें युद्ध होऊन मुबारीजखान मोडला, त्यात पथके जखमी जाले," त्यांच्या निगेचा खर्च दाखल असून राणोजी सिंद्यास रुपये दहा व राणोजी भोसल्यास रुपये आठ दिलेले आढळतात. ‡ बाजीरावाचे तैनातीस निजामानें आपला भरंवशाचा सरदार तुरुकताजखान यास नेमून दिलें होतें. 'सरकारचा चाकर बाबाखान अमानतखानाचे युद्धीं ठार झाला त्याचे मुलास शाहूनें इनाम दिलें. § मुबारीजखानाचे नोकरींत सिंदखेडकर जगदेवरावाचा पुत्र रघूजी जाधव होता तो युद्धांत पडला, त्या संबंधानें शाहूनें ता. ५ नोव्हेंबर, स. १७२४ रोजीं बाजीरावास लिहिलें, "राघोजीराव देशमुख सुभा दौलताबाद हे मुबारजखानाचे युद्धीं पडले त्यांचे पुत्र मानसिंग आमचे भाचे होत. त्यांचें अगत्य आम्हांस आहे, तरी तुम्ही नबाबांस विनंती करून त्याचे बापाची मनसब जागीर त्यास बहाल होऊन त्याची उभारणी होय ती गोष्ट करणें." मानसिंगाची आई अंबिकाबाई राजारामछत्रपतीची मुलगी. शाहूनें मानसिंगाचा

‡ पे. द. ३० पृ. २७०. § इ. स. पे. द. पृ. २०.

प्रतिपाळ केला, तो पुढें ताराबाईजवळ साताऱ्यास असे. व्यक्ति मोठी विचित्र असून पेशव्यांचा विरोध करी.§ भुइंजकर रायाजी जाधव याचा आप्त असावा. नीलकंठराव जाधव यास निजामानें कैद केल्याचा उल्लेख शा. रो. १७ मध्यें आहे तो कोण कोणाचा याचा पत्ता लागत नाहीं.

निजामाचा स्वभाव व व्यावहारिक बुद्धि या संग्रामाचे उपसंहारांत चांगली निदर्शनास आली. मुबारीजखानाचा पुत्र, जनानखाना व साह्यकर्ते यांस त्यानें प्रेमाने वागवून त्याचा लोभ संपादिला. रणभूमीवर पडलेल्यास मूठमाती यथायोग्य देऊन नंतर तीन चार दिवसांनीं औरंगाबादेस जाऊन त्यानें पुढील व्यवस्था लाविली. तेथें बाजीरावास अगत्यानें बोलावून त्याची भेट घेतली आणि त्याचा योग्य सत्कार केला. या वेळीं त्यानें बाजीरावास सप्त-हजारी मनसब व जाततनखा सात हजार ठरवून आणि हत्ती, पोषाख व मोलवान वस्तु नजर देऊन संतोषानें रवानगी केली. असे किताब व बहुमान आपल्या मुसलमान सहायकांस व रावरंभा वगैरे पदरच्या मराठे सरदारांसही त्यानें दिले.

मुबारीजखानासारखा बलाढ्य उमराव धुळीस मिळविल्यानें निजामाची छाप सर्वत्र चांगली बसली. इतउत्तर आपण सर्वथा स्वतंत्र सत्ताधीश आहों अशा बाण्यानें तो व्यवहारात वागूं लागला. मात्र शब्दांत, लेखात किंवा औपचारिक बाबतीत बादशहाचे स्वामित्व त्यानें उघड अमान्य केलें नाहीं. दक्षिणच्या सहा सुभ्यांचा तो संपूर्ण मालक बनला. इकडील कारभारासंबंधी त्यानें दिल्लीकडे विचारणा कधीं केली नाहीं. युद्ध किंवा तह करणें, बहुमान व किताब देणें हे बादशाही अधिकार त्यानें स्वतः स्वीकारले. प्रांताचा वसूल जमा करून त्याचा हिशेब त्यानें बादशहाकडे कधीं गुदरला नाहीं. हे प्रकार त्याच्या स्वतंत्र सत्तेचे निदर्शक होत. प्रत्यक्ष सिंहासन किंवा छत्र त्यानें धारण केलें नाहीं की स्वतःचें स्वतंत्र नाणें पाडिलें नाहीं. जुम्मेच्या दिवशीं खुत्बा पढण्यात त्यानें बादशहाचे नांवाचा उच्चार कायम ठेविला. आपण बादशहाचे ताबेदार ही भाषा कधीं सोडिली नाहीं. ही राजकारणी धूर्तता परिणामास आली.

मराठ्यांचा मात्र इतउत्तर दक्षिण प्रांताचा सर्व संबंध निजामाशीं जडला, एवढ्यापुरती फत्तेखेड्यांची लढाई क्रान्तिकारक समजली जाते. मोगल बादशाहीतून फुटून बाहेर पडणारा पहिला उमराव हा निजाम होय. अयोध्येचा

§ ऐ. प. ८ व ४३६, पे. द. १७३०.

वजीर व मुर्शिदाबादचा अलीवर्दीखान वगैरे सुभेदार पुढें पुष्कळ वर्षांनीं इंग्रजांच्या साह्यानें स्वतंत्र बनले. स्वतंत्रतेसंबंधानें कोणी पृच्छा केली असतां निजाम सांगे, "छत्रसिंहासनें ज्यांची आहेत त्यांनाच तीं लखलाभ होवोत. एक अंगी पराक्रम आहे तो माझा. तो असल्यावर छत्रसिंहासनाची मला गरज काय !"

निजाम मोठा कार्यसाधु होता. त्याच्या स्वभावांत कठोर पाणी नव्हतें. बादशहास सौम्य पत्रें लिहून त्याचा रोष त्यानें हलके हलके दूर केला. होऊन गेलेला प्रकार बदलतां येत नाहीं, मग द्वेष वाढविण्यांत तरी मुद्दा काय अशी समजूत घेऊन बादशहानें देखील निजामाचे अपराध माफ केले आणि त्यास असोफजा असा नवीन किताब देऊन आणि माळवा व गुजरात हे प्रांत त्याजकडून काढून फक्त दक्षिणच्या कारभारावर नेमणूक कायम केली. या नेमणुकीचें फर्मान पुढें यथावकाश ता. २० जून, स. १७२५ रोजीं दाखल झालें, त्याचा निजामानें आदरपूर्वक स्वीकार केला. त्याचें अंतःकरण निश्चित झालें. तापीच्या उत्तरेस त्याचा अंमल राहिला नाहीं.

महिना पंधरा दिवस औरंगाबादची व्यवस्था लावून निजाम हैदराबादेस जाण्यास निघाला, तो स. १७२५ च्या जानेवारींत तेथें पोंचला. त्या वेळीं गोवळकोंड्याचें महत्त्व विशेष होतें. महत्त्वाचें वित्त व सामान या मजबूद किल्ल्यावर होतें, तें सर्व तेथील अंमलदारांस भरपूर द्रव्य देऊन निजामानें आपले कबजांत घेतलें. या वेळेपासूनच हैदराबाद ही निजामाची राजधानी बनली. अन्वरुद्दीनखान नांवाचा एक हुशार परदेशी गृहस्थ दिल्लीस निजामाचे मर्जीतला होता, तो या वेळीं नोकरीसाठीं दक्षिणेंत आला, त्यास निजामानें आपले जवळ हैदराबादचे बंदोबस्तास नेमिलें. हाच पुढें कर्नाटकचा नवाब म्हणून प्रसिद्धीस आला. निजामाच्या कायमपणाचा एक परिणाम असा झाला की, पूर्वी दक्षिणचे अंमलदार वरचेवर बदलत गेल्यामुळें, कलह, बंडें, लढाया इत्यादिकांची दंगल माजली होती तो प्रकार आतां बदलला. सगळे सहा सुभे एकाच्या मालकींत आले, त्यामुळें कारभारास एकसूत्रता आली. मराठ्यांनाही इतउत्तर आपलें धोरण निजामाची मालकी संभाळून ठरवावें लागलें, त्यामुळें कर्नाटकीय कारस्थानांस रंग चढला, आणि उत्तरेंतून निजामाला साह्य मिळूं नये म्हणून माळव्यांत आपला पाया दृढ करणें बाजीरावास क्रमप्राप्त झालें.

कर्नाटकीय कारस्थानास रंग चढला म्हणून वर म्हटलें त्याचें प्रत्यंतर देणारी चिमाजी आपाच्या हातची एक याद उपलब्ध आहे.‡ साखरखेडल्याच्या लढाईनंतर आठ दिवसांनीं हा कागद बाजीरावास पोंचला. बाजीराव व निजाम यांची भेट होईल तेव्हां काय गोष्टी बोलून ठेवाव्या त्यांची सूचना या कागदांत बाजीरावास केलेली आहे. यादींत बरीच कलमें असून त्यांत कर्नाटक स्वारीसंबंधानें कांहीं महत्त्वाची सूचना आहे. निजामानें आपल्याबरोबर बाजीरावासच कर्नाटकांत फौजेसह पाठवावें अशी मागणी शाहूकडे करण्याची चिमाजीची सूचना आहे. कदाचित् निजाम स्वतः कर्नाटकात न जातां ऐवजखान गेला तरी त्याजबरोबरही बाजीरावासच मागून घ्यावें, निजाम कर्नाटकांत अंमल बसविण्यास जाईल त्या वेळीं बाजीरावानेंही बरोबर जाऊन आपआपले हक्क उगवावें, म्हणजे पुणे प्रांतासारख्या भानगडी तिकडे उरणार नाहींत, असा सूचनेचा अर्थ दिसतो. बाजीरावानें उत्तरेकडे वावरावें, दक्षिणेकडे फत्तेसिंग, प्रतिनिधि वगैरे जातील असा शाहूचा कटाक्ष होता. परंतु निजामानेंच बाजीरावाची मागणी केली म्हणजे शाहूला ती अमान्य करितां येणार नाहीं, असा हा घाट होता. पेशव्याची नजर व हुकमत सर्व राज्यांत सारखी चालावी त्याचें कार्यक्षेत्र विभागलेलें नसावें, अशी व्यवस्था घडवून आणण्याची ही खटपट होती. याच धोरणानुसार पुढें स. १७२५ व १७२६ या दोन सालात बाजीराव कर्नाटकचे स्वारीस गेला. एवंच निजाम व बाजीराव यांचा कायम वावर इतउत्तर एका क्षेत्रात उद्भवला हें परिवर्तन इतिहासांत संस्मरणीय बनलें.

‡ पुरंदरे दप्तर भाग १ ले. ७७

# ३

# कर्नाटकीय अंकुरास खतपाणी

## कालसूची

| | |
|---|---|
| १७०२–१७३२ | बसवलिंग नाईक सोंधेकर. |
| १७०८–३२ | सादतुल्लाखान कर्नाटकचा सुभेदार. |
| १७१४–३१ | दोड्ड कृष्णराज श्रीरंगपट्टणचा राजा. |
| १७१४–२६ | हैबतराव निंबाळकर सरलष्करीवर. |
| १७२५ फेब्रु० २८ | निजामाचा वकील बाजीरावाकडे. |
| ,, एप्रि० ८ | प्रतिनिधीकडून अमात्याचा पराभव पन्हाळयावर. |
| ,, ऑग० २३ | नीलकंठराव जाधवास सोडविण्याची शाहूची आज्ञा. |
| ,, डिसें० २३ | त्रिंबकराव दाभाडे बाजीरावास सामील. |
| १७२६ फेब्रु० २१ | सोंधेकराचा बचाव करण्याची शाहूची आज्ञा. |
| १७२५ नोव्हें०—मे | १७२६ बाजीरावाची चित्रदुर्ग–स्वारी. |
| १७२६ ,,—एप्रि. | १७२७ ,, श्रीरंगपट्टण–स्वारी, खंडेराव दाभाडे हजर. महामारीनें मराठी फौजांचे हाल. |
| १७२६ उन्हाळा | निजामाची स्वारी कर्नाटकांत. |
| १७२६ नोव्हें० १९ | सुलतानजी निंबाळकराची सरलष्करी काढली. |
| १७२७ मार्च ४ | बाजीरावाचा मुक्काम श्रीरंगपट्टणास. |
| १७२७ सेप्टें० २९ | सिधोजी निंबाळकर सरलष्करीवर. |
| १७३० | मुरारराव घोरपड्याची साताऱ्यास शाहूशी भेट; हा दोनही कर्नाटक-स्वाऱ्यांत बाजीरावाबरोबर होता. |

# ३

# कर्नाटकीय अंकुरास खतपाणी

**१ प्रयोजन  २ चित्रदुर्गची स्वारी  ३ श्रीरंगपट्टणची स्वारी**

**प्रयोजन**—कर्नाटकीय प्रदेशाची अंतर्गत राजकीय परिस्थिति त्या वेळीं कशी होती तें वाचकांचे निदर्शनास आणले पाहिजे. श्रीरंगपट्टण येथें दोड्ड कृष्णराज वोडियार राज्य करीत असून त्याची कारकीर्द म. १७१४ ते १७३१ पर्यंत चालली. हे वोडियार मूळचे विजयनगर साम्राज्याचे म्हैसूर प्रांताचे अधिकारी उत्तरोत्तर स्वतंत्र झाले. त्यांचेच वंशज हल्लीं म्हैसुरास राज्य करीत आहेत. दोड्ड कृष्णराजाची सत्ता फारशी विस्तृत नव्हती. कर्नाटकाचे दोन मुख्य भाग बालाघाट व पाईनघाट ‡ या नावाचे अनुक्रमें मध्योत्तर व पूर्वेकडील प्रदेशाचे त्या वेळीं लोकभाषेंत प्रचलित होते. पूर्वी हा सर्वच प्रदेश विजयनगरचा होता, पुढें त्यातले कांहीं भाग विजापूर व गोवळकोंडा या सुलतानांनीं जिंकले आणि कांहीं भाग शिवाजी व त्याचा बंधु एकोजी यांचे ताब्यांत राहिले. औरंगजेबानें विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें जिंकलीं तेव्हां या दाक्षिणात्य प्रदेशावर त्या बादशहाची सत्ता उत्पन्न झाली. पण मराठ्यांनीं व मुख्यतः संताजी घोरपड्याच्या कुटुंबानें बादशहाला दाद न देतां प्रचंड झगडा करून बराचसा कर्नाटकीय प्रदेश आपल्या हुकमतीखालीं आणिला. औरंगजेबाच्या मृत्युनंतर शाहूला छत्रपतिपद मिळालें, तेव्हा त्यानेंही आपल्या तंजावरकर बंधूची आठवण ठेवून शंकराजी महाडिकास त्या बाजूचा उद्योग सांगितला. संताजीचा बंधु बहिरजी हिंदुराव घोरपडे व बहिरजीचा पुत्र सिधोजी यांनीं स्वतःच्या हिमतीवर पण छत्रपतीच्या नांवानें कर्नाटकांत आपली सत्ता स्थापून गुत्ती येथें आपलें मुख्य ठाणें बनविलें. सोंधें संस्थानचे कागद छापलेले

‡ बाला = वरचा, उच; व पाईन म्हणजे खालचा, सखल; हे शब्द हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं वापरण्यांत येतात. म्हैसूर संस्थानचा उत्तरेकडचा भाग उच आहे त्यास बालाघाट (म्ह० टेबल लॅंड) म्हणत; मद्रास इलाख्याचा समुद्रकिनाऱ्याकडील उतरता भाग पाईनघाटांत मोडतो.

पाहतां वरील प्रकार व्यक्त होतो. शाहू व संभाजी यांजमध्ये दुही उत्पन्न झाली नसती, तर घोरपड्यांच्या उद्योगास संपूर्ण मराठशाहीचें पाठबळ मिळून कर्नाटक प्रांतांत मुसलमानी सत्ता शिल्लक राहिली नसती.§

पण घोरपड्यांना दाबून टाकण्यास झुल्फिकारखान, दाऊदखान पन्नी व मुबारीजखान वगैरे कित्येक हुशार मोगल सुभेदार समर्थ झाले. बहादूरशहा स. १७०८ साली कामबक्षावर चालून आला, त्या वेळीं त्यानें दाऊदखान पन्नीस कर्नाटकांतून आपले मदतीस महाराष्ट्रांत आणिलें. दाऊदखानानें निघतेसमयीं कर्नाटकचा कारभार सादतुल्लाखान या हुशार अंमलदारावर सोपिला. सादतुल्ला शूर, दक्ष व नेकीचा गृहस्थ होता. त्यानें घोरपड्यांना व इतर सत्ताधीशांना जरबेंत ठेवून मुसलमानी सत्ता दृढ केली. बालाघाट व पाईनघाट याच्या मध्यभागीं आर्काट हें सोयीचें ठिकाण पाहून तेथें त्यानें कायमचें वास्तव्य केलें, तेणेंकरून कर्नाटकच्या नबाबांची राजधानी म्हणून आर्काटची प्रसिद्धि पुढें इतिहासांत झाली. स. १७३२ त सादतुल्ला मरण पावला, त्यानंतर नबाबाची सत्ता ओसरूं लागली.

सादतुल्लाच्या हुकमतींत कडाप्पा, कर्नूळ, शिरें, सावनूर अशा कित्येक ठिकाणीं दुय्यम नबाब कामावर होते, ते आपापल्या टापूंत पिढीजाद बनले. साखरखेडल्याच्या संग्रामांत हे नबाब मुबारीजखानाचे साह्यास हजर असल्याचें मागें सांगितलें आहे. अशा कित्येक नबाबांशीं पुढें मराठ्यांचे व्यवहार घडले. स. १७१९ च्या बादशाही सनदांनीं मोगल प्रदेशावर चौथाईचे हक्क मराठ्यांस प्राप्त झाले, त्यांची बजावणी करण्याचें काम बाजीरावानें स्वीकारिलें. शिवाजीच्या मनोरथांतील हिंदुपदपातशाहीचा हा उद्देश परंपरेनें आतां शाहूनें धारण केला. निजाम व बाजीराव यांनीं एक विचारानें वागून उभय पक्षांचें हित सांभाळावें अशी शाहूची सालस इच्छा होती.

मिळून स. १७२५ त कर्नाटक-स्वारी उद्भवली त्या वेळीं आर्काटकर सादतुल्लाखान व त्याच्या हुकमतींतले वर सांगितलेले स्थानिक नबाब हे मुसलमान पक्षांत व श्रीरंगपट्टणकर वोडियार, तंजावरकर भोसले राजे शरफोजी व गुत्तीकर घोरपडे हिंदुपक्षांत, अशांची आपापसांत झोंबाझोंबी चालू असतां, त्या सर्वांवर छत्रपतींचा नक्ष बसविण्याकरितां आणि त्या कामीं

§ शि. च. सा. ख. ३ ले. ४८०–४९०

निजामाचें अग्रेसरत्व मोडून काढण्याकरितां शाहूनें तिकडे आपले सरदार रवाना केले. वरील सर्वच हिंदूंकडे शाहूचा ओढा सारखा नव्हता. तंजावरकराबद्दल त्याला प्रेम होतें तसें श्रीरंगपट्टणकराबद्दल नव्हतें. दुसऱ्या स्वारीत बाजीरावानें श्रीरंगपट्टणकरास रगडून काढिलें.

तंजावरास शरफोजी राज्य करीत असतां त्याला आर्काटकर सादतुल्लाखानानें अतिशय छळलें, तेव्हां त्यानें शाहूची करुणा भाकली. कोप्पळ, कर्नूळ, कडाप्पा, तिरुपति, व्यंकटागिरि , वेलूर, आर्काट, जिंजी हीं तंजावरला जोडणारी स्थळें शिवाजीनेंच कबजांत आणली असून पुढें सत्तावीस वर्षे मराठ्यांनीं औरंगजेबाशी झगडून ही प्रदेशशृंखला हाताखाली घातली, ती टिकविणें, तिकडे आपली सत्ता दृढ व ताजी करणें, ठिकठिकाणच्या पुंडपाळेगारांना जरबेत आणून मराठी सत्तेचा फैलाव थेट दक्षिणेपर्यंत करणें, शिवाजीमहाराजांनी रुजविलेल्यां हिंदुपदपातशाहीच्या बीजास खतपाणी घालून वाढविणें, हे मुख्य उद्देश साधण्यासाठी शाहूनें कर्नाटकात फौजा पाठविण्याचें ठरविलें. वडिलांचे उद्देश सिद्धीस नेणें एकप्रकारचें पवित्र कर्तव्य शाहूला वाटत होतें म्हणून त्यानें या स्वारीची निकड केली. उगाच असंबद्ध रीतीनें कोणतीही गोष्ट व्यवहारात घडत नसते. स. १७२५ त खुद्द निजाम त्या बाजूस जाण्याच्या तयारीस लागला, म्हणून शाहूनें विशेष त्वरा केली. मात्र निजाम या वेळी कर्नाटकांत का उतरूं शकला नाही किंवा जो सहकार त्या उद्योगात मराठे त्याजकडे मागत होते तो देण्याची त्याची इच्छाच नव्हती, हा प्रकार पुढें व्यक्त होईल.

**२ चित्रदुर्गची स्वारी.**—कर्नाटकांत या वेळी मराठ्यांच्या दोन स्वाऱ्या झाल्या. पहिली नोव्हेंबर स. १७२५ पासून मे स. १७२६ पर्यंतची, हिला चित्रदुर्गची स्वारी असे नांव तत्कालीन लेखकांनी दिलें आहे. दुसरी नोव्हेंबर स. १७२६ पासून एप्रिल स. १७२७ पर्यंतची, हिला श्रीरंगपट्टणची स्वारी म्हणतात.

भागानगरचा सुभा फत्तेसिंग भोसल्यास देऊन त्याची हुकमत या दक्षिणप्रदेशावर बसवावी या विचारानें त्यालाच शाहूनें स्वारीचें आधिपत्य दिलें. स. १७२५ च्या आरंभी हा विचार कसा चालू झाला तें तत्कालीन कागदांत पाहावयास मिळतें. ता. २७ मार्च, स. १७२५ रोजीं फत्तेसिंगानें आपल्या हस्तकास कळविलें, "प्रधानपंत व निजाम उल्मुल्क कदाचित् दक्षिणप्रांतें जावयाचा विचार करतील तर ते कांहीं आपल्या चौथाईचा तह केल्यावेगळे

जाणार नाहीत. तरी तुमचा त्यांचा बनाव होऊन उस्तवारी होय, चार टके मिळत ते गोष्ट करणें. आपले अकलेस दगा न होय तें करणें." † बाजीराव व निजाम यांचें संगनमत झालेलें त्या वेळी जाहीर होतें. त्यांनी चौथाईची वांटणी कशी करण्याचा विचार ठरविला ती खबर फत्तेसिंगास नसल्यामुळें परभारें ते कार्यभाग उरकून आपलें नुकसान करतील ही भीति वर फत्तेसिंगानें बोलून दाखविलेली दिसते. कारण स. १७२५च्या आरंभी कर्नाटकसंबंधीं बोलणें करण्यासाटीं निजामानें नरसो कुसाजी नांवाचा पेशव्याचा वकील जवळ होता त्यास पेशव्याचे भेटीस पाठविलें. ता. २८ फेब्रुवारी, स. १७२५च्या पत्रांत नरसो कुसाजी चिमाजी आपास विचारतो, 'आपणास नबाबसाहेबी स्वामीच्या दर्शनास पाठविलें आहे. चाकणेस आलों. आपली व प्रधानपंतांची भेट केव्हा कोठें होईल तें कळवावें. भेटीनंतर वर्तमान कळों येईल.' ¶

निजामाची सूचना काय होती ती आपणास ठाऊक नाही. मात्र कोल्हापुरच्या संभाजीस शाहूविरुद्ध उठविण्याचा प्रकार त्यानें स. १७२५ त सुरू केलेला दिसतो. भगवंत रामचंद्र अमात्य या वेळी संभाजीचे तर्फेनें निजामाकडे खटपट करीत होता. प्रतिनिधीचा हस्तक जगजीवन गोविंद पन्हाळगडाकडे असतां त्याजवर भगवंतरावानें किल्ल्यावरून उतरून हल्ला केला दोघांचें झुंज होऊन जगजीवन गोविंदानें अमात्याचा पराभव केला, आणि पन्हाळ्याचा सरनोबत गोरखोजी यादव यास पकडून आणिलें. या पराक्रमाबद्दल शाहूनें ता ८ एप्रिल स १७२५ रोजी जगजीवन गोविंद यास वस्त्रें पाठवून गौरव केला.§ यावरून स्पष्ट होतें कीं निजामाचा उद्देश मराठ्यांशी कोणत्याही प्रकारें तडजोडीनें व सामोपचारानें वागण्याचा नसून उलट संभाजीला हाताशी धरून शाहूला पेचांत आणण्याचा जो उघड खटाटोप त्यानें पुढें केला, त्याची सुरुवात स. १७२५ च्या आरंभी वर सांगितल्याप्रमाणें त्यानें भगवंतराव अमात्याचे मार्फत केलेली दिसते.

निजामाचा उठावा उत्तरोत्तर वाढतच गेला. शाहूचा सरदार नीलकंठराव जाधव याजवर निजामानें हल्ला करून पकडून कैदेंत ठेविलें, त्यास सोडवून आणण्याबद्दल शाहूनें ता. २३ ऑगस्ट, स. १७२५ रोजीं आज्ञा केली, ‡ ही

† पे. द. ३०.३६. ¶ पे. द. ३०. ३७ § पे. द. ३०. ३५७ ‡ शा. रो. २७

आणखी एक निजामाच्या विरोधाची आगळीक लक्षांत घेतां उभयतांच्या सहकाराचा मेळ जमला नाहीं हें स्पष्ट होतें. तथापि निजामानें आपल्या अंतःकरणाचा टाव कोणासच लागूं दिला नाहीं, तेव्हां स. १७२५ च्या दरम्यान कर्नाटकांत स्वारी पाठविण्याचा निश्चय शाहूनें ठरविला, आणि प्रतिनिधि, खंडेराव दाभाडे, सुल्तानजी निंबाळकर सरलष्कर या सरदारांस फत्तेसिंग भोसल्याचे हाताखाली सामील होण्याचे हुकूम सोडिले.§ निजामानें या स्वारीस व्यत्यय करूं नये म्हणून शाहूनें बाजीराव व पिलाजी जाधव यांस त्याचे समजुतीसाठीं जाण्याचा हुकूम केला, त्या संबंधानें ता. २५ नोव्हेंबर, स. १७२५ रोजी बाजीरावानें खालील पत्र शाहूस लिहिलें.

'स्वामींनी फौजा जमा केल्या, पंढरपुरच्या रोखें येतात ही खबर निजामास पावेलच. तेही विचारांत पडतील. स्वामींशी बिघडतात असे नाही, व आम्ही होऊन नबाबाशीं विरुद्ध करूं हें सहसा होणें नाही. हा कालपर्यंत आम्ही नबाबास पत्र लिहिलें नाहीं. स्वामी तिकडून लिहिणें ते लिहितात, आमच्या व आपल्या लिहिण्यास द्वैत पडेल म्हणून लिहिलें नाही. प्रस्तुत नबाबास ल्याहावयाचा मजकूर स्वामींनी कळविला आहे, त्या अन्वयेंच लिहितों. स्वामींनीं कोणेविशी चिंता न करावी. स्वामीचे पुण्यप्रतापेंकरून जें होणें तें उत्तमच होईल. इकडे मनसुब्याचे नेट पडावे, असा नूर मात्र जाहला आहे.' †

बाजीरावानें मुद्दाम कुरापत काढून निजामास दुखवूं नये अशी शाहूची इच्छा होती ती बाजीरावाने मान्य केली आणि मनसुब्यानेंच लागेल तेवढा नेट लावूं असें त्यानें शाहूस कळविलें. स्वारीत बाजीरावास पाठविण्याचा शाहूचा पहिला उद्देश नव्हता. दक्षिणच्या कामगिरीत बाजीरावाचा हात न ठेवतां फत्तेसिंगाचें महत्त्व राखावें अशी शाहूची इच्छा होती. पण बाजीरावाशिवाय सरदार पुढें पाऊल टाकीत नाहीत आणि मनसबा विसकटणार असा प्रकार दिसूं लागल्यामुळें, शाहूनें मागाहून आग्रह करून बाजीरावास स्वारीबरोबर पाठविलें. थोडेंबहुत यश स्वारीत आलें तें बाजीरावामुळेंच होय.

खंडेराव दाभाडे सेनापति वार्धक्यानें जर्जर व नव्या मनूच्या तीव्र कामगिरीस नालायक बनत चालला होता. मुख्यतः बाजीरावानें स्वतःच शिपाईगिरी नेटानें चालविल्यामुळें खरा सेनापति मागें पडला. शाहूच्याही मनांतून

§ शा. रो. १४, १५७ † रा. ख. ६. २२

तो पुष्कळसा उतरला असून त्या संबंधानें कैक वर्षे त्याच्या तक्रारी शाहूकडे चालू होत्या. त्याचे पुढील उद्गार या वृत्तीचे निदर्शक आहेत. "समुद्रवलयांकित पृथ्वी धण्याची, धण्यानें जें ज्यास दिलें तें सर्वत्र चालावें आणि सेवकास दिलें तें मात्र न चालावें, असा सेनापतिपदाचे ठायीं अपराध कोणता हे कळत नाहीं. कदाचित् पदाचे ठायीं अपराध असला तर, आम्ही सेवक निरपराधी असतां अपराधी पदाचे योगें सेवकानें अपराधी व्हावें यांत विशेष काय ? सबब पूर्वीपासून सेवकावर धण्याची कृपा अनुपम आहे तेणें प्रमाणें कृपावलोकनानें सेनापतीचे ठायीं अपराध असेल तो दूर करून निरपराधी सेवकास निरपराध पदीं स्थापना करून सेवा घेणार महाराज धणी समर्थ आहेत." ‡ हें सर्वच पत्र वाचण्यालायक असून सेनापतिपदाचा कारभार आपल्याकडून यजमानास समाधानकारक होत नाहीं अशी खंडेरावाची कबुली त्यांत व्यक्त होते. दिल्लीच्या स्वारीहून आल्यावर खंडेरावाची ठळक कामगिरी कांहींच दिसून आली नाहीं. बाजीरावाची देखील त्यानें परोपरी आळवणूक केलेली आढळते.

प्रस्तुत कर्नाटकचे स्वारीत जाण्याची शाहूनें खंडेरावास आज्ञा केली त्यावर चार हजार फौजेनिशीं त्यानें आपला पुत्र त्रिंबकराव सेनाखासखेल यास प्रतिनिधीकडे रवाना केलें, ती गोष्ट मान्य केल्याचा जबाब शाहूनें ता. २३ डिसेंबर स. १७२५ रोजीं खंडेरावास पाठविला.† त्रिंबकराव व बाजीराव बहुधा समवयस्क, दोघेही तडफदार व आपापल्या पदाचे अभिमानी असल्यामुळें या स्वारींत त्यांचें विशेष पटल्याचें दिसत नाहीं. उलट बेबनाव उत्पन्न होऊन तो उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेला. मिळून डिसेंबरअखेर मराठ्यांच्या फौजा दक्षिणची वाट चालूं लागल्या. खुद्द निजाम जरी कर्नाटकांत गेला नाहीं तरी त्याचे कांहीं सरदार व फौज मराठ्यांबरोबर होती. एकंदर सुमारें पन्नास हजार मराठ्यांचा जमाव झाला. संताजी घोरपडे पुरातन सेनापति, त्याचे पुत्र राणोजी व पिराजी संभाजीकडे राहिले. पिराजी व मुरारराव गुत्तीचें संस्थान रक्षून होते, त्यांस शाहूमहाराजांनीं लिहिलें, स्वारींत येऊन सेवा करून दाखवावी. त्यावरून तेही फत्तेसिंग याजबरोबर कर्नाटकांत गेले. महाराजांनीं फत्तेसिंगास शरफोजीराजे यांचे भेटीस तंजावरास पाठविलें. ¶

‡ पे. द. १२.५,८ † पे. द. ३० पृ. २७६ ¶ रा. खं. २ पृ. ५३.

निजामाच्या सरहद्दीवरून विजापुर, गुलबर्गा, गलगलें, कोप्पळ मार्गानें चित्रदुर्गपावेतों फौजा गेल्या. हयग्रीवा नदीवर सुमारें पाऊण महिना फौजांचा मुक्काम झाला. निघाल्यापासून दोन महिने होऊन गेले तरी शाहूला कांही खबर कळली नाही म्हणून तो अस्वस्थ झाला. प्रतिनिधि, बाजीराव, सरलष्कर, त्रिंबकराव दाभाडे या सर्वांस त्यानें ता. २१ मार्च रोजी खरमरित पत्रें लिहिलीं कीं 'तुम्हीं सर्व कुलअखत्यारी सेवक, कोठपर्यंत गेलां, काय मनसुबा करितां हें गेल्यादारभ्य कळविलें नाहीं यावरून अपूर्व भासतें, तरी दिनप्रतिदिनीं स्वामींस कळवीत जावें." ¶ "फौजांनी जाऊन तुंबलेल्या खंडण्या वसूल केल्या, साल्याबाद पुढें घेण्याचा ठराव केला. हुजूरची ठाणी गेली होतीं ती सोडविली. ज्यानी मगरुरी केली त्यांस जरब दिली," अशी या स्वारीची कामगिरी चिटणिसानें वर्णिलेली आढळते.

पूर्वेस चित्रदुर्गापासून पश्चिमेस सोंधें-बिदनूरपर्यंत या स्वारीचा क्षेत्रविस्तार दिसतो. सोंध्यावर मराठी फौजांनी चाल केली तेव्हां तेथील राजानें शाहूकडे वकील पाठवून शरणागति कळविली, त्यावरून शाहूनें ता. २१ फेब्रुवारी, स. १७२६ रोजी बाजीराव व प्रतिनिधि यांस आज्ञा लिहिली ती अशी, 'सोंधेकर पुरातन, त्यांजवर चोहोंकडून कसाला जाला, त्यामुळे श्रमी आहेत, स्वामीचे टायीं अकृत्रिम हेत धरतात, त्यांचे चालवणें स्वामींस अवश्य. या निमित्त बोली करावयासाठी हुजरून गोपाळराम पाठविले आहेत, ते बोली करतील, तदनुरूप निर्वाह [illegible] खंडणीचा भाग वारून घेऊन संस्थान संरक्षण करणें.' § अर्थात् सोंधेकराच्या वाटेस मराठे गेले नाहीत. राजारामाच्या वेळेस सोंधेकर सदाशिव नाईक यानें मराठ्यांचा आश्रय पत्करिला होता, तो स. १७०२ नंतर वारला आणि त्याचा पुत्र बसवलिंग राजा गादीवर आला. त्यानें स. १७३२ पर्यंत राज्य केलें. त्यानेंच शाहूकडे वरप्रमाणें विनंती करून त्याचा लोभ संपादिला. 'राजाची सख्याची इच्छा मान्य करून छत्रपतींनी आपले हेजीब भानजी बल्लाळ व देवजी विश्वनाथ सोंध्यास पाठविले. त्यांनी भापापत्राचा करार केला की, प्रतिवर्षी राजानें पंचेचाळीस हजार रुपये खंडणीचे द्यावे; आणि दुसरा हरकोणी शत्रु संस्थानावर चालून आल्यास लागेल ती मदत करून त्याचा पराजय करून संस्थानचें आधिपत्य निर्विघ्नपणे

¶ शा. रो. १५. § शा. रो. १९६, २००

अनुभवूं द्यावे. मराठे यांणी आपली ठाणीं उठवून संस्थानी गमन करावें.' ‡ वरील वर्णनात मराठ्याच्या चौथाई हक्काची व परशत्रुपासून मांडलिकाचें संरक्षण करण्याची जबाबदारी दर्शविलेली आढळते ती अभ्यासूंनी लक्षात आणावी. कर्नाटकातील हिंदु सत्ताधीशास मुसलमानांपेक्षा मराठ्याची ताबेदारी ज्यास्त सुखकर वाटली हें सोंध्याच्या व इतर उदाहरणावरून स्पष्ट होतें.

मात्र सोंधेकराच्या भानगडी एवढ्यानेंच मिटल्या नाहीत. पुढे निजाम उल्मुल्कनें त्यास जेरीस आणिलें, त्या वेळी मराठे त्याच्या संरक्षणास वेळेवर जाऊं शकले नाहीत. सवाई रामचंद्र राजे सोंधेकर याचे एक अत्यंत आर्जवाचे पत्र बाजीरावास लिहिलेलें उल्लेखनीय आहे, त्याचा काळ निश्चित होईल तर सोंधेकर व मराठे याचे व्यवहार स्पष्ट होतील. $

**३ श्रीरंगपट्टणची स्वारी**—बाजीराव पहिल्या स्वारीतून परत येताच निजामाने किंवा त्याच्या हुकमात वागणाऱ्या हस्तकांनी कर्नाटकांतील हिंदु सत्ताधीशावर चढाई केली, यावरून शाहूने केलेला उद्योग मोडून काढण्याचा प्रयत्न निजामानें केला हे स्पष्ट होतें. ता. २० जुलै, स. १७२६ रोजी शाहू लक्ष्मेश्वरच्या देशमुखास लिहितो, 'तुम्ही विनंतीपत्रें पाठविली, अभिप्राय कळों आला. नबाबांनी आपणावरी बहुत अतिशय मांडिला आहे. गावगन्ना ठाणीं घालावयाचा उद्योग करितात, तरी स्वामींनीं आपलें साहित्य करून स्थल रक्षण होय तें केलें पाहिजे म्हणून लिहिलें, ऐशास तुमचा अभिमान पूर्वापासून स्वामीस आहे. त्या प्रांतीचे बंदोबस्त कर्तव्य आहेत, याबद्दल सरलष्कर, प्रधान व सेनापति यांस फौजा आणावयाची आज्ञा केली आहे. तुम्ही जमाव करून नबाबास आपल्या स्थलामध्यें प्रवेश होऊं न देणें. दसरिया कारणें स्वामी फौजा रवाना करतील.'†

मराठ्यावर नजर ठेवण्याकरता निजामाने स. १७२६ च्या उन्हाळयात हैदराबादेहून अदवानीपावेतो स्वतः प्रयाण केलें आणि तिकडूनच पावसाळयात लक्ष्मेश्वरावर फौजा पाठविल्या. नबाबानें कर्नाटकांत असा उच्छेद मांडलेला ऐकून पुनः लगेच दसऱ्यास दुसरी स्वारी त्या बाजूस पाठविण्याचें शाहूनें ठरविलें, आणि बाजीराव व दाभाडे यांस स्वहस्ताक्षरी आज्ञा लिहून कळविलें

‡ सोंधेकराची बखर, शि. च. सा. ख. ३ ले. ४९७.

$ पे. द. १७. ९ † शा. रो. २७.

की 'विजयादशमीच्या मुहुर्तें उभयतां स्वार होऊन दिवसगत न लावतां अति-सत्वर फौजेची तयारी करून पंढरपुरच्या रोखें येणे.' या हुकमाप्रमाणे दसऱ्यास दुसरी स्वारी निघाली तिला श्रीरंगपट्टणची स्वारी म्हणतात. या स्वारीत खंडेराव दाभाडे स्वतः हजर होता.‡

फत्तेसिंग भोसले बाजीरावाबरोबर श्रीरंगपट्टणकडे गेला नाही. कलबुर्गा प्रांतात चौथाई वसुलीचें काम त्यानें केलें. †

निजामानें बाह्यतः मराठ्यांशी सख्य दाखवून आंतून कपटविद्या चालविली. त्याला कळून चुकलें की वेळेवर मराठ्यांचा बंदोबस्त आपण केला नाही तर उत्तरेंत माळव्याप्रमाणेंच कर्नाटकांतही ते बद्धमूल होतील. यास्तव स. १७२६ त मराठे सरदार दक्षिणेकडे असतां महाराष्ट्रांत त्यानें चंद्रसेन जाधवास हाताशी घेऊन मराठशाहीची पोखरणी चालविली. त्यानें कर्नाटकांत फौजा पाठविल्या, संभाजीस शाहूविरुद्ध चिथविलें आणि कान्होजी भोसले, सुलतानजी निंबाळकर सरलष्कर अशांसारखे शाहूचे दुटप्पी सरदारांस फितविण्याची खटपट सुरू केली. हे सर्व प्रकार पूर्ण परिणत होण्यास आणखी एक वर्ष लागलें, पण बाजीरावाने स्वतः जागरूक राहून त्यांचा प्रतिकार केला हें पुढें दिसून येईल.

हैबतरावाचा पुत्र सुलतानजी निंबाळकर स. १७१४ पासून सरलष्करीवर होता. स. १७२६ त शाहूला त्याची फितुरी आढळली म्हणून शाहूनें प्रथम त्याजवळ आपल्या तर्फेचा नवीन कारभारी नेमिला आणि त्यास मुद्दाम कर्नाटकांत जाऊं न देतां आपल्याजवळ बोलाविलें, (ता. १९ नोव्हें०, स. १७२६ ).‡ परंतु तो शाहूशीं अनुरक्त राहिला नाहीं, किंवा उघडपणें निजामाकडे गेला म्हणून सुलतानजीचा भाऊ सिधोजी यास सेवेंत घेऊन पुढें त्यासच सरलष्करी शाहूनें दिली. §

निजामाच्या धामधुमीमुळें स. १७२७ च्या कर्नाटकच्यास्वारींत बाजीरावाचें चित्त अत्यंत अस्वस्थ राहिलें, त्यामुळें पाहिजे होती तितकी कार्यसिद्धि स्वारीत

‡ शा. रो. १९, २२, व २२, २५.

† शा. रो. २३. ‡ शा. रो- २२ व २६५ व ३२.

§ सुलतानजी निजामाकडे गेला अशी नोंद पे. द. १५ पृ. ९० वर आहे. त्यास निजामाने आबेड व बीड येथे जागीर दिली. पे. द. १२. १४ च्या पत्रांत ता. २९-९-१७२७ रोजीं सिधोजी सरलष्करीवर आहे.

होऊं शकली नाही. बाजीराव पश्चिम बाजूनें प्रांत रगडीत गेला. हुकेरी, सामानगड, बेळगांव, कित्तूर, सोंधें या मार्गावरील खंडण्या वसूल करून बेदनूर प्रांतांतून बाणावर हसनवरून तो ता. ४ मार्च रोजीं श्रीरंगपट्टणास दाखल झाला. तेथें एक महिना मुक्काम करून गेल्या वाटेनेंच परत सातार्‍यास आला. काही सरदार व फौजा चित्रदुर्गकडेही आदल्या वर्षाचा कार्यभाग पुरा करण्यासाठी गेल्या होत्या. या स्वारीत उन्हाळा, पाण्याची टंचाई व महामारी यांचे योगानें मराठी फौजाचे अतोनात हाल झाले, असें खुद्द बाजीरावानें लिहिलें असून या हालाचें वर्णन पोवाड्यात वर्णिलेलें विश्वसनीय दिसतें. त्या पोवाड्यांत बुद्धिहाळ, चिक्कनहळ्ळी, महाबळ्ळी, नंदीगड, बाळापुर, नागमंडळ, बेंगरूळ, बहिरवदुर्ग, मागडी व देवरायदुर्ग इतक्या स्थळांची नांवें दाखल आहेत ता सर्व या दोन्ही स्वार्‍यांतील मराठ्यांच्या वाटेवरची आहेत.‡

श्रीरंगपट्टणच्या स्वारींत बाजीरावानें आर्कोटकर नबाब सादतुल्लाखानाशी तह केला, तो त्या नबाबानी पुढें पंधरा वर्षे पावेतों यथायोग्य पाळला, यावरून बाजीरावाची कर्तबगारी व मराठशाहीचे उद्देश व्यक्त होतात. $ या दोन स्वार्‍यांत मिळून पश्चिम व मध्य कर्नाटकच्या भागात मराठ्यानीं आपले चौथ सरदेशमुखीचे हक्क लागू केले आणि पूर्वी घोरपड्यानी प्रस्थापित केलेल्या वर्चस्वाची प्रतिष्ठापना केली. पूर्वेकडचा भाग राहिला, त्यासाठी पुनः कर्नाटकात फौजा पाठविण्याची हुरहूर शाहूच्या मनांत किती लागली होती, हे त्याने अनेकवार व्यक्त केलेले आढळते. सिधोजी हिंदुराव घोरपडे व त्याचे पुत्र मुरारराव हेच मुख्यतः कर्नाटकांत मराठ्याची सत्ता सांभाळीत होते. स. १७२६ व १७२७ च्या दोन्ही स्वार्‍यात मुरारराव हजर होता. कारण संताजीजवळ वागलेला हा सरदार दक्षिणेंत फार वर्षे बलाढ्य व नामांकित बनल असल्यामुळे त्याचा विशेष उपयोग झाला. स. १७३० त मुराररावानें सातार्‍यास येऊन शाहूची भेट घेतली. शाहूनें त्याचा गौरव केला. त्यापूर्वी व नंतर त्याचे वकील शाहूकडे सारखे येत जात असत. ‡ चिटणीस लिहितो, " संताजीचे

‡ ब्र. च. ले. ३२ व रा. ख. ६ ले. १०९. मे स. १९४० च्या सह्याद्रीच्या अंकात रा. खरे यानी या पोवाड्याचा आधार खोटा ठरविला आहे. पण नकाशावर ही स्थळे पहावीं म्हणजे त्याच्या खरेपणाची खात्री पटेल. लष्कर ज्या मार्गाने जाते त्याच्या दोहों बाजूची शेपन्नास मैलातली स्थळे त्याच्या क्षेत्रात मोडतात.

$ ऐ. टि. २. ४४. ‡ पे. द. १७. १४६ व शा. रो. १७१

घराण्यांतील मुरारराव गुत्तीचें संस्थान सांभाळून होते, त्यांस महाराजांनीं पत्रें दिलीं होतीं, जे तुम्ही सामानसुद्धां सरकारचे फौजेंत येऊन सेवा करून दाखवावी, त्याप्रमाणें सामान घेऊन येऊन भेटले. तमाम पाळेगार सुरापूर, कनकदुर्ग, चित्रदुर्ग, गदग, लक्ष्मेश्वर वगैरे यांजपासोन पूर्वीचे ठरावाप्रमाणें खंडण्या घेतल्या. खुद्द श्रीरंगपट्टणची खंडणी एकवीस लाखांवर घेतली.§ पुढें सालाबादप्रमाणें घेत जावें, असें केलें. हुजूरची स्थळें ठाणीं किल्ले पहिले होते ते सोडविले.' यावरून या दोन स्वाऱ्यांची कामगिरी पुष्कळ यशस्वी झाली आणि कर्नाटकांत वावरणाऱ्या एकाकी घोरपड्यांना पाठिंबा मिळून मराठशाहीच्या त्या भागांतील फैलावास सुरुवात झाली हें स्पष्ट आहे. स. १७२७ नंतर निजामानें चढाई चालविली तिला तोंड द्यावें लागल्यामुळें कर्नाटकचा अवशिष्ट कार्यभाग मागें पडत गेला, पण शाहूनें आग्रह धरून स. १७४०-४१ त तो पुढें पुरा केला. † त्यामुळें बाळाजी बाजीराव पेशव्याचे वेळीं मराठी सत्तेचा वृक्ष कर्नाटकांत कसा फोफावला ती हकीकत पुढें यथावकाश सांगण्यांत येईल.

§ स. १७५३ त रघुनाथराव नानासाहेबास लिहितो," श्रीरंगपट्टणची खडणी बेवीस लाख केली म्हणोन लिहिले, त्यास कै. रावांनीं एकवीस लाख देत असतां न घेतलें." पे. द. भा. २१. ५८.

† शा. रो. ३ च्या पत्रास 'सल्लास अशरीन' साल दिले आहे तें 'सल्लास आर्बैन पाहिजे, म्हणजे त्या पत्राची तारीख २ फेब्रुवारी, १७४३ होय. पुढें पत्र ७३ A पहा.

# ४

# पहिलें यश म्हणजेच पालखेड

## कालसूची

| | | |
|---|---|---|
| १७२१ | | संभाजी व चंद्रसेन शाहूचे विरोधक. |
| १७२५ | डिसें० ३० | शाहूनें संभाजीस तह लिहून दिला. |
| १७२६ | फेब्रु० | नीलकंठ प्रभूची संभाजीस शाहूविरुद्ध भर. |
| ,, | मार्च | तुरुकताजखान, रंभाजी निंबाळकर, उदाजी चव्हाण, यांचा शाहूचे राज्यांत उपद्रव. |
| ,, | पावसाळा | संभाजी निजामाचे आश्रयास गेला. |
| ,, | ऑगस्ट | रायाजी जाधवास शाहूनें उदाजीवर रवाना केलें. |
| ,, | ,, अखेर | सुलतानजी निंबाळकर व चिमणाजी दामोदर निजामास सामील. |
| १७२७ | फेब्रु० १ | ऐवजखानाचे हातून कान्होजी भोसल्याची सुटका. |
| ,, | ऑग० २७ | बाजीराव निजामावर चालून गेला. |
| ,, | ,, | निजामाचा सवाईजयसिंगास शाहूविरुद्ध उपदेश. |
| ,, | आक्टोबर | निजामाची बाजीरावावर चाल. |
| ,, | नोव्हेंबर ५ | बाजीरावाकडून ऐवजखानाचा पराभव, नंतर गुजरातेवर चाल. |
| ,, | डिसेंबर | निजामाचा पुणें प्रांतांत धुमाकूळ. |
| १७२८ | फेब्रु० ८ | निजामानें पुण्यास संभाजीचें लग्न केलें, बाजीरावाचा खानदेशांत धुमाकूळ, चिमाजी व शाहू पुरंदरावर. |
| १७२८ | फेब्रु० २५ | पालखेडावर निजामास मराठ्यांचा घेरा. |
| ,, | मार्च ६ | मुंगी-शेवगांवचा तह. |
| ,, | | शाहूकडून सरदारांचा गौरव; दावलजी सोमवंशीस सरलष्करी दिली, सिधोजी निंबाळकराची काढली. |
| १७२९ | जानेवारी | बाजीराव निजामावर चढाई करणार त्यास शाहूनें आवरलें. |

४

# पहिलें यश म्हणजेच पालखेड

**१ संभाजीचा बंडावा** | **२ निजामाचा उपद्व्याप**
**३ तोफा विरुद्ध गनिमी युद्ध** | **४ निजामाची शरणागति**
**५ फलादेश**

**१ संभाजीचा बंडावा.**—मराठ्यांना बलहीन करण्याचे निजामाचे व्यूह कसे चालू होते, त्याचें दिग्दर्शन थोडें मागील प्रकरणांत केलें आहे. ऐवजखान, तुरुकताजखान, घियासखान हे त्याचे विश्वासू व कर्तबगार सरदार मराठ्यांचे पिच्छावर त्यानें ठिकठिकाणीं सोडून दिले. सुलतानजी निंबाळकर सरलष्कर, कान्होजी भोसले सेनासाहेब सुभा अशा कित्येक शाहूच्या सरदारास त्यानें आमिष दाखवून फितविलें. शिवाय रंभाजी निंबाळकर, उदाजी चव्हाण व चंद्रसेन जाधव या पूर्वीच्या राष्ट्रद्रोहकास हाताशीं घेऊन त्यांच्या मार्फत कोल्हापुरकर संभाजीस त्यानें शाहूविरुद्ध उठविलें. वास्तविक शाहूची सामवृत्ति एवढी अढळ होती कीं, एकदम निजामास दुखवूं नये, शक्य तितक्या तडजोडीनें वागून त्याचा संतोष ठेवावा, अशी स्नेहवृत्ति त्यानें आपल्या सरदारांस पढविली होती. पण संभाजीच्या द्वारा जेव्हां प्रत्यक्ष शाहूलाच उखडून काढण्याचा घाट निजामानें अवलंबिला, तेव्हा त्याचाही दमखाऊपणा खलास झाला. मात्र हा परिणाम घडून येण्यास तीनचार वर्षे लागलीं. तो प्रकार येथें विस्तारानें सांगणें जरूर आहे.

संभाजी व त्याची मातुश्री राजसबाई यांचाही समज ताराबाईसारखाच होता. राज्याचे मालक आपण, शाहूचा त्यावर हक्क नाहीं हे सारखें मनांत वागत असल्यामुळें शाहूपुढें नमून वागणें त्यांस मान्य नव्हतें. शाहूच्या सामर्थ्यापुढें त्यांचा इलाज चालला नाहीं, म्हणून ते दबून गेले; पण अंतःकरणांतलें वैमनस्य गेलें नाहीं. तशांत जवळची कित्येक मंडळी त्यास चेतना देई तेव्हां शाहूविरुद्ध उठण्याची ऊर्मि त्यांचे ठिकाणीं उसळे. अशा स्थितींत शाहूचें जरा

कोठें उणं दिसलं, की त्याचा फायदा घेण्यास संभाजी सदैव टपलेला असे. ही त्याची वृत्ति चंद्रसेनास व निजामास आरंभापासून माहीत होती. ता. २३ जुलै, स. १७२१ रोजी संभाजी रायाजी मल्हार प्रभूस ‡ लिहितो, " जाधवरावांनी कितेक अर्थ लिहोन व सांगोन पाठविला त्याचें उत्तर त्यास पाठविलें आहे त्यावरून तुम्हांसही कळेल. तुम्ही शहाणे लोक आहां. स्वामीच्या पायांशीं निष्ठा बहुत धरितां. जाधवराव तुमचे ठायीं ममता बहुत धरितात, त्यांस स्वामीचे मनसुब्याचें यश बहुत येतें. इकडील कृपेचें निदर्शन समयविशेष तुमच्या प्रत्ययास येईल. स्वामीच्या कार्यभागाविशीं बहुत सादर असत जाणें. " ¶ यावरून रायाजी प्रभूच्या मार्फत चंद्रसेन जाधव संभाजीस शाहूविरुद्ध कसें उत्तेजन देत होता त्याचें प्रत्यंतर पटतें.

परंतु पुढील तीन वर्षात मोगल सुभेदारांच्या भांडाभांडीमुळें संभाजीच्या कारस्थानास बळ आलें नाहीं. स. १७२५ त प्रतिनिधि वगैरे सरदारांस शाहूनें कर्नाटकात रवाना केल्याबरोबर संभाजीनें व चंद्रसेनानें पुनः जोराची उचल घेतली आणि त्यांस निजामानें तावडतोब पाठबळ दिलें. विश्वावसु संवत्सरांत म्हणजे बहुधा स. १७२६ च्या फेब्रुवारीत संभाजीनें चंद्रसेनास लिहिलेलें खालील पत्र उपलब्ध आहे.| चंद्रसेन संभाजीस लिहितो, ' आम्ही स्वामीचे आज्ञाधारक आहों. स्वामीच्या संरक्षणापेक्षां व राज्याभिवृद्धीपेक्षां दुसर निदिध्यास नाहीं. निजाम उल्मुल्काकडे स्वामीच्या मनोभिष्टाचीं पत्रें लिहिलीं होतीं. त्यावरून निजामांनी समाधान पावोन स्वामीचा अभिमान धरून उत्तरें पाठविलीं तीं स्वामिसेवेशीं पाठविलीं आहेत. अतःपर महत्कार्याचा प्रसंग व्हावा, संधि फिरोन येणार नाहीं, सेनासमुदायाविशीं त्वरा करून तोरगलास पत्र पाठवावें. चिरकालें करून समय प्राप्त झाला आहे. जितकी त्वरा होईल तितकें हित आहे. ' अशा मजकुराचें चंद्रसेनाचें पत्र संभाजीस आलें, त्याचा

‡ रायाजी मल्हार व त्याचा पुत्र मल्हार रायाजी हे दोन कारस्थानी पुरुष बाळाजी विश्वनाथ व बाजीराव याच्या काळीं प्रमुख होते. हे सेनापतीच्या दिमतीस प्रथम धनाजी—चंद्रसेनाकडे व पुढे दाभाड्याकडे असत आणि शाहू व पेशवे याचे विरुद्ध वागून निजामाशीं वगैरे सधान बाळगीत. त्याच्या घराण्याचा छडा लावणे जरूर आहे. रा. ख ८. ६८ व ७५, प. सं. वृ. पृ. ८, त्रै. ७ पृ. ८४. ८५, पे. द. २२ ले. ५४ व ३० ले. ३७६ यात त्याचा उल्लेख येतो

¶ रा. खं. ३ ले. ५५९.

| दळवीकृत जाधव घराण्याची कैफियत, पृ. ८१

जबाब त्यानें पाठविला तो असा–'तुमचें पत्र वाचून स्वामींचे मनोरथ सिद्धीस गेले असेंच वाटलें. खास त्वरा करावयाविशीं लिहिलें, तरी याहून अंतर तें काय! दीलभरीनें सांगणें तें सांगोन, हिंदुराव व त्यांची सगुणाबाई, पिराजी घोरपडे यांची स्त्री, व पुत्र राणोजी इत्यादिकांचा जमाव समागमें घेऊन तुंगभद्रातिरापर्यंत स्वारी केली. पुढें श्रीपतराव प्रतिनिधि चालून आले, त्यांचे उपमर्दाचा विचार करण्यासाठीं तुम्हास त्वरेनें दर्शनास बोलाविलें. निजाम अदवानीस आले, त्यांचीं पत्रेंही स्वामींस आलीं, कीं फौज पाठवून देणें. तेव्हां निळकंठराव त्रिंबक प्रधान यासह फौजेंत येऊन निजामास सामील होणें अशी आज्ञा केली. तुम्हांस दर्शन द्यावयाकरितांच स्वामींनी तोरगल येथें मुक्काम केला. तरी तुम्हीं बहुत त्वरेनें येऊन स्वामीचें दर्शन घ्यावें. इकडील वर्तमान तरी प्रतिनिधि व बाजीराव व तोरगलकर असे या प्रांतें आले आहेत. आपणांकडे येणें म्हणून निजामाचीं लिहिणीं येतात. पठाणांचे वाढीमुळें श्रीपतराव व बाजीराव यांत एकमत नाहीं. स्वामीकडील अगत्य धरावयाविशीं निष्कर्ष तुम्हीं निजामास कळवावा. सातारवासीयांकडील तह मोडून स्वार्थ साधावा हा अर्थ निजामांनीं तुम्हांस सांगून पाठविला, हे गोष्ट तुम्हीं बरी केली. याउपरी कोणे गोष्टीचा उजूर न धरितां स्वामीचे दर्शनास येणें. इकडे आबाजी सुरो, मुरारजी (घोरपडे), उदाजी चव्हाण इत्यादिकांची फौज संपूर्ण आहे. ऐवजखानाकडूनही राजकारण बहुत निराळया तऱ्हेचें आलें आहे. पांढरे वगैरे तुम्हांजवळ आहेत त्याचा दिलासा केला हें उत्तम केलें. त्यासही समागमें घेऊन येणें.' या पत्रावरून संभाजीच्या कारस्थानाचा आणि दुसऱ्या अवांतर गोष्टींचा उलगडा होतो.

बाजीराव व प्रतिनिधि कर्नाटकात असतां संभाजीनें शाहूवर चढाई करण्याचा हा घाट रचिला. खुद्द निजाम अदवानीपावेतो गेला. शाहू व बाजीराव यांची चढाई असह्य होऊन त्यानें संभाजीस आपल्या पक्षांत ओढिलें. संभाजीनें शाहूचा आश्रय सोडून आपल्या आश्रयाखालीं यावें अशी मसलत निजामानें चंद्रसेनामार्फत उभी केली. उदाजी चव्हाण, ऐवजखान असे अनेक प्रतिष्ठित गृहस्थ संभाजीचें साह्य करण्यास सिद्ध झाले. सर्व मंडळींनीं तोरगल येथें येऊन संभाजीस सामील व्हावें असा बेत ठरला.

जगाच्या व्यवहारांत अंगचा पराक्रम हाच प्रत्येकाचा मुख्य आधार होय. दुसऱ्याच्या पराक्रमावर अवलंबून राहणाराचें भाग्य वाढत नाहीं. तसाच प्रकार संभाजीचा झाला. शाहूनें नेकीनें वागून अनेक पराक्रमी माणसें

जमवून राज्याचा फैलाव चालविला आणि त्यांजकडून राष्ट्रोपयोगी कामें घेतलीं. ‘सातारवासीयांकडील तह मोडून स्वार्थ साधावा’ हा अर्थ निजामानें संभाजीस सांगून पाठविला. ता. ३० डिसेंबर, स. १७२५ रोजीं शाहूनें संभाजीस लिहून दिलेला सातकलमी तह उपलब्ध आहे,¶ त्यांत मजकूर आहे तो असा–‘तुम्ही आम्ही उद्योग करून मोगलाईतील मुलूख सोडवावे, उत्तरेकडील मुलूख सुटतील त्यांतले निमे प्रांत तुम्हांस देऊं, तुम्ही सोडवाल त्यांतला निमा प्रांत तुम्ही आम्हांस द्यावा.’ अशी राज्याची पुरेपूर निंमी वांटणी शाहूनें संभाजीस दिली, तरी त्याचें समाधान झालें नाहीं. स. १७२५ च्या दसऱ्यास कर्नाटकांत शाहूच्या फौजा जाऊं लागल्या, त्यांस संभाजीनें उपसर्ग करूं नये म्हणून मुद्दाम हा स्पष्ट तह ताबडतोब शाहूनें त्यास लिहून दिला. त्या वेळीं नीळकंठ त्रिंबक प्रभु महाडकर ग्वासनीस§ संभाजीचा प्रधान होता, त्यानें संभाजीला वरील तह मोडून शाहूविरुद्ध उठण्यास भर दिली. वर दिलेलें पत्र स. १७२६ च्या फेब्रुवारींतलें असून त्यापुढें लवकरच संभाजी निजामाकडे गेला.

ता. ३० जुलै, स. १७२६ च्या पत्रांत शाहू चिमणाजी दामोदर राजाज्ञास लिहितो, “चंद्रसेन जाधव पन्हाळयाकडे गेले म्हणून हुजूर वर्तमान आलें, तुम्ही कांहीं लिहिलें नाहीं. याउपर चंद्रसेन व पाढरे यांचे वर्तमान लिहिणें, आणि फौजबंदी करून निजाम उल्मुल्क यांचे भेटीस जाऊन भागानगर प्रांतीचा तह करून घेणें.” यावरून निश्चित होतें कीं, स. १७२६ च्या पावसाळयांत चंद्रसेनानें संभाजीस नेऊन निजामाचे ओटींत घातलें; लगेच शाहूचा राजाज्ञा चिमणाजी दामोदर भागानगर प्रांताकडे असतां त्यास निजामानें फितवून संभाजीची पेशवेगिरी दिली. या विश्वासघातामुळें चिमणाजी दामोदराचें कसें नुकसान झालें तें पुढें दिसून येईल. या आगळिकीबद्दल बाजीराव व चिमाजी आपा याजपुढें नाकदुऱ्या काढतां काढतांच त्यास मरण आलें.

अशा प्रकारें स. १७२६ सालांत शाहूच्या विरुद्ध हा प्रचंड कट गुप्त रीतीनें उभारला गेला. शाहूला त्याची खबर प्रथम नव्हती. स. १७२६ अखेर सरदार व फौजा कर्नाटकांत निघून गेल्यावर मग या कारस्थानाची कथा हळू हळू शाहूचे कानांवर येत गेली, तेव्हां त्याच्या मनाची तारांबळ उडून त्यानें बाजीरावास

¶ का. सं. प. या. १४ व मोडककृत को. इ.

§ का. सं. प. या. १८, चिटणीस बखर पृ. ५४. केशव त्रिंबक व नीलकंठ त्रिंबक बंधु.

लगबगीनें परत बोलाविलें. प्रसंग मोठा कठिण होता. पण निजाम व चंद्रसेन गुप्त कपटाचरणांत कितीही निष्णात असले तरी रणकौशल्यांत बाजीरावाशीं बरोबरी करणारा एकही इसम त्यांजकडे नसल्यामुळें निजामाचे साह्यानें संभाजीचा फायदा न होतां उलट घात मात्र झाला. स. १७२६ च्या दसऱ्यापासून स. १७२८ च्या मार्चपर्यंत म्हणजे पालखेडच्या संग्रामापावेतों संभाजी निजामाबरोबर होता. 'स्वामी तीन वर्षे स्वारींत होते,' असें विधान रा. खं. ८ ले. ९४ मध्यें आहे, त्याची संगति स. १७२५-२८ अशा तीन वर्षांची लागते. स. १७२५ त तो बाहेर पडला, तेव्हांपासून राजधानींतील कारभार राजसबाई पाहत होती. या अवधींतील कागद राजसबाईच्या नांवानें सुटलेले आढळतात. †

**२ निजामाचा उपद्याप.**—साखरखेडल्यानंतर निजामानें औरंगाबाद येथें बाजीरावाची भेट घेऊन सत्कार केला, त्या वेळी मराठ्यांशीं कायम धोरण काय ठेवावें याबद्दल त्याचे मनाचा निश्चय नव्हता. आधीं आपलें आसन कसें दृढ होतें हीच त्याची त्या वेळीं मुख्य विवंचना होती. पुढें बादशहानें दक्षिणच्या सुभ्यावर त्याची नेमणूक कायम ठेविली तेव्हा त्याचा जीव खालीं पडला. स. १७२५ च्या आरंभीं तो औरंगाबादेवरून हैदराबादेकडे निघाला तेव्हा मराठ्याना आळा घालण्याचे विचार त्याच्या मनात घोळूं लागले. एप्रिल महिन्यांत पंढरपुराजवळ मुक्काम असतां उदाजी चव्हाणानें येऊन त्याची भेट घेतली. ‡ त्यास आपले पदरीं चाकरीस ठेवून तीसहजारी मनसब व दहा लक्षांची जागीर देण्याचा ठराव केला आणि तुरुकताजखानास ताकीद दिली कीं बेलाशक मराठ्यांचा थारा होऊं देऊं नये, त्याजवर दहशत बसवावी. त्यावरून संगमनेर-नासिक प्रांतांत खानानें प्रळय उडवून दिला. मोगलाई इजारदार, प्रजेची माया नाहीं, अशा कागाळ्या मारख्या बाजीरावाकडे आल्या, त्यावरून निजामाचें खरें हृद्गत त्यास कळून आलें. बाह्यतः सुमंत प्रतिनिधि यांचे मार्फत निजाम शाहूस कळवी, कीं आम्ही सर्वथा तुमच्याशीं स्नेहभावानें व पूर्ण नम्रतेनें वागत आहों, मात्र तुमचे पेशवे उगाच आमचा उच्छेद करितात, तो बंद ठेवा. निजामाचा हा कांगावा सुमंत किंवा शाहू यांस प्रथम बिलकूल उमगला नाहीं, बाजीरावच कळलाव्या आहे अशी त्याची समजूत

† रा. खं. ८ ले. ९६, स. घ. इ. ले. १६६, १७०, १७१ इ.

‡ पे. द. १०. ३२, ३३

होती. पुढें संभाजीला पुण्यास आणून शाहूला साफ उखडून काढण्याचा घाट जेव्हां शाहूला स्पष्ट दिसला तेव्हां त्याचें मत फिरलें. पण अशाखाली एक वर्ष गेलें.

तुरुकताजखानाप्रमाणेच रंभाजी व त्याचा पुत्र जानोजी निंबाळकर यांनीं भाईबंदकीची सबब पुढें करून सातारा प्रांतांत मुलूख मारून शाहूचा उच्छेद केला. हे सरदार निजामाचे, त्याची आज्ञा पाळीत होते. शाहूनें त्यांस स्वतः पत्र लिहून दटावलें की, ' गांवांचा सत्यनाश व उत्पात करावा हे गोष्टी बरी नव्हे. ऐसी वर्तणूक न करणें. ' ( ता १० मार्च स. १७२६ ).† पण शाहूच्या धमकीला भिणारे हे सरदार नव्हते हें त्याला प्रथम कळलें नाही.

याच वेळेस कोल्हापुरास गनिमाचा वेढा पडल्याची हकीकत आहे तिचा उलगडा झाला पाहिजे. ¶ उदाजी चव्हाणास निजामानें शाहूविरुद्ध उठविलें; स. १७२६ त फौजा कर्नाटकात असता उदाजीनें रहिमतपुरावर येऊन शाहूचा उच्छेद चालविला. तेव्हा शाहूनें आपला विश्वासू सरदार रायाजी जाधव भुइंजकर यास उदाजीवर पाठविलें.§ ( ऑगस्ट, स. १७२६ ). उदाजीच्या मदतीस रंभाजी निंबाळकर आला. त्यावर रायाजीचें व रंभाजीचें युद्ध होऊन रायाजी मारला गेला. फौजा दूर गेल्या असता निजामाच्या सरदारांनी असा दगा द्यावा याचें शाहूला वैषम्य वाटून स. १७२६ च्या अखेरीस त्याला निजामाच्या कपटाची थोडी जाणीव होऊं लागली. या वेळीं मुलतानजी निंबाळकर, चिमणाजी दामोदर वगैरे शाहूला सोडून निजामास मिळाले, त्याचा वचपा म्हणून चंद्रसेनाचा भाऊ शंभुसिंग, व कापशीकर सेनापति पिराजी घोरपडे व त्याचे पदरचा धारराव निंबाळकर निपाणकर यांस शाहूनें आपल्या पक्षात आणिलें. शंभुसिंगास आणण्याची कामगिरी व्यासरावानें केली. हा व्यासराव जाधवाचा कारभारी, बाळाजी विश्वनाथाच्या हरणाच्या तंट्यात वाचकांचे माहितीत आलेला आहेच.

स. १७२७ साल उजाडलें. शाहूला एक एक प्रकरणाचा प्रत्यय येऊं लागला. कान्होजी भोसले यास ऐवजखानाचे फौजेनें पिटून लाविलें असतां

† शा. रो. २०८. छापण्यात चूक आहे. जानोजी हाच रंभाजीचा पुत्र, सुलतानजी नव्हे. पहा पे. द. १०.९३. सुलतानजी हा हैबतरावाचा पुत्र.

¶ इ. स पे. द. पृ १२०, ले. ११९.

§ शा. रो. २० व २०९, पे. द. १०.२९. पु. द. १.७९,८०.

शाहूच्या सरदारांनी त्यास सोडवून आणिल्याबद्दल ता. १ फेब्रुवारी, स. १७२७ रोजी शाहूने त्याचें अभिनंदन केलें.¶ मुलखांत संभाजीचा गौरव चालू झाला. लोक इनामाच्या सनदा संभाजीकडून घेऊं लागले.‡ हा प्रकार पाहून शाहूची अत्यंत तारांबळ उडाली. बाजीरावास तर त्यानें कर्नाटकांतून लगोलग परत बोलावलेंच, पण शिवाय उदाजी पवार, कंठाजी कदम, पिलाजी गायकवाड उत्तरेकडे होते त्यास ता. १९ मार्च रोजी लिहिलें, 'बाजीराव व सेनापति दक्षिण प्रांतास गेले आहेत, इकडे मनसुब्याचा प्रसंग प्राप्त जाला आहे, त्यांस अविलंबें यावयाविशी पत्रें पाठविलीं आहेत. तुम्ही उभयतांचे ताबीन आहां तरी देखत आज्ञापत्र फौजेनिशी स्वार होऊन येणें.' § याच वेळीं त्यानें कान्होजी भोसल्याची चलबिचल पाहून त्यास आश्वासनाचें पत्र लिहिलें. तथापि निज़ामाकडील दुराशा लागल्यामुळें 'इदंच नास्ति परं न लभ्यते' अशा वृत्तीनें कान्होजीच्या पराक्रमावर इतउत्तर विरजण पडून शेवटीं बंडखोरीमुळें त्यास कैद भोगावी लागली.

या वेळीं शाहूची मनःस्थिति अत्यंत उद्विग्न झाली होती. हा 'तरुण कोंकणस्थ ब्राह्मण तुमचा पेशवा व खंडेराव दाभाडे सेनापति दोघेही तुम्हास दगा देणार', अशी कंडी निजामानें उठवून ती अशा बेमालूमपणें शाहूच्या कानावर घातली की, त्यानें ता १२ मार्च रोजी खालील विलक्षण पत्र अंबाजीपंतास लिहिलें. "तुम्ही बाजीरावास चार गोष्टी विचाराच्या सांगोन अमित्राचे पिच्छावरी जाऊन फितूर तुटे तो अर्थ करणें. तुम्ही स्वामीजवळ बोलोन गेला काय, करतां काय हा विचार कळत नाही. सेनापति व प्रधान याचे चित्तीं विचार तरी काय आहेत त्याचा शोध घेऊन लिहून पाठवणें, त्यावरून स्वामी निश्चिंति मानतील. वारंवार लिहावयाची सीमा झाली, परंतु कार्यभागाचा विचार दिसत नाही. याउपरी अमित्राचें गुंज काढावें आणि फितूर तुटावा, ऐसें चित्तांत असेल तरी पत्रदर्शनी अमित्राचे पिच्छावरी येऊन वाताहत करणें."†

अंबाजीपंत या वेळी माळव्याचे स्वारींतून परत येत असावा. त्यानंतर बाजीरावानें कर्नाटकातून येऊन अंबाजीस निकडीचें पत्र लिहिलें की,

¶ शा. रो. २३. ‡ स. पे. द. पृ. १३०.१३१. § शा. रो. २५, २६.
† का. सं प. या. १६.

'सत्वर येणें, आमचा घात न करणें' यावरून बाजीरावाचीही कशी धांदल उडाली होती त्याची कल्पना होते. निजामानें कळ लाविली तिचा हा प्रभाव.‡

शाहूला संकटांतून मुक्त करणारे दोन पक्ष होते. एक मुत्सद्दी शहाणपणानें निजामाची समजूत घालणारा व दुसरा लष्करी सामर्थ्यानें त्यास वठणीस आणणारा. पहिल्याचे अध्वर्यु प्रतिनिधि व सुमंत, दुसऱ्याचे बाजीराव व त्याची साथ करणारे शिपाईगडी. दुसऱ्या पक्षाला तयारी करण्यासच पर्जन्य-काळ हवा होता, पण पहिल्या पक्षानें पर्जन्यकाळाचा उपयोग तडजोडीच्या वाटाघाटींत प्रथम करून घेतला तो अगोदर सांगणें जरूर आहे.

हैदराबादच्या राजधानींत मराठे चौथाई घेतात त्याऐवजी त्यांस दुसरें कांहीं उत्पन्न देऊन अथवा खजिन्यांतून सालोसाल रोख रकमा पाठवून मराठ्यांचें येणें हैदराबादच्या सुभ्यांत बंद करावें, त्याच्या कमावीसदारांनी वसुलीसाठी आमचे मुलखांत येण्याचें प्रयोजन पडूं नये असें निजामानें मनात आणून, प्रतिनिधीच्या मार्फत महाराजास द्रव्य व बालाघाटातील कांहीं मुलख कबूल केला, आणि प्रतिनिधीस वऱ्हाडांत कांहीं जागीर दिली. या योजनेनें निजामावर शह बसविण्याचें आपल्या हातचें साधन नाहींसें झाल्यानें तिजबद्दल बाजीरावास फार राग आला. संभाजीचा व तुमचा कलह आहे त्याचा न्याय मी मध्यस्थ होऊन तोडीन असें सांगून चौथाई सरदेशमुखीचा ऐवज निजामानें अटकावून ठेवला. ही लबाडी बाजीरावानें शाहूचे मनात पक्की भरवून महाराजाचे आज्ञेनें छ, १ सफर म्ह. २७ ऑगस्ट रोजी तो निजामाच्या स्वारीवर निघाला.†

या विधानास शकावलीचा दुजोरा आहे. दादोराव भीमसेन भागानगर प्रांतातील स्वराज्याचे अमल उगविण्याच्या कामावर होते त्यास महाराजांनी आणवून आकार व मोबदला महाल घेऊन तहनामा ठरविला आणि प्रतिनिधींचें मनोगत सिद्धीस नेलें. पण पुढें संभाजीची चढाई दिसून आल्यावर महाराजांनी निजामांशी लढण्याचाच विचार कायम केला. या प्रकरणांत प्रतिनिधि व पेशवे यांच्या दरम्यान देशस्थ कोकणस्थ असें ज्ञातिद्वेषाचें बीज निजामानें शाहूचे मनांत पेरले. त्यानें वकिलामार्फत शाहूस कळविलें, 'आमचा उपक्रम सर्वस्वी तुमचे हिताचा आहे, कोंकणी ब्राह्मणांनीं तुम्हास ग्रासून टाकिलें आहे, त्यांच्या ताब्यांतून तुम्हास मुक्त करावें एवढाच आमचा

‡ का. स. प. या. १५. हे व ऐ. स. सा. २. २२३ एकच. † शा. च. पृ. ६३

हेतु. तुमचे मोकासदार दूर करून आम्ही त्यांचे जागीं संभाजीचे कामगार नेमिले यांत गैर कांही नाहीं. तुमच्याच तर्फेनें काम करण्यास तूर्त आम्ही संभाजी यास नेमिलें आहे. एकदा कोंकणी ब्राह्मणांचा निकाल लागला म्हणजे आपण आपले पसंतीचे कामगार वाटेल ते नेमावे.' असें जें विधान ग्रँट डफ वगैरेंनीं केलें आहे त्याला बिनतोड पुरावा मिळत नाही.

पण निजामाचें कारस्थान फार खोल गेलें होतें यांत संशय नाही. आपल्या मनांतील कपट शाहूस कळूं न देतां त्यानें मराठ्यांकडील सरलष्करादि अनेक सरदार फोडून आपल्या बाजूस वळविले; चंद्रसेनामार्फत कारस्थान रचून आपले हेतू पार पाडण्याकरतां संभाजीची उभारणी केली. इतकें झालें तेव्हाच शाहूचे चित्तांत एकंदर कारस्थानाचा लख्ख उजेड पडला आणि समेटाचा नाद सोडून आपल्या सरदारास त्यानें युद्धाचे हुकूम सोडिले.

निजामाच्या कारस्थानावर नवीन प्रकाश पाडणारें त्याचें एक महत्त्वाचें पत्र सवाई जयसिंगास स. १७२७ त लिहिलेलें सर जदुनाथांकडून मिळालें. मूळ फारसीचा इंग्रजी तर्जुमा त्यांनीं दिला त्याचा मतलब असा—

“ राजपुतान्यांतील महाराण्याचा व तुमचा प्रदेश मराठ्यांनीं वारंवार लुटून कसा उच्छेद चालविला आहे तो प्रकार पत्रद्वारा तुम्ही आम्हांस पूर्वी कळविलेला आम्ही जाणून आहों. अलीकडे त्यांनीं माळवा व गुजरात प्रांतांत केवढा धुमाकूळ मांडला आहे तोही सर्वत्र महशूर आहेच. मी मराठ्याना भर देऊन हे उत्पात मुद्दाम घडवून आणले अशी वार्ता बादशहाचे कानावर घालण्यांत आली असून, त्या संबंधानें बादशहाचीं निषेधप्रदर्शक लिहिणी आम्हांस आली आहेत. बादशहाजवळ आमची नालस्ती करणाऱ्या कित्येक गृहस्थानीं दुष्टाव्यानें हा खोडसाळ प्रवाद उठविला असून, खरी हकीकत आम्ही बादशहास कळवीत आहों आणि इकडे मराठ्यांच्या बंदोबस्ताचे शक्य ते प्रयत्न आम्ही चालविले आहेत.

“ राजा शाहूंना अनेकवार पत्रें लिहून आम्हीं कळविलें आहे की माळवा व गुजरात प्रांतांत तुमचे सरदार जाऊन उच्छेद करतात हें अत्यंत गैर आहे. बादशहांस हा प्रकार बिलकूल खपत नाही. तुम्ही सर्व सरदारांना हुकूम पाठवून नर्मदा उतरूं नये अशी तजवीज करा. पण आमच्या या कानउघाडणीचा परिणाम कांही एक घडून आला नाहीं. सरदार लोक शाहूच्या आज्ञा

मानीत नाहीत. सबब या बंडखोर सरदारांस नठणीस आणण्याचा एक उपाय आम्ही हल्लीं चालविला आहे, त्यामुळें तुम्हास व उदेपूरच्या महाराण्यास मराठ्याकडून होणारा उपसर्ग बंद होऊन बादशहांनाही आनंद वाटेल. शाहूचा प्रतिस्पर्धी कोल्हापुरकर संभाजीराजा यास आम्ही बोलावून जवळ आणले आहेत, आणि त्यास साह्य करून शाहूला गादीवरून काढण्याचा उद्योग आरंभिला आहे. मराठ्यांचा सरलष्कर सुलतानजी निंबाळकर आम्हास येऊन मिळाला, त्यास आम्ही संभाजीचा मुख्य सेनापति नेमिले आहे. ईश्वरकृपेनें दुसरेही शाहूचे सरदार त्यास सोडून आमचे बाजूस येतील आणि शाहूराजा हतबल होईल अशी आमची खात्री आहे.

"साखरखेडल्याच्या लढाईत मुबारीजखानाचा पाडाव करून आम्ही हैदराबादेस गेलों तेव्हां कांही फौज आम्ही पूर्वकिनाऱ्यावरील शिकाकोलकडे बंदोबस्तासाटीं रवाना केली. तेथून बंगाल प्रांत नजीक होता, तो आम्ही हाताखाली घालावा आणि बादशहाची खोड मोडावी असें अनेकांनी आमचे मनांत भरविलें. दरबारांत आमचे वैरी बादशहाचे कानास लागून आमचा उच्छेद करतात, त्याचा वचपा काढण्याची ही संधि चांगली होती. परंतु बादशहा कसे झाले तरी आपले धनी, आम्ही निष्ठावंत सेवक, धन्याचे विरुद्ध कोणतेही कृत्य करणें मुनासब नाही, असें जाणून आम्ही बंगालचे भरीस पडलों नाहीं. इतक्यात बादशहांचीही स्वहस्ताक्षरी पत्रें आम्हास आलीं, कीं 'तुम्ही जाऊन शाहूला चांगला नतीजा पोंचवा, आम्ही तुमचे साह्यास फौज व सामान पाठवितों, तुमचे विरुद्ध कोणी कांही आम्हांस कळविलें तरी आमचा हा निश्चय कायम समजावा.' त्यावरून बादशहाशीं आमची निष्ठा प्रत्यक्ष खरी करण्याच्या हेतूनें आम्ही प्रस्तुत हें साहस पत्करिलें आहे. बादशहाची सेवा करून कृपा संपादन करावी हाच आमचा मुख्य उद्देश आहे. नाही तर मराठ्यांशीं बिघाड करण्याचें आम्हांस आतां बिलकूल प्रयोजन नव्हतें. पूर्वी मराठ्यांचें सामर्थ्य अत्यल्प असूनही त्यांस बंद देण्यास औरंगजेबसारख्यांस केवढे प्रयास पडले ते लक्षांत घेतल्यास, हल्लीं त्यांच्या वाढत्या शक्तीस आळा घालणें किती बिकट काम आहे तें आपल्या लक्षांत येईल. केवळ बादशहांच्या संतोषास्तव आम्ही हें साहस अंगावर घेतलें आहे. आपलीही या कामीं अनुकूलता आम्हांस अवश्य पाहिजे."

जयसिंग बादशहाचे मर्जीतला बलवान सरदार होता, त्यानें मराठ्यांस साह्य देऊं नये या हेतूनें निजामानें हें पत्र लिहिलेले आहे.

**३ तोफा विरुद्ध गनिमी युद्ध.**—एकदा खात्री झाल्यावर शाहूनें मोहिमेची सिद्धता करण्यांत बिलकूल कसूर केली नाहीं. स. १७२७च्या दसऱ्यापासून महाराष्ट्राचा नूर त्वरेनें पालटत गेला. शाहू व बाजीराव मनापासून झटतात असें पाहून लहान मोठे सरदार त्यांचे साह्यास धावून आले. ता. १३ ऑक्टोबर रोजी शाहूनें सरदारांस पत्रें पाठविली कीं, " किलीजखानाचे पिच्छावर येऊन पायबंद देऊन नतीजा पोहोंचावून स्वामींचा संतोष करणें." संभाजी राजे व निजाम उल्मुल्क एकत्र होऊन चालून येत आहेत, याकरितां समस्त गडकऱ्याना कामगिरीच्या विशिष्ट सूचना ता. ७ नोव्हेंबर रोजी शाहूनें रवाना केल्या. §

शाहूची ही तयारी पाहून निजामानेंही मराठ्यांवर चालून जाण्याची सिद्धता केली. स. १७२७ च्या आरंभी निजाम बीड येथें व पुढे जूनपासून तीन महिने धारुरावर होता. नंतर ऑक्टोबरांत बातमी आली कीं धारुराहून तीन मजला तो अलीकडे आला. ¶ त्यानें आपल्या हालचाली अगदी गुप्त ठेविल्या होत्या. आवई घातली औरंगाबादची, आला बिडास, सरदार रवाना केले जुन्नरकडे. आवई घालावी एकीकडे आणि जावें दुसरीकडे अशी त्याची पद्धत कळून आली त्याचा मासला पुढील पत्रांत मिळतो. ता० २१ सेप्टेंबर रोजी पुरंदरे बाजीरावास लिहितो, 'निजामाच्या लष्करांतून बातमी आली कीं सुल्तानजी निंबाळकरासह म्हसवडाहून साताऱ्यावर चालून यावें असा बेत आहे. महाराजांस ये समयीं आपला व सेनापतीचा भरंवसा आहे. आपण काय विचार केला, कोण्या रोखें जाणार, सेनापतीचा व आपला एकविचार होतो कीं नाहीं अवघें वर्तमान महाराजांस लिहून पाठवावें. ये समयीं उत्तम रीतीनें काम करून आपण महाराजांस संतोषविलें पाहिजे'

युद्धाची भिस्त सेनापतीवरही होती तिचा उल्लेख वरील पत्रांत आहे. सेनापतीच्या घरांतील अव्यवस्था जगजाहीर होती. पे. द. च्या १२ व्या खंडांत छापलेले कागद या अव्यवस्थेचे निदर्शक आहेत. खंडेराव दाभाडे बाजीरावास लिहितो, "लोकांचीं समाधानें रक्षून त्यांचे हातें महत् कार्य घ्यावें ऐसा मखत्यार

§ शा. रो. ३०. इ. सं. पे. द. पृ. २३.

¶ शा. रो. २९, ३०, ३२.

ईश्वरें आपणावर दिला आहे. प्रस्तुत धामधुमेचा प्रसंग, जीव वाचवावयास लोक परक्यांचे पदरीं पडतील. घरचा फितूर बहुतच फटकळ. येरवी आपण कराल तें सत्तेमुळें होईल, परंतु हे दिवस नव्हत. ये प्रसंगीं कुस्ट मिस्ट प्रकार मनास न आणावे. परकीयांवर छाप बसवावी. "§ या कानउघाडणीच्या भाषेवरून बाजीरावाचें वर्तन सेनापतीस असह्य होऊं लागलें होतें हें स्पष्ट आहे. 'शिपाई आहे, बोलावें लागतें, एखादा फटकळ बोलतो त्याची आपण उपेक्षा करावी, त्याचा रुसवा दूर करावा,' असा दुसऱ्याही एका बाबतींत खंडेरावानें बाजीरावास पोक्त उपदेश केला आहे. सेनापतीचा रुसवा घालवून त्याची समजूत पाडण्यासाठीं बाजीरावानें रामाजी चिटणिसास त्याचे भेटीस पाठविलें. त्यानें खंडेराव व त्याची बायको उमाबाई यांची भेट घेऊन तेथील अंतःस्थिति कळविली. खंडेरावानें बाजीरावासच आपले भेटीस बोलाविलें. अशाखालीं कालहरण होऊन निष्पत्ति कांहींच झाली नाहीं. खंडेरावाच्या तक्रारी व बयादा सारख्या चालूच राहिल्या. शेवटीं आपण सुमुहूर्ते कूच करून येतों असें सेनापतीनें बाजीरावास कळविलें. पण पुढें त्रिंबकराव मात्र फौजेंत सामील झाला. दाभाड्यांच्या तक्रारी मिटल्या नाहींत. $

पुढील मोहिमेसंबंधीं मुख्य गोष्ट लक्षांत ठेवण्याची ही कीं, निजामाजवळ पूर्वीचा मोगली तोफखाना व्यवस्थित पद्धतीनें बनविलेला असून तसा तोफखाना मराठ्यांकडे बिलकूल नव्हता. केवळ धावपळीच्या गनिमी काव्यापलीकडे निजामास आळा घालण्याचें कांहींच साधन मराठ्यांचे हातीं नव्हतें. म्हणून गांधीलमाशांप्रमाणें चहूंकडे दंगल उठवून निजामास हैराण करणें एवढा एक उपाय बाजीरावास होता. औरंगजेबानें पंचवीस वर्षे मराठ्यांशीं झगडा केला व किल्ले घेतले ते सर्व तोफखान्याच्या बळावर घेतले. निजामाला ती पद्धत पूर्ण अवगत असून ऐवजखान, घियासखान वगैरे निष्णात अधिकारी हाताखालीं होते. तेव्हां एकाच जागीं ठासून उभे राहून निजामाच्या तोफखान्यास तोंड देणें मराठ्यांस शक्य झालें नाहीं. तोफखान्याच्या बळावर पुणें प्रांतांत मोगलांनीं जो पुढें प्रळय उडवून दिला, त्याचा वचपा बाजीरावानें गोदावरीपासून नर्मदेपर्यंतच्या भागांत भरपूर काढिला आणि शेवटी तोफखाना उपयोगांत आणतां येऊं नये अशा अडचणींत निजामास गाठून त्याजला

§ पे. द. १२.८,११७,११,१५,२२,२०,२१.

$ पे. द. १२, २२ व ३०.४५ वगैरे लेख पहावे.

कोंडलें, हा गनिमी काव्याच्या पद्धतीचा उत्कृष्ट प्रयोग होय. यासाठीं शाहूच्या आज्ञेनें दोन पृथक्कार्यभाग बाजीराव व चिमाजी या दोघां बंधूंनी वांटून घेतले. उत्तरेकडची बाजू बाजीरावानें आपल्याकडे घेऊन, नाशिकपासून सातारा-मिरजपावेतोंच्या प्रदेशाची व्यवस्था चिमाजीकडे सोंपिली आणि त्याचे साह्यास सिंदे, होळकर, पवार, कदमबांडे हे होतकरू सरदार नेमून दिले. जुन्नर, पेडगांव, पाटस, खेड ही ठाणीं ठासून सांभाळण्याची ताकीद बाजीरावानें चिमाजीस व सरदारांस केली.

उभय पक्षांचे ठिकाणीं युद्धाचा आवेश भरपूर उमटला होता. ऐवजखान व तुरुकताजखान जसे निजामाकडे कसून मेहनत करणारे तसेच सिंदे, होळकर इत्यादि सरदार मराठ्याकडे होते. राणोजीनें बाजीरावास कळविलें, "ज्या प्रकारची आज्ञा होईल, त्याप्रमाणें वर्तूं. भिऊन पुढें चालावयास अंतर करणार नाहीं. प्रसंग पडलाच तर स्वामींचें पुण्य समर्थ आहे. आमचा सांभाळ ईश्वर करीतच आहे."‡ राणोजीचीं अशी रसभरित पत्रें अनेक आहेत. बाजीरावानें या समयीं भीड मुर्वतही कोणाची ठेविली नाहीं. उदाजी पवार कटकट करूं लागला तेव्हां बाजीरावानें त्यास लिहिलें, "या मरदाच्या मातबर असतां क्षुल्लक दावे करावे हें पाजीपणाचें काम होय. कार्यसिद्धि झाल्यावर मग काय तें पाहतां येईल."† तुकोजी पवारानें या समयीं मोठी बहादुरी केली, तिचें वृत्त पुढीलप्रमाणें आहे.

पुणें प्रांताची दंगल स. १७२७ च्या पावसाळ्यांतच सुरू झाली होती. ऐवजखान औरंगाबादेकडून चालून आला त्याचा समाचार सिन्नरजवळ तुकोजी पवारानें चांगला घेतला. या ऐवजखानाची धास्ती शाहूस फार पडली होती.§ सिन्नरचा देशमूख कुवरबहादूर नांवाचा राजपूत सरदार मोगलांचे पदरीं होता, तो चालून आला तेव्हां त्याचाही फन्ना तुकोजी पवारानें उडविला. पुढें नेवासकर थोरात व पारनेरकर असे कुवरबहादुरास सामील होऊन तुकोजीवर चालून आले, तेव्हां पेशव्यानें मदत पाठवून त्याचा बचाव केला (ऑगस्ट, स. १७२७). हा कुवरबहादूर पुढें युद्ध संपल्यावर पेशव्याचे पक्षांत सामील झाला. चंद्रसेन जाधवही मुलखात उपद्रव करीत होता, त्यास

‡ पे. द. १०. ४१ ; १४.३३

† पे. द. ३०.५० § इ. स. पे. द. पृ. १२० ले. ११७

फत्तेसिंग व रघूजी भोसले यांनीं गांठून साफ बुडविलें. एक प्रहर तुंबळ युद्ध झालें. उभयतांकडील लोक बहुत पडले. † स. १७२७ च्या अखेरीस पुणें प्रांतांत निजामानें भयंकर धुमाकूळ उडवून दिला त्याचें वर्णन खुद्द चिमाजीनें लिहून पाठविलें तें असें. ¶

"तुरुकताजखान, रंभाजी निंबाळकर, नेवासकर थोरात, धीराजी पवार वगैरेंनीं येऊन प्रथम मुलकांत धुंदी चालविली. लोहगडचे पेठेपर्यंत गेले. तेथें लोहगडकऱ्यांनीं ठेचून वाटेस लाविले, ते माघारे येऊन चिंचवड पुण्यामध्यें राहिले. तों निजाम संभाजीसह पुणें प्रांतांत अंजनापुरास येऊन राहिला. पुढें तळेगांव शिखरापुरावर जाऊन कौल घेतले. तेथून नारायणगड उदापुरचे § रोखें जाऊन राहिला. अवसरी पाबळकर ठाणीं टाकून पळाले. खेडचें संरक्षक ठाणें सोडून गेले. नारायणगडावरील शिबंदीनें जुन्नरकर बेगांस धुडावून संभाजी राजांचें निशाण घेतलें."

तदुपर निजामानें उदापुरचें ठाणें घेऊन अवसरीखेडची ठाणीं जुन्नरकर बेगाचे हवालीं केलीं आणि आपण माघारा लोहगांववरून पुण्यास आला. तेथें त्यानें संभाजीचें लग्न रामनगरचा राणा सिसोदिया राजपूत होता त्याचे कन्येशी केलें.‡ छत्रपति पद तर संभाजीचें होतेंच. फक्त यथाविधि राज्याभिषेक व्हायचा तेवढा बाकी होता. त्यावर पुण्याचा बंदोबस्त फाजलबेग याजला सोपून निजाम लोणी पारगावावर गेला. तेथून सुपें व पाटसचीं ठाणीं त्यानें काबीज केलीं. सुप्यास रंभाजीला ठेवून पाटसास नेवासकर थोरातास ठेविलें. आंबीचें ठाणेंही रंभाजीकडेच दिलें. बारामतीस धायगुडे होते ते ठाणें टाकून पळाले तें निजामानें जानोजी निंबाळकराचे ताब्यांत दिलें. इतक्यांत पेशवा पुण्यावर चालून येतो अशी वार्ता आल्यावरून निजाम लगबगीनें पेडगांवावरून नगरास गेला, तेथून कासारबारीनें तडक उत्तरेकडे खानदेशांत

† पे. द. १०.४०,४६,४७.

¶ पे. द. १०.५०. चिमाजी या वेळीं शाहूसह पुरंदर गडावर राहिला होता.

§ जुन्नरचे उत्तरेस १० मैल.

‡ 'निजाम व संभाजी याचा मुक्काम आर्जा फाल्गुन शु. ९ रोजीं पुणें येथें जाला,' असें चिमणाजी दामोदर रा. खं. ३ ले. १५ यांत ब्रह्मेन्द्रस्वामीस लिहितो. ही फाल्गुन शु. ९, स. १७२८, ८ फेब्रुवारीची समजली पाहिजे. स. १७२७ च्या फाल्गुनांत निजाम पुण्याकडे नव्हता. राजवाड्यांनीं पत्राची तारीख अंदाजानें दिली आहे. याच मुक्कामांत संभाजीचें लग्न झालें.

जाऊन पेशव्याशीं गांठ घालावी असा विचार ठरवून ता. २२ फेब्रुवारी, स. १७२८ रोजीं तो नगरहून पुढें निघाला असतां पेशव्यानें त्यास कैचीत कसें पकडलें तें पुढें दिसून येईल. पुणें प्रांतांतील त्याचा वरील प्रभाव तोफखान्याचे सामर्थ्यावर त्यास घडवून आणतां आला. वर पाटसच्या ठाण्याचा उल्लेख आला आहे. ते ठाणें राणोजी सिंद्यानें शिकस्तीनें सांभाळलें होतें त्या संबधींचें त्याचें बाणेदार वर्तन त्यानें स्वतः लिहून कळविलेलें स्मरणीय आहे.§

निजामानें आपले बेत अत्यंत गुप्त म्हणून ठेविले होते, तरी त्याची पूर्ण माहिती बाजीरावास त्याच्या हस्तकामार्फत लगोलग कळत होती. तदनुसार त्यानें आपल्या हालचाली आखिल्या. तोफखाना जवळ नसल्यामुळे समोर युद्धप्रसंग टाळून लाबीच्या भराऱ्यांनीं निजामाचा मुलूख साफ उद्ध्वस्त करून दोन महिन्यात बाजीरावाने निजामास जेरीस आणिले. सेप्टेंबरांत दसऱ्याच्या मुहूर्तानें पुण्यांतून निघून पारनेर उजवें टाकून पुणतांब्यावर त्यानें गोदावरी ओलांडिली. पलीकडील निजामाचा धनाढ्य प्रदेश यथेच्छ लुटून जालना व सिंदखेड हे परगणे बेचिराख केले. ऐवजखान त्याजवर चालून आला त्यास नोव्हेंबरच्या ५ तारखेस धुडावून आता बऱ्हाणपुर जाळून खाक करतों अशी नुसती आवई पाडिली, आणि पूर्वेकडे वळून माहूर, मंगरूळ व वासीम हे तालुके त्यानें डिसेंबरचे आरंभीं धुळीस मिळविले. तसाच त्वरेनें वायव्येकडे वळून चोपड्याचे पश्चिमेस तापी उतरून ता. १८ डिसेंबरास त्यानें कोकरमंड्यावर मुक्काम केला. तेथून पश्चिमेस गुजरातेत प्रयाण करून जानेवारीचे आरंभीं बाबाप्याराचे घाटानें तो भडोचवर गेला आणि जानेवारी-अखेर त्यानें अलीमोहन गाठलें. तेथें त्यास निजामानें पुणें प्रातांत अनर्थ उडविल्याची बातमी कळली, त्याबरोबर तसाच परत फिरून तो करवंदबारीनें खानदेशांत ता. १४ फेब्रुवारीस धुळयाजवळ बेटावद येथें दाखल झाला.†

बाजीरावाच्या वरील भरारीत काय उद्देश होते ते सूक्ष्म अभ्यासानें निश्चित केले पाहिजेत. अर्थात् त्यांत मतभेदास जागा राहील. निजामास कोठें तरी सोयीच्या जागीं दोन फौजांच्या चिमट्यांत कोंडावा हा बाजीरावाचा चतुराईचा उद्देश प्रथमपासून ठरविलेला होता. उत्तरेकडून निजामास मदत येऊं न देतां तिकडचा त्याचा सधन प्रदेश लुटला कीं पुणें प्रांताची मिठी सोडून तो

§ पे. दि. २.३५. पत्राचा काळ फेब्रुवारी १७२८ चा होय. पे. द. १८.३५ पहा.

† पहा, सर जदुनाथांचें विवेचन, केम्ब्रिज हि० ऑफ इं०, भा. ४, पृ. ३८०.

उत्तरेकडे यावा ही बाजीरावाची अपेक्षा शेवटीं खरी ठरली. वऱ्हाड खानदेश लुटून त्यानें पैसाही पुष्कळ मिळविला. गुजरातेंत हुलकावणी अल्पकाळ दाखविण्याचें प्रयोजन असें होतें की, तेथचा सुभेदार सरबुलंदखान याचें व निजामाचें वाकडें होतें ही गोष्ट बाजीरावास माहीत होती. त्यानें सरबुलंदखानास कळविलें, 'आमची व निजामाची दोस्ती आतां पक्की झाल्यानें त्यांचे सांगण्यावरून गुजरात प्रांत त्यांस मिळवून देण्यासाठीं आम्ही तुमचेवर चालून आलों आहों.'

निजाम प्रथम उत्तरेकडेच बाजीरावाचे पाठीवर चालला होता. ऐवजखानास बाजीरावानें पिटाळलेलें ऐकून निजाम त्या खानाचे मदतीस धावून गेला, तों बाजीराव बऱ्हाणपुरावर गेल्याचें कळताच त्या राजधानीच्या बचावासाठीं निजाम तिकडे वळला. इतक्यांत बाजीरावानें गुजरातेंत भलताच उपद्व्याप करून सरबुलंदखानास फसविल्याचें निजामास कळलें. तेव्हां तो मोठ्या त्वेषानें परत वळून एकदम पुण्यावर चालून आला. तुरुकताजखान, रंभाजी निंबाळकर, चंद्रसेन वगैरे अगोदरच पुणे प्रांतावर आले होते, त्यांस आतां स्वतः निजाम आल्यानें जोर चढला, आणि अल्पावकाशात जुन्नर ते इंदापूरपर्यंतच्या टापूंतील एकूण एक ठाणीं भराभर निजामाचे कबजात गेलीं हे वर सांगितलेंच आहे. यामुळें शाहू अत्यंत उद्विग्न झाला. पुढें आपला निभाव लागतो कीं नाहीं याची त्यास धास्ती वाटूं लागली. साबाजी निंबाळकराची काकळूत करून शाहूनें इंदापुरचें ठाणें परत घेण्याची त्यास आज्ञा केली.† वस्तुतः पुणें प्रांतांतून निजामास लभ्यांश असा कांहीच झाला नाहीं. चार दिवस ठाणीं हातचीं गेलीं तीं परत येण्यास विलंब लागला नाहीं. संभाजी व चंद्रसेन याची तर निजामाला मुळीच मदत झाली नाहीं, उलट गळ्यांतल्या लोढण्याप्रमाणें त्यांस पोसून सांभाळणें त्यास भाग पडलें. ते होऊन एखाद्या सरदारावर लढाई मारतील किंवा शाहूवर चाल करतील असें कांहीच घडलें नाहीं. शाहू व चिमाजी आपा पुरंदरावर राहून शत्रूचें निवारण करीत होते. चिमाजी बाजीरावास लिहितो, "स्वामींचीं पत्रे खानदेशांतील मुकामाचीं (ता. ६ व १४ फेब्रुवारीचीं) पोंचून स्वामींच्या आगमनाचें वृत्त कळलें. ऐशास जो प्रसंग घडला तो स्वामींनीं महाराजांचे पायावरी व स्वामिकार्यावरी दृष्टि देऊन मान्य केला. सकल सरदार सेनेनिशीं आले, उत्तम जालें. सर्वभार श्रीवरी आहे. वडिलांचे पुण्येंकरून व स्वामींची

† शा. रो. ३४

निष्ठा महाराजांचे ठायीं आहे तेणेंकरून ईश्वर निभावीतच आहे. आपलीं दोन पत्रें वाचून राजश्री संतोषी जाले. नित्य आपणाकडील वर्तमानाचे ठायीं आतुर आहेत. "¶

निजाम-बाजीरावाच्या हालचालीची उपपत्ति बिनचूक सांगणें कठिण आहे. त्या संबंधानें हदीकतुल आलम या ग्रंथांतील हिजरी स. ११३९ ची खालील हकीकत अभ्यासोपयोगी वाटेल. §

" उत्तरोत्तर बाजीरावाचा उपद्रव निजामाला दुःसह होऊन, खुद्द त्याचा धनी शाहूराजा यासच गादीवरून काढण्याचा विचार निजामानें ठरविला. राजारामपुत्र संभाजी कोल्हापुरास राज्य करीत होता, त्यास आणून सातारचे गादीवर बसविण्याचा घाट त्यानें रचिला. या कामीं त्यानें चंद्रसेन जाधवास हाताशीं धरिलें. चंद्रसेनास पाठवून निजामानें संभाजीस आपले भेटीस आणिलें; तुम्हीच एकंदर मराठी राज्याचे छत्रपति अशी द्वाही फिरविली, चौथाईच्या वसुलासाठीं शाहू व बाजीराव यांचे मोकासदार ठिकठिकाणीं होते, त्यांस काढून त्यांचे जागीं निजामानें संभाजीचे मोकासदार नेमिले. स. १७२७च्या पावसाळ्यापूर्वी हा प्रकार सिद्ध होऊन शाहूची सत्ता चहूंकडून संपुष्टात आली.

"या अरिष्टाचें निरसन करण्यासाठीं बाजीरावानें फौजेची जमवाजमव करून दसऱ्यानंतर जालनाचे जवळ आपला तळ दिला. हें पाहून निजामानेंही फौजेची सिद्धता केली. त्यानें संभाजीस बरोबर घेऊन आघाडीवर ऐवजखानाची नेमणूक केली. ता. ६ नोव्हेंबर, स. १७२७ रोजीं जालनाजवळ लढाई होऊन बाजीराव पराभव पावून बऱ्हाणपुराकडे पळूं लागला. ऐवजखानानें बाजीरावाचा पाठलाग चालविला, तेणेंकरून बाजीरावाची हैराणगत जाली. निजामाचे फौजेस चुकवून बाजीराव गुजरातेंत गेला असें वर्तमान समजतांच, निजामानें परत बऱ्हाणपुरावर येऊन फौजेस थोडी विश्रांति दिली आणि पुनः लढाईची सिद्धता केली.

" मोठमोठ्या मजला करीत निजाम सुरतेपावेतों बाजीरावावर चालून गेला. गुजरातचा सुभेदार सरबुलंदखान यास वाटलें निजाम आपणावरच चालून येतो. बाजीरावानें निजामास चुकवून पुनः पलायन केलें, तेव्हां निजाम लगोलग परत फिरून पुण्यावरच चालून गेला. अहंमदनगरपावेतों येतो तों त्यास

¶ पे. द. १०.५० § सर जदुनाथ याजकडून हा उतारा मिळाला.

कळलें, बाजीराव खुद्द औरंगाबादेवर चढाई करून गेला. तेव्हां निजाम आपल्या राजधानीच्या बचावास परत फिरला. दरम्यान बाजीरावानें कासारबारीनें पुढें येऊन गांडापुर, बैजापुर वगैरे निजामाचा प्रदेश उध्वस्त केला; आणि निजामाच्या फौजेस दाणावैरण मिळूं नये अशी युक्ति केली. रस्त्यांत नद्यानाले होते त्यांचे उतार बाजीरावानें अडविले. अशा रीतीनें गनिमी काव्याचें युद्ध खेळून बाजीरावानें निजामास जेरीस आणिलें, तेव्हां ऐवजखानास मध्यस्थीस घालून त्यानें तह ठरविला."

मोठ्या विस्तृत क्षेत्रांत चाललेल्या या प्रचंड झगड्यासंबंधानें लोक अत्यंत आतुर व हवालदील झाले होते. पुढें काय परिणाम होतो याचा अंदाज कोणालाच बांधता येण्यासारखा नव्हता. निजामास तर बाजीरावाचा एवढा त्वेष चढला कीं मुबारीजखान बरा पण हे मराठे नकोत अशी त्याची भावना होऊन, केव्हां एकदा बाजीरावास मैदानांत गांठून तोफांनीं भाजून काढतों अशी त्याला उत्कंठा लागली. इकडे आपण जगतों की मरतों, आपलें छत्रपतिपद राहतें की जातें अशी विवंचना शाहूस लागली.

निजाम उलटून आपल्यावर चालून येतो ही बातमी बाजीरावास बेटावद येथें कळतांच तो कासारबारीनें अजिंठ्याचे डोंगरांतून औरंगाबादचा डौल दाखवून विजेसारखा दक्षिणेकडे येऊं लागला. त्यापूर्वीच मराठे सरदारांनीं निजामाच्या दोहों बाजूंनीं छापे घालून त्यास हैराण केले. सावजाला चहूंकडून हुसकून पारध्याचे आटोक्यात आणण्याचा हा आगाऊ ठरवून ठेवलेला डाव निजामास उमगला नाहीं. तोफखान्याच्या बळावर तो निर्धास्त राहिला. पण तोफखाना काहीं हुकमी हत्यार नव्हे कीं तें पाहिजे तेव्हां पाहिजे तेथें उपयोगांत आणतां यावें.

"मोगलांपासून बातमीचे राऊत आले. तीन कोसावर आला, पुढें येत आहे, बाजी भीवराबाकडे आणखी राऊत पाठवावे." अशी सूचना बाजीरावास आली. ¶ निजामाच्या आजूबाजूस सर्व सरदार गुपचूपपणें फांकून एकमेकांस इशारे देत राहिले. अशा स्थितीत हलके हलके त्यास चालता बोलता वेढा बसवून ता. २५ फेब्रुवारी, स. १७२८ रोजी मराठे सरदारांनीं पालखेडनजीक अकस्मात घेरून त्याचा कोंडमारा केला. पालखेड हें स्थळ औरंगाबादच्या पश्चिमेस वीस मैल व बैजापुरच्या पूर्वेस दहा मैल आहे. निजामाचा तोफखाना

¶ पे. द. १०. ४८.

दूर मागें राहिला आणि बाह्य प्रदेशाशीं त्याचें दळणवळण साफ तुटलें. त्यास दाणावैरण अन्नपाणी कांहींच मिळेनासें होऊन त्याची मोठी हैराणगत झाली, त्या संबंधाचे अल्पस्वल्प तपशील उपलब्ध आहेत. बाजीराव लिहितो, “आज आम्ही व नबाब येथें आलों. त्यांस आम्हांस दो कोसांचें अंतर आहे. जवळच जोगिणीचे डोंगर डावे पडतसी उत्तम वाट लिहून पाठविणें. रंभाजी कदम व दावलजी सोमवंशी डावे बाजूस व पिलाजी जाधव उजवे बाजूस असे राहणें. सर्वांस सांगणें कीं मोगलांची शरम तुम्हां लोकांवरी आहे. समय पाहून वागणें. मोगल पुढें चालतोच आहे. तुम्ही फौजेनशीं आम्हांजवळ येणें.’ ¶ मल्हारराव होळकरास नबाबावर पाहरा करण्यास बाजीरावानें नेमलें.

निजामाचे अंगावर डाव उलटलासें पाहून चंद्रसेन खजील झाला. त्यानें बाजीरावास पत्रें लिहून त्याचें अभिनंदन केले आणि निजाम मजल दरमजल औरंगाबादेस जातात असे कळविलें. उपासमार होऊं लागल्यामुळे ऐवजखानाचे मार्फत बाजीरावाशीं तहाचें बोलणें करून करारनामा ठरला, तो नाइलाजास्तव निजामानें स्वहस्तें पुरा करून दिला. ‘ ऐवजखान दरम्यान नसता तर बाजीरावानी निजामाची विश्रांत केली असती, ’ असा व्यंकाजी राम या हुशार राजकारणी पुरुषाचा यावर अभिप्राय आहे. §

ऐवजखानामार्फत निजामानें तहाचें बोलणें करतांच प्रधान व सरदार यांनीं एकविचारें सांगून पाठविलें, दोन मातबर कारभारी ओलीस पाठवून द्यावे म्हणजे पाण्याची वाट देऊन मुक्काम करवितों. त्याप्रमाणें मुंगीशेवगाव जवळ पाण्याचे बाजूस सर्व मंडळी गेली, तेव्हां तह कायम झाला. म्हणून त्यास मुंगीशेवगांवचा तह म्हणतात. हा ता. ६ मार्च, स. १७२८ रोजीं चैत्र शु. ६ स पुरा झाला.

तहाचीं कलमें खालीं दर्शविलेलीं नमूद आहेत. मागणी बाजीरावाची असून, त्याजवर जबाब निजामाचा आहे. ( निजामाचे दस्तकाची फर्द )

१ मागणी—दक्षिणचे कामकाजाचा बंदोबस्त आमचे हातें घ्यावा. ईश्वर कृपेकरून दौलतखाई व किफाइत केली जाईल. जबाब—बशर्त तुमचे हातें घेतला जाईल.

¶ पे. द. १०. ५१. § पे. द. १५ ले. २९.

२ शाहूराजांकडून आनंदराव ( सुमंत ) आपणापाशी आहेत, त्यांसीं आम्हासीं नीट नाही, सबब त्यांस निरोप द्यावा. आम्हाकडून कोण्ही आपणाजवळ राहील. रुकमद दिल्ही. ( कबूल गोष्ट )

राजे शाहू यांणीं मतलब लिहून दिला, त्याजवर निजामांनी दस्कत केलें, त्याचीं कलमें.

३ संभाजीराजे यांस निरोप द्यावा की ते पन्हाळयास जात. ज० रुकसत करतों.

४ पो अकलकोट, खेड, तळेगांव, बारामती, इंदापुर, नारायणगड व पुणें वगैरे ठाणीं पहिल्यापासून स्वराज्यांत आहेत. हाली आपण जप्त केली तीं मोकळी करावीं. ज० ठाणेदार व फौजदार यांस लिहून दरोबस्त ठाणी तुमचे हवाली केली जातील.

५ सहा सुभे दक्षणच्या सरदेशमुखीची सनद व स्वराज्याची सनद नवी द्यावी. ज० पेशजीच्या सनदेप्रमाणे अंमलदारांचे नांवें परवाना दिल्हा जाईल.

६ बळवंतसिग वगैरे यांस पेशजीप्रमाणें मनसबा जागीर देऊन सरफराज करावें. ज० कबूल.

७ बाजी संकपाळ यांणी नापरूटी पो चांदवड येथील मोकदमास जिवें मारिलें. घोडे वगैरे वस्तभाव नेली ते माघारे देवावे. ज० चौकशी करून देविली जाईल.

८ संभाजी राजे यास विजापुर मुभ्यापैकीं कृष्णा व पंचगंगेपलीकडील प्रांत आम्हीं दिला आहे व त्याची सनदही आम्ही करून दिली तेच असावी. आपण न द्यावी. हें कबूल केलें.

९ सीलमखान वगैरे यांणी कमावीसदारास जिवे मारलें, घोडीं वगैरे वस्तभाव नेली ते माघारी देवावी. ज० शोध करून माघारी देविली जाईल.

१० सुलतानजी निंबाळकर आपणाशीं मिळाले, त्यास जागीर आंबड व बीड येथे आहे. कदाचित् त्यांचे भाऊ सिधोजी व कान्होजी यांशी ते खटला करतील आणि शब्द आम्हांवर येईल. ज० सुलतानजी आम्हांसी मिळाले तेव्हां त्यांची रयायत ( भीड ) आम्हासी लाजम आहे.

११ संभाजी राजे यांजकडील कमावीसदारांनी महालोमहाली वसूल घेतला असेल तो आमचे हिशेबीं न लिहावा. आम्हांकडील कमावीसदारांनीं वसूल

घेतला असेल तो मजरा देऊं. ज० चौकशी करून शाहूराजे व संभाजी राजे यांनीं वसूल घेतला असेल तो मजरा देऊन बाकी तहशील करावी.

१२ वडगांव वगैरे सात गांव पेटा गाळणा येथील जमीदाराचे गुमास्ते अलीखानाचे कैदेंत आहेत ते सोडवून द्यावे. ज० मोगल अलीखानास लिहून सोडविले जातील.

१३ पिलाजी जाधव व रंगोजी जाधव यांजकडे शहागडची पाटीलकी आहे त्यास तेथील जागीरदारास ताकीद करावी की पाटीलकीचा अंमल चालवावा. ज० ताकीद केली जाईल.

१४ तुरुकताजखान यांणीं स्वराज्यांत जाऊन बंद धरून आणिला आहे तो सोडवून द्यावा. ज० सोडून देविला जाईल.

१५ तोकरे परगण्याचे सात गांव मजीठोके याचे देशमुखांचे आहेत त्याची सनद देवावी. ज० दप्तरचा दाखला पाहून देविली जाईल. मौजे मजकूरचे महसुलाची चौकशी करून रयात केली जाईल.

१६ पेटा कर्डे निंबोणे येथील पांच गांव कृष्णाजी पवार व उदाजी व केरोजी पवार यांस इनाम द्यावे. ज० आमचे चाकर होतील तेव्हां त्यांस दिले जातील.

१७ संभाजी राजे यांस सुभे विजापूरपैकीं कृष्णा व पंचगंगेच्या पलीकडे प्रांत येथील चौथसरदेशमुखी आम्ही दिल्ही ते त्यांणीं घेत जावी. कृष्णेच्या अलीकडे उपद्रव न करावा. ज० मंजूर व स्वाल कबूल.

येणेप्रमाणे पांच पत्रांतील मजकूर कलमबंदीनें लिहिला आहे. ¶

वर वर पाहणारास तहाचीं कलमें म्हणजे त्यांतील मागण्या व जबाब अगदी क्षुल्लक वाटतात. निजामानें मोठ्या कौशल्यानें जमवून आणलेला डाव बाजीरावानें हाणून पाडला त्याचा त्यानें पुरेपूर फायदा घेतला नाहीं असा समज होतो. पण हा समज अनाठायीं आहे. बखरकारांनी तहाचा आशय अर्थपूर्ण रीतीनें दिला आहे तो असा,—

¶ पे. द. भा. १५ ले, ८६ वर एक लांब २५ बंदी मोडी कागद छापलेला आहे. शाहू राजे व पेशवे यांचे बादशहा व त्याचे अमलदार याजबरोबर जे व्यवहार दहावीस वर्षें घडले त्यांचे हे दस्तैवज कोणी तरी एकत्र नकलून ठेवले. त्यांत पृ. ८९ वर हा वरील तहाचा कागद पूर्ण दाखल आहे.

१ संभाजीस आपल्या हवालीं करावें; २ दक्षिणच्या सहा सुभ्यांवर मराठ्यांचे हक्क सुरळित चालावे; ३ आणि पुनः या हक्कांस हरकत न व्हावी म्हणून ठिकठिकाणीं तटबंदीच्या जागा आहेत त्या मराठ्यांच्या हवालीं कराव्यात.

खरोखर तहांतील ही दोन तीन कलमेंच विशेष महत्त्वाची आहेत. आपण संभाजी व चंद्रसेन यांच्या साह्यानें शाहूला नाहींसा करूं अशी उमेद निजामाची होती ती तर मुळींच साध्य झाली नाही. त्यांची आपसांत बरीच बाचाबाच झाली. पण आपल्या आश्रयार्थ आलेल्या संभाजीस, किंबहुना आपल्याच शिकवणीनें ज्यानें शाहूविरुद्ध उठावणी केली अशा इसमास त्याच्या शत्रूचे हवालीं करणें निजामास मोठें नामुष्कीचें वाटलें आणि त्यानें ही अट नाकारली. तहाची वाटाघाट चालू असतांच त्यानें संभाजीस पन्हाळ्याकडे लावून दिलें; पण त्याची वाटेल ती व्यवस्था शाहूनें करावी अशी अट कबूल केली. मराठी राज्याचें पुढारीपण शाहूकडे आहे, त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाचा वारसा आपण कबूल करणार नाही अशी कबुली या अटीनें निजामानें दिली. अशा रीतीनें युद्ध पुकारतांना मराठी राज्याचा वारस शाहू की संभाजी असा जो मुद्दयाचा प्रश्न निजामानें पुढें आणला होता तो निकालांत निघाला. शाहूची मराठी राज्याची मालकी निर्बाधित झाली.

त्याचप्रमाणें दक्षिणच्या सहा सुभ्यांवरील मराठ्यांच्या चौथ सरदेशमुखीच्या हक्कांस निजामाकडून मान्यता मिळाली. या हक्कांच्या सनदा दरबारांतून जरी मराठ्यांस मिळाल्या होत्या, तरी हे हक्क कृतींत आणणें स्थानिक अधिकाऱ्यांवर अवलंबून होतें. मुबारीजखान व निजाम हे हक्क कबूलच करीत नव्हते. ते जाणून होते कीं, या हक्काना मान्यता देणें म्हणजे आपलें स्वातंत्र्य गमावून बसून, दक्षिणेंत मराठ्यांच्या स्वैर संचारास मोकळीक करून देण्यासारखें होतें. आधीच मराठ्यांनीं चोहोंकडे धुमाकूळ मांडिला होता. चौथ सरदेशमुखीच्या पातशाही सनदांनी त्यांच्या आक्रमणास कायदेशीरपणा आला होता. हें आक्रमण वाढत जाऊन आपली सत्ता संपुष्टांत येणार, आपलें राजकीय वर्चस्व निर्माल्यवत् होणार हें जाणून ही अनिष्ट घटना टाळण्यासाठीं निजामाची सर्व धडपड चालली होती. मराठ्यांची सत्ता त्यांच्यात कलह लावून मुळांतच खची करण्याचा त्याचा डाव बाजीरावानें आपल्या शौर्यानें त्याच्या विरुद्ध उलटविला. यापुढें मराठे-निजाम यांचे लढे झाले, पण

चौथ सरदेशमुखीच्या हक्कांविरुद्ध निजामानें ब्र काढला नाहीं. अशा रीतीनें मराठ्यांचें दक्षिणेंतील राजकीय वर्चस्व निजामानें कबूल केलें.

मोगलांच्याकडे स्वराज्यापैकीं जो प्रदेश अद्याप राहिला होता त्याचा कबजाही या वेळीं मराठ्यांनीं घेतला. मावळें हीं स्वराज्याचा पहिला गाभा, तीं रंभाजी निंबाळकराचे कबजांत होतीं. निजामानें लगेच रंभाजीकडून तीं पेशव्याचे हवाली केलीं. ¶

याप्रमाणें तह पुरा होऊन दोनही पक्षाचे लोक आपापल्या ठिकाणीं गेले. तह झाल्यावर निजामानें सर्व सरदारांस वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे नजर दिले. निजामासही उलट पोषाख बाजीरावानें दिले. बाजीरावादि मंडळी परत येतांच महाराजांनीं सामोरे जाऊन सन्मान करून स्वतः सर्वांचा गौरव केला.

५ **फलादेश.**—लष्यांशाच्या दृष्टीनें या मोहिमेचें महत्त्व वर दर्शविलें आहेच. शाहूची त्रेधा उडून आता आपला काय परिणाम होणार अशी जी त्यास चिंता लागली होती ती कायमची दूर झाली. शाहूच्या मानानें संभाजी अगदी कस्पटासमान ठरला आणि केवळ शाहूच्या कृपेमुळेंच त्याचें राज्य राहिलें. आपण कोणी तरी स्वतंत्र सत्ताधीश आहों ही त्याची घमेंड पार नाहींशी झाली आणि शाहूच्या तंत्रानें वागण्यांतच आपला तरणोपाय आहे अशी त्यास खात्री पटली. चंद्रसेनाची तर अशी नाचक्की झाली, की पेशव्याशीं गोडी ठेवूनच त्यास आयुष्य कंठावें लागलें. दुसरा एक अप्रत्यक्ष पण महत्त्वाचा परिणाम असा झाला, की प्रतिनिधि, कान्होजी भोसले, दाभाडे, सरलष्कर निंबाळकर हे जुने सरदार अकर्तृत्वामुळें नामशेष होऊन मागें पडले. दावलजी सोमवंशी यानें युद्धकौशल्य चांगलें दाखविलें, म्हणून निंबाळकरांचें सरलष्कर पद काढून दावलजीस देण्यांत आलें. आणीबाणीच्या प्रसंगीं स्वतःची शक्कल (initiative) काढून अंगच्या हिमतीनें आपला कार्यभाग यशस्वी करून दाखवूं अशी ताकद बाजीराव व चिमाजी यांनी प्रगट केली, म्हणून त्यांजवर शाहूचा व राष्ट्राचा इतबार बसला. त्यांनी आपली नवी माणसें तयार करून हाताशी घेतली आणि वरील अहंमन्य मंडळींना परस्पर निकामी बनविलें. ही अंगची धमक ज्याचे अंगीं नाहीं त्यानें राष्ट्राच्या व राज्याच्या गोष्टी बोलूं नयेत. स. १७२७ च्या दसऱ्यास सर्व सरदारांच्या घरीं पराक्रमाची संधि चालून आली होती, सर्वांच्या विनवण्या व मनधरण्या शाहूनें सारख्या केल्या, कोणास

¶ रा. ख. ६. २७.

मुद्दाम म्हणून मागें टाकलें नाही, पण त्या संधीचा फायदा तेवढ्या दोन बंधूंनीच घेतला, म्हणून शाहूची मर्जी त्यांजवर कायमची बसली आणि बाकीचे मागें पडले. तथापि मनुष्य सहसा आपल्या अंगीं पराक्रम नाही हें न ओळखतां उगाच दुसऱ्याचा द्वेष करीत सुटतो, हा प्रकार पाहिला म्हणजे संभाजी, दाभाडे, कान्होजी वगैरे मंडळींनी पुढें कैक वर्षे दंगल चालविली ती अशाच प्रकारची होती. तिचा निस्तार पेशव्यांस व शाहूस कसा करावा लागला हें पुढील इतिहास सांगेल.

या मोहिमेचा तिसरा परिणाम म्हणजे पालखेडच्या प्रसंगानें बाजीरावाची छाप चहूकडे कायमची बसली. "ती० रायांचा पुण्यप्रताप विचित्र, तत्प्रभावेंकरून मोठी अवघड कर्मे स्वल्पायासें होतात. आज दक्षिणेंत मोहरा एकच आहे. या समयांत पंतप्रधान हे महाराजांचा एक डोळा आहे. जे कोणी देखो सकत नाहीत तेच हीनप्राक्तनी, करंटे. राजश्रींची चाकरी एकनिष्ठ चित्तें मनोभावें करितात, म्हणोन श्रीनें भाग्य उत्कर्ष दिल्हे आणि जयही आहे, ऐसी बहुत स्तुति आज नबाब करीत होते." लोकचर्चा की "रावसुमंतानीं नबाबास सांगितलें, बाजीरायांस नबाबांनी तंबी पोंहचाविली तरी राजे शाहू वाईट मानणार नाहीत, त्यामुळे राजांचें राज्य बुडत नाही. अवघे मराठे खूप होतील ऐसें सांगितले."† अशा रीतीनें बाजीरावाबद्दल समर्थांचा आदर व असमर्थांचा विद्वेष वाढत गेलेला आढळतो. जनरीत सर्वत्र अशीच आहे.

आणखी एक महत्वाचा परिणाम म्हणजे तोफखाना विरुद्ध गनिमी कावा हा प्रयोग वरील संग्रामात चांगला निदर्शनास आला. निजामानें पुणे प्रांतांत तोफांच्या जोरावर अवघड स्थळें काबीज केली, तसा तोफखाना आपल्याजवळ नाही, ती उणीव बाजीरावानें आपल्या धावपळीच्या युद्धानें भरून काढिली आणि शिवाजी-संताजीच्या पश्चात् त्या कलेचा मुख्य पुरस्कर्ता असें चिरंतन नांव इतिहासांत कमावलें. १४ फेब्रुवारीस सोनगडावर असलेला बाजीराव २४ फेब्रुवारीस गोदावरीवर अचूक प्रगट होतो, ही करामत पाहून निजामही आश्चर्यचकित झाला. नुसत्या घोड्यावरील धावपळीने शेकडों कोसांचा प्रदेश मराठ्यांनीं धुळीस पोंचविला, त्यामुळें निजाम हातटेकीस आला. पण तोफखानी युद्धाच्या मागे कवाइती पायदळ व आगाऊ आखलेलें धोरण असावें लागतें हा अनुभव मराठ्यांस पुढें बुसीच्या करामतींत कळून आला. बाजीरावाचें

† पे. द. १०. ४५, ४६, ५१, ५४, ५६ इ०.

सर्व यश या एका युद्धपद्धतींत निर्माण झालें. होळकर हा या बाबतींत बाजीरावाचा पट्टशिष्य बनला.

पालखेडावर निजामास नेस्तनाबूद कां केला नाहीं हा प्रश्न हाली सुचतो, पण तो त्या वेळीं उद्भवला नव्हता. निजामाला नाहींसें करण्याची कल्पना पुढें उत्पन्न झाली. पालखेडापूर्वी निजामाला मारणें तर बाजूला राहो, त्याजपुढें आपण जगायचें कसें हाच मुख्य प्रश्न शाहूला पडला होता. महंमदशहाची बादशाही तेव्हां मोडकळली नव्हती. निजामाची छाप चहूंकडे मोठी होती. नादीरशहा अजून उद्भवला नव्हता. निजामाला हाताशीं धरून बादशहा पुनः आपला संहार करील ही भीति शाहूला सारखी वाटत होती. अशा स्थितीत निभावलों हेंच पुष्कळ असें शाहूला व बाजीरावाला वाटलें यांत आश्चर्य नाहीं. शिवाय निजामाचा किंवा मोगलाचा समूळ उठावा दक्षिणेतून करावा, अशी शाहूचीच इच्छा नव्हती. अद्यापि मराठशाहीचें व बाजीरावाच्या पराक्रमाचें केवळ बालवय होतें. उत्तरोत्तर बाजीरावाला आत्मप्रत्यय येऊन दक्षिणेतून मोगलांचा अंमल साफ उखडून काढावा अशी इच्छा त्यास झाली, पण शाहूला ती गोष्ट नापसंत असल्यामुळें खुद्द शाहूचें वजन कमी होईपावेतों पेशव्यांना कालहरण करणेंच प्राप्त झालें.

पण पालखेडावर निजामाचें पाणी बाजीरावानें इतकें जोखलें की, पुढील वर्ष सहा महिन्यांत निजामास नेस्तनाबूद करण्याचे अनेक प्रयत्न त्यानें केले, पण ते शाहूनेंच सिद्धीस जाऊं दिले नाहींत. निजामाला काढणें शाहूला पसंत नव्हतें. ता. १५ जानेवारी, स. १७२९ रोजी शाहू लिहितो, " नबाबाचा व स्वामींचा सल्ला आहे, यास्तव वऱ्हाड, देवगड, चांदा व भागानगर या प्रांतीं फौजा गेल्यानें नबाब अजुर्दा होऊन सल्ल्यास विक्षेप येतो, यास्तव त्या प्रांतीं स्वारीस जाऊंच नये. "† पुढें लवकरच निजाम खानदेशात गेला असतां बाजीरावानें त्यास औस्तुक गांठून त्याचा फन्ना उडविण्याचा योग आणिला, तेव्हां शाहूनें कठोर शब्दानीं बाजीरावाचा निषेध केला, तो पुरंदऱ्यानें लिहून पाठविला—" नबाब बहुत श्रमी होऊन बोलले की आमचा व महाराजांचा स्नेह चालत असतां आमचा मुल्क मारावा, ठाणेदार धरावे, हें उचित की काय ! ऐसें झालियावर स्नेहाचें प्रयोजनच नाहीं. ऐसें भापण करून वर्तमान तपासिलें महाराजांस लिहून पाठविलें. " त्यावर शाहूनें बाजीरावास कळविलें,

† शा. रो. १८८.

"तुम्ही नबाबाचे नजीक राहूं नये. तुम्ही त्याच्या गोष्टींत मन घालावेंसें नाहीं. त्यांच्या स्नेहास अंतर करूं नये. नबाबाजवळ राहून कलह वाढवावा हें उत्तम नाहीं." 'महाराजांनीं आज्ञापत्र लिहून शपथपूर्वक स्वमुखें आज्ञा केली कीं नबाबाची मर्जी राखावी. कै० नानांच्या पायांची शपथ सांगितली. आपण राज्याचे प्रधान आहेत, किरकोळ उपसर्ग करावे, नित्य नालीश महाराजाकडे यावी हे गोष्टी आपल्या पदायोग्य नाहीं. राज्यकारभारास उत्तम दिसेल तोच प्रकार आपण करावा. नबाबाशीं कलह न केला पाहिजे '‡ यावरून निजामाचें अस्तित्व कायम राखण्याचें कारण खुद्द शाहू होय हे स्पष्ट आहे. शाहूच्या सभोंवार जुन्या निष्क्रिय मंडळीचा घोळका, त्यास या मंडळीची भीड न तुटे, म्हणून दक्षिणेंत मोकळेपणें वावरण्याची सोय बाजीरावास उरली नाहीं, यास्तव त्यानें स्वतःची मंडळी निर्माण करून शाहूच्या दृष्टिआड राहणारा उत्तरेचा कार्यभाग मुद्दाम स्वीकारिला. तरी पेशवेपण हातीं असल्यामुळें शाहूच्या मर्जीतील प्रकरणें साफ अंगाबाहेर टाकणें त्यास शक्य नव्हतें. बाजीरावाची ही परिस्थिति अभ्यासकांनीं लक्षांत बाळगली पाहिजे.

पण संकट ही पराक्रमाची जननी होय. शाहूमहाराज सदिच्छेचा सागर, त्यानें बाजीरावाचे गुण ओळखून त्यासच पुढें आणिलें. मराठशाहीचा उत्तर इतिहास मुळांत बाजीरावानें बनविला. शाहू छत्रपतीनें हा एक बाजीराव राष्ट्रास दिला, एवढ्यानेंच त्याच्या हयातीचें सार्थक झालें. निजामाचें संकट निवारण होऊन राजधानीस येतांच महाराजांनीं आपला खरा मनोदय दरबारात जाहीर केला कीं, "राऊस्वामींची मर्जी अवघ्यांनीं पाळावी. त्याच्या चित्तास क्षोभ करूं नये." अशा रीतीनें स. १७२७ च्या दसऱ्यानें निजामास वठणीस आणलें, तर लगेच स. १७२८ च्या दसऱ्यानें आणखी अघटित विजय राष्ट्रास आणून दिले आणि या दोन सालांनीं पेशवाईचें मुख्य अधिष्ठान कसे सिद्ध केलें हें पुढें सांगूं.

‡ पे. द. १०.७५.

*

# ५

# अद्भुत वर्षांतलें अद्भुत कृत्य

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १७२८ | | | —कीलक संवत्सर. |
| ,, | जून | | बंगसानें जैतपुरावर छत्रसालाचा पाडाव केला. |
| ,, | ऑक्टो० | ७ | सवाई संताजी भोसले याशी बाजीरावाचा स्नेह-करार. |
| ,, | नोव्हें० | २९ | आमझेराची लढाई, दोन सुभेदार गारद, चिमाजीचा अपूर्व विजय. |
| ,, | डिसें० | १३ | चिमाजीआपा उज्जैनवर. |
| ,, | ,, | २० | भवानीरामाचा चिमाजीवर हल्ला. |
| १७२९ | फेब्रु० | | बाजीरावाचा बुंदेलखंडात प्रवेश. |
| ,, | मार्च | १२ | महोबा येथें बाजीराव-छत्रसाल भेट. |
| ,, | एप्रिल | २८ | बाजीरावाकडून बंगषाचा पराभव, गोविंदपंत बुंदेल्याची नेमणूक. |
| ,, | डिसेंबर | | —मांडवगड पवार-होळकरांकडून काबीज. |
| १६७०–१७३१ | | | छत्रसाल बुंदेल्याचा पराक्रमकाल. |
| १७३० | मार्च | २९ | मांडवगड मोगलांस परत दिला. |
| १७३१ | जाने० | २९ | उदाजी पवाराचा सरंजाम जप्त. |
| ,, | डिसें० | १४ | छत्रसाल मृ. |
| १७३६ | जून | | आनंदराव पवार मृ. |
| १७६० | फेब्रु० | | उदाजी पवार मृ. उद्गीरच्या संग्रामांत. |

*

# ५

# अद्भुत वर्षांतलीं अद्भुत कृत्यें



**१ कीलक संवत्सराचा प्रभाव.**—स. १७२८ किंवा शके १६५० कीलक संवत्सर हें वर्ष मराठशाहीच्या इतिहासांत सदैव झळकत राहणारें बनलें. या सालच्या आरंभीं बाजीरावानें निजामास आहारीं आणून त्याजवर आपला शह बसविला, त्याचप्रमाणें या सालच्या अखेरीस त्याचा बंधु चिमाजी आपा यानें माळव्यांत उतरून ता. २९ नोव्हेंबर रोजी अमझेराच्या लढाईत गिरिधर बहादूर व दया बहादूर हे दोन बलवान मोगल सुभेदार अकस्मात् बुडविले, आणि या अद्भुत कृत्यानें समस्त हिंदुस्थानास चकित करून हिंदुपदपातशाहीचा संकल्प चालीस लाविला. वरील बनावानें माळव्याची राजधानी प्राचीन अवंती नगरी मराठ्यांचे कबजांत आलीसें पाहून बाजीरावानेंही वऱ्हाड-मध्यप्रांतांतून उत्तरेकडे त्वरेनें प्रयाण करून देवगड, गढामंडळा मार्गानें बुंदेलखंडाचा भाग आक्रमिला. अशा प्रकारें पुढील सालच्या उन्हाळयांत म्हणजे सौम्य संवत्सर शके १६५१ च्या आरंभी या दोघा बंधूंनीं मराठी राज्याची सत्ता यमुना नदीस भिडवून पर्जन्यकाळी साताऱ्यास महाराजांचें दर्शन घेऊन आपल्या या अपूर्व विजयाबद्दल त्यांचें अभिनंदन स्वीकारलें. विद्युद्वेगाच्या या घटना आतां सांगावयाच्या आहेत. §

---

§ गिरिधर बहादूर व दया बहादूर यांचा पाडाव मराठ्यांनीं कधीं कसा केला या संबंधानें पुष्कळ काळ संशय चालू होता, त्याचें आतां पेशवे दप्तरांच्या कागदांनीं व जयपुरच्या अखबारांनीं कायमचें निरसन झालें आहे. मध्यंतरीं मंडलोई घराण्याचा पत्रव्यवहार बाहेर आलेला विश्वसनीय नाहीं असेंही सिद्ध झालें आहे.

पालखेडच्या प्रसंगानें निजामाचें पाणी बाजीराव-चिमाजींनी पूर्णपणें ओळखलें आणि मनाचा हिय्या केला कीं, कसें करूं, काय करूं या विवंचनेंत कालक्षेप न करितां एकदम जोराचा प्रहार करून अंगच्या पराक्रमानें हिंदुपद-पातशाहीची सिद्धता करून दाखवायची. या प्रयोगास शाहूमहाराजांची संमति बिलकूल नव्हती. निजामाच्या कर्तबगारीचा त्यास मोठा भ्रम होता. हे उच्छृंखळ पोर भलताच घात करून बसतील, अशा बुद्धीनें शाहू नाना तऱ्हेनें त्यांस मागे ओढीत होता. पण सारखे बाहेरच्या व्यवहारात वागत असल्यानें त्या दोघा बंधूंस वस्तुस्थिति जशी बिनचूक कळत होती, तशी ती शाहूस कळत नव्हती. या दोघांनी आतां सहायकही भरपूर जमविले असून तारुण्याचें रक्त सर्वांच्या अंगात सळसळत असल्यामुळें अंतःकरणाच्या प्रवृत्तींनाच त्यांनीं प्राधान्य दिलें. निजामाचा तह ठरला त्याप्रमाणें त्यानें कांहींच आचरण केलें नाहीं. चहूंकडून कागाळ्या येऊं लागल्या. किल्ल्यांच्या देवघेवींत भानगडी उपस्थित झाल्या. निजामाची घमेंड अशी मुखामुखी उतरणारी नव्हती. शाहूच्या दरबारांत कपटनीतीचा प्रयोग त्यानें सारखा चालू ठेविला. मनाची वृत्ति असेल तीस पुष्टि देणारे तोंडपुजे लोक जवळ होतेच. त्यांनीं निजामास भर दिली की, बाजीरावाला दरबारांत कोणाचाच पाठिंबा नाहीं.

"मराठे सरदार कोणीच बाजीरायास सामील होत नाहींत, दावलजी सोमवंशी व फत्तेसिंग भोसले त्यांस वऱ्हाडात पाऊल ठेवूं देणार नाहीत, असा घाट शाहूजवळ रचून निजामाच्या हस्तकांनी त्यास निर्धास्त राहण्याची सूचना दिली. हे प्रकार बाजीरावाच्या कानीं आले. शाहूमहाराजांस राज्य राखणें असेल आणि बाजीरायास कांहीं अभिमान असेल तर दावलजी व फत्तेसिंग यांस त्यानें सामील करून घ्यावें म्हणजे नबाबाचे डोळे उघडतील. सेनापति दाभाडे तर पहिल्यापासून शाहूमहाराजांचें शत्रुत्वच चाहतात. सुलतानजी निंबाळकर किती इमानी आहेत तेंही कळून चुकलें.¶ त्याचाच कित्ता दाभाड्यानें वळविला." अशा प्रकारचीं वर्तमानें बाजीरावास कळून आलीं. कावनई, अणकाई इत्यादि किल्ल्यांच्या भानगडी चालून चहूंकडून काहूर उठल्यासारखें दिसतांच निजामाचा नाद सोडून प्रत्यक्ष माळवा

¶ हैबतराव व त्याचा पुत्र सुलतानजी निंबाळकर शाहूचे सरलष्कर होते. स. १७२७ त सुलतानजीने निजामाकडे फितुरी केली, म्हणून त्याचे जागी दावलजी सोमवंशी याची नेमणूक सरलष्करीवर स. १७२८ त झाली.

बुंदेलखंडाचा डाव हातीं घेतला की सर्व हिंदुस्थानास दहशत बसेल अशा विचारानें त्या दोघां बंधूनीं अत्यंत साहसाचा निराळाच उपक्रम सुरू केला.† ता. ७.१०.१७२८ रोजीं सवाई संताजी भोसले याच्याशीं बाजीरावानें करार करून साह्य मिळविलें, तो या स्वारीचा आरंभ होय. मात्र भोसल्यानें करार पाळला नाही.

गिरिधर बहादूर व दयाबहादूर या दोन बलवान मोगल सुभेदारावर एकसमयावच्छेदें घातलेला मराठ्यांचा घाला अनेक प्रकारें अतर्क्य व कुतूहलोत्पादक आहे. अमझेराच्या रणांगणावर दोन मोगल सुभेदार मराठ्यांस माळव्यांतून घालवून देण्यासाठीं जंगी तयारी करून बादशहाच्या आज्ञेनें आलेले गारद झाले. मराठ्यांकडे तोफा नव्हत्या. कांहीं अल्पगुणी बंदुका व भाले, बरच्या, तलवारी एवढींच त्यांची हत्यारें असून मोगलांकडे तोफखाना भरपूर होता. या वेळीं तरी गनिमी युद्धापुढें तोफांचा इलाज चालत नव्हता. एकूण एक मराठे वीर तारुण्य, शौर्य, हिंमत, निश्चय अशा गुणांनीं उद्युक्त झालेले केवळ लोखंडाच्या छातीचे बनले होते; आणि मोगलांच्या बाजूस मुख्य अभाव अशा कर्तव्यनिष्ठ सैनिकांचा होता. मराठ्यांस अल्पायासें विजय प्राप्त होण्याचें हें मुख्य कारण होय. मानवी बुद्धीपुढें बाह्य शस्त्रांचा व साहित्याचा दिखाऊ पसारा किती विफल ठरतो हें या उदाहरणांत व्यक्त झालें.

या लढाईचें प्रत्यक्ष वर्णन करणाऱ्या हकीकती उपलब्ध आहेत. जयपुर दप्तरांत बादशाही अखबारा मिळाल्या त्यांत गिरिधर बहादूरच्या मृत्युसंबंधी खालील पत्र आहे. महाराजा सवाई जयसिंग यास त्याचा हस्तक केशवराम लिहितो,—

" कंठाजी कदम दहा हजार लोकांनिशी माळव्यात उपद्रव करीत होता त्याजवर गिरिधर बहादूर चालून गेला, म्हणून कंठाजी पळून गुजरातेंत बासवाडा येथें गेला. तेव्हां गिरिधर बहादूरनें अमझेरा येथें येऊन मुकाम केला. इतक्यांत बाजीरावाचा बंधु चिमाजी आपा व उदाजी पवार २२ हजार फौजेनिशीं अकस्मात् नर्मदापार होऊन रोजीं ३० कोसांच्या मजला करीत गिरिधर बहादूरवर चालून आले. धारच्या बंदोबस्तास महंमद उमरखान होता

† या उपक्रमाचे कागद ठिकठिकाणीं विखुरलेले व मुख्यत: पेशवे दप्तराच्या भागांत इतके विपुल आहेत, कीं त्यांचा नुसता गोषवाराही देणे शक्य नाही. पे. द. भा. १० ले. ५५, पे. द. ३०.५५ ५६, ७२ C, ६६ व ६६ A इत्यादि पहावे.

त्यानें बहादूरच्या साह्यास येऊं नये म्हणून एक लहानशी टोळी चिमाजीनें धारचे रस्त्यावर ठेवून दिली आणि ता. ८ जमादिलावल ( २९ नोव्हेंबर स. १७२८ ) रोजीं एकाएकीं येऊन बहादूरच्या छावणीस वेढा घातला. राव गुलाबराम व सलाबतखान जमादार बाहेर मराठ्यांवर चालून गेले, पण दुर्दैवानें ते दोघे गारद झाले. राजा आनंदराम यास दोन गोळ्या लागून जखमा झाल्या तेव्हां आनंदराम व त्याचा भाऊ शंभुराम यांस मराठ्यांनीं पकडून घेतलें. खुद्द गिरिधर बहादूरांनीं हत्तीवरून चालून येऊन आपल्या बाणांनीं पुष्कळ मराठ्यांना ठार केलें. हत्तीवर बाणांचे चार भाते होते ते सर्व खलास झाले. इतक्यांत शत्रूची गोळी छातींत घुसून राजा बहादूर गतप्राण झाले. आजपावेतों त्यांनीं सरकारची सेवा निष्ठेनें बजावून शेवटीं धन्यासाठीं आपले प्राण अर्पिले. आतां राजा बहादुरांचीं व राजा छबिलारामाचीं मुलें व परिवार यांचा सांभाळ करणें आपल्या हातीं आहे. ''

बादशहानें व जयसिंगानें सांत्वनपत्रें पाठवून गिरिधर बहादुराचे कुटुंबाचा परामर्ष घेतला, आणि सय्यदनुज्मुद्दीन अलीखान यास ताबडतोब माळव्याचे उपराळयास रवाना केलें. इकडे गिरिधर बहादूरचा पुत्र भवानीराम जवळ होता, त्यानें बापाचे पश्चात् प्रांताचा कारभार हातीं घेऊन मराठ्यांचा प्रतिकार चालविला. उज्जैनचा बंदोबस्त करून तें शहर त्यानें हातचें जाऊं दिलें नाहीं. बादशहानें त्याला चिमणाबहादूर किताब व बापाची जागीर देऊन खर्चास दोन लाख रुपये पाठविले.

दरम्यान चिमाजी आपानें अमझेरा येथें तीन दिवस मुक्काम करून थकलेल्या फौजांस विश्रांति दिली आणि कूच करून ता. ३ डिसेंबर रोजीं आहू, ता. ६ रोजीं देपाळपुर व ता. १३ रोजीं तो उज्जनी येथें दाखल झाला. त्यापूर्वींच उदाजी पवारानें उज्जनीस वेढा घातला होता. एक महिनापावेतों भवानीरामानें उज्जनीचा उत्कृष्ट बचाव केला, त्याबद्दल बादशहानें त्याची वाहवा केली.

पे. द. च्या १३ व्या भागांत कित्येक पत्रें छापलेलीं आहेत त्यांवरून या प्रचंड घडामोडीचा थोडा बहुत छडा लावितां येतो. उदाजी पवार, मल्हारराव होळकर, राणोजी सिंदे वगैरे जे लहान मोठे सहायक पेशव्याचे होते, त्यांच्या दप्तरांत नमूद झालेल्या कित्येक हकीकती त्या त्या सरदाराची कामागिरी सांगणाऱ्या मिळतात, त्या अभ्यासूंनीं लक्षांत घेतल्या पाहिजेत. अनुषंगानें

दुसरी एक गोष्ट सहज कळून येते कीं, स. १७२८ च्या दसऱ्यास जेव्हां चिमाजी-आपा व बाजीराव पुण्याहून स्वारीस निघाले, तेव्हां त्यांनीं आपल्या बायका स्वारीत बरोबर घेतल्या होत्या.‡ म्हणजे बायका स्वारीत घेण्याचा प्रघात आरंभापासूनच होता. बाळाजी विश्वनाथ प्रथम दिल्लीस गेला, तेव्हां त्याची बायको राधाबाई बरोबर होती कीं काय याचा थांग लागत नाहीं. पण पुढें या राधाबाईनेंच आपल्या तरुण पुत्रांबरोबर बायका पाठविण्याचा रिवाज घातला.

गिरिधर बहादूरचा पुत्र भवानीराम हुशार होता, त्यानें लगोलग फौजा जमवून उज्जनीचा बंदोबस्त केला. ता. २० डिसेंबर रोजीं चिमाजीनें शहरास वेढा घातला. भवानीरामाने निकरानें मराठ्यांवर हल्ला केला, पण निकाल लागला नाहीं. पुढें बाजीरावाच्या सांगण्यावरून चिमाजीनें उज्जनी सोडून बाहेरच्या प्रांतांतून चौथाईच्या रकमा वसूल केल्या. भवानीरामाचे साह्यास नुज्मुद्दीन अलीखान आला, त्यांचें आपसांत पटलें नाही, तेव्हां खान माळवा सोडून परत गेला. भवानीरामाजवळ पैसा नसल्यामुळें फौजेनें त्यास भंडावून सोडलें. बादशहासही मोठा पेच उत्पन्न झाला, की आतां माळव्याचा बचाव कसा करावा. इतक्यात महंमदखान बंगश जैतपुरच्या अपयशानें जळफळत बादशहाकडे दाखल झाला. ' मला माळव्याची सुभेदारी द्याल तर मी मराठ्यांना तेथून काढून देतों,' असें हिमतीचें बोलणें त्यानें बादशहाकडे करितांच स. १७३० च्या सेप्टेंबरांत बादशाही हुकमानें तो माळव्याचे सुभेगिरीवर दाखल झाला.

**२ तयारीची पराकाष्ठा.**—माळव्यांतच एकाएकीं स्वारी करण्याचा उद्योग बाजीरावानें कां स्वीकारिला व त्या कामावर चिमाजीसच कां पाठविलें याचा खुलासा कळला पाहिजे. बाजीरावाच्या पत्रव्यवहारावरून एक गोष्ट व्यक्त होते कीं, शाहूला कर्ज झालें होतें तें ताबडतोब फेडण्याचा तगादा त्यानें बाजीरावास लाविला. कांहीं तरी विशिष्ट साहस केल्याशिवाय धनोत्पत्ति होत नव्हती. म्हणून उत्तरेकडे पुनः स्वारी करून कांहीं लभ्यांश झाल्यास पहावा असें मनांत आणून जयसिंगाशीं स्नेह जोडण्याचें त्यानें मनांत आणिलें; आणि दादोराव भीमसेन नांवाचा चतुरस्र गृहस्थ पालखेड येथील मोहिमेच्या पूर्वी हैदराबाद प्रांताच्या चौथाई वसुलीवर होता, त्यास बाजीरावानें लगोलग जयसिंगाचे भेटीस उत्तरेंत पाठवून आपण माळव्यांत आल्यास आपल्या

‡ पे. द. भा. २२ ले. ३१ व ३४ हे रोजकीर्दीतले उतारे बारकाईनें पहावे.

उद्योगास दिल्लीहून कितीसें पाठबळ मिळेल याची विचारणा केली. दादोरावाचा जबाब ता. १७ ऑगस्ट, स. १७२८ चा जयपुराहून मोठा उत्तेजक आला की, "दसरा होतांच फौजांनिशीं यावें म्हणजे मोठे मनोरथ सफल होतील. फौज माळव्यांत येऊन धामधूम केली पाहिजे." दिल्लीस बादशहाजवळही संदर्भ ठीक करण्यांत आला. दादोभीममेनचें हें सर्व पत्र पेशव्याच्या स्वारीसंबंधांत विशेष अभ्यसनीय आहे. त्यावरच भिस्त ठेवून दोघा बंधूंनी उत्तरेच्या स्वारीचा बेत निश्चित केला.

धनोत्पादनासाठीं फौज पाहिजे, फौजेस खर्च पाहिजे आणि खर्च भागण्यास त्या फौजेस किफायतशीर काम पाहिजे. एकंदर राज्यकारभार सुरळीत चालविण्याची जबाबदारी पेशव्यावर होती. कोठें तरी संधि साधून एखादा परिणामकारी विजय मिळविल्याशिवाय पेशव्याची हुकमत कोठेंच चालेना. अशा या अडचणींचा भरपूर खल दोघां बंधूंनी निकटवर्ती सल्लागारांशीं स. १७२८ च्या पावसाळ्यांत स्वस्थपणें केला; आणि मनांत कांही एक विशिष्ट कार्यक्रम उत्तरेच्या स्वारीचा आंखला, त्यांत चिमाजीनें बागलाण खानदेशांतून फौजा गोळा करीत नर्मदेवर जाऊन, तेथें जशी परिस्थिति दिसेल तशी पुढें आघाडी मारावी आणि बाजीरावानें अहमदनगर, वऱ्हाड, चांदा देवगड अशा पूर्व मार्गानें चिमाजीच्या उद्योगावर ध्यान ठेवीत त्याचा पाठपुरावा करावा असें ठरवून दोघे मार्गास लागले. यांत त्यांचा उद्देश प्रथम दाभाडे, भोसले, सरलष्कर इत्यादिकांस वठणीस आणण्याचा असून, ते शिरजोर बनले तर त्यांच्या जागीं आपल्या हुकमतीत वागणारे नवीन सहायक मिळविण्याचा होता. बाजी भीवराव रेठरेकर, गणपतराव मेहेंदळे, नारो शंकर, अंताजी माणकेश्वर, गोविंद बल्लाळ खेर अशी अनेक जिन्हाळ्याचीं माणसें चिमाजीबरोबर या स्वारींत पहिला अनुभव मिळवून पुढें प्रसिद्धीस आलीं. दसऱ्यापासून दिपवाळीपर्यंतची वाटचाल फौजेच्या जमवाजमवींत गेली. खुद्द चिमाजी पुण्यास भाऊबीज करून बाहेर पडला. प्रवासाच्या संगतीसाठीं दोघा बंधूंचे मुक्काम तपासून पहावे.‡

कंठाजी कदम व सेनापति यांनी स. १७२८ च्या आरंभीं माळव्यांत स्वारी करून डोंगरपुर, बासवाडा, झाबवा व इतर अनेक ठिकाणें लुटून मुलूख खराब केला. हा प्रदेश पेशव्याच्या कक्षेंतला असल्यामुळें, त्यांचा शाहूनें निषेध करून

‡ पे. द. २२.५-१०

घेतलेला पैसा बाजीरावाकडे भरण्याविषयीं त्यांस आज्ञा केली, तिचा अंमल करण्याकरितां देखील आपण माळव्यांत जाणें पेशव्यास जरूर झालें. ‡ न जाणो प्रसंग कसा येतो, यास्तव विरोधी सरदारांची समजूत घालून व विशिष्ट करार करून त्यांचें साह्य संपादण्याचा प्रयत्न बाजीरावानें केला. राणोजी ऊर्फ सवाई संताजी भोसले याच्या हद्दींतून पेशव्याच्या फौजा जावयाच्या म्हणून त्याच्याशीं ता. ७ ऑक्टोबर, स. १७२८ रोजी विशिष्ट करार बाजीरावानें केला, ¶ पण पुढें राणोजीनें त्या संबंधांत काय उद्योग केला तें कळत नाहीं.

चिमाजीची रवानगी करून बाजीराव शाहूचे भेटीस गेला. महाराज व राण्या यांस तुळजापुरच्या यात्रेस नेऊन परत साताऱ्यास पोंचविल्यावर नोव्हेंबर-अखेर तो नगरच्या बाजूस बीड पाथ्रीकडे सरलष्कर दावलजीचा अंमल बसवून देण्यासाठीं गेला. पिलाजी जाधव व दावलजी सोमवंशी बाजीरावाबरोबर होते. "विचारें करून मनसबा करून कर्जाचा परिहार करणें" हा मुख्य उद्देश त्यानें वारंवार चिमाजीस कळविलेला आढळतो. † म्हणजे ता. २९ नोव्हेंबरास चिमाजीचें अमझेरा येथें युद्ध झालें, त्या वेळीं बाजीरावाचा मुक्काम पुण्याहून फारसा दूर नव्हता.

अल्पावधींतच बाजीरावास वर्तमान आलें कीं, चिमाजीनें युद्धांत गिरिधर बहादूर व दया बहादूर यास बुडविलें. हा हां म्हणतां या बातमीनें विद्युल्लतेप्रमाणें सर्व हिंदुस्थान हादरून सोडलें. मराठ्यांच्या हितचिंतकांस आनंदाचें भरतें आलें तर त्यांच्या शत्रूंच्या पोटांत धडकी भरली. दोन दरडींवर हात ठेवणारे राजपुतांसारखे द्विधा वृत्तीचे लोक 'पुढें काय' या विवंचनेंत पडले. "दयाबहादूर याणें चालोन येऊन बारी धरिली, मग घाट बंद करून आमझऱ्यावरी राहिला होता, त्यास तो घाट टाकून आम्ही मांडवगडचे घाट चढोन गेलियावरी तो चालोन आला. जरूर जाणोन युद्ध करणें लागलें सख्ती करतांच युद्ध प्रसंग बरा दाट जाला. दयाबहादूर व सरदार ठार जाले. हत्ती, निशाणें, नगारे, घोडीं पाडाव झालीं. लुटून फन्ना केले." ता. ३० नोव्हेंबरचीं चिमाजीचीं पत्रें आमझरा मुकामचीं बाजीरावास पोंचलीं, त्यांतील मजकूर.—"गिरिधर बहादूर वहमें करून युद्धास आला. त्याचें आपलें युद्ध दोन प्रहर बहुत झालें.

‡ शा. रो. २१४. ¶ पे. द. ३०. ५५, ३२६. † पे. द. १३. १३–३०.

सेना सहवर्तमान बुडवून यश प्राप्त झालें." बाजीराव चिमाजीस लिहितो, 'वडिलांचे व धण्याचे पुण्येंकरून शत्रूचा पराजय केला, यश संपादलें यावरून बहुत समाधान झालें. श्री सदैव तुम्हांस याच प्रकारें यशस्वी करो. विचारें करून उज्जनीवर दाब घालून गिरिधर बहादुराच्या कूल जागिरा जप्त करून पोख्ता टका साधणें आणि कर्जाचा परिहार करणें. उदाजी पवारांनी व हुजूरच्या पथकांनी कष्ट मेहनत बहुत केली म्हणून लिहिलें तें कळलें. पुढेही सर्वांविशीं भरंवसा त्याचाच आहे. तुम्ही समस्तांची समाधानें करून स्वामिकार्य व कीर्ति संपादे तें केलें पाहिजे. तुम्ही आपले स्वतःचे शहाणपणें वागणें, मुस्ती करीत न जाणें, चित्तांत अहंता न आणणे, द्रव्य साधे तें करणें. आमचा विचार चादा देवगडावरून बुंदेलखंडाकडे जावें ऐसा आहे." चिमाजीच्या या प्रचंड विजयाबद्दल त्याजवर चहूंकडून स्तुतीचा व अभिनंदनाचा केवढा वर्षाव झाला तें सांगण्याची गरज नाहीं. कल्पनेनें जाणावा, वा कागदांत वाचावा.

नर्मदेचे उतार व विंध्याचलाचे घाट याची माहिती आगाऊ आणून मोगल फौजेची रचना बिनचूक समजून घेण्याची कामगिरी पवार, होळकर इत्यादि सरदारांनीं यथायोग्य पार पाडिली, मंडलोई सारख्यांचें भरपूर साह्य पैदा केलें आणि ऐन प्रसंगी योग्य मोका ओळखून चिमाजीनें अकस्मात् मोगल फौजेवर पाठीमागून मारक प्रहार केला, म्हणूनच एवढा हा विजय अल्पावधींत मराठ्यांचे पदरांत पडून त्यांचा दरारा देशभर बसला. औरंगजेबाच्या कैदेतून केवळ स्वतःच्या बुद्धिबलानें शिवाजीनें आपली सुटका केल्याबरोबर त्याचा जसा विजयोत्साह देशभर पसरला, तशाच तोडीचा विजयोत्साह पुनरपि चिमाजीच्या या पराक्रमानें उत्पन्न होऊन हिंदी राष्ट्रांत मराठ्यांना थोरपण प्राप्त झालें. सातपुडा व विंध्याद्रि यांच्या दरम्यान जे कोळी वगैरे नानाविध लोक ठिकठिकाणीं भूम्ये म्हणून होते, त्यांची भरपूर मदत मराठ्यांस मिळाली.

माळवा प्रांताचे कारभारावर मोगल बादशहाचे सुभेदार कोण केव्हां रुजू झाले त्यांची खालील यादी अभ्यासकांचे लक्षांत पाहिजे.—

१ निजाम उल्मुल्क २०.२.१७१९; २ गिरिधरबहादूर ३०.८.१७२२; ३ अजीमुल्ला १५.५.१७२३; ४ गिरिधरबहादूर २.६.१७२५; ५ भवानीराम

२९.११.१७२८; ६ जयसिंग सवाई-नोव्हेंबर १७२९; ७ महंमदखान बंगश १९.९.१७३०; ८ सवाईजयसिंग २८.९.१७३२; ९ निजाम उल्मुल्क ३.८.१७३७.

हिंदुपदपातशाहीची कल्पना नर्मदेपलीकडील औत्तरीय प्रदेशामुळें सार्थ होऊं लागते. माळवा प्रांत याचा आरंभ. सातपुड्याच्या दक्षिण उतरणीवर तापी, आणि विंध्याद्रीच्या दक्षिण उतरणीवर नर्मदा असून पलीकडे माळव्याची हद्द लागते. त्या प्रांतांत प्रवेश करण्यास त्या वेळीं नर्मदेच्या पलीकडे तांडा, भैरव, नालछा वगैरे अनेक घाट होते. हे घाट माळव्याची प्रवेशद्वारें होत. होळकर, पवार वगैरे सरदारांनीं ही प्रवेशद्वारें हस्तगत केल्यामुळें चिमाजी-आप्पाचा विजय सुकर झाला. § विंध्याद्रि चढून गेल्यावर उत्तरेच्या बाजूस बेटवा, चंबल, सिंधु, माही, पार्वती वगैरे नद्या माळव्यांतून उत्तरेकडे वाहत जातात. मराठशाहीचा तिकडील हा फैलाव समजून घेण्यास त्या भूप्रदेशाची रचना मनांत आणिली पाहिजे.

माल्कम म्हणतो, "औरंगजेबाशी युद्ध सुरू असतांच बादशहास शह देण्याच्या उद्देशानें मराठ्यांनीं माळव्यावर हल्ले सुरू केले. स.१६९०च्या एका कागदांत मराठ्यांच्या हल्ल्यामुळें त्या साली माळव्याच्या उत्पन्नात तूट आली, असा उल्लेख आहे. औरंगजेबाचें राजपुतांशी वैर उत्पन्न झालें तेव्हांपासून बादशहाच्या शत्रूंस राजपूत राजे मदत करूं लागले; आणि राजपुतांच्याच साह्यानें मराठ्यांनी माळव्यांत प्रवेश केला. स. १६९८ त उदाजी पवारानें माळव्यांत शिरून माडवगडास तळ दिला. तेव्हांपासून कैक वेळां मांडवगडचें हें इतिहासप्रसिद्ध ठिकाण मराठ्यांनी घेतलें व सोडून दिलें. हल्लीं तें धार संस्थानच्या ताब्यांत आहे. ¶ सवाई जयसिंगाच्या मार्फत माळव्यांतील जमीनदार व बुंदेले राजपूत, औरंगजेबानें केलेला छळ स्मरून, मराठ्यांस अनुकूल झाले. बाजीरावाचा पराक्रम पाहून आपणास हा नवीन हिंदु पुढारी मिळाला, अशी तिकडील लोकाची भावना झाली; आणि बाजीरावाचे साह्यकारी सिंदे, होळकर

§ मराठी रियासत, उ. वि. ३, या भागांत पृ. १८० वर नर्मदेच्या घाटांचा नकाशा दिला आहे तो पहावा.

¶ त्रै. व. ८ ले. १० पृ. ५४.

व पवार यांच्या धाडशी व युक्तिबाज उद्योगानें माळवा प्रांत जिंकण्याचें काम सुलभ झालें.

स्वतः बाजीराव माळव्यांत प्रथम स. १७२२ त गेला. त्या ठिकाणीं त्यानें उदाजी पवारास ता. ३ डिसेंबर, स. १७२२ रोजी पत्र लिहून दिलें की, "प्रांत गुजरात व माळवा येथील निमे मोकासा हुजरून आम्हांकडे आहे, त्यापैकी निंमे मोकासा तुम्हास सरंजाम करून दिल्हा असे. आमची इमारत सर्व तुम्हांवरच आहे. आपलें समाधान असों देणें." यापुढील दोन सालांतही बाजीरावानें माळव्यांत जाऊन निजामाची भेट घेतल्याचा उल्लेख पूर्वी आला आहे. त्या वेळीं तो बाघेलखंडपावेतों गेला, तेव्हां पिलाजी जाधव त्याजबरोबर होता. सरदार खंडेराव हरि भालेराव याचा आजा रामाजी बाबाजी व चुलता मल्हार रामाजी हे माळव्यांत लढत असतां स. १७२५ त मारले गेले. ‡

स. १७२६ त अंबाजी त्रिंबक, पिलाजी जाधव, रघूजी व राणोजी भोसले आणि आनंदराव पवार यांनीं माळव्यात मोठी स्वारी करून दयाबहादुराशीं कित्येक संग्राम व व्यवहार केले, § पण त्याजपासून म्हणण्यासारखा लभ्यांश झाला नाहीं. माळव्याचे मोगल सुभेदार व सिंदे होळकरादि मराठे सरदार यांचा थोडा पूर्वपरिचय येथेंच देणें अवश्य आहे.

**३ व्यक्तिपरिचय.**—( १ ) **गिरिधर बहादुर.** † ( स. १७२२–२८ ). राजा गिरिधरचें नांव दिल्लीच्या कारभारांत पूर्वी आलें आहे. उत्तर मोगलशाहींत जे थोडे हिंदु कामदार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत राजा गिरिधरच्या कुटुंबाची गणना आहे. हे नागर ब्राह्मण अलाहबादेकडे राहत होते. राजा गिरिधरचा बाप दयाराम ऊर्फ दयाबहादूर व चुलता छबिलाराम ऊर्फ माधवबहादूर हे बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. ते शूर व मुत्सद्दी असून त्यांनीं आपल्या धन्याची सेवा उत्कृष्ट रीतीनें बजाविली. अजीमुश्शान पुष्कळ वर्षे बंगालच्या मुख्यावर असतां

‡ भालेराव कागद.

§ पे. द. १३.६, ७, ८ व मुख्यत. ९. व का. स. प. या. १५

† आधार. अर्व्हिनकृत लेटर मोगल्स, व माळवा–इन्–ट्रॅन्झिशन्.

त्यास व त्याचा मुलगा फरुखसेयर यास दयारामच्या कुटुंबाचा परिचय चांगला होता. लाहोर येथें बहादुरशहा स. १७१२ त वारला, तेव्हां त्याच्या मुलांत गादीविषयीं लढाया झाल्या, त्यांत दयाराम नागर आपल्या धन्यासाठी लढून समरांगणीं मरण पावला. राजा मुहकमसिंग खत्री व त्याचा भाऊ केशरसिग, किसनगडचा राजा राजसिंग बहादुर व प्रुथ्वीराज बुंदेला, हे सरदार व दयाराम, एकमतानें वागून, अजीमुश्शानचा पक्ष उचलून धरीत होते. परंतु अजीमुश्शान मारला गेला आणि दयारामचा भाऊ छबिलाराम जहांदरशहाचे पक्षास मिळाला. त्यास जहांदरशहानें करा माणिकपुरचा फौजदार नेमिलें. त्याजवळच दयारामचा मुलगा राजा गिरिधर हाही कामास असे. छबिलाराम व गिरिधर यानी करा माणिकपुर येथें असता, द्रव्यसंचय करून फौज वाढविली. जहांदरशहाने वर्षसहा महिने गादीचा उपभोग घेतला नाही तोंच अजीमुश्शानचा मुलगा फर्रुखसेयर बंगाल्यांतून बंड करून, सय्यदबंधूंची मदत घेऊन, आगऱ्यावर चालून आला, तेव्हा छबिलाराम व गिरिधर त्यास जाऊन मिळाले. त्यांनीं त्यास पुष्कळसा पैसा कर्जाऊ दिला व फौजेचीही मदत चांगली केली. ता. १० जानेवारी, स. १७१३ रोजी आग्रा येथे निकराची लढाई झाली, तीत छबिलारामानें स्वतः मोठा पराक्रम करून जिवावर उदार होऊन लढण्याची शिकस्त केली, म्हणूनच फर्रुखसेयर यास त्या दिवशी जय मिळाला. या कामगिरीबद्दल फर्रुखसेयरने त्यास प्रथम खालसा दिवाणाचें म्हणजे वसुलाचे काम देऊन पुढें त्यास आगऱ्याच्या सुभ्यावर नेमिलें. आग्रा येथें असतां त्यानें चूडामण जाठास वठणीस आणिले. नंतर काही दिवसांनी त्याची बदली अलाहबादच्या सुभ्यावर झाली. जयसिंग व छबिलाराम यांचें संगनमत असून सय्यदांचें व बादशहाचे वाकडें आलें तेव्हां या दोघाची सय्यदांस मोठी धास्ती होती. शेवटीं सय्यदांची कारस्थानें सिद्धीस जाऊन फर्रुखसेयर पदच्युत झाला, त्यामुळें छबिलारामाची पुष्कळ नाउमेद झाली. तरी प्रसंगास पाठ देऊन त्यानें सय्यदांस चिडविलें नाहीं. लवकरच सय्यदांनी त्याजवर शस्त्र धरिलें. प्रथम त्यांनी गिरिधर बहादुर यास दिल्लीस बोलावून आणिलें. तेथें त्यास सय्यदांचा बेत समजतांच तो पळून अलाहबादेस चुलता छबिलाराम यास जाऊन मिळाला. तेव्हां सय्यदांनीं त्या दोघांवर फौज रवाना केली. इतक्यांत छबिलाराम अर्धांगवायु होऊन नोव्हेंबर १७१९ त मरण पावला, आणि गिरिधर बहादुरास त्यांनी शरण येण्याविषयीं पाचारण केलें; परंतु चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून

तो एक वर्ष प्रयागास राहिला, आणि त्या अवधींत त्यानें तेथील किल्ल्याचा वगैरे चांगला बंदोबस्त केला. या वेळीं बुंदेले राजपूतही बादशहाशी लढत असून त्यांचा राजा भगवंतसिंग हा गिरिधर बहादुरास अलाहबाद येथें सामील झाला. सय्यदांनी त्यांजवर मोठी फौज रवाना केली. या फौजेवर महंमदखान बंगश वगैरे सरदार मुख्य होते. गिरिधरसारखा पराक्रमी, अनुभवी व शूर सरदार आणि अलाहबादसारखा महत्त्वाचा किल्ला आपल्या कबजांत नाहीत याबद्दल सय्यदबंधु मोठ्या फिकिरींत पडले. किल्ला कबजांत येईना, तेव्हां त्यांनीं आगऱ्याहून आपल्या भरंवशाचा सरदार रतनचंद यास गिरिधरवर पाठविलें. रतनचंदानें गिरिधरची खासगी रीतीनें भेट घेऊन त्याजबरोबर सल्ला ठराविला. राजा गिरिधरनें तीस लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा आणि अलाहबादचें ठाणें सोडून द्यावें असा तह ठरून, राजा गिरिधर अयोध्येस गेला, आणि रतनचंद सय्यदांकडे आगऱ्यास मे स. १७२० त परत आला. त्या वेळीं महंमदखान बंगशाचा भाऊ अहंमदखान याची नेमणूक सय्यदांनीं अलाहबादच्या सुभ्यावर केली.

**राजा गिरिधरचा वंश**

- **दयाराम**
  - **राजा गिरिधर बहादूर**
    - **राजा भवानीराम ऊ० चिमणा बहादूर.**
- **छबिलाराम ऊ० माधव बहादूर**
  - **दयाबहादूर**

पुढें सय्यदाचा पाडाव झाला, आणि अयोध्येच्या सुभ्यावर बादशहानें सादतखानास नेमिलें. तेव्हा तेथून गिरिधर बहादुराची बदली माळव्यावर झाली. हा कारभार त्याने ता. ३० ऑगस्ट, स. १७२२ पासून ता. १५ मे, स. १७२३ पावेतों अल्पकालच केला. दरम्यान निजामाने माळवा प्रात घेण्याची शिकस्त केली. तो स्वतः फौजेनिशीं माळव्यावर चालून आला, तो प्रांत कबजांत घेऊन त्यानें आपल्या तर्फेने अजीमुल्ला यास माळव्याची सुभेदारी दिली आणि परत दिल्लीस प्रयाण केलें. त्यानंतर स. १७२४ त निजामानें दक्षिणेंत येऊन साखरखेडलाच्या लढाईंत मुबारीजखानास ठार मारून स्वातंत्र्य धारण केलें, तेव्हां महंमदशहानें अजीमुल्ला यास माळव्यांतून काढून पुनः तेथील सुभेदारी राजा गिरिधर यास दिली. गिरिधरनें आपल्या साह्यासाठीं बरोबर दयाबहादूर यास आणिलें आणि उभयतांनीं एकविचारानें माळव्याचा कारभार सुरू केला, (ता. २ जून, स. १७२५). बाजीरावानें मात्र माळव्यावरील आपलें

लक्ष कमी केलें नाहीं. अंबाजी त्रिंबक, उदाजी पवार इत्यादिकांस माळव्यांत पाठवून तेथें आपला अंमल बसविण्याचा उद्योग त्यानें सारखा चालू ठेविला. राजा गिरिधरच्या अंमदानींत मराठे सरदार वारंवार माळव्यांत येऊन जबरदस्ती करूं लागले. त्यांच्या बंदोबस्ताचे शक्य ते इलाज गिरिधरनें केले, पण बादशहाकडून त्याचा पाठपुरावा झाला नाही म्हणून त्यास अपयश आलें. बादशहाची सेवा इमानानें बजावून त्या दोघा बंधूंनीं मराठ्यांना दूर ठेवण्याची शिकस्त केली. होळकर, पवार व सिंदे यांच्या इतिहासांत वरील झोंबाझोंबीचे तपशील भरपूर आहेत. विस्तारभयास्तव ते सर्व येथें देतां येत नाहीत. आपल्याकडून शिकस्तीनें लढत असतां गिरिधर बहादूर व दया बहादूर ता. २९ नोव्हेंबर, स. १७२८ रोजीं मारले गेले, हें वर सांगितलेंच आहे.

(२). **नंदलाल मंडलोई**—इंदूरचे जमीनदार मंडलोई हे गौड ब्राह्मण, भारद्वाज गोत्री, नर्मदेच्या उत्तर तीरावर मोठे वजनदार असून त्यांच्याच मदतीने मराठ्यांचा प्रवेश माळव्यांत झाला. यांचें मूळ ठिकाण इंदूरपासून १८ मैलांवर कंपेल नांवाचें गांव असून तें उज्जैन सरकारांत मोडत असे. स. १७२४ च्या सुमारास कंपेल परगणा मोडून इंदूर परगणा झाला. इंदूर शहर या मंडलोईनीं प्रथम वसविलें. तेजकर्णपुरा, नंदलालपुरा, निहालपुरा, रावजी बाजार, वगैरे इंदुरांतील पुऱ्यांची नांवें मंडलोई घराण्यांतल्या पुरुषांवरून पडली आहेत. यांनीं इंदूर शहरास तट घातला होता त्याचा अवशेष अद्यापि नदीच्या कांठीं दिसतो.

गिरासिया ठाकूर जितसिंग यानें स. १६६२ त वंशावळीतील बळरामाचा खून केला. त्या वेळीं त्याची बायको गौतमाबाई गरोदर असून बापाकडे पळून गेली. तिला मुलगा झाला तो चूडामण. त्यानें पूर्वीचें गेलेलें वतन बादशहाकडून पुनः संपादन केलें. चूडामणचा मुलगा रावनंदलाल हाच पहिला मोठा पराक्रमी पुरुष. माळवा व नेमाड हे दोन प्रांत याजकडे होते, त्यांचा सालाचा वसूल तो बादशहास देत असे. हाच वसूल तो पुढें बाजीराव व जयसिंग यांस देऊं लागला. नंदलाल यास बादशहाकडून मिळालेली तलवार अद्यापि त्यांचे घरीं संभाळून ठेविलेली आहे. तेजकर्णाचे वेळेस माळव्यावर मराठ्यांचें स्वामित्व पूर्ण झालें. ‡

‡ ही माहिती रा. भालेराव यांनीं दिली, आणि मंडलोईचीं सुमारें ६२ पत्रें पाहण्यास दिलीं, तीं बनावट समजलीं जातात.

मोगल बादशाहीच्या पडत्या काळांत निरनिराळ्या प्रांतांतील वजनदार गृहस्थ कोणत्या ना कोणत्या उपायांनीं स्वतंत्र होऊं लागले, त्या झोंबाझोंबीचा फायदा बाजीराव व त्याचे सल्लागार यांनी चाणाक्षपणें करून घेतला. गिरिधर बहादुर व दयाबहादुर यांचाही उद्देश स्वतंत्र राज्य संपादण्याचा होता. परंतु राजपूत किंवा मराठे यांपैकी कोणाचाच स्नेह त्यांनी ठेविला नाहीं, म्हणून त्याचा पाडाव झाला. राजपूत राजे व विशेषतः सवाई जगसिंग यांचें अगोदरपासूनच मराठ्यांशी संगनमत होतें. बादशहाची सत्ता झुगारून देण्याच्या इराद्यानें त्यानी मराठ्यास मुद्दाम माळव्यात आणिले. त्या गडबडींत मंडलोईसारखे जमीनदार निरनिराळ्या अधिकाऱ्यांपुढें हैराण होऊन कोणासच वसूल देईनातसे झाले. दयाबहादुरानें तर मंडलोईस इतकें सतविलें, की त्याला मराठ्यांचीच कास धरावी लागली. परंतु शेवटीं मराठ्यानीही त्यांना चेपलेंच. नर्मदेचे उतार मंडलोईच्या ताब्यांत होते, त्यांचा उपयोग मंडलोईने मराठ्यांस करून दिला. या मंडलोईस वश करण्याचें काम मल्हारराव होळकर व उदाजी पवार यांनी केलें. नंदलाल व जयसिंग याचा स्नेह होता.

**चौधरी राव मंडलोईची वंशावळ**

**१ गणेशदास, कंपेलचा चौधरी स. १६६२.**
|
**२ बळराम चौधरी—बायको गौतमाबाई.**
| **मृ. १६६२.**
**३ चूडामण** मृ. १७०१.
|
**४ रावनंदलाल** मृ. १७३१.
| **बायको मेदा बहूजी.**
**५ रावतेजकर्ण** १ ला, ज. १७१८.
| मृ. १७५४. **बायको फुंडा बहूजी.**

**६ निहालकर्ण, जेतकर्ण**
| **बालकर्ण=बा. भागाबाई**
**७ रावदुलेराव** मृ. १८१५.

**८ राव माधवराव. भगवंतराव.**
|
**९ राव तेजकर्ण** दुसरा स. १८१३–६५.
|
**१० निहालकर्ण** दुसरा. १८४०–१८७१
| **बायको गोजरा बहूजी**
**११ रावछत्रकर्ण** ज. १८७१

होळकराचा नंदलालशीं झालेला पत्रव्यवहार स. १७१८ पासूनचा उपलब्ध आहे, § त्यावरून माळवा प्रांत जिंकण्याचा उद्योग बाळाजी विश्वनाथाचे हयातीत होळकरानें सुरू केला असें दिसतें. स. १७२३–२४ चे दरम्यान

§ राजवाडे खं ६ ले ५८४–६२३

मल्हाररावानें इंदुरास ठाणें दिलें, व उदाजी पवारानें धारचा कबजा घेतला. रघूजी व कान्होजी भोसल्यांचा डोळा माळव्यावर होता, त्यास बाजीरावानें जरब देऊन ठेविली. 'हल्लीं नंदलाल मंडलोई मरण पावले,' 'असा उल्लेख ३.११.१७३१ च्या पत्रांत आहे. त्या प्रसंगी त्याच्या पुत्रांचें समाधान करून बाजीराव व चिमाजीआपा यांनी त्यांचें पुढें यथायोग्य चालविण्याविषयीं अभिवचन दिले. मल्हारराव होळकरानें तेजकर्णास बहुमान पालखी देऊन त्याच्या नेमणुकीबद्दल सालाचे रु. ७०० द्यावे असा ता. १३.८.१७४९ रोजीं कमावसिदारास हुकूम काढिला. तसेंच मंडलोईचा वाडा मराठ्यांच्या कमावीसदारानीं आपल्या वास्तव्यास घेतला होता, तो त्यांस परत देऊन, त्यांचें निरंतर यथास्थित चालविण्याचे अभिवचनही मल्हाररावानें लिहून दिलें. स. १७२० पासून मल्हाररावाबरोबर नारोशंकराचें नांवही माळव्याचे उद्योगांत आढळतें. नारो शंकर प्रथम उदाजी पवाराचे दिमतीस असून, स. १७३० पासून त्याची दिंमत होळकराकडे झाली. यावरून त्याच सालीं बाजीरावाचा उदाजीशीं बेबनाव झाला हें सिद्ध होतें. नारोशंकरानें लोकांस हैराण केल्यावरून, त्यास कारभारावरून दूर केल्याचा उल्लेख ६.११.१७३२ च्या पत्रात आहे. नारो शंकराचे जागीं बाबूजी नाईक याची नेमणूक कांही काळ झाली. मुलखगिरीची क्षेत्रें शाहूनें निरनिराळ्या सरदारांस वांटून दिली, त्यात माळवा प्रांत बाजीरावाकडे दिला. माळव्यांत तुम्ही वसूल वगैरे घेऊं नये, अशा सक्त ताकिदी शाहूनें दाभाडे व कंठाजी कदम यांस दिलेल्या आहेत. स. १७२९ त नंदलाल मंडलोईस बाजीरावानें चांगली जरब दिली. त्याच सालापासून राणोजी सिंद्याचेंही नांव तिकडील उद्योगांत आढळतें. सन १७३१ नंतर होळकर व सिंदे या दोघांसच बाजीरावानें माळव्याच्या उद्योगावर ठेवून इतरांस तेथून काढिलें.

नंदलाल मंडलोईप्रमाणेंच **बढवाणीचा ठाकूर अनूपसिंग** मराठ्यांस सामील झाला होता, त्याची व बाजीरावाची भेट स. १७२३ च्या जानेवारींत झाली. त्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये असें आज्ञापत्र शाहूनें सन १७३५ त उदाजी पवार व मल्हारराव होळकर यांस काढिलेलें आहे. †

माळव्याच्या व उत्तर हिंदुस्थानांतील स्वाऱ्यांत आरंभीं ज्या सरदारांनी कामे केलीं, त्यांपैकी एका मोठ्या सरदाराचें स्मारक तिकडे फारसें राहिलें

† शा. रो. २०२ व २४१.

नाहीं, तो सरदार पिलाजी जाधव होय. माळव्याच्या आरंभींच्या उद्योगांत पिलाजीच प्रमुख होता. पण कित्येक कारणांनी त्याजवर शाहूची व बाजीरावाची इतराजी झाली. त्याचा मोठा गुण धडाडी नसून सावधपणा होता. केवळ पेशव्यांच्या भजनीं न राहिल्यामुळें तो मागें पडला असावा. दावलजी सोमवंशीनें रदबदली करून त्याचें व पेशव्याचें रहस्य जुळवून दिलें. पण अढी पूर्णपणें गेल्याचें दिसत नाहीं. ‡

तसेंच माळव्याच्या पहिल्या उपक्रमांत सिंदे होळकरांपेक्षांही उदाजी पवार व त्याचें विस्तृत कुटुंब यांचा भाग जास्त असतांही स. १७३०-३१ त उदाजीनें निजामाकडे संधान बांधून पेशव्याचे विरुद्ध दाभाड्याशीं संगति जोडली, त्यावरून पवार मागें पडले. पवारांचे इतिहास आतां प्रसिद्ध झाले आहेत त्यावरून माळव्याच्या हिसेरसीची कल्पना बरोबर बसवितां येते. त्यांत सिंदे, होळकर व पवार हे प्रमुख होत. त्यांची थोडी पूर्वपीठिका प्रथम सांगूं. §

( ३ ) **मल्हारराव होळकर**—होळकरांचें घराणें महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं पसरलेलें आहे. इंदूरच्या हल्लींच्या राजघराण्याचे पूर्वज प्रथम पुण्याजवळ वाफगांवी राहत असून, नंतर ते फलटण परगण्यांत पुण्यापासून ४० मैलांवर नीरा नदीचे कांठीं होळ म्हणून एक खेडें आहे तेथें आले. त्यांचें पहिलें नांव वीरकर असून, पुढें होळ या गांवावरून होळकर असें पडलें. होळ येथें खंडूजी नांवाचा धनगर जातीचा एक वजनदार चौगुला म्हणजे ग्रामाधिकारी राहत होता, त्यास एक मुलगा चैत्र शु. ९, संवत् १७५०, ता. १५।१६ मार्च, स. १६९३ रोजीं झाला. त्याचें नांव मल्हारि. तो तीन वर्षांचा असतांच खंडूजी वारला; तेव्हां भाईबंदांनीं त्रास दिल्यामुळें खंडूजीची बायको जिवाई ही मुलास घेऊन खानदेशांत तळोदें गांवीं आपला भाऊ भोजराज बारगळ चौगुला याजकडे गेली. हा भोजराज कंठाजी कदम बांडे याच्या पागेंत पंचवीस स्वारांचा मुख्य होता. ‘ शिवजीसुत भोजराज बारगळ, ’ असें त्याचें शिक्क्यांत नांव आहे. मल्हारि हा भोजराजाचे घरीं वाढला. त्यास भोजराजानें आपल्या पथकांत नोकरी दिली; आणि त्याची हुशारी पाहून पुढें त्यास आपली मुलगी गौतमाबाई ही देऊन त्याचें लग्न केलें. प्रथम लहान लहान लढायांत शौर्याची कामें केल्यावरून तो लवकरच प्रसिद्धीस आला.

‡ रा. खं. ६. ४९. § लेलेकृत धारकर पवार, गुजरकृत देवास, माल्कमचे ग्रंथ व इतर निबंध वगैरे आधार.

मराठ्यांचें व निजामाचें स. १७२० त बाळापुरास युद्ध झालें त्यांत मल्हाररावानें चांगलाच पराक्रम केला. कदम बांडे व बाजीराव यांच्या फौजांची एकदा कलागत लागली असतां, ती मल्हाररावानें मिटविली, त्यावरून बाजीरावानें त्यास बांड्यापासून स. १७२१ त आपणाकडे मागून घेतलें. तेव्हापासून त्याच्या भाग्योदयास प्रारंभ झाला. बाजीरावाची नोकरी पत्करितांना त्यानें आपला खरा बाणा खालील पत्रांत व्यक्त केलेला आढळतो.

"पंत प्रधान. राजश्री अंबाजी त्रिंबक स्वामी गोसावी यांसी सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी होळकर, दंडवत विनंती. आम्ही बहुत दिवस बांड्यांकडे होतों, त्यांचा आमचा बिघाड पडला यास्तव बढवाणीचे मोहनसिंग राणे यांजकडे तजवीज करीत होतों. मग बापूजी प्रभूंनी § साहेबाकडे मनसिब्याचे वाटेनें मनापासून बोली केली आहे. आम्ही सर्वथा मनापासून इमान ठरविला आहे की जेथें स्वामींनी ठेवावें तेथें आम्ही बिलाकुसूर राहवे. जो धनी चाकर ठेवील त्यांनीं इजतीनें ठेवावें. चाकरीस उजूर नाहीं. बहुत काय लिहिणें." पु. द. भा. १ ले. १२४ चें पत्र वाचतां मल्हारराव कैफी होता असें दिसतें.

स. १७२५ त बाजीरावानें ५०० स्वाराची मनसब त्यास दिली. पूर्वीच त्यानें माळव्यांत शिरून तिकडे मुलूख जिंकण्याचा उद्योग सुरू केला असून भोजराज बारगळही त्याबरोबर खपत होता. यापुढची मल्हाररावाची हकीकत ठिकठिकाणीं पुढें येईल.

(४) **राणोजी सिंदे**, ( मृ. १९ जुलै, १७४५ ).—प्राचीन काली सेंद्रक नांवाचें क्षत्रिय घराणें होतें, त्यावरून सिंदे हें आडनांव पडलें असावें. त्यांची कित्येक घराणीं बहामनी राज्यांत उदयास आलीं. साताऱ्यापासून सहा कोशांवर कोरेगांव तालुक्यांत कण्हेरखेड म्हणून गांव आहे, तेथें एक सिंद्यांचें घराणें पाटिलकी करून होतें. याच घराण्यांतील मुलगी अंबिकाबाई शाहूस दिलेली होती, ती शाहू कैदेंत असतां वारली. तिचा बाप औरंगजेबाचे नोकरींत होता, तो बहुधा आग्रा येथें अजीमशहाच्या मदतीस असतां मारला गेला. त्याच्या घराण्यांत राणोजी सिंदे हा पुढें प्रसिद्धीस आला. घरची गरिबी असल्यामुळें त्यानें प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेंत बारगिराची नोकरी पत्करिली. लवकरच त्याजवर पेशव्याची मर्जी बसली. राणोजी सिंदे, उदाजी पवार व मल्हारराव होळकर हे आरंभीं बाजीरावाबरोबर खेळगडी म्हणून एकत्र वाढले, असा

§ बापूजी सोनाजी दिघे. पहा बा० वि० पृ. ३२

समज आहे. निजामावरील वगैरे मोहिमांत राणोजीची निष्ठा व शौर्य हे गुण पाहून बाजीरावानें त्यास इतर सरदारांबरोबर माळवा व हिंदुस्थान येथील कामगिरीवर पाठविलें. तिकडे पराक्रम करून तो लवकर उदयास आला. या सरदारांच्या उदयासंबधानें अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत; परंतु त्यातील ऐतिहासिक अंश निश्चित नाहीं. उदाजी पवार व त्याचे बंधु बाजीरावाशी निष्ठेनें वागेनात, म्हणून त्यांस बाजूस सारून पेशव्यानें राणोजी सिंद्यास विश्वासाचे कामीं घेतलें. 'सिंदे व होळकर हे उभयतां सरदार सलाबतीचे दिवसेंदिवस आक्रम करीत चालले,' या बखरींतील वाक्यांत तत्कालीन समज चांगला व्यक्त झाला आहे. राणोजी स्पष्टवक्ता व धन्याची भीडभाड ठेवणारा नव्हता. त्याचीं पत्रें बाणेदार आहेत. राणोजीचा बाप जनकोजी मुलाचा पराक्रम पाहण्यास हयात होता. त्याचींही पत्रे छापलेलीं आहेत.‡ पुण्याजवळच्या अनेक भानगडींत व गांवकीच्या कारभारांत राणोजीचें प्राधान्य होतें ही गोष्ट पुरंदरे रोजनिशींतील अनेक उल्लेखांवरून व्यक्त होते. सिंद्यांचे घराण्याचा मराठशाहीच्या पुढील इतिहासाशीं निकट संबंध आहे; इतकेंच नव्हे तर पाऊण शतकाचा मराठशाहीचा इतिहास बराचसा ह्या एका घराण्यानें बनविलेला आहे असे म्हणण्यास चिंता नाहीं.

(५) **पवार मंडळी.**—स. १७२२ त बाजीरावानें उदाजीस पत्रे लिहून माळवा गुजरात प्रातांत अंमल बसविण्याची कामगिरी सांगितली, तदनुसार उदाजीनें स. १७२४ त धार येथें आपलें ठाणें बसविलें. ता. ११ ऑगस्ट, स. १७२५ रोजीं उदाजी व आनंदराव यांस शाहूनें पोषाख देऊन सत्कार केला.§ गुजरात, काठेवाड, कच्छ, मारवाड, बुंदीकोटा, बुंदेलखंड, खानदेश अशा विस्तृत टापूंत उदाजीनें संचार केलेला आढळतो.

**पवारांची वंशावळ**

**कृष्णाजी**

**बुवाजी** — **केरोजी**

**काळूजी** — **संभाजी**

**१ तुकोजी २ जिवाजी ३ उदाजी ४ आनंदराव**

**१ तुकोजी**-संस्था० देवास १, स. १७३२–५३
**२ जिवाजी**–संस्था० देवास २, स. १७३२–७५
**३ उदाजी**–मलठण शाखा, स. १७०८–६०
**४ आनंदराव**–धार संस्थापक, स. १७३२–३६

‡ पे. टि. २.३५, पे. द. ११.५३ व ३०.१०१ इ. § पे. द. ३०.३५९.

माळवा व गुजरात ह्या प्रांतांत आरंभीं मराठ्यांचा जम बसविणारा मुख्य सरदार उदाजी होय. याची साक्ष शाहूनें स. १७२६–२७ त त्यास ठरवून दिलेल्या तहांत मिळते. " तहनामा राजश्री उदाजी पवार सु॥ सब्बाअशरीन मया व आलफ, तह प्रांत गुजरात व माळवा.

१ प्रांत मजकूर चौथाई व सरदेशमुखीचा अखत्यार सर्व तुम्हांवर दिल्हा असे. हुजरून रा. बाजी भीवराव तुम्हांसमागमें दिल्हे आहेत, शिक्का, रोखा, कुच, मुक्काम त्यांचा; परंतु जें करणें तें तुमच्या अखत्यारें करावें. मुलखीं तह-रह त्यांनीं तुम्हीं करावा. तुम्हां खेरीज त्यांस हरएक विच्यार करावयास प्रयोजन नाहीं. अखत्यार तुम्हांवर. कलम १.

२ प्रांत मजकुरीं जो आकार जमा होईल त्यांत सरदेशमुखी व बाबती चौथाई शिरस्तेप्रमाणें काढावी. उरला ऐवज दामाशाही गणतीप्रमाणें घ्यावा. शिबंदी, तोफखाना व भांडियांचा ऐवज सदरहु उरल्या ऐवजावरी मोघम काढून उरला ऐवज गणतीप्रमाणें दामाशाही घ्यावा. मोकाशी कोणही न म्हणावा. सारे जमेचा तह येणेंप्रमाणें करावा.

३ दिवाण रु० एक लक्ष बाबती सरदेशमुखीच्या ऐवजीं आधीं वारावें.

४ फौज हुजरून येईल त्यास दामाशाही ज्यास्ती आधी दिवाणाचा ऐवज वारावा. उरेल ऐवज त्याची दामाशाही द्यावी व तुम्ही घ्यावी.

५ जेथें मुकाशाचीं ठाणीं बसलीं असतील तेथें बाबती व सरदेशमुखी काढून उरला ऐवज ठाण्यांचे बेगमीस द्यावा.

६ चौथाई व सरदेशमुखी दिवाणाचा ऐवज काढावा, त्यांत राजश्रींचें देणें वारून बाकी ऐवज राहील त्यापैकीं एक तक्षीम तुम्हांस सरदारीस दिल्हा, घेणें. दोन तक्षिमा आमचे सरदारीस द्यावे. कलम १.

हीं कलमें सारीं लिहिली आहेत. येणेंप्रमाणें वर्तावें. पैका कदाचित् थोडा मिळाला तरी आधीं दिवाण वारावें. उरेल तें सर्वांनीं समजावें. दिवाणाचा ऐवज नये तोंवरी रुपये कोणीं शिबंदी व रोजमुरा व दारूगोळाशिवाय घेऊं नये."

हे प्रांत कबजांत येऊन दोन तीन वर्षांनीं प्राप्ति होऊं लागली, तेव्हां पेशव्यानें शाहूस उत्पन्नाबद्दल सालाचे दोन लाख रुपये देण्याचा करार ता. १७ ऑक्टोबर, स. १७२९ रोजीं लिहून दिला. ‡

‡ इ. सं. पे. द. पृ. १२७.

कांहीं काळानें बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें येऊन, पेशव्यानें त्याचा भाऊ आनंदराव यास धारेस नेमून उदाजीस कैदेंत ठेविलें. स. १७२९ ता. १ नोव्हेंबरचें खालील पत्र बाजीरावानें आनंदरावास लिहिलें. 'रा. आनंदराव पवार गोसावी यांस. स्ने० बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सुरूसन सल्लानीम मया व आलफ. हवाल्याबाबद सावकारी निशेचे रुपये तुम्हांकडे येणें, त्याहीमध्यें तुमचा पतीचा धंदा; पवार प्रामाणिक, एकवचनी, वचनाचे सचे, पतीचे थोर, यास्तव हवाला घेतला. त्यास मुदती अगोदर माणसें पाठविलीं म्हणावी, तरी तेंही न केलें. तुमची मुदतही जाहली असतां, तुम्हीं माणसें फिरावलीत. येणेंकरून तुमचे पतीस शब्द लागला. आमचाही इतबार त्या लोकांजवळ गेला. ऐशियास वचनास व पतीस अंतर केल्यानें पुढें तरी पत कशी राहील ? तो ऐवज त्यांस पावला पाहिजे. यास्तव तुम्हांकडे मुजरद माणसें पाठविलीं आहेत. तरी पत्र पावेल ते क्षणी त्यांचे पदरी ऐवज घालणें. ऐवज त्यांच्या पदरीं घातल्याविना भोजन कराल तरी आमची आण असे. बिनाकसूर, पत्र पावतांचं हवाल्याबाबत रुपये त्यांचे पदरी घालून पावलियाचें कबेज घेऊन पाठविणे. जाणिजे. छ २० रबिलाखर लेखनसीमा.'

गिरिधर बहादूरवरील स्वारीत बाजीरावाची मुख्य भिस्त उदाजीवर कशी होती हें पूर्वी सांगितलें आहे. इतका त्याजवर बाजीरावाचा इतबार असता स. १७३० त उदाजी पेशव्याच्या विरुद्ध निजाम सेनापतींच्या कारस्थानांत सामील झाला. शाहूनें आपल्याकडून त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. पुढें बाजीरावानें पवारांचा सरंजाम ता. २९ जानेवारी, स. १७३१ रोजीं काढून त्यांस निष्क्रिय बनविलें. ताठर स्वभावामुळें त्यानें बाजीरावाचीं आर्जवें केलीं नाहीत. मात्र आनंदरावाची समजूत काढून त्यास धारचा सरंजाम दिला.¶

उदाजी पवार पुढें पुष्कळ काळ वांचूनही राष्ट्रोद्योगांत सामील झाला नाहीं. एवढा बाणेदार व कर्तृत्ववान पुरुष निरुपयोगी बनल्याबद्दल खेद वाटल्याशिवाय राहात नाहीं. जंजिऱ्याच्या स्वारींत सीदी अंबर अफवाणी याशीं रायगडच्या पायथ्याशीं लढून ता. १०.१.१७३४ रोजीं त्याचें शीर उदाजीनें कापून आणिलें, ही कामगिरी त्यानें शाहूची म्हणून केलेली आढळते.

---

¶ पे. द. २२. ५८ व १२. ३७.

उदाजीचा सरंजाम काढून घेतल्याबद्दल शाहूच्या दरबारांत पुष्कळ चर्चा झाली. बाजीरावानें उदाजीला अन्याय केला की काय असा प्रश्न निघाला असता शाहूला जबाब देण्यांत आला की, " उदाजी पवार कांही छत्रपतींची चाकरी टाकून गेला असें नाहीं. महाराजांनींच उदाजीस पंतप्रधानांचे हाताखाली दिलें. महाराजांचे हुकमावरून पेशव्यांसमागमें गेले. त्यांनींही नेलें. त्याउपरी पंतप्रधान देशास आले, पवारही देशास आले. उभयतां बरोबरच हुजूर येतील. स्वतःच हुजूरचे चाकरीस येतील. साहेबीं जी भाकर दिली आहे ती ते टाकणार नाहींत." हें ता. ४.८.१७३६ चें पत्र सर्वच वाचण्यालायक आहे.§ स्वभावभेदामुळें उदाजीचें बाजीरावाशी पटलें नाहीं असेंही दिसून येतें. कदाचित् सिंदे होळकर जसे खुद्द बाजीरावाच्या प्रोत्साहनानें पुढें आले, तशी ताबीनात उदाजीनें बाजीरावाला दाखविली नाही; आपण छत्रपतीचे नोकर, किंबहुना प्राचीन परमाराचे वंशज म्हणून भोसल्यांपेक्षांही उच्च अशी त्याची भावना असेल. नाहीं कोणी म्हणावें ? ब्रह्मेंन्द्रस्वामीनें उदाजीबद्दल काढलेले उद्गार स्मरणीय आहेत. तो म. १७६० च्या फेब्रुवारींत उद्गीरप्रसंगांत मरण पावला. ¶

आनंदराव स. १७३६ च्या ज्येष्ठ महिन्यांत अकस्मात् सर्पदंशानें मरण पावला. उज्जनीस त्याची छत्री विद्यमान आहे. बाजीराव पेशव्यानें माळवा प्रांतांतील देशमुख देशपांड्यांस ६.८.१७३६ चें आज्ञापत्र काढिलें, त्यांत हा उल्लेख आहे. 'परगणे मजकूरचा मुकासा देखील बाबती व सरदेशमुखी व जकात आनंदराव पवार यांस होता, त्यास ते मृत्यु पावले, याजकरितां त्यांचे पुत्र रा. यशवंतराव पवार दि॥ चिमणाजी बल्लाळ यांस साल मजकूर मुकासा बाबती व सरदेशमुखी व जकात दिल्हा असे जाणिजे. छ ९ रबिलाखर सबा सल्लासीन मया व आलफ. आज्ञाप्रमाण.' यशवंतराव पवार हा पुढें मोठा बाणेदार निघाला. तो शरीरानें काटकोळ व उंच असून त्याचे डोळे फार मोठे होते. त्याची मुद्रा क्रूर व शिपाईबाण्याची होती. त्याचा थाट राजासारखा असून तो कधी कोणाशीं नमून वागत नसे. तो अपमान सहन करणारा नसून त्याचा दरारा प्रसिद्ध होता. एका अपमान करणाऱ्या हुजऱ्यास त्यानें तलवारीनें छाटल्यामुळें, पेशव्यांच्या घरचे नोकरही त्यास थरथर कांपत अशा प्रकारचें त्याचें वर्णन आढळतें.

§ पे. द. १७.६५ ¶ खरे इचल० इ० ले. ४४.

**४ माळव्याचा ताबा व वांटणी.**—युद्ध व कारस्थान या दोनही मार्गांनीं बाजीरावाचा उपक्रम माळव्यात चालू होता. निजामास अडविण्याच्या हेतूनें राजा गिरिधरची नेमणूक बादशहानें माळव्यावर केली असून, त्यास जयसिंग व अजितसिंग यांचें साह्य होतें. वास्तविक आग्रा व माळवा या दोनही सुभ्यांची व्यवस्था बादशहानें जयसिंगाचे हवाली केली होती. पैकीं आग्रा प्रांत जयपुरास लागून असल्यामुळें तो जयसिंगानें आपल्याकडे घेतला, आणि माळव्यावर राजा गिरिधर यास आणिलें (अर्विन). परंतु गिरिधर जयसिंगाचे विरुद्ध वागूं लागला, तेव्हां त्याने मंडलोई वगैरेंच्या मार्फत मराठ्यांशीं बोलणें करून, त्यांजकरवीं माळव्यावर स्वारी करविली. जयसिंगाचें पाठबळ नसतें तर मराठ्यांचा रिघाव माळव्यांत सुलभ रीतीनें झाला नसता. जयसिंगाचे मार्फत माळव्याची चौथाई संपादन करावी असा उपक्रम कैक वर्षांपासून बाजीरावानें चालवून त्या कामावर अनेक हस्तक त्यानें वेळोवेळीं रवाना केले. त्यांजकडून कार्यसिद्धि होत नाहींसें पाहून स. १७२८ त दोघां बंधूंनीं स्वतःच भिन्न मार्गांनीं माळव्यावर स्वारी केली. अमझेराच्या लढाईनें वस्तुतः माळवा प्रांत मराठ्यांचे कबजांत येऊन त्याची वांटणी सिंदे होळकर व पवार या तिघांत झाली ती अद्यापि कायम आहे. मराठ्यांचा प्रत्यक्ष कबजा पुढें चौदा वर्षांनीं स. १७४३ त बादशहानें राजरोस मान्य केला.

मराठ्यांना माळवा प्रांत हस्तगत करणें इतकें सुलभ कां गेलें याचीं कारणें अनेक आहेत. मोगल बादशाहीचा ऱ्हास कसा होत चालला होता हें यांत स्पष्ट दिसतें. माळव्याची अंतःस्थिति कशी निकृष्ट बनली होती याचें विवेचन महाराज कुमार रघुवीरसिंहांनीं आपल्या ग्रंथांत केलेलें अभ्यासूंनी अवश्य लक्षांत आणावें. चहूंकडे अन्याय व अनीति यांचा जोर एवढा वाढला कीं वतनदार व रयत यांस क्षणाची शाश्वति राहिली नाहीं. मांडवगडच्या एका वतनदारानें आपलें वतन पेशव्यास विकलें, त्या खरीदीखतांत खालील मजकूर आहे.—“आमचे वडील निवर्तल्यावर पातशाही गर्दी जाली. बंडखोरी व फितुर नानाप्रकारचा जाहला. तालुका वैराण जाहला. राहवयास स्थळ नाहींसें झालें. मुलें लेकरें अन्नवस्त्राविणें हैराण जालीं. कर्जदारांचा तगादा लागला. ईश्वराचा कहर जाणोन नाइलाजानें श्रीमंत पंतप्रधान स्वामीपाशीं येऊन विनंती करून निमे वतनाचे भाऊ करून खरीदखत करून दिल्हें असे.” या निकरांतून

मराठ्यांनीं येऊन रयतेचें संगोपन केलें, म्हणूनच त्यांचा अंमल माळव्यात इतक्या लवकर कायम झाला.†

माळव्याचें मुख्य द्वार मांडवगड व प्राचीन राजधानी धारानगरी पण मुसलमानी अंमलांत उज्जनीस सुभ्याचें ठाणें होतें. पहिलीं दोन ठिकाणें उदाजी पवारानें हस्तगत केली, पण मांडवगडाबद्दल बादशहास अत्यंत खेद वाटला, त्यावरून जयसिंगानें शाहूस भीड घालून त्याजकडून मांडवगड परत देण्याचा हुकूम मिळविला ( ता. १९ मार्च, स.१७३० ).§

ता. १४ ऑगस्ट, स. १७२९ त उदाजी पवारानें नंदलाल मंडलोईस खालील धाक दाखविलेला आढळतो. "आमचे अंमलदार जाऊन दीड दोन महिने जाले, अद्याप अंमल चालत नाहीं. तरी मालवा प्रांत आपला आहे. येथेंही अंमल न चाले ऐसें काय आहे ? मख्यत्वेंकरून अंमल दिल्हा तरी उत्तमच आहे. हरकोणी सुप्रवर्तोन वर्तेल त्याचें ऊर्जित होईल, नाहीं तरी विचार कळतच आहे. तुम्ही तों सर्व गोष्टींनें सुज्ञ आहां, ल्याहावे ऐसें नाहीं. तरी राजश्री नारो शंकर यांस अंमल कुलबाब कुलकानू सुरळीत देणें. उजूर एकंदर न करणें. जाणिजे. छ २९ मोहोरम सल्लासैन मया व अलफ."

यानंतर दुसरे पत्र. "नंदलाल मंडलोई यांसी—बाजीराव बल्लाळ प्रधान. सु॥ सल्लासीन मया व आलफ रा. कुसाजी गणेश हुजूर आले, त्यांणीं कितेक अर्थ निवेदन केला, त्यावरून सविस्तर कळलें. ऐशियासी आमची स्वारी ते प्रांतें सत्वरीच आहे. माळवियाच्या बंदोबस्ताचा अर्थ रा. लाला हरनारायण यांणी लिहिला व जबानी सांगोन पाठविला होता. त्यास प्रांत म॥ चा बंदोबस्त जालिया रयत निरुपद्रवी राहून दुतर्फा किफायतच आहे. एतद्विषयी येथून उज्जनच्या सुभ्यास व लाला हरनारायेण यास कितेक अर्थ लेख करून पत्रे पाठविली व जबानी म॥रनिल्हे सांगतील. तरी तुम्ही त्यांस विचाराच्या चार गोष्टी सांगोन मुल्काचा तह करून दुतर्फा कमाविस सुरळीत चालविणें. जरी हे गोष्टी त्यांचे विचारास न ये, तरी आम्ही ते प्रांतें येतच आहों. आमची फौज तिकडे आलियावर मुलूख सप्रयुक्त राहातोसा नाहीं. खराब होईल. वरकड कितेक अर्थ म॥रनिल्हे तुम्हांस सांगतील त्याजवरून कळेल. सारांश, तुम्ही मातबर

† या संबधाचा एक विचारपूर्ण लेख कै. का कृ. लेले यांनी लिहिलेला भा. इ. मं. त्रै. व. ९ अं. १, पृ. ५४ येथें दाखल आहे तो वाचकानी अवश्य पहावा.

§ शा. रो. १९८.

कार्यकर्ते एकनिष्ठ आहां. हरएक विचारास चुकतां असें नाहीं. तुमचें सर्व प्रकारें अगत्य आहे. तदनुरूप भलाईस होणें तें होईल. आपला खातरजमा असों देणें. आमची स्वारी रेवातीरास येताच तुम्ही मातबर मनुष्य हुजूर पाठवून देणें; व त्याजकडील मातबर मनुष्य बा॥ घेऊन तुम्हीच रेवातीरीं भेटीस येणें. जाणिजे. छ १९ रबिलावल" (ता. ३ ऑक्टोबर, स. १७२९). या पत्रावरून माळव्यावर मराठ्याची केवढी जरब लगोलग बसली तें निदर्शनास येतें.

माळव्यांत मराठ्यांचा प्रवेश कसा झाला यासंबंधानें नंदलाल मंडलोईच्या वंशजाकडून माल्कमसाहेबास माहिती मिळाली ती अशी.—महंमदशहाच्या कारकीर्दींत मुलखात फार अंदाधुंदी माजली. दयाबहादूर माळव्याचा सुभेदार होता. राज्यकारभारांत अव्यवस्था झाल्याबरोबर शेतकरी रयतेची मोठी आबाळ होऊं लागली. पाहिजे त्यानें यावें आणि रयतेकडून पैसा उकळावा असा प्रकार चालू झाला. दयाबहादूर व त्याच्या हाताखालचे मुनीम यानीं रयतेस इतकें पिळून काढिलें, कीं माळव्यातील ठाकूर व जमीनदार हे बादशहाकडे दाद मागून मागून थकले. सरकारांत आपली दाद लागत नाहीं असें पाहून, ते जयपूरचा राजा सवाई जयसिंग यास शरण गेले. जयसिंग मोठा पराक्रमी व धूर्त होता. इतर राजपुत राजाप्रमाणें तो बादशहाविरुद्ध उघडपणें उठला नव्हता. परंतु दरबारांत त्याची चहा होत नसल्यामुळें त्यानें बाजीराव पेशव्याशीं स्नेह जोडला. त्यानें माळव्यांतील ठाकरास अशी सल्ला दिली, कीं तुम्ही मराठ्याना बोलवा, म्हणजे ते तुमची दाद घेतील. माळव्यांतील ठाकरांत इंदूरचा जमीनदार राव नंदलाल चौधरी हा प्रमुख व मातबर सरदार असून, त्याजपाशीं दोन हजार फौज चांगली तयार होती. त्याजकडेसच नर्मदेवरील उतारांचा बंदोबस्त ठेवण्याचें काम होतें. जयसिंगाच्या सल्ल्यानें नंदलालनें बाजीरावाशीं बोलणें सुरू केलें. बाजीरावाची फौज बऱ्हाणपुरनजीक छावणी देऊन राहिलेली होती, तिच्या आघाडीवर मल्हारराव होळकर बारा हजार फौजेनिशीं जय्यद तयारीनें होता. राव नंदलाल यानें मल्हारराव होळकर याजकडे आपला वकील पाठविला, आणि त्यास नर्मदा उतरून माळव्यांत बोलाविलें. "नर्मदेवरील उताराचा व पलीकडच्या डोंगरांतील घाटांचा उपयोग तुम्हांस चांगला करून देऊं," असें अभिवचन मिळाल्यावरून मंडलोईच्या मदतीनें धरमपुरी आणि महेश्वर यांच्या दरम्यान अकबरपुर म्हणून नर्मदेवर एक गांव

आहे त्या ठिकाणीं नर्मदा उतरून मल्हारराव माळव्यांत आला. दयाबहादुरास ही खबर लागतांच तांडा येथील घाटांत तो मल्हाररावास अडविण्याकरितां गेला. परंतु मल्हाररावास माळव्यांतील मंडलोई वगैरे लोकांनी आगाऊ इशारत दिल्यामुळे तो तांडा घाटानें न येतां माडवगडच्या पूर्वेकडील भैरव घाटानें माळव्यांत आला. मल्हाररावाची व दयाबहादुराची गांठ धारनजीक तिरला गांवी पडली. लढाई होऊन दयाबहादूर मारला गेला. याप्रमाणें माळवा प्रांत मराठ्याच्या हस्तगत झाला. प्रांताच्या वसुलाची व्यवस्था लावतांना मराठ्यांनीं पूर्वीचे बादशाही धारे कायम ठेविले; आणि दुसऱ्या कोणापासून रयतेस इजा न पोंचावी अशी तजवीज केली. पूर्वीचे मोगल अंमलदार त्यांनी काढून टाकिले, आणि आपले दक्षणी अंमलदार नेमिले. कांहीं राजपूत जागीरदारांनीं मराठ्यास जुमानिलें नाहीं, त्यांच्या जमिनी मराठ्यांनी खालसा केल्या, आणि त्यांच्या जागीं आपले नवीन जमीनदार नेमिले. या वेळीं रयतेला संतुष्ट ठेविण्याची खबरदारी मराठ्यांनीं चांगलीच ठेविली होती. §

नंदलाल मंडलोई पुढें दोन तीन वर्षांत मरण पावला त्या समयीं बाजीरावानें पुत्र तेजकर्णास खालील पत्र लिहिलें. 'तुम्ही विनंतिपत्र पाठविलें तें पावोन सविस्तर कळलें. नंदलाल मंडलोई यांस देवाज्ञा जाली, चांगले प्रकारें चालवावें, म्हणोन कितेक निष्ठापुरस्कर लिहिलें तें कळलें. ऐशियास माळवा प्रांतीचा येखतियार रा. मल्हारजी होळकर व रा. राणोजी शिंदे यांस देऊन पाठविले आहेत. यांस तुमचा गौर करावयाविसीं कितेक आज्ञा केली आहे. उभयतां मा।।रनिल्हे आज्ञेप्रमाणें तुमचा गौर करतील. तुम्ही त्यांस भेटोन कामकाज करीत जाणें. तुमचा सर्व प्रकारें आह्मांस अभिमान आहे, तदनुरूप निर्वाह होईल. आपलें वर्तमान वरचेवर लिहीत जाणें. जाणिजे. छ. २ जमादिलावल, इसन्ने सल्लासीन (२३.१०.१७३१). याच मासल्याचें अगत्यवादाचें पत्र चिमाजी आपानेंही मल्हारराव होळकरास लिहिलें.

एक जोराचा मारक प्रहार झाला की जेत्यांचें मुख्य काम भागतें. तसाच प्रकार माळव्याचा झाला यांत आश्चर्य नाहीं. चिमाजीच्या विजयाचा फायदा घेऊन बाजीरावानेंही लगोलग पूर्वेकडून बुंदेलखंडावर झडप घालून बंगसाच्या जाचांतून छत्रसालास सोडविलें. पुष्कळ दिवस हे प्रकार इतिहासांत अनिश्चित

§ Malcolm's Central India Vol. II p. 82.

राहिल्यानें खऱ्या बनावांत जें मोठें वैगुण्य राहिलें होतें, तें आतां कालस्थल-व्यक्तींच्या स्पष्ट निर्देशानें निरसन पावलें आहे, शके १६५०च्या कीलकसंवत्सरानें मराठी राज्यास केवढी शुभाशंसा आणिली हें व्यक्त होतें.

दोघेही बंधु अपूर्व विजय पदरांत घेऊन स. १७२९ च्या पावसाळ्यांत महाराजांच्या दर्शनास साताऱ्यास दाखल झाले, त्या वेळचा त्या राजधानीचा आनंदोत्सव कल्पनेनेंच ओळखला पाहिजे. मुख्य काम पार पडल्यामुळें खुद्द बाजीरावास पुढें स. १७३६ पावेतों उत्तरेंत जाण्याचें प्रयोजन पडलें नाहीं, किंवा दुसऱ्या निकडीच्या उद्योगांमुळें त्यास तिकडे जातां आलें नाहीं. मराठी राज्याची हद्द स. १७२९ त यमुना नदीस जाऊन भिडली आणि या प्रदेशाच्या व्यवस्थेची व वांटणीची तजवीज बहुतेक तिकडे वावरणाऱ्या सरदारांनी व चिमाजीआपानें स्वतः स. १७३२ त उत्तरेंत जाऊन केली. प्रदेशाची वांटणी व तत्संबंधी वेळोवेळीं झालेले फेरफार येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. शिवाय त्यांत इतक्या भानगडी आहेत कीं तो विषय स्वतंत्र अभ्यासाचाच आहे. मुख्य प्रकार खालीं दर्शविल्याप्रमाणें लक्षांत ठेवतां येईल.—

' निमें स्वराज्याचा अंमल पेशव्यांचे मार्फत हुजूर सरकारांत यावा, निमेंत फौजेचा खर्च करून, पेषकशी ( नजराणा ) येईल ते हुजूर यावी ऐसे तह करून दिले. शिंदे होळकर व यशवंतराव पवार, या सर्वांशी तह केला, की जो मुलूख सरकारांत येईल त्याचे हिस्से करून फौज जमा करून एकविचारें चालावें. हिस्से केले त्यांत शेंकडा ३१ रु. सरकार एक हिस्सा, शिंदे रु. ३० एक हिस्सा, होळकर रु. ३० एक हिस्सा, पवार रुपये ९. याप्रमाणें करार करून फौजा ठेवून दिल्लीस जयसिंग राजा सुद्धां जाऊन पादशहाचे दौलतीविषयी चाकरींत उणें पडों देऊं नयें. '‡ येणेंप्रमाणें ठराव केला. या ठरावांत निरनिराळ्या वेळीं फेरफार झालेले आहेत, तरी त्यातील मूळ तत्त्व कायम आहे. पुढें या उत्पन्नाचे हिस्से थोडे निराळे झाले. म्हणजे मुख्य सरकार ४५, सिंदे २२॥, होळकर २२॥, व पवार १०; असे हिस्से ठरवून महालांचे वसूल सर्वांनी मिळून करावे असें ठरलें. हे ठराव नक्की एकदांच झाले असें नाहीं. स. १७२९ पासून पुढें कैक वर्षें पुनः पुनः वाटाघाट होऊन ते हळूहळू बनत गेले.§

‡ का. स. प. या. पृ. ५३५ ; तह व करारमदार पृ. १५२.

§ तपशील ई. सं. पे. द. पृ. २०३, २०८ व १२७ वर आहे.

माधवराव पेशव्याचे वेळचें २४.२.१७६८ चे वांटणीपत्र पाहण्याजोगें आहे, त्याचाच अंमल नानाफडणीसापर्यंत पुढें होत असे.

५ **छत्रसालाचा गजेन्द्रमोक्ष** ( एप्रिल स. १७२९ ).—मराठ्यांचे व राजपुतांचें ऐक्य होऊन माळवा प्रांत बादशहाचे हातचा गेला, आणि पुढें मराठे दिल्लीच्या बाजूस चाल करूं लागले, हा प्रकार पाहून बादशाही दरबारांत मोठी धास्ती उत्पन्न झाली. त्यांतच बुंदेले राजपूत मराठ्यांस सामील होऊन बादशाही बुडवूं लागले. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल पन्ना येथें स्वातंत्र्यानें वागूं लागला. कधीं प्रत्यक्ष लढून, तशीच वेळ आली तर शरण जाऊन, व कधीं मराठे वगैरेचें साह्य घेऊन सुमारें साठ वर्षे (स. १६७०–१७३१) या पुरुषानें जो जोर दाखविला तो हिंदुराष्ट्रास सदैव अभिमानास्पद वाटण्याजोगा आहे.† त्याचें व मराठ्यांचें शिवाजीच्या वेळेपासूनच सख्य होतें. तेव्हां ह्या प्रकरणाचा जोरानें प्रतिकार न केल्यास मराठे दिल्ली सुद्धां काबीज करण्यास चुकणार नाहींत, अशी आणीबाणीची वेळ आलेली पाहून, बादशहानें अलाहबादचा सुभेदार महंमदखान बंगश पठाण हा पराक्रमी पुरुष होता, त्यास माळव्याचे मदतीस नेमून मराठे व छत्रसाल व इतर राजपूत राजे यांचें पारिपत्य करण्याचा त्यास हुकूम दिला. छत्रसालाची हकीकत मुसलमानी रियासतींत दिली आहे.

महंमदखान बंगश § गझन फर्जंग ( ज. १६६५, मृ. १७४३ ) हा अफगाणिस्तानांतील कोहत प्रांतापैकी बंगश खोऱ्यांतला राहणारा पठाण असून, त्याचा बाप आईनखान औरंगजेबाचे वेळेस हिंदुस्थानांत आला. महंमदखानानें बादशाही फौजेंत नोकरी करून नशीब काढिलें. तो गंगेच्या कांठीं शम्शाबाद परगण्यांत माऊ येथें राहत असून पांच चार हजार अफगाण लोक नोकरीस ठेवून, जरूर त्या पक्षास मदत करीत असे. फर्रुखसेयरच्या कारकीर्दीत सय्यदांस मदत केल्यानें त्यास मोठमोठ्या जागिरी मिळाल्या. त्यानें बादशहाच्या नांवानें फर्रुखाबाद शहर स्थापून तेथें वास्तव्य केलें. फर्रुखाबादच्या नबाबास बंगश नबाब म्हणतात. हे पठाण, एक बंगश व दुसरे रोहिले, उत्तर हिंदुस्थानांत

¦ पारसनीस कृ. बुंदेलखंड प्रकरण; बुंदेल्याची कै. भा. व. १; Irvines' Bangash Nawabs of Ferrukhabad; Pogson's Bundellas.

† जयपुर अखबारात छत्रसालचा उल्लेख वारंवार येतो.

§ बंगश शब्दाचा अर्थ 'गिरिप्रदेश' असा आहे. The two Nawabs of Oudh p.142.

मराठ्यांचे नेहमीचेच शत्रु बनले ही गोष्ट पुढील इतिहासात ध्यानांत येते. महंमदखान पुढें सय्यदांचे विरुद्ध उठला; आणि त्यांचा पाडाव झाल्यावर सन १७२१ त महंमदशहाने त्यास अलाहबादची सुभेदारी दिली. त्या योगानें बुंदेलखंड, आग्रा व अलाहबाद या टापूंत त्याचा संचार सुरू झाला, आणि बुंदेलखंडचा छत्रसाल व इतर राजपूत यांस जिंकण्याचा उद्योग त्यानें सुरू केला. त्यास मिळालेल्या जागिरी बुंदेलखंडांत असल्यामुळे लढून अंमल बसविल्याशिवाय त्याचें चालण्याजोगें नव्हते. हा अंमल बसवितांना त्याचा मुलगा पीरखान यास बुंदेल्यानी ठार मारून त्याच्या फौजेचा फडशा उडविला, तेव्हां महंमदखानानें आपला मुलगा काईमखान व सरदार दलेलखान यांस बुंदेल्यांवर पाठविलें. छत्रसालानें त्यांचाही पराभव करून दलेलखानास ठार मारिलें. तेव्हा महंमदखान बंगश चवताळून मोठ्या तयारीनिशी बुंदेलखंडांत शिरला. त्यामुळें छत्रसाल जैतपुरच्या किल्ल्याचा आश्रय करून बंगशाचा प्रतिकार करूं लागला. दिल्लीचा बादशहा व वजीर खानडौरान यांनी बंगशास भरपूर मदत पाठविली. माळवा व अलाहबाद ह्या दोहोंच्या मध्यें असलेल्या बुंदेले राजांस आपण सहज चिरडून टाकूं अशी त्याची अपेक्षा होती छत्रसाल व त्याचे तिघे मुलगे यांचें व महंमदखानाचें स. १७२८ च्या जून महिन्यांत निकराचें युद्ध चालू झालें. बंगशाची फौज मोटी व खंबीर असल्यामुळें बुंदेल्यांची पीछेहाट होऊं लागली. शेवटीं स. १७२८ च्या डिसेंबरांत जैतपुर नजीक मोठी निकराची लढाई झाली, तींत वृद्ध छत्रसाल अग्रभागी असतां घायाळ झाला, तेव्हां त्याचे लोक पराभव पावले, आणि किल्ला बंगशाचे हवालीं करून छत्रसाल त्यास शरण गेला.

इकडे याच वेळीं चिमाजीने माळव्यात शिरून अमझेराची लढाई जिंकल्यावर उज्जनीस वेढा घातला, त्याच्या हालचालींवर बंगशाची नजर जडलेली होती. चिमाजीच्या साह्यास पूर्वेकडून खुद्द बाजीराव बुंदेलखंडाकडे चालून येत होता. देवगडावरून गढामंडळाच्या जंगलांतून अकस्मात् मराठे छत्रसालाच्या मदतीस येतील अशी अटकळ नसल्यामुळे बंगशाने छत्रसाल व त्यांचे पुत्र यांस जेतपुरच्या किल्ल्यावर बंदोबस्ताने ठेवून आपण बाहेरच्या प्रांतवसुलीचें काम आरंभिलें. चिमाजीआपा उज्जनीस वेढा घालून बसला. त्याकामीं तो बराच काळ गुंतून पडल्यामुळें स. १७२९ च्या जानेवारींत बाजीरावानें त्यास कळविलें,

"उज्जनीच्या शहास गुंतून राहूं नये. वरकड स्थळें व प्रांत पुष्कळ पडला आहे. तुम्ही आम्ही एक होण्याची जरूर वाटल्यास तसें लिहून पाठविणें. नाहीं तर आम्ही सत्वरच बुंदेलखंड प्रांतें जात आहों." हें पत्र पावतांच चिमाजीनें उज्जनीचा वेढा उठवून गुजरातकडे प्रयाण केलें.

दरम्यानछत्रसालानें अंतस्थ रीतीनें बाजीरावाकडे मदतीची याचना करून मुद्दाम या कार्यानिमित्त घरचा माणूस दुर्गादास यास समक्ष हकीकत कळविण्यासाठीं रवाना केलें. हीच छत्रसालाच्या गजेन्द्रमोक्षाची सुप्रसिद्ध विनवणी होय. ती बाजीरावास गढामंडळा येथें फेब्रुवारींत पोंचली. त्यानें चिमाजीस कळविलें, 'आम्हीं छत्रसालाचे मुलकांत आहों. तुम्ही सुचेल तिकडे पोट भरणें, आम्ही इकडे भरतों.' †

बाजीरावाबरोबर या वेळीं पिलाजी जाधव, नारोशंकर, तुकोजी पवार, दावलजी सोमवंशी वगैरे मिळून पंचवीस हजार फौज होती. ता. १२ मार्च रोजी महोब्यानजीक छत्रसालच्या पुत्रानें बाजीरावाची भेट घेतली.¶ दुसऱ्या दिवशी खुद्द छत्रसालानें त्याची भेट घेऊन मेजवानी वगैरेचा सत्कार व पुढील मोहिमेचीं बोलणीं केलीं. मराठे-बंगश युद्धास तोंड लागलें. बंगशाजवळ तोफखाना असल्यामुळें त्यास वेढा घालून उपासमार करण्याच्या उद्योगास मराठे लागले. बंगशानें दिल्लीहून कुमक मागवून पुत्र काईमखान यास तांतडीनें बोलाविलें. काईमखान त्वरेनें आला, पण त्याची व बापाची गांठ पडूं न देतां जैतपुरनजीक सुपे येथें त्यास मराठ्यांनीं घेरलें, तेव्हां तो शंभर स्वारांनिशीं पळून गेला आणि त्याचें लष्कर यांनीं लुटून घेतलें. ता. ४ एप्रिल रोजीं पिलाजी जाधव लिहितो, " देवगडचें सख्य संपादून गढ्यावरून आलों तों बंगश वीस हजार फौजेनिशी आला. त्यास जेर करून कोंडला आहे. रसदकुली बंद केली आहे. या आठा दिवसांत त्यास बुडवून टाकितों किंवा सल्लयास आला तरी सल्ला करून लवकरीच देशास येतों. यमुनातीरपर्यंत अंमल जाला."

ता. २८ एप्रिलचें पत्र चिमाजी आपास आलें तें असें. "कै. नानांच्या पुण्यप्रतापेंकरून तांब्र लुटून फन्ना केला. सहा हजार फौज बुडविली. सरदार मृत्यु पावला. एकोणीस हत्ती पाडाव आले. वर्तमान ऐकोन राजश्री बहुतसे

† पे. द. १३. १०, ३०, ३३. ¶ पे. द. ३२.३६

संतोषी जाले. एकनिष्ठ सेवक आहेत, त्यांस श्री यश देतो ऐसें बोलले. मातुश्रीबाई वगैरे सर्वांस संतोष जाहला. " $

मे महिन्यांत जैतपुरवर बंगषाची अन्नान्नदशा होऊन त्यानें बाजीरावास करार लिहून दिला, 'आम्ही बुंदेलखंड सोडून जातों, पुनः छत्रसालावर चढाई करणार नाही.' पावसाळा नजीक आल्यामुळें एवढाच विजय पदरांत पाडून बाजीरावास स्वदेशची वाट धरणें भाग पडलें. २३ मे रोजीं तो जैतपुर सोडून परत निघाला, तो १६ जुलैस पुण्यास पोंचला. बंगशाच्या या अपजयाबद्दल बादशहानें त्याचा अलाहबादचा सुभा काढून सरबुलंदखानास दिला. अशा रीतीनें छत्रसालाची सुटका बाजीरावानें केली. तो पुढे १४ डिसेंबर, स. १७३१ रोजी मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ८२ वर्षांचें होतें. त्यास पुष्कळ पुत्र होते, पैकी दोन वडील हिरदेसा व जगत्‌राज यांनीं राज्य वाटून घेतलें. हिरदेसाचें वास्तव्य पन्ना येथें व जगत्‌राजाचें जेतपुरास झाले.§ बाकीच्या पुत्रास लहान गांव निर्वाहापुरते देण्यांत आले. या कुटुंबाचे पुढें पेशव्याशीं हर्षामर्षाचे प्रसंग सारखे चालू राहिले. या स्वारीत बाजीरावास मस्तानीची प्राप्ति झाली तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे.

हें एकंदर प्रकरण म्हणजे मराठे व राजपूत यांचें मोगल बादशाहीविरुद्ध धर्मयुद्धच होय. लोकवार्तेत तरी बाजीरावाला हिंदूंचा पुरस्कर्ता हें नांव मिळालें. मरणसमयी छत्रसालानें राज्याचा हिस्सा बाजीरावास देऊन त्याची मदत पुढें आपल्या पुत्रांस सदैव मिळत जावी अशी योजना करून ठेविली. हातीं जोर असणारा योद्धा आपल्या मदतीची अशी किंमत नेहमींच घेत असतो.

एकाच स्वारींत जगड्व्याळ विजय दोघा बंधूंनीं मिळविल्यामुळें शाहूला एवढी धास्ती उत्पन्न झाली, की त्यानें ताबडतोब त्यांस ता. १२ एप्रिल, स. १७२९ चें खालील पत्र लिहिलें, "प्रस्तुत छावणीचे दिवस समीप आले, पुढें चातुर्मास्यांत कितेक मनसुब्यांचा विचार करावा लागतो, याकरितां बाजीराव यांस संनिध यावयाची आज्ञा केली आहे. तुम्हीही त्या प्रांतें गुंतोन राहवें असें नाहीं. याकारितां कुलफौजेनिशीं स्वामींच्या दर्शनास येणें. उदाजी पवार यासही घेऊन येणें." † बहुधा उदाजीनें शाहूकडे कलागत लाविली.

$ रा. खं. ३.१४, पे. द. १३.४५, व १०.५४

§ अर्व्हिन, भा. २, पृ. २४१

† पे. द. १७.१८ व शा. रो. १०७ एकच होत.

वरील स्वारीनंतर बाजीरावास द्यावयाच्या जागिरीसंबंधानें वाटाघाट व बोलाचाली पुष्कळ झाली. त्या कामासाठीं छत्रसालाचे वकील हरिदास पुरोहित व आशाराम पुण्यास गेले. दरम्यान हा थोर वृद्ध व अनुभवी पुरुष मरण पावला. त्याचे दोन मुलगे हिरदेसा व जगत्‌राज कर्ते होते, त्यांनीं प्रत्येकी सवालाख वसुलीचा प्रदेश पेशव्यास देण्याचें कबूल केलें. पुढें चिमाजी आपाची स्वारी स. १७३२–३३ त बुंदेलखंडांत झाली, तेव्हां त्यानें गोविंदपंत बुंदेल्यास तिकडील प्रदेश ताब्यांत घेऊन त्याची व्यवस्था पाहण्यास नेमिले मुधाजी हरि म्हणून मराठा वकील त्यावेळीं बुंदेल्यांचे दरबारांत होता. त्यानें लिहिलेली या प्रकरणाची हकीकत खुलासेवार आहे.§ अशा व्यवस्थेनें पुष्कळसा मुलूख बुंदेलखंडांत बाजीरावास मिळाला, त्यांत काल्पी, हटा, सागर, झांशी, शिरोंज, कुंच, गडकोटा आणि हरदेनगर वगैरे प्रांत होते. मुलूख देतांना बाजीरावाशीं तह झाला त्यांत छत्रसालाचे दोन मुलगे व बाजीराव यांनीं बंधूंप्रमाणें वागून नेहमीं एकमेकांस मदत करावी असा ठराव झालेला होता. बाजीराव व छत्रसालाचे मुलगे यांच्यांत झालेला करार ता. १:७.१७३९ चा त. क. प्र. ९ वर आहे, त्यांत बाजीरावानें लिहून दिल्हें कीं, 'तुमचा व्यवहार, बढाई, मरातब आहे तो कधीं कमी होणार नाहीं. तुमचे किल्लयांची व जागांची रदबदल करणार नाहीं. तुम्हांस गैरराजी होतील त्यांस आम्ही ठेवणार नाही. आमची फौज तुमचे मुलखांतून गेल्यास तिचा खर्च आम्ही भागवूं. पातशाही फौज तुमचेवर चढाई करून आल्यास तुमचे राज्याचें संरक्षण करूं; आणि आम्हावर आल्यास तुम्ही मदत करावी. तुम्हीं पांच लाखांची जहागीर आम्हांस दिली आहे, त्याशिवाय जास्त रुपयांची किंवा गांवांची रजबदली करणार नाही. यास दरम्यान चिमाजी आपा, नाना, पिलाजी जाधव, मल्हारराव, राणोजी व यशवंतराव पवार व जानोजी समशेर आहेत.' बाजीरावानें व त्याच्या सरदारांनीं पुढें आग्रा, दिल्ली, दुआबकडे स्वाऱ्या केल्या, त्यांत बुंदेलखंडातील या प्रदेशाचा त्यांस चांगला उपयोग झाला. कारण, स्वतःच्या मालकीच्या मुलखांत मुख्य ठाणें ठेवून उद्योग वाढविण्याची त्यांस सोय झाली. माळव्याच्या पुढेंच हा प्रदेश असल्यामुळें माळव्यावरही मराठ्यांचा शह बसला. [illegible] बुंदेलखंडांत कायमचें ठाणें दिलें, व बुंदेले राजपुतांशी सख्य जोडून बादशाहीच्या नाशाची जोराची तयारी केली, त्यामुळें पुढें त्याचा बादशहाशीं

§ पे. द. भा. १४ ले. ८–९

झगडा उपस्थित झाला. बुंदेलखंडांतील ही जागीर बाजीराव व त्याचे अनुगामी केवळ स्वतःच्या मालकीची समजत; समाईक राज्यांत ती सामील झाली नाहीं. गोविंदपंत बुंदेले यानें पुढील पंचवीस वर्षांत यमुना नदीच्या दक्षिणोत्तर भागांत मराठी सत्ता कायम केली. पांच लाख उत्पन्न निव्वळ दरसाल हातीं पडेल एवढी ही जागीर म्हणजे तिचा एकंदर वसूल ३३ लाख होता असें बखरीत ममूद आहे, तें बरोबर दिसतें. खास पेशव्याचे मालकीची ही जागीर स. १८५७ सालपर्यंत मस्तानीच्या वंशाकडे चालली ¶

६ **गोविंदपंत बुंदेले.**—गोविदपंताचें मूळ गांव रत्नागिरीजवळचें नेवरें होय. याचे वडील नरसिंहपंत खेर यास मुलगे सहा; गोविंद, अंताजी, रामाजी, विठ्ठल, काशीपंत व बाबूराव. पैकीं गोविंदपंत हा बाळाजीपंतास दत्तक दिला होता. शेवटचा बाबूराव गुलसराईस राहूं लागला, त्याजपासून गुलसराईचा वंश स्वतंत्र बनला. गोविंदपंत १३।१४ वर्षांचा असतां त्याचा बाप बाळाजीपंत वारला, आणि नेवऱ्याच्या कुळकर्णाची व्यवस्था त्याजकडे आली. तो हूड व खेळाडू असल्यामुळें त्याच्या हातून ही व्यवस्था न होतां भाईबंदांनी त्यास सर्वस्वीं नागविलें. तेव्हां बर्वे वगैरेंचें उदाहरण पाहून, गोविंदपंत कोंकण सोडून देशावर आला. नोकरीसाठी हिंडतांना त्यानें बाजीरावापाशीं शागीर्दीची जागा पत्करिली. बाजीरावाकडूनच तो कांही दिवस मल्हारराव होळकराजवळ काम करीत असावा. स. १७३२ त मल्हाररावास त्याचा कारभारी पुण्याहून लिहितो, "गोविंदबल्लाळ यांजविशी, आपण येथें आले होते तेव्हां श्री. रा. आपांस विनंति केली होती, त्याप्रमाणें हल्लीं त्यांस (आपांस) पुसोन आपल्या नांवें सनद पाठविली आहे, त्याप्रमाणें आपण त्यांचें विल्हेस लाविलें पाहिजे."§ "आम्ही आपखुशीनें गोविंद बल्लाळ कमावीसदार केला, त्याची फळें आम्हांस प्राप्त झाली," असें पुढें कैक वर्षांनी अंताजी माणकेश्वर लिहितो. म्हणजे बाजीरावाबरोबर बुंदेलखंडाचे स्वारीत अंताजी माणकेश्वर होता, त्यानें गोविंदपंताची शिफारस केली हें स्पष्ट दिसतें. गोविंदपंताचे गुण नजरेस येऊन स. १७३३ त बुंदेलखंडाचा जो भाग बाजीरावास प्राप्त झाला, त्याची व्यवस्था पाहण्यास त्यानें गोविंदपंताची नेमणूक केली. शौर्यानें व धूर्ततेनें वागून उत्तरेंत

¶ या संबंधाने प्रो. पोतदार यांचे विवेचन पहावे. सह्याद्रि, 'बाजीराव अंक', मे, १९४०

§ ख. ६-८४ व पे. द. २१. १०९.

गोविंदपंतानें आपला जम चांगला बसविला, आणि लवकरच उत्तरेंतील मराठे सरदारांमध्यें त्याची गणना प्रमुखपणें होऊं लागली. हळू हळू त्यानें नवीन किल्ले बांधिले, आणि नवीन ठाणीं हस्तगत केलीं. कुरईच्या नबाबाकडून त्यानें कांहीं प्रांत हस्तगत केला, त्यांत सागर म्हणून एक प्रचंड तलाव होता. या तलावाच्या कांठीं 'सागर' नांवाचें नवीन शहर वसवून तेथें गोविंदपंतानें आपलें वास्तव्य कायम केलें. सागरची स्थापना स. १७३६-३७ चे सुमारास झाली असावी. यापुढील बुंदेलखंड प्रकरणाची हकीकत नानासाहेब पेशव्याचे प्रकरणांत कळून येईल.

**सागरकर गोविंदपंताचे घराण्याची वंशावळ**

( पारसनीस कृत बुं. प्र. )

गोविंदपंत
|
बाळाजी
|
गोविंदपंत द. १७३१-६१
|
- बाळाजी १७६१-१८००
  |
  रघुनाथराव आबासा० १८००-०२
  |
  बळवंतराव बाबा सा.
  |
  रघुनाथराव
  १ सागर घराणें.
- गंगाधर १७६१-१८०२
  |
  गोविंदराव १८०२-२२
  |
  बाळाजी १८२२-३२
  |
  गोविंदराव १८३२-४२
  २ जालवण घराणें.

३ गुलसराई वंश
|
बाबूराव
|
दिनकरराव अण्णा १७७४-१८३३
|
केशवराव राजेबहादूर. १८३३-१८८१

## ६

# गृहकलह मिटला

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १६९८ | मे | २३ | संभाजी कोल्हापुरकर जन्म. |
| १७१३ | | | संताजीपुत्र पिराजी घोरपडे कापशीकर कोल्हापुरचा सेनापति. |
| १७२७ | | | चिमणाजी दामोदर संभाजीचा प्रधान. |
| १७२८ | | | संभाजी निजामास सोडून पन्हाळयास दाखल. |
| ,, | | | सेनापति पिराजी घोरपडे कापशीकर मृ. लढाईंत ; पुत्र राणोजी सेनापति ( हयात १७२३-१७८३ ). |
| १७२९ | जाने० | ६ | उदाजी चव्हाण शाहूस शरण. |
| १७३० | | | नीलकंठ त्र्यंबक खासनीस संभाजीचा प्रधान. |
| ,, | | | शाहूची संभाजीवर स्वारी; संभाजी व उदाजी चव्हाण यांची शाहूवर चढाई. |
| ,, | मार्च | | प्रतिनिधीनें संभाजीचा पराभव करून बायका पकडून साताऱ्यास आणिल्या. |
| ,, | जुलै | १२ | विशाळगड काबीज करण्याची शाहूची संभाजी आंगऱ्यास आज्ञा. |
| ,, | ऑगस्ट | ८ | संभाजीनें नीलकंठ त्रिंबक प्रधानास शाहूकडे पाठवून तहाची याचना केली. |
| ,, | सेप्टें० | | जयपुरकर दीपसिंहाची साताऱ्यास वकिलात. |
| ,, | नोव्हें० | | दीपसिंग औरंगाबादेस निजामास भेटून परत गेला. |
| ,, | ,, | | संभाजीस आणण्यासाठीं शाहूचे सरदार पन्हाळयास. |
| ,, | डिसें० | १६ | संभाजी पन्हाळयावरून निघाला. |
| १७३१ | फेब्रु० | २७ | दोघां राजबंधूंची जखिणवाडीस भेट. |

| | | | |
|---|---|---|---|
| १७३१ | मार्च | १२ | संभाजीचें साताऱ्यास आगमन, दोन महिने मुक्काम. |
| ,, | एप्रिल | १३ | वारणेचा तह, संभाजीची कोल्हापुरास रवानगी. |
| १७३२ | नोव्हें० | २७ | संभाजीची साताऱ्यास दुसरी भेट. |
| १७३३ | मार्च | १३ | मनसाराम पुरोहित यास शाहूनें भेटीस आणिलें. |
| १७३४ | डिसें० | ६ | संभाजीची तिसरी भेट, पुढील १२ एप्रिल पावेतों. |
| १७३५ | एप्रिल | १८ | संभाजीची चवथी भेट. |
| १७३६ | एप्रिल | २६ | पांचवी भेट; सितोळे घोरपड्यांचा समेट. |
| १७३९ | नोव्हें० | ८ | उदाजी चव्हाणाचें अथणी प्रतिनिधीनें काबीज केलें. |
| १७४० | जून | ८ | सहावी भेट. |
| १७४६ | ऑगस्ट | २० | सातवी भेट; सहा महिने राहून या दिवशीं परत. |
| १७५१ | एप्रिल | २६ | राजसबाई मृ. |
| ,, | | | उदाजी चव्हाणास नाना सा० नें डिग्रजचा सरंजाम दिला. |
| १७६० | डिसें० | २० | संभाजी मृ. |
| १७६२ | नोव्हें० | २४ | उदाजी चव्हाण मृ. |
| १७७१ | फेब्रु० | १७ | राणी जिजाबाई मृ. |

# ६

# गृहकलह मिटला



**संदर्भ**—स. १७२८च्या कीलक संवत्सराचे प्रताप सर्व हिंदुस्थानास भोवले. उत्तरेंत बादशहा, मोगल उमराव, राजपूत सत्ताधीश आपापल्या बचावास लागले, तर निजामानें पुढें दाभाड्यास हाताशीं घेऊन पेशव्याशीं पुनरपि विरोध चालविला, त्यावरून संभाजीला वठणीस आणून गृहकलह मिटविणें शाहूनें मनावर घेतलें. ह्या प्रचंड घडामोडी स. १७३० सालीं इतक्या एकीस एक खेंचून नेटास लागल्या कीं त्यांचें पृथक्करण करून इतिहासाचा ओघ एका सूत्रांत आणणें हें काम अवघड बनलें आहे. एकाची गुंतागुंत दुसऱ्यास बाधल्याशिवाय राहत नाहीं. या दृष्टीनेंच आतां आपण एक एक विषय हातीं घेऊं.

**१ दीपसिंहाची वकिलात** (स. १७३० पावसाळा).—माळवा व गुजरात दोन्ही प्रांतांवरील मराठ्यांचें आक्रमण पाहून बादशहास धास्ती उत्पन्न झाली. त्रिंबकराव दाभाडे संतप्त झाला आणि निजाम चुळबूळ करूं लागला. सर्व हिंदुस्थान अस्वस्थ झालें. बादशहानें घाबऱ्या घाबऱ्या जयसिंगाची सल्ला घेतली. "त्यास आज्ञा केली जे, (१) मांडवगडास जाऊन तें स्थळ परत घ्यावें, आणि (२) शाहूराजाकडे इतबारी मुत्सद्दी पाठवून गुजरात व माळवा यांत मराठे पाऊल न ठेवीत, नर्मदोत्तर न येत ऐसा बंदोबस्त करावा." अर्थात् असा कायम बंदोबस्त करायचा म्हणजे प्रथम त्यासंबंधीं मराठ्यांचे विचार काय आहेत, त्यांचें सामर्थ्य कसें आहे, कोणत्या अटींवर ते माळवा गुजरात प्रांत सोडून देण्यास कबूल होतील याचा पक्का शोध आणण्याची व त्यासाठीं खुद्द शाहूलाच भेटण्याची जरूर उत्पन्न झाली. या बाबतींत उदेपुरचा राणा संग्रामसिंह याच्या विचारानें जयसिंहानें इतबारी वकील साताऱ्यास

पाठविले. दीपसिंह व मनसाराम पुरोहित हे दोन जयसिंहाचे व संग्रामसिंहाचा बागजी असे तीन वकील हुशार मुत्सद्दी म्हणून नांवाजलेले स. १७३० च्या पावसाळ्यांत साताऱ्यास दाखल झाले. त्यांनीं महाराज, बाजीराव, चिमाजीआपा, पुरंदरे, प्रतिनिधि, फत्तेसिंह व रघूजी भोसले इत्यादींच्या भेटी घेऊन पुणें, सातारा येथील एकंदर परिस्थिति अजमावून घेतली, बोलणीं करून आशय समजून घेतला. साताऱ्याहून हे वकील पुढें औरंगाबादेस निजामाच्या भेटीस गेले. तेथेंही त्यांचा पाहुणचार यथायोग्य झाला. आश्विनांत त्यांचा मुक्काम औरंगाबादेस होऊन पुढें नोव्हेंबरचे आरंभी ते परत जाण्यास निघाले. वाटेंत अजिंठ्याचे सराईनजीक उदेपुरचा बागजी मृत्यु पावला. "तेथून निजामांनी माघारे आणिले. आज भेटीस गेले. चार पांच घटका खलबत जालें. [illegible] सडे आले आहेत."

दीपसिंग व मनसाराम दोघे परत गेले. पैकीं मनसारामाची भक्ति शाहूवर एवढी बसली कीं तो पुढें साताऱ्यास येऊन राहूं लागला. "तपोनिधि मनसाराम पुरोहित नांदुरास राहतात. त्यांच्या घरास जाऊन बहुमान व समाधान करून महाराजांच्या दर्शनास घेऊन येणें," अशी शाहूची आज्ञा ता. १३ मार्च, स. १७३३ ची आहे. शाहू व जयसिंग यांचें सख्य जोडण्यांत हा उपयोगी पडला यांत संशय नाहीं. †

या वकिलातीचा परिणाम मराठ्यांनाच अनुकूल झाला. शाहू व त्याचे सरदार यांचे हेतु उदात्त व धर्मसंवर्धक असून उगाच दुसऱ्यांना बुडवून त्रास द्यावा अशी भावना कोणाची नाहीं; कामगार लोक नीतिमान, शूर व दक्ष आहेत; सर्वांची इच्छा बादशहाशीं, राजपुतांशीं व निजामाशीं सुद्धां स्नेहवृत्तीनें राहावें अशी असून माळवा व गुजरात या दोन प्रांतांबद्दल सालाची चौथाई अनुक्रमें अकरा लाख व पंधरा लाख रुपये मराठ्यांस अविच्छिन्न मिळाले म्हणजे ते या प्रांतांच्या वाटेस जाणार नाहींत, उलट आपल्या फौजा ठेवून ते त्यांचें संरक्षण करतील. अशा तऱ्हेची बोलणीं होऊन वकिलांची खात्री पटली आणि असा करार जयसिंगानें बादशहाकडून मंजूर करून पाठवावा हा विचार ठरून ते त्रिवर्ग वकील परत निघाले. पण जयसिंगाची वकिलांस ताकीद होती कीं शाहूच्या दरबारचा मतलब समजून घेतल्यानंतर निजामाची भेट घेऊन त्याचें वरील [illegible] काय म्हणणें आहे, निजामाचें बलाबल किती आहे,

† पे. द. १०. ७४; १७. ६०; ३०. ७३ व ७८.

मराठ्यांचा व त्याचा हर्षामर्ष कशा प्रकारचा चालतो, ही माहिती घेऊन रुजू करावी. तदनुसार हे वकील औरंगाबादेस जाऊन निजामास भेटले. निजामाच्या व त्यांच्या भेटींत काय बोलणीं झालीं त्यांचा मतलब मराठ्यांच्या वकिलानें पेशव्यांस कळविलेला महत्त्वाचा व अभ्यसनीय आहे. ¶

राजकारणाच्या दृष्टीनें या शिष्टाईचा उपयोग कांहींच झाला नाहीं. शाहूची भावना सर्वांशीं भलेपणानें वागण्याची होती, तर लष्करी जोराशिवाय राजकारण सिद्धीस जात नाहीं अशी भावना बाजीरावाची. जयसिंगाची मात्र मधच्या मध्यें तारांबळ उडाली. बाजीराव व त्याचे सिंदे होळकरादि हस्तक यांचें सामर्थ्य जयसिंग ओळखीत असल्यामुळें त्यांच्याशीं समोर युद्धप्रसंग त्यानें शक्य तोंवर टाळिला . परंतु बादशहा व त्याचे प्रधान यांना ही जयसिंगाची नरमाई किंवा मराठ्यांशीं स्नेह ठेवण्याची वृत्ति पसंत पडली नाहीं. जयसिंगच बाजीरावास उत्तेजन देऊन त्याजकडून बादशाहीवर आक्रमण करवितो, हे दोघे हिंदु एकमेकांस साह्य होतात अशी कल्पना दिल्ली दरबारची झाली ; आणि याच कल्पनेस निजामानें उचलून धरलें. या अशा 'अनिश्चित स्थितीचा फायदा बाजीरावानें घेतला. पुढील दहा वर्षांचा बाजीरावाचा एकंदर उद्योग वरील मीमांसेवर रचलेला आढळतो. मुत्सद्देगिरी व युद्धचातुर्य या दोहोंचा मिलाफ बाजीरावाच्या वागणुकींत भरपूर दिसून येतो. जयसिंगाच्या मनोधारणासाठीं शाहूच्या आज्ञेनें मांडवगडचा किल्ला बाजीरावानें लगेच परत दिला. ती आज्ञा अशी.—" सवाई जयसिंग उज्जनी प्रांतें आले, ऐशीयास स्वामींचा व त्यांचा स्नेहघरोबा पूर्वीपासून चालत आला आहे. त्यांचें अगत्य स्वामींस. यास्तव उभयपक्षीं स्नेहाभिवृद्धि होय तो अर्थ करून मांडवगड यांचे स्वाधीन करणें. " ( ता. १९ मार्च स. १७३०. )

वरील वकिलातीच्या हकीकतींत दीपसिंगानें बाजीरावाचें व शाहूच्या दरबाराचें जें वर्तमान निजामास समक्ष कळविलें तें विशेष इतिहासोपयोगी आहे. निजामानें दीपसिंगास चढवून त्यानें मराठ्यांचा कमकुवतपणा बादशहास स्पष्ट कळवावा अशी क्लृप्ति योजली, पण ती सफल न होतां उलट दीपसिंगानें बाजीरावाची ओतप्रोत स्तुतिच केली, ती निजामाच्या अंतःकरणास विशेष झोंबली. ' माळव्याची अकरा लाख खंडणी कबूल करवून तुम्ही बंगसाचें व बादशहाचें घर बुडविलें, एवढी रक्कम बंगस आणील कोठून ?' असें निजामानें

¶ पे. द. १०. ३१, ६६, ६९ A, ७४; ३०. ७३, ७८; १७. ६०.

दीपसिंगास कळविलें. ‘ गुजरातेंत तर चौथांची भानगड आहे. तेथें बांडे व गायकवाड वाटेल तशी धामधूम करतात, त्यांस पेशव्यांकडून आळा बसणें शक्य नाहीं. ’ यावर दीपसिंग बोलला, ‘ पेशवे व जयसिंग दोघे मिळून बांडे व गायकवाड यांचा बंदोबस्त करतील. ’ त्यावर निजामानें साफ कळविलें, ‘ पेशव्याच्या वचनावर काडीचाही विश्वास कोणी ठेवणार नाहीं. ’ त्यावर दीपसिंगानें निक्षून सांगितलें, ‘ आम्हांस बाजीरावाचा इतबार पूर्ण असून, जयपुरचा त्यांचा घरोबा वडिलार्जित आहे. ’ या उत्तरानें निजाम ग्वजील होऊन बोलला, ‘ तुम्हांस सातारा येथें मातबर मनसुबेबाज व महाराजांचा इतबारी असा गृहस्थ कोण आढळला ? ’ दीपसिंगानें उत्तर केलें-‘ यासाठींच तर जयसिंगांनी मला मुद्दाम साताऱ्यास पाठविलें. बाजीराव प्रधानांचें नांव व मर्दुमी मुलखांत फार गाजते, तर त्यांची गिरंबारी ‡ व मुत्सद्देगिरी, मान, आदर राज्यांत व बोलीन चालीन पोख्त कारभारी कोण आहे तें मनास आणून येणें म्हणोन जयसिंगानीं आम्हांस पाठविलें होतें. ’

**निजाम**—मग असा मातबर पोख्तकार, साहेबततूंद, ( वाटेल तेव्हां फौज उभी करणारा ) राजा मेहरबान, गिरंबार ( =सामर्थ्यवान ), असा तेथें तुम्हांस कोण आढळला ?

**दीप०**—एका बाजीराउजीशिवाय आणिक कोणी सत्यवचनी, प्रामाणिक, पोख्तकारी, चलनसाहेबफौज दुसरा दिसत नाहीं.

**निजाम**—राजा खुद्द कसा आहे ?

**दीप०**—राजाही बहुतच खुब्या राखतो.

**निजाम**—आम्हीं ऐकिलें कीं तो कित्येक गोष्टी हलकेपणाच्या ऐकतो.

**दीप०**—ते जर मजलसीच्या सल्यानें न चालत तर राज्य कसें चालतें ! राजे मोठे शहाणे, विवेकी आहेत. जाबसाल उत्तम करितात.

शाहू व बाजीराव यांच्या योग्यतेचा हा त्रयस्थाचा किंबहुना विरुद्ध पक्षाचा अभिप्राय प्रमाण व बहुमोल मानला पाहिजे.

“ नबाबाचे मुलाकतींत दीपसिंगजींनीं महाराजांची व बाजीरावांची स्तुति फारच केली, ती ऐकून नबाब दिलगीर जहाला. म्हणों लागला, मला बाजीरायाचा इतबार अगर माणुसकीची व वचनाची सत्यता वाटत नाहीं. ”

‡ आवरशक्ति, बंदोबस्त.

**दीप०**—आपणास अनुभव असेल. पण माझी खात्री आहे, बाजीराव केलेले, अनुभवी, एकवचनी, सत्यनिष्ठ, राज्यांतील श्रेष्ठ कारभारी आहेत. सर्व फौजांना यांच्या वचनाचा इतबार वाटतो. पहिल्या प्रतीचे आज आहेत.

**निजा०**—पण त्यांस गर्व फार जाला आहे, एकवेळ पारपत्य करणें जरूर आहे.

**दीप०**—पातशहाची तुमच्यावर गैरमर्जी असतां बाजीरावासारख्या मोहोऱ्याशीं बिघाड करणें तुम्हांस उचित नाही. आम्ही तुम्हांस खात्रीनें मांगतों, आज बाजीराव मनांत आणील तर एक लाख फौज मिळवूं शकेल.

**निजा०**—शाहूच्या दरबारांत नारबा मातबर आहे. गयासखान गेले होते ते प्रत्यक्ष पाहून आले. त्यांच्याशी संधान बांधून पहा आम्ही कशी बाजीरावास तंबी पोंचवितों ती. सिधोजी निंबाळकर, कंठाजी बांडे, उदाजी पवार, व कान्होजी भोसले; शिवाय गायकवाड, ऐसे आम्हीं पंनास हजार स्वार जमवून शिकस्त चालविली आहे की एक बाजीरावास धरून तरी आणतों, नाहीं तर साफ धुडावून देतों, सर्व फौज त्यांची लुटून घेतों.

**दीप०**—आम्हांस योग्य दिसलें तें आम्हीं कळविलें. आपणास उचित दिसेल तें करण्यास आपण मुखत्यार आहां. †

निजामाचा पालखेडचा डाव फसला, त्यावर त्यानें हा दुसरा उभा केला. स. १७३०च्या दिपवाळींतला निजामाचा वरील व्यूह पुढील फाल्गुनांत डभईच्या संग्रामानें कसा फळास आला तें निदर्शनास येईल. या वेळेपासून उभय पक्ष निकरानें तजविजीस लागले. बाजीरावाच्या विरोधकांनीं वरील कारस्थानांत शक्य तितके आपले हात धुऊन घेतले. “ आनंदराव सुमंतांनीं राज्यास धका बसविण्याच्या बाजीरावाच्या नालस्तीच्या वल्गना चित्तास आल्या तशा निजामाशीं केल्या, त्यावरून निजामास सत्यसें भासलें. हा चित्ताचा खोटा, मायावी, महाकाबुची, माणसाचा पारखी, मनीं कपट पुरतें आहे; कंठाजी, उदाजी, कान्होजी भेटीस येतात, यांचा भरंवसा फार धरतात आनंदरायांनीं यांस सांगितलें, बाजीरायाशीं वैर भांडण केल्यास शाहू महाराजांस वाईट वाटणार नाहीं, राज्यांतील कुत्रेंही त्यास सामील होणार नाहीं, ” असें निजामाचें वर्तमान कळवून पेशव्याचा वकील कुंटे बाजीरावास लिहितो, “ स्वामींनीं गाफील न

† पे. द. १०. ६६ A.

राहिलें पाहिजे. दुष्टस्वप्नानें सावध जालें पाहिजे," असें बजावून नंतर तो वकील निजामाची हलाखी बाजीरावास कळवितो कीं, 'याचे मुख्य साह्यकारी हमीदखान व ऐवजखान मेले; कित्येक तर बेदील आहेत. ते म्हणतात याची बुद्धि फिरली, मरण समीप आलें, बाजीरायाचे हातें मरणार. स्वामींचे पदरीं वडिलांचें पुण्य समर्थ, शाहूमहाराजांस जो कोणी अनिष्ट चिंतील त्यास असाच भ्रम प्राप्त होतो. बहुधा स्वामींस पूर्वीहून अधिकोत्तर महद्यश येणार. गर्व बहुत जाला आहे; पण श्री सत्याकडे आहे हा पूर्ण भरंवसा वाटतो. यांस कांहीं चमत्कार दाखविल्यानें त्रेधा उडेल. काल निजामांनीं दीपसिंगास मेजवानी मेवा पाठविला. परभारें जात होते. बाह्यात्कारें बेचकरी दिसोन आली. सबब सात सिरपाव तीन तीन वस्त्रें देऊन विदा केले. चंद्रसेन रुसला, त्याची समजावीस होत आहे. यांस स्वामींचा उत्कर्ष नित्य दाहक जाहला आहे. निजामांस उमाबाईची व कंठाजीची पत्रें आलीं कीं, आम्ही कवडी मागत नाहीं, फुकाचा आश्रय तेवढा नबाबांनीं द्यावा, म्हणजे प्रधानपंतास युद्ध करून आम्ही मोडूं. जर त्यांनीं आम्हांस मोडलें तर मग तुम्ही आम्हास जागिरा मनसब द्यावी, आणि आम्ही मोडलें तर शाहूचें राज्यच बुडवितों. शाहूचें राज्य बुडविल्यावर संभाजी राजास स्थापून त्रिंबकरायास सेनापतिपद व कंठाजीस सरलष्करपद द्यावें, अशीं पत्रें बांडे दाभाड्यांची गयासखानजीचे विद्यमानें आलीं. त्यावर नबाब बोलले, संभाजीचा लकडा आमचे पाठीवर आहे त्यास एकवेळ राज्यीं बैसोन शाहूस मोडावें, फुकटाफुकट मनसुबा आला आहे. परभारें घरांत कलह लागतो. कोणही मोडला तरी एक विरोधक कमी जाला, आपलें काय जातें. सला तोडतोसें मुखेंकरून म्हणत नाहीं." ¶

दुसरा वकील लिहितो, "यंदाही पहिल्यासारखा उपक्रम इकडून आहे, थोडकासा फितवा घरचाही आहे. श्रीपतरायाची अर्जी वरचेवर येत असते. स्वामीनीं सहस्रप्रकारें सावध राहून राजश्रीसही लिहिलें पाहिजे. राजास धका द्यावा यांत तिळतुल्य मिथ्या नाहीं. प्राक्तन विचित्र. उपटून शूळ खांद्यावर घेतात. याचा उपाय मजबुदीनें कीजे." संभाजीचे पदरीं सेनापतीचा हुद्दा मिळविण्याची खटपट उमाबाईनें चालविली. "यांनीं विचार केला जे बिगाड तर करूं नये. चौथ तर रास्ती देऊं नये. हे गुजरात माळव्यांत जाताती तसें जाऊं

¶ पे. द. १०.६६–७६. सर्वच कागद या विषयाचे आहेत.

द्यावे. हरकसे उणे करावे. हे सला तोडितांतसें मुखेंकरून म्हणत नाहींत. राजाचा आमचा स्नेह, बाजीरायाचा स्नेह ऐशा लौकिकी गोष्टी सांगतो. एक प्रधान पंतास मात्र वचकतात. नाहीं तर राजास कांही वचक धरीत नाहीं."

अशा प्रकारचीं वर्तमानें बाजीरावाकडे आल्यावर जर तो निर्धास्त किंवा गाफील राहिला असता तर त्याची गणना वेड्यांत झाली असती. यावरूनच पुढें डभईचा प्रसंग उद्भवला. संभाजीस पुनः उठवावें, म्हणून कान्होजी भोसले, दाभाडे, कंठाजी कदम, उदाजी पवार इत्यादि सरदार निजामाशीं संधानें करूं लागले तेव्हां प्रथम शाहू व बाजीराव यांनीं संभाजीस नरम आणून मग दाभाड्याचें प्रकरण हातीं घेतलें आणि लष्करी जोरावर सर्व शत्रूंचा नाश केला.

**२ राज्य श्रीचे कृपेचें.**—शाहू दक्षिणेंत आल्यावर त्याचें चुलतबंधूंशीं जें युद्ध सुरू झालें, तें तेवीस वर्षांनीं स. १७३१ त कऱ्हाडनजीक कृष्णेच्या कांठीं उभय बंधूंची भेट होऊन संपलें. या अवधीत त्या युद्धाचीं कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं, त्यांचें वर्णन वेळोवेळीं वर आलें आहे. बाळाजीच्या अकालीं मृत्यूनें तर शाहूच्या शत्रूंस पुनः जोर आला असता, परंतु बाजीरावाचा पराक्रम चमकूं लागून चार पांच वर्षांच्या अवधींत शाहूचे शत्रु नरम झाले. स. १७२८ तील मुंगीशेवगांवच्या तहानें संभाजीची बाजू अगदींच बसली. त्याचा पहिला साह्यकर्ता रामचंद्रपंत अमात्य मेल्यावर भगवंतराव अमात्य झाला. पण त्याजवर त्याचा विश्वास बसला नाही. स. १७२३ पासून संभाजी व जिजाबाई भगवंतरावास गोंजारून आपल्या बाजूस ठेवण्याचा प्रयत्न करीत होतीं, परंतु भगवंतरावाचें मन त्यांजविषयीं अनुरक्त नव्हतें. बाजीरावानें निजामास तंबी दिल्यावर संभाजी उघडा पडला, आणि उदाजी चव्हाण हिंमतबहाद्दर यांच्या मदतीनें त्यानें शाहूशीं कांहीं काळ विरोध चालविला. 'तुम्हीं परपक्ष अवलंब केला,' असें संभाजी भगवंतरावास लिहितो, यावरून भगवंतराव संभाजीचें साह्य करीत नव्हता हें उघड आहे.† स. १७३० त

† या भगवतरावाचा वृत्तान्त मोठा हृदयद्रावक आहे. पे. द. तील त्याचीं पुष्कळ पत्रें छापलेलीं वाचून त्याजबद्दल कींव येते. बापाप्रमाणें कर्तबगारी दाखविण्याची त्याची हाव, पण दोघां छत्रपतींच्या कौटुंबिक कलहांत त्याजवर कोणाचाच विश्वास बसला नाहीं. बा. द. भा. २ मधील कागद पहा. पे. द. २६ मध्यें त्याचीं पुष्कळ पत्रें आहेत. खं. ८–८५, ९२–१०१, १०५–११०.

चिमाजीआपा गुजरातेंत चौथाईचा अंमल बसवीत असतां, इकडे संभाजी उदाजी चव्हाणाची मदत घेऊन शाहूवर चढाई करून येऊं लागला, त्याचा समाचार प्रतिनिधीनें घेतला. हा प्रकार आतां सांगावयाचा आहे.

संभाजी निजामास जाऊन सामील झाला, त्या बनावाचे तपशील चिटणिसानें दिलेले अभ्यासकांनीं लक्षांत घेण्याजोगे आहेत. त्या वेळीं शाहूनें संभाजीस पत्रें लिहून त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, ते कागद चिटणिसापुढें होते असें निःसंशय दिसतें. या पत्रांत मराठी राज्याचे एकंदर हेतू व शाहूची तत्संबंधी भावना यांचें उत्कृष्ट वर्णन आज आपणास उपलब्ध होतें, तें असें:—

"महाराजांनी सर्व प्रधान बोलावून विचार केला जे, संभाजी राजांनी मनांत दुर्बुद्धि धरली आहे. हें राज्य श्रीचे कृपेचें, थोरले महाराजांपासोन आजपर्यंत साध्य करण्यास कोण प्रयास लागले. म्हणोन त्यास पत्रें लिहिलीं जे, 'हें राज्य श्रीचें, यवनांचे आश्रयास जाऊन जय कसा येईल. तुम्हांस राज्यलोभ बहुत होता तर आम्हांस सांगोन पाठवायचें होतें. आम्हापासीं सेवकलोक दिगंत-प्रताप करणारे आहेत. त्यांतील तुमचे बरोबर देऊन एखादें राज्य साधून दिलें असतें. किंवा तुम्ही पराक्रम करून दाखवावा होता. किंवा आम्ही यवनांनीं घेतलेलें राज्य पुनः सोडवितों, तसें तुम्हांसही याखेरीज सोडवितां आलें असतें. आम्हीं सोडविल्यापैकीं विभाग मागावा ही काय नीति! कै. राजारामसाहेबांनीं चंदीस जाऊन फौज व दौलत जमविली. तेथून देशीं येऊन मोठीं स्थळें लुटलीं, ख्याति केली. आम्ही नजरबंदींत असतां आमचे ठायीं कसें लक्ष ठेविलें हें तुम्ही जाणत असोन, आतां यवनाचा आश्रय करावा हें विहित नव्हे. हरप्रकारें निघोन यावें. तुम्हांस दौलत पाहिजे ती आम्ही नवीन सिद्ध करून देऊं, अगर खर्चास नेमणूक अधिक मागा देऊं. पण राज्याचा वांटा मागणें पुराणांतरीं जाहलें नाहीं. ही बुद्धि सोडावी. सेनापति चंद्रसेन सेवक असोन हरामखोरीनें लढाई करून यवनास शरण गेले, महाराष्ट्र राज्य व धर्म सोडला, तेही मोठे कुळींचे रामदेवराव जाधव यांचा वंश. त्यांची तुम्ही अनुकूलता करून यवनांचा आश्रय करणें फार वाईट.' असें बहुतां रीतीनें सांगून पाठविलें असतां ती गोष्ट चित्तीं न आणतां केले मनसुब्याचे अभिमानास पडून निजामुल्मुल्कसह मिळोन चालून आले. तेव्हां सर्व प्रधान व सरदार जमवून विचार केला. सर्वांची उमेद व पराक्रम ऐकून महाराज संतोषी जाहले, सर्वांनीं तयारी करून निघावें ऐशी आज्ञा केली."

तत्कालीन राज्यचालकांचे हे विचार आपण अवश्य ध्यानांत ठेविले पाहिजेत. त्यांत मराठी राज्य स्थापण्याचा मूळ उद्देश देवधर्माचें संरक्षण असा स्पष्ट सांगितला असून तोच उद्देश शाहूनें आपल्या दृष्टिपुढें सदैव ठेविला. पेशवे वगैरे सरदार त्यासाठींच कष्टत होते. पालखेड, डभोई, भोपाळ, पानिपत इत्यादि संग्राम या एका उद्देशसिद्धींतले प्रयत्न होत. एकोजी राजानें यवनाश्रय केला म्हणून त्याजवर शिवाजीनें स्वारी केली, तोच प्रकार संभाजीसंबंधानें शाहूनें केला.

संभाजीचा सेनापति राणोजी घोरपडे, अमात्य भगवंतराव वगैरे प्रमुख मंडळी शाहूची चलती पाहून त्याचे नोकरींत येण्याची खटपट करूं लागली. संभाजीला हलका करण्याकरितां शाहूनेंही या मंडळींस आश्रय दिला. तेव्हां शाहूशीं तेढ धरणारा अथणीकर उदाजी चव्हाण संभाजीचा मुख्य साह्यकर्ता बनला. तो बलाढ्य व हिंमतवान असून त्याच्याच आधारावर संभाजीनें शाहूशीं थोडीबहुत धडपड चालविली होती. बाजीरावानें मात्र त्यास चांगलें धाकांत ठेविलें होतें. 'उदाजी चव्हाणाची बातमी राखोन वळवळ करील तर नतीजा देणें' असें ८.३.१७२८ रोजीं शाहू लिहितो. यानंतर लवकरच उदाजी शाहूस शरण आला. स. १७२९ ता. ६ जानेवारीस शाहूनें त्यास लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे.–'बोलीप्रमाणें वर्तावयास अंतर न पडे म्हणून लिहिलें, त्यावरून स्वामी संतोष पावले. तुम्ही एकवचनी आहां, तुम्हांपासोन बोलिले वचनास वर्तावयास अंतर न पडे, हा निशा आहे. इमान श्रींचा बेलभंडार पाठविला.' असेंच पत्र उदाजीचें चिमाजी आपास आहे.† परंतु लगेच स. १७२९ त बाजीराव व चिमाजीआपा दोघेही दूर माळव्यांत गेलेले पाहून उदाजी चव्हाणानें वारणेच्या तीरीं येऊन मुलूख लुटण्यास आरंभ केला. शिरोळचे ठाण्यांत राहून बाहेरच्या मुलखास तो उपद्रव देऊं लागला. संभाजीनें त्यास आपला सेनापति नेमिलें. तेव्हां शाहूनें संभाजी व उदाजी यांस पकडून आणण्यासाठीं स्वतःच पुष्कळ सरदार बरोबर घेऊन स. १७३० चे आरंभीं दक्षिणेकडे स्वारी केली. एके दिवशीं शाहू त्या बाजूस शिकारीस गेला असतां चव्हाण जवळच आसपास आहे असें कळलें. त्यावरून अभय देऊन शाहूनें त्यास भेटीस बोलाविलें. भेट होऊन तो परत गेला. पुढें एके दिवशीं शाहूला मारण्यासाठीं आलेले चार मारेकरी जंगलांत भेटले. चव्हाणाकडून किंवा

† शा. रो. २१३ व पे. द. ११·१

संभाजीकडून ते आले होते असें कळलें. तेव्हां संभाजीचें व चव्हाणाचें पारिपत्य करण्याचा विचार करून शाहूनें त्यासाठीं मोठी तयारी केली. 'स्वामी पन्हाळे प्रांतीं मोहिमेस जातात' असें लिहून, शंभुसिंग जाधव, दावलजी सोमवंशी, सिधोजीराव निंबाळकर, सेखोजी आंगरे, बाजीराव प्रधान, पिलाजी जाधव या सर्वांस पत्रें लिहून मोहिमेस बोलाविलें. स. १७२९ च्या दसऱ्यास हा उपक्रम होऊन पुढील फाल्गुनापर्यंत मोहीम चालली.

**३ संभाजीचा पाडाव** ( मार्च १७३० ).—त्रिंबकराव दाभाडे यास शाहूनें आज्ञा केली, 'हेरलें येथील वाडा घेऊन कोल्हापुराभोंवते राहून चव्हाणास तंबी पोंचविणें, लांब न जाणें.' सिधोजी थोरात, दावलजी सोमवंशी, राणोजी घोरपडे इत्यादि अनेक लहान मोठ्या सरदारांस उदाजी चव्हाणावर चालून जाण्याची शाहूनें आज्ञा केली. संभाजीनें पुनः निजामाशीं कारस्थान करूं नये, त्याचा बंदोबस्त कायमचा करावा, आणि त्याचे सर्व साथीदार नाहींसे करावे, अशा उद्देशानें प्रधान, प्रतिनिधि, सेनापति व इतर झाडून सारे सरदार जमवून आपण स्वतः वारणेच्या बाजूस तळ देऊन पलीकडे कोल्हापुरच्या राज्यांत शाहूनें मोहीम सुरू केली.

निजामास सामील झाल्या वेळेपासून प्रतिनिधीच्या मनांतून शाहूची मर्जी संपादावी अशी उत्कंठा झाली होती. तेव्हां या वेळीं मुद्दाम शाहूनें प्रतिनिधीस चव्हाणावर रवाना केलें, आणि त्याजबरोबर शंभुसिंग जाधव यास जाण्याचा हुकूम केला. हा शंभुसिंग जाधव, धनाजीचा मुलगा, कांहीं वर्षें भाऊ चंद्रसेन याजबरोबर निजामाकडे होता. परंतु तेथें भावाशीं बिघाड होऊन तो शाहूकडे आला. त्याजला बहुधा हीच पहिली कामगिरी शाहूनें सांगितलेली दिसते. रोजनिशीतील लेखांक ४२–४५ यांवरून कळतें कीं ही स्वारी संभाजीच्या पन्हाळे प्रांतावर शाहूनें पाठविली असून, खुद्द शाहू भिलवडीपर्यंत गेला होता. स.१७२९ ऑगस्ट पासून स. १७३०च्या ऑगस्टपर्यंत बाजीरावाला सबंद वर्ष पुणें साताऱ्याचे बाजूस शाहूनें मुद्दाम ठेवून घेतलें. संकट आल्यास त्याचें निवारण बाजीरावाशिवाय इतरांकडून होणार नाहीं हें शाहू जाणून होता. ¶

उदाजी चव्हाणानें संभाजीस हिंमत देऊन शाहू महाराजांशीं लढण्यास प्रवृत्त केलें. संभाजीनें आपल्या अष्टप्रधानांस व सरदारांस पत्रें पाठवून आपआपल्या

¶ शा. रो. १२३, ४२–४६, २१३, २१५, २१६. ४२ ची ता. १४.१.१७२९ व ४४ ची ता. ५. १. १७३०.

फौजांसह हजर होण्याची आज्ञा केली, त्याप्रमाणें फौज येऊन वारणातीरीं जमा झाली. इचलकरंजीकर व्यंकटराव घोरपडे व भगवंतराव अमात्य हेही या फौजेंत होते. पण त्यांची भक्ति अंतर्यामीं संभाजीकडे नव्हती. शाहूची तयारी होतांच त्यानें श्रीनिवासराव प्रतिनिधि यास संभाजीवर चालून जाण्याचा हुकूम केला. ' उदाजी चव्हाण शिरोळ येथें घुमटांत होते. त्यास प्रतिनिधि व शंभुसिंग जाधव यांनीं वेढा घातला. संभाजीनें शिरोळचा वेढा उठवून उदाजीस ठाण्यांतून लष्करांत आणिलें. दुसरे दिवशीं पुनः लढाई होऊन मोड झाला, तेव्हां चव्हाणासह निघून पन्हाळ्यास आले. जाधवराव व प्रतिनिधींनीं बुणगे लुटले. सडेच पळून गेले.§ प्रतिनिधीनें सर्व लष्कर लुटून फस्त केलें, आणि हजारों लोक पाडाव केले. पाडाव झालेल्यांत ताराबाई, राजसबाई, संभाजीच्या बायका, भगवंतराव अमात्य व व्यंकटराव घोरपडे हे प्रमुख होते. यांपैकीं राजसबाई व संभाजीच्या बायका यांस पन्हाळयावर पोंचवून बाकीच्या तिघांस घेऊन प्रतिनिधि साताऱ्यास आला. ताराबाईस परत पाठविण्याचा शाहूचा विचार होता, परंतु ' मला कोठें झालें तरी कैदेंतच रहावयाचें, त्या अर्थी तुम्हांजवळच राहूं ' असें तिचें म्हणणें पडल्यावरून, सातारच्या किल्ल्यावर राजवाडा होता तो दुरुस्त करून तेथें ताराबाईस ठेविलें, आणि यादो गोपाळ यास तिचा कारभार सांगितला. ताराबाई कोल्हापुरास जाती तर पुढें साताऱ्यास रामराजाची स्थापना बहुधा झाली नसती, आणि कांहीं अंशीं मराठशाहीचा इतिहास बदलला असता. भगवंतराव अमात्याचा दंड स्वतःच्या इज्जतीखातर संभाजीनें भरून त्यास सोडवून आणिलें. व्यंकटरावाचा तपासच त्यानें केला नाहीं. प्रतिनिधि त्यास बंडखोर समजून मुक्त करीना. तेव्हां बाजीरावानें दहा हजार रुपये दंड भरून प्रतिनिधीपासून त्याची सुटका केली. प्रतिनिधि व बाजीराव एकाच धन्याचे सेवक; आणि लढाईंत पाडाव झालेल्या शत्रूचा दंड एक सेवक दुसऱ्या सेवकापासून घेतो, हा राजनीतीचा मासला शाहूच्या राज्यव्यवस्थेचा निदर्शक आहे. ‡

इतकें झाल्यावर संभाजीनें युद्धाचा इरादा सोडला आणि शाहूस शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेण्याचा निश्चय केला. संभाजी कोणाचे सल्ल्यानें वागत होता तें समजत नाहीं. त्याची बायको जिजाबाई हीच बहुतेक

§ का. सं. प. या. ९; भा. व. श. पृ. ८.

‡ शा. म. ब; खरेकृत इचलकरंजी इ० पृ. ३९; खं. ६.५१ (ता. ११.३.१७३०).

कारभारीण होती. जिजाबाईच्या स्वभावाचें वर्णन रा. खरे यांनीं मार्मिकपणें केलें आहे, त्यावरून संभाजीचें राजकारण व कर्तबगारी समजण्यास मदत होईल. 'जिजाबाई अग्नीप्रमाणें प्रखर असून तिचीं शासनें निष्ठुर व कडक असत. स्वकार्य साधण्याच्या नादांत एखादा पसंत पडलेला मार्ग योग्य आहे कीं अयोग्य आहे याचा विचार ती करीत नसे. तिचा स्वभाव अत्यंत संशयी होता. आपला नाश करण्याविषयीं सर्व टपले आहेत असें तिला वाटे. कोल्हापुरच्या राज्याची स्थापना करण्याचें श्रेय जिजाबाईस आहे असें सामान्यतः म्हणण्यास हरकत नाही. या वेळेस व पुढें माधवराव पेशव्याचे वेळेस कोल्हापुरच्या राज्याचा बचाव झाला, याचें कारण जिजाबाईचें शहाणपण होय. जिजाबाईप्रमाणेंच ताराबाई दंगेखोर, खटपटी व अधिकार गाजविण्याविषयीं आतुर होती, परंतु अशा प्रयत्नांनीं आपला हेतु सिद्धीस जाईल कीं नाहीं हें ताराबाईला कळत नव्हतें. जिजाबाई तशा स्वभावाची असूनही मोठी धोरणी होती. आपलें व प्रतिपक्षाचें बलाबल ओळखून आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागून, केवळ आपलाच हेका न चालवितां प्रसंगीं पडतें घेऊन, ती आपलें कार्य साधीत असे. हें तडजोडीचें चातुर्य ताराबाईस मुळींच नव्हतें. तथापि स. १७३० च्या सुमारास कोल्हापुरचा कारभार सर्व अव्यवस्थित होता. जिजाबाईचें व दुसऱ्या कोणाचें पटत नसे. सरदारांवर व प्रधानांवर तिजकडून जुलूम होत असल्यामुळें करवीर राजमंडळांत घोटाळे व जुलूम होते. शिवाय राज्यांत जिजाबाईचें वजनही आरंभीं तिच्या अपक्व वयांत विशेष नव्हतें.' राजसबाई संभाजीची मातुश्री स. १७२६ त संभाजी निजामाकडे गेल्यावर दोन वर्षे कोल्हापुरचा कारभार करीत होती; पुढें ती संभाजीबरोबर साताऱ्यास येत असे. ती पुष्कळ काळ जगून ता. २६ एप्रिल, स. १७५१ रोजीं मरण पावली. §

जिजाबाईशिवाय कोल्हापुरचे प्रधान संभाजीचे सल्लागार होते असें म्हणतां येईल. असे प्रधान तेव्हां कोण होते व ते कशा योग्यतेचे होते हें समजेल तर त्या वेळच्या घडामोडींवर जास्त प्रकाश पडेल. स. १७२३ त तिमाजी रघुनाथ हणमंते कोल्हापुरच्या पेशवेगिरीवर होता. स. १७२७ त निजामानें चिमणाजी दामोदरास संभाजीचा पेशवा बनविलें, तो प्रकार पूर्वी येऊन गेला आहे. स. १७३० पासून नीलकंठ त्र्यंबक खासनीस प्रभु महाडकर व त्याचा भाऊ

§ पे. द. ६. १९०

केशव त्र्यंबक प्रधान असलेले आढळतात. पालखेडावर निजामाचा पाडाव होऊन संभाजी उघडा पडला आणि पन्हाळयावर परत येऊन कृष्णाजी परशुराम प्रतिनिधीचे सल्ल्यानें जम बसवूं लागला असतां शाहूनें स.१७३० चे मार्चात त्याजवर स्वारी करून पराभव केला. ता. १२ जुलै व १७ ऑक्टोबरच्या पत्रात संभाजी आंगरे व प्रतिनिधि यांस विशाळगड काबीज करण्याची शाहूची आज्ञा नमूद आहे, त्यावरून त्यापूर्वीच पन्हाळा शाहूचे हातीं पडून संभाजीला थारा राहिला नव्हता. अशा स्थितींत ता. ८ ऑगस्ट, स. १७३० रोजीं शाहूराजे दाजी यांजकडे जाऊन तहाची बोली करण्याची आज्ञा संभाजीनें प्रधान नीलकंठ त्र्यंबकास केली.

यापूर्वी उदाजी चव्हाण हा अधून मधून संभाजीचा पुरस्कार करी. अनन्यगतिकत्वामुळें संभाजी त्यास जवळ करी. पण पराक्रमाची फाजील घमेंड व मनाची धरसोड यामुळें ज्या कित्येक व्यक्ति नेहमीं कुचंबणेंत राहून फुकट गेल्या, त्यांत या उदाजी चव्हाणाची गणना करावी लागेल. शाहूची त्याची भेट बोली होऊन त्यानें बेलभंडारपूर्वक स. १७२९ चे आरंभी शाहूचा आश्रय पत्करिला. पण पुनः त्यानें आपला पहिला क्रम चालू ठेवल्यामुळें खुद्द शाहूनें त्याजवर स्वारी केली, तो प्रकार पुढें सांगण्यात येईल. †

**४ राजबंधूंची अपूर्व भेट** ( २७.२.१७३१ ).—माह्यकर्त्याचा पाडाव झाल्यामुळें संभाजीचा उपाय हरला. लवकर शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेतली नाहीं तर कठिण प्रसंग गुदरणार. शाहूनें आता सर्व बाजूंनीं उत्कृष्ट तयारी केली होती. संभाजीकडचे बहुतेक सरदार शाहूस अनुकूल झाले. शाहूनें त्याचा संतोष करून त्यांस आपल्या नोकरीत घेतलें. प्रत्यक्ष ताराबाई पूर्वीचा ताठा सोडून त्याच्याच सन्निध जाऊन राहिली. स्वतः संभाजी स्वप्रवृत्तीनें मसलत उभारून तडीस नेण्यास असमर्थ होता. दुसऱ्याच्या जिवावर त्याचे प्रयत्न चालत.¶ परंतु त्याचे साथीदार नाहीसे होण्याचें मुख्य कारण शाहूची चलती होय. शाहूचा मनमिळाऊ स्वभाव, शत्रूसमुद्धा क्षमा करून

† शा. रो. ४७, ४८, २१३; का. सं. प या. १७, १८; बा. द भा. २.१३५, १३६; रा. ख. २० ले. १८३, १८४.

¶ शा. च. पृ. ६१, ६५, ७० व खं २ पृ.६० व ७७. इ सं. पे. द. पृ. २९. खं. ६. १८७. का. सं. प. या. ९३ व ९; शा. रो. २२०, २२६, २२७, २३०, २३२; खरे भा. १ ले. ११७. पे. द. भा. २६ ३०.

आपलेसे करून घेण्याची त्याची हातोटी, लोकांस संतुष्ट ठेवण्याची त्याची कळकळ, आणि त्याच्या सरदारांचे चहूंकडे चाललेले पराक्रम, इत्यादि कारणांनीं संभाजीचें तेज अगदींच मंद झालें. 'या करवीर राज्यांत विवेक, विचार, शहाणे लोक, सभ्य, चतुर विद्यावंत कोणी नाहीत. रा. शाहूराजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षांचे लक्ष जिल्हे मामले खाऊन सुखरूप आहेत,' असे भगवंतराव अमात्याचे उद्गार आहेत. लोकांसही या आपसांतील युद्धाचा कंटाळा आला होता. दुहीचे अनर्थ पुष्कळ लोकांस कळत होते. दोनही बाजूंस समंजस व राष्ट्रहित जाणणारी मंडळी बरीच होती. दोहोंकडील मुत्सद्द्यांच्या व हितचिंतकांच्या वारंवार भेटी होत. लग्नकार्यादि प्रसंगानें पन्हाळा-सातारा यांचे दरम्यान जाणीं येणीं चालून राजकारणांतील विषयांची वाटाघाट होई. साराश, शाहू व संभाजी यांच्या प्रत्यक्ष भेटी होत नव्हत्या, तरी बाह्य दृष्टीनें दोघांचेही व्यवहार एका कुटुंबाप्रमाणें चालले होते. ताराबाई पन्हाळयास कैदेंत असतांनाही शाहूचा व तिचा पत्रव्यवहार चाले. इनाम, उत्पन्नें, सणवार इत्यादि व्यवहार त्यांस पत्रानेंच उलगडावे लागत. सारांश, अशा रीतीनें हें दोघांचे भांडण मिटण्यास अनुकूल वातावरण तयार होत गेलें.

वास्तविक उभयतांचा कांहीं तरी तह ठरवावा असा प्रयत्न अव्वलपासून म्हणजे स. १७०८ त झालेला दिसतो. अशाच मासल्याचा दुसरा एक तह ३०.१२.१७२५ चा आहे. असे ठराव वेळोवेळीं झाले असावे. राज्याचा हिस्सा संभाजीस देऊन त्याची समजूत करण्याचा विचार शाहूच्या मनांत आरंभा-पासून कायम होता. अगदीं पहिल्या तहांत उत्तरेकडील प्रदेशांत संभाजीचा हिस्सा शाहूनें ठेविला होता. संभाजीचा बंडखोरपणा वाढत गेला, तसतशा तहाच्या अटी संकुचित होत गेल्या, हें त्यांची तुलना केल्यानें दिसून येईल.‡

स. १७२९ च्या उन्हाळयांत ताराबाई शाहूकडे येऊन राहिल्यावर दोघा भावांचा तह ठरविण्याचा उपक्रम सुरू झाला. प्रत्यक्ष उपक्रम स. १७३० त संभाजीनें नीलकंठ त्र्यंबक प्रधानामार्फत करून आपल्या अटी शाहूस लिहून पाठविल्या आणि प्रतिनिधि, भगवंतराव अमात्य, ताराबाई इत्यादिकांच्या

‡ खं. ८-९९ ; शा. रो. १७२, १७३. हीं पत्रे सन १७२३ ते २६ च्या दरम्यानचीं असून त्यापुढील ले. १७४ चे पत्र शाहूनें संभाजी व ताराबाई या दोघांस ता. १३ ऑगस्ट, स. १७२८ रोजीं लिहिलेले आहे. खं. २०.२८२ ; तह व करारमदार पृ. ४३ ; का. सं. प. या. ले. १४ व कोल्हापुरचा इ. परिशिष्ट नं. ३.

मध्यस्थीनें सख्य घडून आलें व उभयतांच्या भेटी व्हाव्या असें ठरलें. खालील पत्र संभाजीनें शाहूस लिहिलें.

'तीर्थस्वरूप मातुश्री साहेबी वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभय पक्षीं निर्दोष कीर्ति व्हावी हेंच आम्हांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बाबाजी प्रभु यांसी पाठवावयाविषयीं लिहिलें होतें, तेव्हांच पाठवावे तरी त्याचे शरीरीं सावकाश नव्हते. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसी आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करतील'. § भगवंतराव अमात्याचें पत्र याच वेळी शाहूस आलें कीं, 'कोल्हापूर दरबारी क्षुद्र माणसांचा पर्वकाळ जाला आहे. यास्तव साहेबाचे पायांशीं सेवा करावी हे इच्छा धरली आहे.' बाजीरावानें त्यास लिहिलेलें पत्रही वाचण्यालायक आहे. ¶

या पत्रांत उल्लेखिलेला बाबाजी प्रभु हाच बुवाजी अथवा बोवाजी नीलकंठ प्रभु पारसनीस होय. हा चतुर व दुसऱ्यावर छाप बसविणारा असून उभय बंधूंचा स्नेह घडवून आणण्यात यानें फार श्रम केले. हा आजारी असल्यामुळे तहाचें काम थोडें लांबणीवर पडलें. बाबाजी प्रभूबरोबर शाहूनें पत्र व वस्त्रें पाठवून संभाजीचा गौरव केला, तेणेंकरून संभाजीचें अंतःकरण प्रेमानें विरघळून, त्यावर त्यानें शाहूस पाठविलेला जबाब भाषेचा व वात्सल्याचा उत्कृष्ट मासला गणला जाईल. "वडिलीं लिहिल्या गोष्टी यथार्थच आहेत वडिलांचें निर्व्याज वात्सल्य तैसेंच आहे. आम्हांसही वडिलांपेक्षा दुसरं दैवत नाही. वडील आम्हांस पितृस्थानी. आमचा सर्व प्रकारें सांभाळ करावा हेंच वडिलास विहित आणि कीर्तिरूप आहे." शाहू सुटून आला त्या वेळचें कठोर वातावरण व त्यानंतरचा स. १७३० चा हा प्रेमभाव याचा विरोध मनात येऊन मनुष्यस्वभावाची अजब रचना डोळ्यांसमोर उभी राहते, आणि हेच काय ते पूर्वीचे शत्रु असा भ्रम उत्पन्न होतो. शत्रुत्व व वात्सल्य या दोन गुणांनीं युक्त असें दुसरें उदाहरण इतिहासात नाही. शिवाय ही भेट व पुढील वारणेचा तह हीं दोन प्रेमभाव निदर्शक प्रकरणें डभईवर रक्तपाताचा संग्राम चालू असतां शाहूनें इकडे उरकलीं, यात त्याची मनःशांति व कर्तव्यनिष्ठेचा संतोष हे गुण व्यक्त होतात. ही त्याची वृत्ति अहिंसायोगाला पोषक आहे.

---

§ ऐ. प. १४, १५. ¶ बा. द. २.१८०

याप्रमाणें राज्याची अर्धी वांटणी घेण्याचा हेका सोडून व मराठी राज्यांत दुय्यम प्रतीचा धनीपणा पत्करून, शाहूमहाराजाशी कशाही प्रकारें समेट करून घेण्यास संभाजी कबूल झाला. स. १७३० च्या आश्विन-कार्तिकात साताऱ्याहून संभाजीस आणण्याकरिता फत्तेसिंग भोसले, श्रीपतराव प्रतिनिधि, नारो राम मंत्री, बाळाजी बाजीराव, भवानीशंकर मोरेश्वर, अंबाजीपंत पुरंदरे, कृष्णाजी दाभाडे, निंबाळकर व पांढरे वगैरे कित्येक नामी नामी सरदार फौजसुद्धा पन्हाळयाच्या मुक्कामी आले. सर्वांनी नजरा करून जडजवाहीर हत्ती घोडे नजर केले. उपरांत पद्धतीप्रमाणें पोपाख घेऊन मार्गशीर्ष व. ३ स ( १६.१२ १७३० ) † किल्ल्याखाली उतरले. मागाहून संभाजीची स्वारी खाली येऊन देवाळे नावली येथें मुक्काम जाहला. तेथून कूच दरकूच जाऊन वाठारावर मुक्काम केला. भगवंतराव अमात्यासही शाहूने आदरपूर्वक बोलाविले. पन्हाळयाहून कऱ्हाडास थेट दक्षिणोत्तर रस्ता येतो त्यावर पन्हाळा, नावली, वडगाव, वारणातीर, इस्लामपूर, वाठार, जखीणवाडी, कऱ्हाड ही ठिकाणे आहेत. §

जखीणवाडीच्या मैदानात भेटीची जागा मुक्रर केलेली होती. " श्रीपतराव व नारो राम मंत्री वाठाराहून पुढें उंब्रजेस गेले. सफाईची बोलणी समजाविली. शाहूने कऱ्हाडवर श्रीकृष्णेतीरीं डेरे देऊन मुक्काम करविला. जखीणवाडीपासून वाठारापावेतों उभयताकडील संपूर्ण सरदार वगैरे मिळून दोन लक्ष पावेतो जथ जाहला. उभय महाराजांच्या स्वाऱ्या हत्तीवर बसून बिछायतीवरून मोठ्या मिरवणुकीनें लोकांचे मुजरे घेत घेत भेटीच्या जागेपावेतों आले. थोडे अंतर राहिल्यावर उभयता महाराज हत्तीवरून उतरून स्वार झाले. नजीक आल्यावर उभयता घोड्यांवरून उतरले. संभाजीनें शाहूच्या पायांवर मस्तक ठेविला. शाहूनी त्यास उठवून आलिंगन दिले. उभयतांच्या प्रथम भेटी श्रीकृष्णेसानिध्ये होऊन बहुत आनंद जाहला. त्या वेळीं परस्पर सुवर्ण रौप्य वगैरे सत्के व पुष्पाची वृष्टि झाली. वाद्यें वाजलीं. तोफाची सरबत्ती झाली. फाल्गुन शुद्ध द्वितीया मंदवार शके १६५२, ता. २७ फेब्रुवारी, स. १७३१ रोजी राजश्री स्वामी कऱ्हाडास जाऊन राजश्री संभाजी राजे यांची भेट चवदावे घटकेस मध्यान्ही झाली आणि सायंकाळी माघारे कऱ्हाडास गेले. मुदपाक कऱ्हाडास केले. कऱ्हाड व जखीणवाडीमध्यें माळावर दुसरी भेट होऊन कसबे मजकुरीं श्रीकृष्णातीरावर मुक्काम केले. नंतर शाहूनें संभाजीचा

† पे. द. ११.१० § खं. ८.१११, ११२, ११६, १२१, १२३.

हात धरून उभयतां बंधु एका हत्तीवर स्वार झाले. खवासखान्यांत शंभुसिंग जाधव दोन मोर्चेलें घेऊन बसले. नंतर संपूर्ण लोकाचे मुजरे घेत स्वाऱ्या मुक्कामाच्या डेऱ्यावर आल्या, तेथें बहुत प्रकारें बोलणीं झालीं, आणि हत्ती घोडे, सुवर्णाचें सामान, जवाहीर, कोटार ऐसें शाहूनें संभाजीस दिलें. पुढें कऱ्हाडाहून उंबरजेस उभयतां महाराजांच्या सऱ्या स्वाऱ्या आल्या. तेथें मेजवान्या भोजनें झाली. साताऱ्यास शिमगी पौर्णिमा व्हावी, म्हणून ममतायुक्त आग्रहानें बोलावून साताऱ्यास घेऊन आले."

त्या समयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयता बंधूंचा समारंभ पाहून सत्के व खैरात बहुत जाहली. संभाजीचा मुक्काम साताऱ्यास पेशव्यांच्या वाड्यांत म्हणजे अदालतीच्या वाड्यात होता. दोन महिने मुक्काम झाला. चैत्र व. २, शके १६५३ ता. १३ एप्रिल, १७३१ रोजीं तह ठरला. त्यास वारणेचा तह असें म्हणतात. फाल्गुन व चैत्र दोन महिने संभाजीचा मुक्काम साताऱ्यास होता. मोटमोठ्या सरदारानीं संभाजीस मेजवान्या केल्या. शाहूनें हत्ती, घोडे, जडावाचा खंजीर, पोपाख व रोख दोन लक्ष रुपये असें देऊन रवानगी केली. बरोबर फत्तेसिग भोसले फौजेनिशीं पन्हाळयापर्यंत दिले. स्वतः शाहू चार कोस पावेतों पोंचविण्यास गेला होता. या भेटीचें वर्णन तत्कालीन स्थिति डोळयांपुढें आणून वाचलें असतां, ते भापेच्या दृष्टीनेंही बहारीचें असून, त्यावरून फ्रान्समध्यें स. १५२० त कनकवस्त्रांगणावर§ इंग्लंडचा आठवा हेन्री व फ्रान्सचा राजा फ्रॅन्सिस याची भेट झाली तिची आठवण झाल्यावाचून राहत नाहीं.

**५ वारणेचा तह,** ( १३ एप्रिल, १७३१ ).—तहाची हकीकत रा. खरे यांनी इचलकरंजीच्या इतिहासांत दिलेली मार्मिक आहे. तह चैत्र महिन्यात झाला. दोन महिने वाटाघाट चालली होती, आणि सामान्य कलमें भेटीच्या पूर्वींच उभय पक्षात ठरून गेलीं होतीं. हा तह शाहूनें संभाजीस लिहून दिलेला आहे.

'कलम (१) इलाखा वारुण महाल तहत संगम दक्षिण तीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणी व किल्ले तुम्हांस दिले असत. (२) तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर संस्थानें निम्मे आम्हांकडे ठेवून निम्मे तुम्हाकडे करार करून

§ Field of the cloth of gold.

दिलीं असत. (३) किल्ले कोपळ तुम्हांकडे दिला, त्याचा मोबदला तुम्ही रत्नागिरि आम्हांकडे दिला. (४) वडगांवचें ठाणें पाडून टाकावें. (५) तुम्हांशीं जे वैर करतील त्यांचें पारिपत्य आम्ही करावें. तुम्ही आम्ही एकविचारें राज्याभिवृद्धि करावी. (६) वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हांकडे दिलीं असत. (७) कोंकण प्रांत साळशीपलीकडे तहत पंचमहाल अंकोलेपावेतों दरोबस्त तुम्हाकडे दिले असत. (८) इकडील चाकर तुम्ही ठेवूं नये, तुम्हाकडील चाकर आम्ही ठेवूं नये. (९) मिरज प्रात विजापुर प्रांतीचीं ठाणीं देखील आथणी तासगाव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावीं. एकूण कलमें ९ करार करून तहनामा दिला असे. सदरहुप्रमाणें आम्हीं चालूं, यास अंतराय होणार नाहीं.' ‡

कलम ५ व ८ हीं दोन सामान्य व्यवस्थेचीं कलमें अमलांत आलीं, तसेंच कलम ३ ही अमलांत आलें. वारुण महाल उदाजी चव्हाणाचे ताब्यांत होता, तो त्याजपासून घेऊन शाहूनें प्रतिनिधीस दिला. प्रतिनिधीपासून पुढें तो पेशव्यांनीं घेतला, परंतु करवीरकरांस मिळाला नाहीं. कलम २ प्रमाणें तुंगभद्रेच्या पलीकडे अनेक स्वाऱ्या झाल्या, त्यांत कोल्हापुरकरांनीं भाग घेतला नाहीं, आणि खंडणीही त्यांस मिळाली नाहीं. वडगांवचें ठाणें करवीरकरांनीं पाडिलें नाहीं. कलम ६ प्रमाणें वारणेपासून तुंगभद्रेपावेतोंच्या मुलुखापैकीं जो प्रत्यक्ष संभाजीच्या ताब्यांत नव्हता तो पुढें शाहूनें व पेशव्यानें जिंकून घेतला, संभाजीस मिळाला नाहीं. कलम ७ ची हीच व्यवस्था आहे. कलम ९ तील मिरज, आथणी वगैरे ठाणीं उदाजी चव्हाणाच्या ताब्यात होतीं तीं संभाजीनें शाहूस दिलीं नाहींत, शाहू व पेशवे यांनीं पुढें जिंकून घेतलीं. कृष्णा व तुंगभद्रा यांचे दरम्यानचे प्रदेशांतील किल्ले वगैरे संभाजीचे हवालीं करण्याबद्दल शाहूनें आपल्या किल्लेदारांस पत्रें लिहिलीं. तथापि या तहानें संभाजीच्या राज्याची वाढ झाली नाहीं. पूर्वी जेवढें होतें तेवढेंच अद्यापपर्यंत राहिलें आहे. वास्तविक शाहूनें संभाजीस स्वतंत्र राज्य तोडून दिलें नाहीं. राज्याचा हिस्सा असा संभाजीस मिळाला नाहीं. मुख्य राज्याचे ताब्यांत एक प्रकारची मोठीशी स्वतंत्र जागीर

‡ का. सं. प. या. २०, २१, ता. १६.४.१७३१ व. शा. रो. १७६, ता. १३.५. १७३१.

राजघराण्यातील पुरुष समजून, संभाजीस तोडून देण्यांत आली. तेवीस वर्षांच्या युद्धात संभाजीची स्थिति सर्वथा इतकी खालावली, कीं संभाजी आपण होऊन भेटीस आला नसता तर इतकेंही त्यास मिळालें नसतें. हल्लीं ब्रिटिश राज्यांत जशीं संस्थानें आहेत, तसें मराठी राज्यांत हें एक मांडलिक संस्थान निर्माण झालें. याच वेळीं सिंदे, आगरे, होळकर इत्यादिकांचीं संस्थानें निर्माण होत होतीं; परंतु तीं स्वपराक्रमावर वाढत आल्यामुळें त्यांची सर कोल्हापुरास आली नाहीं. संभाजीला व त्याच्या वंशजांना शाहूच्या पश्चात् आलेले अधिकारी धनी-पणाचा औपचारिक मान देत गेले, परंतु त्यामुळें ना धनी ना चाकर अशी या राज्याची केविलवाणी स्थिति होऊन पेशवे-कोल्हापुरकरांचा वैरभाव मराठशाही कमकुवत करण्यास कारण झाला, त्याचें आख्यान पुढें यथावकाश येईल.

**६ दोन छत्रपतींचा हर्षामर्ष.**—ममताळु अंतःकरणाचे गुण व दोष दोनही शाहूच्या कारभारांत दिसून येतात. खासगी व्यवहारांत अशी दया शोभते, पण राजकीय व्यवहारांत त्यामुळें ढिलाई होऊन राज्याचीं कामें बिघडतात. मराठशाहीच्या कारभारास शाहूच्या अमदानींत नेट किंवा जोर आला नाहीं आणि त्याच्या अंमलास तेज चढलें नाहीं याचें एक कारण शाहूचा मृदु स्वभाव होय. संभाजीनें कितीही विरोध केला, तरी शाहूनें त्याजला कठोरपणा दाखविला नाहीं. कसा झाला तरी संभाजी आपला भाऊ, आपल्या सारखाच त्याचाही राज्यावर हक्क आहे, हें शाहू कधीं विसरला नाहीं. संभाजीनें आगळीक केल्यास त्याचा विचार आपण करूं, पण इतरांनीं संभाजीच्या वाटेस जाऊं नये, असा सक्त बंदोबस्त शाहूचा होता. चिमणाजी बल्लाळास शाहू लिहितो, 'राणोजी घोरपडे व भगवंतराव यांणीं संभाजी राजाची अमर्यादा केली. त्याचें पारिपत्य ते करीत असतां, तुम्ही आपणाकडील राऊत घोरपड्याचे मदतीस पाठविले व चिरंजिवाचे प्रांतास उपसर्ग केला, हे गोष्ट बिलकुल कार्याची नाहीं. हें उचित न केलें. पत्रदर्शनीं आपली फौज माघारी आणविणें. पर्याय न लिहितां, चिरंजिवांचे चित्तांत विपर्यास नये तो अर्थ करणें. पत्रदर्शनीं फौज बोलवा, नाहीं तर आम्ही त्यांचें साहित्य सर्वथा करूं.' यावरून संभाजीचा मान ठेवण्यास शाहू किती जपत होता हें दिसून येतें. §

§ इ. सं. ऐ. टि. १-२२. राणोजी घोरपड्याची हयात सुमारें स. १७२३-८३ ची आहे. वा. इ. वृ. १८३६ पृ. ६०. का. सं. प. या. ४३५, शा. रो. १७७, १७९, १८०, २६६; इ० इ० ले. १; स. प. पृ. २१०; मोडक कृत को० इ० वगैरे.

संभाजीच्या आयुःक्रमाचा परिणाम एकंदर [illegible] महत्त्वाचा झाला. वारणेच्या तहानें कोल्हापुरचें राज्य निर्माण झालें, तें जरी उघड उघड मांडलिकी स्वरूपाचें केवळ शाहूच्या मर्जीवर अवलंबून होतें, तरी आपण मालक आहों ही संभाजीची भावना अखेरपर्यंत कायम होती. म्हणून शाहूच्या पश्चात् पेशवे जेव्हां मुखत्यारीनें राज्याचा व्यवहार पाहूं लागले, तेव्हा कोल्हापुरकर स्वतंत्र बाण्याने वागूं लागल्यामुळें त्यांस कबजांत ठेवणें हेंच पेशव्यांना अवघड काम होऊन बसलें. तेणेकरून राज्याचा शेवटीं नाश कसा झाला हें उत्तरोत्तर व्यक्त होईल. शाहूनें मोठें औदार्य दाखवून संभाजीला स्वतंत्र राज्य तोडून दिलें, त्याबरोबर स्वतंत्र कर्तव्यही करारांत नमूद केलें. पण हें कर्तव्य पार पाडण्याची इच्छा संभाजीनें कधींच दाखविली नाहीं. शाहूच्या बरोबरीनें आपली मालकी सिद्ध करण्याची हाव धरून त्यानें आपलाच तोटा करून घेतला. संभाजीनें अष्टप्रधानांचें लोढणें आपल्या गळ्यात अडकवून शाहूशीं बरोबरी ठेविली. शाहूनें अष्टप्रधानास कामास लावून शिवाय शेकडों नवीन सरदार निर्माण केले, पराक्रमी पेशव्यांस उत्तेजन देऊन हिंदुस्थानभर राज्यविस्तार करविला, तोच प्रकार संभाजीला दक्षिण हिंदुस्थानात करतां आला असता. निदान थेट तुंगभद्रेपर्यंत त्यास आपलें राज्य वाढविता आलें असतें. त्याऐवजीं घोरपडे, शितोळे, उदाजी चव्हाण, भगवंतराव अमात्य अशा अनेक व्यक्तींच्या खासगी भांडणात तो गुरफटून गेला. त्यांस धाकात ठेवण्याचें सामर्थ्य संभाजीत नव्हतें. मुख्यतः राज्य हें करणाराचें आहे, भोगणाराचें नव्हे हें तत्त्वच संभाजीला उमगलें नाहीं.

संभाजीच्या अंगीं कर्तृत्व नव्हतें. स्वभावानें तो आळशी व विलासी असून पैशाचा लोभी असल्यामुळें लूट मिळण्याची संधि असल्याशिवाय त्यानें मुलुखगिरी कधींच अंगावर घेतली नाहीं. निजामाला त्याचा वीट आला. पैसा कांहीं आपोआप चालून येत नाहीं, उद्योगानें तो मिळवावा लागतो हें त्यानें लक्षांत ठेविलें नाहीं. व्यसनापायीं त्यानें पुष्कळ पैसा उधळिला. कारभार असा कांहीं झाला असेल तर तो आरंभीं त्याच्या मातुश्रीनें व पुढें त्याची राणी जिजाबाई हिनें आपापल्या अकलेनुरूप केला.

शाहू स्वतः कधीं संभाजीकडे कोल्हापुरास किंवा पन्हाळ्यास गेला नाहीं. पण संभाजीला त्यानें वारंवार आदरपूर्वक बोलावणीं पाठवून आपल्या भेटीस सातान्यास आणिलें आणि महाबळेश्वर, प्रतापगड, जेजुरी, शंभुमहादेव इत्यादि

ठिकाणीं नेऊन तीर्थयात्रा, शिकार, खेळ असले प्रकार मुद्दाम त्याजकरितां वारंवार करविले. स. १७३१ च्या वारणेच्या तहानंतर शाहू व संभाजी यांच्या भेटी साताऱ्यास झाल्या त्यांचे उल्लेख मिळतात ते—

(१) ता. २७ नोव्हेंबर, स. १७३२ (पे. द. ११. १५ व ३१);

(२) ता. ६ डिसेंबर, स. १७३४ (पे. द. २२.१०३). या सालीं १२ एप्रिलच्या भेटीचा उल्लेख पे. द. ३.१०६ यांत आहे.

(३) ता. १८ एप्रिल, स. १७३५ (पे. द. ११.१९, का. सं. प. या. पृ. २२३).

(४) ता. २६ एप्रिल, स. १७३६ (पे. द. ३. १८२, १९४; ११. २२, ३०; २०. १७; २२. ३२६; ३३. ३९७, ४०४ व ४०८).

(५) ता. २ जून, स. १७४० (ना. रो. १९३; का. सं. प. या. २४९) ही भेट सहा महिन्यांची महत्त्वाची झाली. बाजीराव मरण पावला, तेव्हां शाहूच्या पश्चात् संभाजीला साताराची गादी देऊन दोन छत्रपतींची दुही मिटविण्याचा प्रयत्न नानासाहेबानें केला. शाहू या योजनेस विरुद्ध असल्यामुळे संभाजीशी गुप्त करार नानासाहेबानें केला. पण ही घटना अनेक कारणांनीं घडून न आल्यामुळे मराठशाहीचा पुढील इतिहास पुष्कळ बदलला. वारणेच्या तहाप्रमाणें अंमल घडत नाहीं अशा तक्रारी संभाजीनें या भेटींत केल्या, त्यांचें निरसन शाहूनें करून दिले.

(६) स. १७४६ त संभाजी सहा महिने एप्रिल ते ऑगस्टपावेतों साताऱ्यास आला होता. ‡

वरील सर्व भेटींत शाहूनें संभाजीला आदर व अगत्य दाखवून कनिष्ठ बंधूप्रमाणें मोठ्या प्रेमानें वागविलें, यात्रा करविल्या, वस्त्रालंकार हत्ती घोडे नजर दिले. मोठमोठ्या सरदारांसह स्वतः त्यास सामोरें जाऊन व परत जाते वेळीं त्यास लांबपर्यंत पोंचवून त्याचा संतोष करण्याची शिकस्त केली. या संबंधाचे पे. द. भा. ११ चे कागद वाचनीय आहेत. पण इतके करून संभाजीनें मात्र आपला संतोष कधीं व्यक्त केला नाहीं, उलट दर खेपेस तो आपली नाराजीच दाखवीत गेला, यावरून उभयतांच्या स्वभावांतील अंतर कळून येतें. संभाजीनें चौथ्या भेटींत शाहूस कळविलें,—

‡ ता. २० ऑगस्ट स. १७४६ रोजी तो निघून परत गेला. पे. द. २६.१३, १४ च्या तारखा ३.१०.१७४६ पाहिजेत. ऐ. प. ४७ व ४९ पहा.

'आमचा आणि या स्थलाचा ( सातारा ) ऋणानुबंध ऐसा आहे की यावें तेव्हां मौरसानें यावें आणि जाते समयीं विरस होऊन जावें. हे वेळेसहित चार वेळे येणें झाले, परंतु चहूं आगमनीं जातां विरसच घडोन आले. आरंभीं आलों तेव्हा जातेसमयीं देण्याघेण्यावरून विरस जाला. दुसऱ्या आगमनी राण्या आल्या नव्हत्या म्हणून विरस जाला. तिसरे आगमनीं ताराबाईसाहेबांच्या राहण्यास्तव विरस जाला: आणि चौथे आगमनीं, घोरपड्याची समजावीस जाली नाहीं, हाही लौकिक उत्तम जाला.' घोरपड्यांचें हें प्रकरण कांहीं काळ पुष्कळ गाजलें आणि त्याचे कागद पण विस्तृत व विखुरलेले आहेत त्याचा अल्पांश येथें सांगणें विहित होईल.

घोरपडे व भोसले चुलत बंधु, एक शाखा मुधोळची व दुसरी संताजीची. संताजीनें शिवाजीच्या वेळेपासून मोठे पराक्रम करून राज्य टिकविलें. कर्नाटकीय प्रदेश घोरपडे बंधूंनी जिंकून मराठशाहीचा दक्षिणेकडे विस्तार केला. संताजीचा पुत्र पिराजी यास ताराबाईनें सेनापतिपद देऊन कापशीची जागीर दिली. स. १७२६ त संभाजी निजामास मिळाला तेव्हां घोरपडे सेनापतीस शाहूनें फितवून आपल्या बाजूस वळविलें. निदान त्यांनी संभाजीची सेवा निष्ठेनें बजावली नाहीं म्हणून त्याची या घोरपड्यांवर गैरमर्जी झाली. स. १७२८ त पिराजी लढाईत मारला गेला, तेव्हा त्याचा पुत्र राणोजी लहान होता त्यास घेऊन त्याची आजी द्वारकाबाई ( संताजीची वडील स्त्री ) संभाजीच्या जाचास त्रासून शाहूजवळ साताऱ्यास येऊन राहिली. पुढे शाहूनें संभाजीची समजूत घालून त्यास कापशीची जागीर व सेनापतिपद पूर्ववत् देवविलें, आणि राणोजी लहान म्हणून त्याचा कारभार पाहण्यास आपाजी शितोळे म्हणून वजनदार सरदार होता त्याची नेमणूक केली.

शाहूच्या पाठिंब्यामुळे हे घोरपडे संभाजीची अवज्ञा करीत ती त्याला दुःसह वाटे. वारणेच्या तहानंतर संभाजी साताऱ्यास जाई तेव्हां हें घोरपडे-प्रकरण नेहमीच उभयतांच्या असंतोषास कारण होई. पुढे राणोजी मोठा झाला आणि आपली व्यवस्था आपण पाहणार, त्यास शितोळ्यानें हरकत चालविली. संभाजीनें शितोळ्याची बाजू उचलून धरिली, तर शाहूनें घोरपड्यांचा पुरस्कार केला. अशा रीतीनें हें घोरपडे प्रकरण उभय छत्रपतींच्या हयातीस पुरलें. थोड्या बहुत फरकानें भगवंतराव अमात्याचा प्रकार संभाजीच्या

दरी असाच झाला. यांच्यासारखे अनेक सरदार शाहूकडे गाऱ्हाणीं आणीत आणि संभाजी घडीघडी शाहूच्या विरुद्ध वागे म्हणून त्याच्या सरदारांस शाहूकडून प्रोत्साहन मिळे. प्रकरण हातघाईवर येऊन चार दोन वर्षें राज्यांत नारख्या लढाया व धुमाकूळ चालला. ही सर्व हकीकत खुद्द राणोजीनें नारो राम मंत्री यास पत्र लिहून शाहूस विदित केली. शाहूनें राणोजीस आपल्या नोकरींत घेण्याचें ठरविलें तें संभाजीनें मान्य केलें नाहीं. तंटा वाढतच गेला. शाहूनें स. १७३६ च्या भेटींत त्या उभयतांचें सौरस्य करून दिलें. † भगवंतराव अमात्य व उदाजी चव्हाण यांची प्रकरणें अशींच वर्षानुवर्ष चिघळत गेलीं, यांचा येथें निर्देश करण्यासही अवकाश नाही. सेनापतीच्या बाबतींत पुढें संभाजीनें मुराररावाचा आश्रय केला, तो भाग पे. द. भा. २६ यांत विस्तृतपणें दिलेला आहे. से० राणोजी घोरपडे स. १७८३ त मरण पावला.

जिजाबाईनें सकवारबाईस लिहिलेलें एक दुर्मिळ पत्र येथें देतों.—श्री तीर्थरूप सकलसौभाग्यादिसंपन्न मातुश्रीबाई वडिलांचे सेवेसी. अपत्यें सकलसौभाग्यादिसंपन्न जिजाबाई साष्टांग दंडवत प्रणाम विनंती. अत्रत्यकुशल ताा फाल्गुन शु० ९ गुरुवासर ‡ पर्यंत वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. यानंतर वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन आनंदातें पावलों. राजश्री जगन्नाथ कचेश्वरबावा श्रीदर्शन करून हालीं वडिलांकडे आले आहेत, हे सविस्तर निवेदन करिता श्रुत होईल. वरचेवर आशीर्वादपत्र येणें; वार्तिकासमवेत पाठवून साभाळ केला पाहिजे. बहुत लिहिणें तरी वडील असा. हे विनंती.

कर्नाटकांतील तालुक्यासंबंधी लढा होता तो मिटविण्याकरितां संभाजी स. १७४६ त सहा महिने साताऱ्यास येऊन बसला होता. ही त्याची सहावी भेट होय. त्याप्रसंगी पेशव्यानें जामीन राहून तंटा मिटविला.

† पे. द. ३०.९७; ११.२९,४५; का. सं.प. या. ३ व ४३५; दळवीकृत जाधव कै० पृ. ८१; खरे–इचलकरजी इ०

‡ ता. ४ मार्च स. १७४२ संभवनीय दिसते. कदाचित् ता. ८ फेब्रु० स. १७२८ असू शकेल. पुत्र जगन्नाथ याचें नांव पत्रांत असल्यानें पहिली जास्त ग्राह्य वाटते. हें पत्र ऑक्टो० स. १९२८ च्या भारत-सेवकात रा. य. रा. गुप्ते यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे.

स. १७५४ त नानासाहेब पेशवे व सदाशिवराव यांनी कर्नाटकांत जातांना कोल्हापुरास संभाजीची भेट घेतली. या भेटींत संभाजीकडून नानासाहेबानें सदाशिवरावास प्रधानकीची वस्त्रें देवविलीं. पुनः परत येतांनाही ते कोल्हापुरास गेले आणि त्यांनी जिजाबाईस आपल्याबरोबर पुण्यास आणून तिचा सन्मान केला. एकंदरींत पेशव्यांनी संभाजीशीं प्रेमभाव राखिला होता.

संभाजीचा जन्म ता. २३ मे, स. १६९८ चा असून तो ता. २० माहे डिसेंबर. सन १७६० रोजीं टाणें वडगांव येथें ६२ वर्षांचे वयांत मरण पावला. त्यास सात बायका होत्या, त्यांत तोरगलचे शिंदे घराण्यातील जिजाबाई हीच कर्तृत्ववान होती. यांच्या पदरच्या अनेक सरदारांच्या व घराण्यांच्या व्यवहारांचा मुख्य इतिहासाशीं निकट संबंध येतो, म्हणून कोल्हापुर शाखेचा अभ्यास कसोशीने करणें अवश्य आहे.

# ७

# दाभाड्यांची उडी चुकली

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १६९८ | ऑक्टो० | १९ | खंडेराव दाभाडे यास सरपाटिलकी तळेगांवची. |
| १७१७ | जानेवारी | ११ | ,, ,, सेनापति पद. |
| १७२५ | फेब्रु० | ११ | पेटलादजवळ वसो येथें रुस्तुमअली लढाईत मृ. |
| ,, | एप्रिल | | बांडे व पिलाजी गाय० यांची लढाई खंबायत येथे. पिलाजी पराभूत. |
| ,, | ,, | | सरबुलंदखान गुजरातचा सुभेदार. |
| ,, | | | गुजरातवर चौथाई लागू करण्याचा मराठ्यांचा उद्योग. |
| १७२७ | डिसें० | १९ | सरबुलंदखानानें मराठ्यास गुजरातची चौथाई लिहून दिली. |
| ,, | जुलै | ३१ | गुजरातचा निमे मुकासा चिमाजीचा काढून शाहूनें दाभाड्यास दिला. |
| १७२९ | जुलै | ८ | कान्होजी आंग्रे मृ. |
| ,, | सेप्टें० | २७ | खंडेराव दाभाडे मृ. |
| १७३० | जानेवारी | ८ | त्रिंबकराव दाभाडे सेनापति, यशवंतराव सेनाखासखेल. |
| १७३० | फेब्रु० | | चिमाजी आपा व उदाजी पवार गुजरातेंत उतरले, पावागड काबीज केला. |
| ,, | मार्च | २३ | गुजरातचे ४४ महाल सरबुलंदखानानें पेशव्यास दिले. |
| ,, | जून | | सरबुलंदखानाची बदली, अभयसिंग गुजरातचा सुभेदार. |
| ,, | आक्टो० | ५ | कुवर बहादूर यास बाजीरावानें पोषाख दिला. |
| ,, | ,, | १० | अभयसिंगनें अहमदाबाद काबीज केलें. |

| | | | |
|---|---|---|---|
| १७३० | नोव्हें० | २५ | भावसिंग ठोके यास बाजीरावानें सरंजाम दिला. |
| ,, | डिसें० | | निजाम दाभाड्याचे मदतीस निघाला. |
| ,, | ,, | | बाजीराव सुरतेस दाखल, चिमाजी खानदेशांत. |
| १७३१ | जाने० | २९ | बाजीरावानें पवाराचे महाल जप्त केले. |
| १७३१ | मार्च १७ ते २८ | | नर्मदेवर बंगश-निजामांचें खलबत. |
| ,, | मार्च | | अहंमदाबाद येथें बाजीराव-अभयसिंगांची भेट. |
| ,, | ,, | २५ | बाजीराव सेनापतीचे रोखें परत सावळीवर दाखल. |
| ,, | एप्रिल | १ | डभईची लढाई, त्रिंबकरावाचा पाडाव व मृ. |
| ,, | ,, | ८ | निजामाची बाजीरावाशीं सुरतेजवळ लढाई. |
| ,, | मे | २९ | बाजीराव साताऱ्यास दाखल. |
| १७३२ | एप्रिल | १४ | अभयसिंगानें पिलाजी गायकवाडाचा खून करविला. |
| १७३४ | नोव्हें० | ४ | शाहूनें बाजीरावाचें दाभाड्यांशीं सख्य केलें. |

# ७

# दाभाड्यांची उडी चुकली

| | |
|---|---|
| १ दाभाड्यांची अनवस्था | २ सरबुलंदखानाचा तह |
| ३ वर्दळीचीं पूर्वचिन्हें | ४ डभईवर दाभाड्याचें कंदन |
| ५ राज्यकारभारावर परिणाम | ६ अभयसिंगाची नामुष्की |

**१ दाभाड्यांची अनवस्था.**—विषयविभागणीच्या दृष्टीनें पूर्वीच्या आवृत्तीत माळवा उत्तरहिंदकडील मराठ्यांच्या स्वाऱ्या व तत्संबंधी बाजीरावाचे उद्योग एका स्वतंत्र प्रकरणांत दाखल केले होते, पण ऐतिहासिक विवेचनाच्या संगतीस ही व्यवस्था आतां अनुचित वाटते. दक्षिण, उत्तर, पश्चिम असे पृथक विभाग पाडण्यांत इतिहासपरिपोषाची हानि होते. एका प्रकरणांतून दुसरें प्रकरण कसें निघालें हें दाखविणें इतिहासाचें मुख्य प्रयोजन आहे. पालखेडावर निजामाचा कोंडमारा झाल्याबरोबर गुजरात माळवा दिल्ली येथील राजकारणास भिन्न स्वरूप प्राप्त झालें. लगेच पेशव्यानें माळवा बुंदेलखंड हे प्रांत काबीज केले, चिमाजीनें गुजरातेंत उतरून तोही प्रांत आपल्या कबजांत आणिला, तेव्हां बादशहास भीति पडून त्यानें जयसिंगाच्या मार्फत शाहूशीं कांहीं विशिष्ट तडजोड करविण्याकरितां दीपसिंहाची वकिलात साताऱ्यास पाठविली. दरम्यान खुद्द निजामाचा जळफळाट वाढून त्यानें संभाजीस हाताशीं धरून शाहूलाच उखडून काढण्याचा पुनः प्रयत्न केला, त्या योगानें त्यानें सेनापति दाभाड्यास फितवून पेशव्याला नेस्तनाबूद करण्याचा प्रसंग आणिला. या प्रसंगाचें निरसन तितक्याच वेगानें बाजीरावानें केलें. यावरून नानाविध महत्त्वाच्या घडामोडींची साखळी एकांत एक गुंतलेली आहे. म्हणून हीं प्रकरणें उत्तरदक्षिणच्या तत्त्वावर तोडतां येणार नाहींत. यानंतर स. १७३२ त निजामानें सर्व उपाय हरलेसें पाहून बाजीरावाशीं स्नेह जोडण्याचा प्रयत्न केला. त्यांची भेट होऊन तह ठरला तरी अंतर्यामींची तेढ नष्ट झाली नाहीं. कशी होणार! बाजीरावाचा मुख्य उद्योग मराठी राज्य वाढविण्याचा आणि निजामाचा त्याचे अगदी उलट म्हणजे मराठ्यांस आळा बसवून मुसलमानांचें राज्य टिकविण्याचा, किंवा तें न साधलें तर निदान आपलें स्वतंत्र राज्य शक्य तितकें फैलावण्याचा.

या विरोधामुळें पुढील मोहिमा, स्वाऱ्या व मुत्सद्दी कावे निर्माण झाले. पोर्तुगीझ, सीदी इत्यादि परकीयास देखील पेशवे-निजामाच्या झोंबाझोंबीत तटस्थ राहता आलें नाहीं, म्हणून त्यानाही आळा घालण्याचें काम पेशव्यानाच स्वीकारावें लागलें. एवंच या निरनिराळ्या प्रकरणाचा उद्भव एकमेकांतून कसा झाला तें लक्षांत येण्यासाठीं कालानुक्रमानेंच त्यांचा निर्देश करणें सोयीचें व उपयुक्त होय. येथपावेतों बाजीरावाच्या उत्तरेकडील उद्योगाचें निरूपण केलें, त्याच्याशीच गुजरातचा प्रबंधही निगडित आहे. तो प्रथम सांगितला म्हणजे पुढील कथाभाग सुस्पष्ट होत जाईल. सबब गुजरातेंत मराठी सत्तेचा उदय कसा झाला तो प्रकार आता लक्षांत घेऊं.

मराठी राज्याच्या संकटकाळीं दाभाडे कुटुंबानें अमोलिक सेवा केल्यावरून ता. १९ ऑक्टोबर, स. १६९८ रोजीं राजाराम छत्रपतीनें खंडेरावास प्रांत जुन्नर सरकार यांतील ७९५ गांवाचें सरपाटिलकीचें म्हणजे जुन्नरपासून नीरथडीपर्यंतच्या प्रदेशाचें वतन वंशपरंपरेनें इनाम करून दिलें.¶

**वंशावळ दाभाडे सेनापति †**

**बजाजी पाटील, तळेगांव**
|
**येसजी**
|
**१ खंडेराव** — **सोमाजी §**

१ खंडेराव:
**२ त्रिंबकराव** | **३ यशवंतराव** | **बाबूराव**

३ यशवंतराव:
**४ त्रिंबकराव**

४ त्रिंबकराव:
**५ शिवराव** | **६ यशवंतराव**

**§ सोमाजी (चऱ्होलीकर) याचा वंश.**
|
**कृष्णाजी**

| | |
|---|---|
| **सोमाजी** | **खंडेराव** |
| **कृष्णाजी** | **बाबूराव** |
| **बळवंतराव** | **माधवराव** |
| **मल्हारराव** | **बळवंतराव** |

१ मृ. ता. २७.९.१७२९, स्त्री उमाबाई मृ. पुणें २८.११.१७५३
२ मृ. १.४.१७३१.
३ मृ. १८.५.१७५४, स्त्री अंबिकाबाई
४ मृ. १७६६ घुसूणेश्वरी.

† का. सं. बखर; रा. खं. ३.१६७; स. प. पृ. १७६. ¶ त्रै. व. ८ अं. ३ पृ. १२३.
§ पे. द. भा. ४४ ले. ७

उत्तरोत्तर खंडेरावाची भरभराट होत गेली. ता. ११ जानेवारी, स. १७१७ रोजीं त्यास शाहूनें सेनापतिपद देऊन गुजरातेत मोहीम करून तो प्रांत सर करण्याचा हुकूम दिला. बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांचें एकमत असून, खंडेरावानें त्यास चांगलें पाठबळ दिलें. बाळाजी विश्वनाथाबरोबर तो दिल्लीस गेला होता. महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवर राहून तो खानदेश, वऱ्हाड व गुजरात या तीन प्रांतांवर नजर ठेवीत असे. बाळापुरच्या लढाईत तो हजर होता. पुढें वयोवृद्ध झाल्यामुळें त्याचा मुलगा त्रिंबकराव व पिलाजी गायकवाड असे गुजरातेंत अंमल बसवूं लागले. 'खंडेराव दाभाडे सेनापति यांनी फौजेचा भरणा मोठा करून मुलखाचा बंदोबस्त केला. खानदेश बागलाण, कोंकण प्रांत वसईपासून सुरतपर्यंत घेतले. बडे सरदार, मातबर कामकरी, हुशार होते.' खंडेराव पांच सहा वर्षे पोटशुळाचे व्यथेनें आजारी असल्यामुळे घरात कलह व कारभारांत अव्यवस्था माजली. तिघे पुत्र व मातुश्री उमाबाई, प्रत्येकजण कारभारी असे होऊं लागले. बाजीराव पेशव्याचा वाढता पराक्रम व तेज यांबद्दल दरबारांतील जुन्या मंडळीस वैषम्य वाटूं लागलें, त्याला खंडेराव अपवाद नव्हता. बाजीरावानें योजिलेल्या कामांतून तो उत्तरोत्तर अलिप्त राहूं लागला. याबाबत शाहूस त्याची अनेकवार कानउघाडणी करावी लागली. खंडेरावाचें वय झाल्यामुळें शेवटचीं पांचसहा वर्षे सेनापतीचे तर्फेनें त्याचा मुलगा त्रिंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड हेच मुखत्यारीनें कामें करीत, त्यांचें व पेशव्याचें रहस्य कधीं जमलें नाहीं. एकमेकाविषयीं मनें कलुषित होत गेली.† तेव्हां समजुतीसाठीं पेशव्यानें खंडेरावास साताऱ्यास बोलाविलें. "बोलणें करण्यास माणसें पाठवितों, आपले विचाराविरहित आमचा विचार नाहीं; तुम्ही प्रसंगी असलेस म्हणजे आम्ही आहों; परस्परें एकमेकांचें न्यून न दाखवावें, यांतच लौकिक आहे,' असे त्यानें कळविलें. § अशा गोड भाषणांनीं तटलेलीं साहसाचीं कामें कशीं उलगडावीं ? यानंतर दोन महिन्यांनीं आश्विन व. १ शनिवार श. १६५१ ता. २७ सेप्टेंबर, स. १७२९ रोजीं खंडेराव मूतखड्याचे विकारानें मरण पावला. याच्याच तोडीचा दुसरा कर्तबगार सरदार कान्होजी आंग्रे ता. ४ जुलै, स. १७२९ या दिवशीं वारला, म्हणजे हे दोन पुरुष थोड्याच अंतरानें नाहींसे झाल्यानें बाजीरावावरील जुनें दडपण नाहींसें झालें. खंडेरावास

† शा. रो. ९५, १७४, १५७, १०५, ३३७: पे. द. ३०.५६, व इ. स. पे. द. पृ. ३३६ व ३४९. § पे. द. १२.२३.

बाजीराव 'काका' असें संबोधीत असे. खंडेरावास मुलगे तीन, त्रिंबकराव, यशवंतराव व सवाई बाबूराव. हे सर्व साताऱ्यास गेले. तेथें शाहूनें ता. ८ जानेवारी, १७३० रोजीं त्रिंबकरावास सेनापतीचीं व यशवंतरावास सेनाखासखेलीचीं वस्त्रें दिलीं. त्रिंबकराव दाभाडे पहिल्या कर्नाटक स्वारींत व कोल्हापूरचे स्वारींत स. १७३० मध्यें शाहूचे कामगिरीवर होता. दाभाडे व शिरके यांचा शरीरसंबंध शाहूनें मुद्दाम जुळवून त्या कुळास सामाजिक उच्चत्व प्राप्त करून दिलें. त्रिंबकराव शूर होता, कर्तृत्ववान होता, पण धोरणांत चुकला. सेनापतिपदाच्या ताठ्यांत त्यानें बाजीरावाशी तेढ धरली, आणि प्रकरण निकरावर आलें.

बाप मेल्याबरोबर त्रिंबकरावाचा पेशव्याशीं बेबनाव सुरू झाला. "सिकेकटार सेनापति आपले हातीं देऊं लागले तर गुजरातचा मामला दिल्याखेरीज होत नाहीं. फौज रवाना करून मुलूख पालथा घालावा म्हणजे डोळे उघडतील,"† असें चिमाजी बाजीरावास लिहितो. हा सुगावा त्रिंबकरावास लागतांच त्यानें मावळांत व कल्याण भिंवडीकडे पेशव्याच्या हद्दींत उपद्रव मांडिला, आणि निजामाकडे संधान जोडून पेशव्याला शह देण्याची खटपट आरंभिली. उलट पक्षीं उदाजी पवार व कंठाजी कदम यांनी गुजरातेंत धामधूम सुरू केली. तक्रार आली तेव्हां कदमांनी जाऊन सेनापति व त्यांच्या मातुश्रीस भेटून समजूत करावी असा निकाल चिमाजीनें लिहून पाठविला. पण या पूर्वी गुजरातेंत मराठ्यांचें राजकारण कसें बनलें होतें तो प्रकार प्रथम समजून घेतला पाहिजे.

**२ सरबुलंदखानाचा तह** ( १७२५–३० ).—अकबर बादशहानें गुजरात प्रांत जिंकून तेथें तोडरमल्ल याची सुभेदार म्हणून नेमणूक केली, तेव्हांपासून मोगल सुभेदारांची मालिका बादशाहीच्या अखेरीपर्यंत बर्गेसच्या जंत्रींत व्यवस्थित दिलेली आहे. निजाम उल्मुल्कचा बाप गाजीउद्दीन हा ४४ वा सुभेदार स. १७०८ त नेमला गेला. तो स. १७११ त मरण पावल्यावर, त्याचे जागीं अमानतखान याची नेमणूक झाली. त्याच सालीं मराठ्यांनीं गुजरातेवर स्वारी केली असतां त्यांचा मोगलांनीं अंकलेश्वर येथें पराभव केला. स. १७१२ त दाऊदखान पन्नीची नेमणूक गुजरातवर झाली, तो ४७ वा सुभेदार होय.

† पे. द. १२. ३३, ३४; १०.५८; ३०. ७१

दाऊदखान सय्यद हुसेनच्या हस्तें मारला गेल्यावर, बादशहानें गुजरातचा कारभार आपला सासरा अजितसिंग यास दिला. बाळाजी विश्वनाथ दिल्लीहून परत आल्यावर नवीन मिळालेल्या हक्कांच्या जोरावर मराठ्यांच्या फौजा निरनिराळ्या प्रांतांत संचार करूं लागल्या, त्यांत खंडेराव दाभाड्याचा हस्तक पिलाजी गायकवाड यानें स. १७१९ त सुरतेवर स्वारी करून त्या ठिकाणीं मोगल फौजेचा पराभव केला आणि सोनगड येथें कायमचें ठाणें दिलें. तेथून हळू हळू उद्योग चालवून स. १७२३ त दाभाडे व गायकवाड यांनीं गुजरात प्रांतावर चौथाईची खंडणी लागू केली. तेव्हां मराठ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें सरबुलंदखान यास काबुलाहून बदलून मुद्दाम गुजरातेंत आणिलें. सरबुलंदखान हा गुजरातचा ५३ वा सुभेदार होय. त्याचें संपूर्ण नांव मुबारीझुन्मुल्क सरबुलंदखान बहादुर दिलावरजंग असें होतें. हा हुशार व थोर घराण्यांतला असून फर्रुखसेयर बादशहाचा मामा होता. या बादशहानें त्यास प्रथम स. १७१३ त अयोध्येच्या सुभ्यावर नेमून स. १७१६ त त्याची बदली बिहारच्या सुभ्यावर केली. पुढें स. १७१८ त सय्यद बंडखोरपणा करूं लागले तेव्हां बादशहानें सरबुलंदखानास आपल्या मदतीस दिल्ली येथें आणिलें. पण बादशहाचे धरसोडीमुळें सरबुलंदच्या हातून सय्यदांना विरोध झाला नाहीं. उलट रिकामा बसून त्याची दौलत मात्र सर्व खलास झाली. स. १७१९ त बादशहानें त्यास काबूलच्या सुभ्यावर पाठविलें; तेथून पुढें स. १७२३ त बादशहानें निजामाकडून गुजरातचा सुभा काढिला, तेव्हां तेथें सरबुलंदखानाची नेमणूक त्यानें केली. तरी प्रत्यक्ष येऊन काम सुरू करण्यास त्यास दोन वर्षे लागलीं. सरबुलंदखानानें गुजरातचा कारभार स. १७२५ पासून स. १७३० पावेतों केला.

औरंगजेबाशीं युद्ध चालू असतां स. १७०२ सालीं मराठ्यांनीं गुजरातेंत प्रवेश करून सुरतेवर शह बसविला. त्यानंतर स. १७०५ सालीं बाबाप्याराचे उतारावर नर्मदा ओलांडून † त्यांनीं पलीकडच्या प्रदेशांत स्वाऱ्या आरंभिल्या. तरी बाजीराव पेशवाईवर येईपर्यंत निश्चित स्वरूपाची मुलूखगिरी सुरू झाली नव्हती. दाभाडे व त्यांचे हस्तक गायकवाड यांस शाहूनें गुजरातचें क्षेत्र नेमून

† नर्मदोत्तर भागांत प्रवेश करण्याचा मराठ्यांचा हा बावाप्याराचा उतार प्रसिद्ध होता. दक्षिणेस राजपिंपळा व उत्तरेस चांडोद यांचे दरम्यान हा नर्मदेचा उतार असून तेथून डभई बरोबर ११ मैल उत्तरेस आहे.

दिलें होतें. सरबुलंदखानास येण्यास अवकाश होता, म्हणून त्यानें आपल्या तर्फेनें मुजायतखान यास आपला दुय्यम म्हणून गुजरातचा कारभार सांगितला. परंतु निजामाच्या मनांत तो प्रांत सोडण्याचें नसल्यामुळें त्यानें आपला मामा हमीदखान यास गुजरातेंत ठेवून दिलें. याच वेळीं कंठाजी कदम बांडे हा शाहूचा दुसरा एक सरदार'तिकडे मुलूखगिरी करीत होता, त्यास कुमकेस घेऊन हमीदखानानें अहंमदाबाद नजीक मुजायतखानावर हल्ला करून त्यास ठार मारिलें. मुजायतचा भाऊ रुस्तुमअलीखान सुरतेच्या बंदोबस्तास होता, त्यास बंधूच्या मृत्यूची बातमी कळतांच त्यानें पिलाजी गायकवाडाची मदत घेऊन हमीदखानावर चाल केली. दोघा फौजांची गांठ पेटलादजवळ आडास येथें पडली, पण आपले जातभाई विरुद्ध पक्षाकडे असलेले पाहून पिलाजीनें आयत्या वेळीं रुस्तुमलीचा पक्ष सोडिला. शिवाय याच वेळी उदाजी पवार, दावलजी सोमवंशी वगैरे आणखी मराठे सरदार मोठी फौज घेऊन हमीदखानाच्या मदतीस आले. त्यामुळें ता. ११.२.१७२५ रोजी पेटलाद नजीक वसो येथें रुस्तुमली पराभव पावून मारला गेला. वास्तविक कंठाजी व पिलाजी या उभयतांचाही विचार हमीदखान व रुस्तमलीखान यांचे भांडणांत गुजरातेंत आपला अंमल कायमचा बसवावा असा होता. दोघे एकमेकांविरुद्ध वागण्याचा देखावा करून अंतर्यामीं संगनमतानें चालत. रुस्तमली मरण पावल्यावर हमीदखानानें महीच्या उत्तर प्रदेशाची चौथाई कंठाजीला आणि दक्षिण प्रदेशाची पिलाजीला कबूल करून त्यांचें साह्य मिळविलें. पिलाजीनें सोनगडास आपला पाया ठेवून तेथून मही पावेतोंच्या प्रदेशावर शह बसविला. मुसलमानांस अडचणींत गांठून चौथाई मिळविण्याची मराठ्यांची ही पद्धत पूर्वीचीच होती. ¶

हमीदखान बोलून चालून बंडखोर होता. ही बंडखोरी निजामानें बादशहाविरुद्ध चालविलेली असून महाराष्ट्रांत मुबारीजखानाबरोबर निजामाचा झगडा झाला, त्याच मतलबाचा गुजरातेंत हा झगडा हमीदखान व सरबुलंदखान यांजमध्यें चालू झाला. मराठ्यांचा कटाक्ष चौथाईचा हक्क इतर प्रांतांप्रमाणें कायमपणें गुजरातेवर बसविण्याचा असून त्या दिशेनें त्यांचे प्रयत्न चालू होते. मराठ्यांनी गुजरात प्रांत बळकाविला हें बादशहास सहन न होऊन त्यानें

¶ Bombay Gazetteer, History of Gujarat.

स. १७२५ च्या मार्चात सरबुलंदखानास मोठ्या त्वरेनें गुजरातेंत पाठविलें. या वेळी पैशाची व फौजेची तयारी सर बुलंदखानास बादशहानें दिल्लीहून भरपूर करून दिली. पन्नास लाख रोख दिले. आणखी पन्नास लाख मागाहून पाठविण्याचें कबूल केलें. हमीदखान, निजाम व त्यांचे सहायक मराठे यांस घालवून सर्व प्रांत पुनः आपल्या कब्जांत घ्यावा असा हा बादशहानें जोराचा प्रयत्न केला. सय्यदबंधूंच्या कुटुंबांतले पुष्कळसे इसम व त्यांचे साथीदार कैदेंत होते त्यांस मुक्त करून बादशहानें सरबुलंदखानाचे मदतीस दिले. पूर्वीचा सय्यदांचा हस्तक मुहकमसिंग यासही पंचहजारी बनवून त्याजबरोबर पाठविलें. परंतु सरबुलंदनें मात्र तितकी निकड दाखविली नाहीं. स. १७२५ च्या एप्रिलांत तो दिल्लीहून निघाला आणि वाटेनें अनेक ठिकाणीं मुक्काम करीत डिसेंबरांत अहंमदाबादेपुढें येऊन उतरला. ही ढिलाई मराठ्यांच्या चांगली पथ्यावर पडली.

आपली परिस्थिति जाणूनच निजामानेंही या वेळीं मराठ्यांशीं सख्य ठेविलें होतें. या संधीचा फायदा घेऊन कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड यानीं समग्र प्रांतांतून आपले हक्क चापून वसूल केले. हमीदखानास मदत करणें हें केवळ त्यांचे दाखविण्याचें कारण होतें. सरबुलंदखान येण्यापूर्वीच त्यांनीं आपला इतका जम बसवून ठेविला कीं त्यास सुद्धां मराठ्यांच्या मागण्या कबूल करण्या-शिवाय गत्यंतर राहिलें नाही. सरबुलंदखान येतोसें पाहून हमीदखानाने मात्र आपला पाय माघारा घेतला. त्यानें डिसेंबर स. १७२५ त अहंमदाबाद खानाचे हवालीं केली, परंतु इतर ठिकाणी शक्य तितका त्यास विरोध केला. सरबुलंद-खानाचा अंमल अहंमदाबादेंत बसला, तेव्हां मराठे कपडवंज येथें जमा झाले, त्यांजवर सरबुलंदखानानें मोठा तोफखाना रवाना केला, तेव्हां प्रथम सोजित्रा येथें व पुनः कपडवंज येथें पराभव पावून मराठे मागें सरत अलीमोहन ऊर्फ छोटाउदेपुर येथें आले. येथें त्यांजला शाहू छत्रपतीकडून अंताजी भास्कर ‡ नांवाचा एक नवीन सरदार ताजी फौज घेऊन मदतीस आला. ही मदत घेऊन कंठाजी वडनगरावर व पिलाजी बडोद्यावर असे चाल करून आले. कंठाजीनें वडनगर हल्ला करून धुळीस मिळविलें, आणि तेथील धनाढ्य नागर ब्राह्मणांपासून चार लाख दंड घेतला. त्या वेळीं वडनगरचीं अनेक ब्राह्मण

‡ हा कोण ? गुजरातेतील उद्योगांत इतक्या भानगडी व मोहिमा झाल्या, कीं त्यांची समग्र हकीकत देणे झाल्यास स्वतंत्र ग्रंथ लिहावा लागेल. अर्विन भा. २ पृ. १६५-१८५ व डॉ० खानकृत निजामचरित्र पहा.

कुटुंबें बचावासाठीं देशत्याग करून मथुरा व बनारस वगैरे ठिकाणीं गेली, त्यांचें वास्तव्य त्या भागीं अद्यापि दिसून येतें. हे प्रकार स. १७२६ च्या उन्हाळयांत घडले, आणि पुढील बरसातीसाठीं मराठ्यांच्या फौजा महाराष्ट्राकडे परत आल्या.

गुजरातेंतील चौथाईचा उद्योग शाहूच्या विशिष्ट योजनेंतच सिद्ध झाला होता. कर्नाटक, माळवा व गुजरात ह्या प्रांतांत मराठ्यांची मुलूखगिरी शाहूच्या आज्ञेनें एकसमयावच्छेदें चालू झाली. या वेळच्या आज्ञापत्रांत शाहूनें सरदारांस दिलेलें प्रोत्साहन व्यक्त होतें. कंठाजी कदम, कृष्णाजी दाभाडे, रघूजी कदम व पिलाजी गायकवाड यांस खालील आज्ञापत्र आहे. 'तुमचे विषयीं राजश्री सेनापति यांनी सांगितलें तें कळलें. सर्व प्रकारें तुमचें अगत्य आहे. स्वामी तुमचें ऊर्जित करणें तें करितील.' ‡

हमीदखानानें गुजरातेस कायमचा रामराम ठोकिला.$ मराठ्यांनी मात्र सरबुलंदखानाचा पिच्छा सोडिला नाहीं. पिलाजीनें लगोलग खंबायत व सुरत यांजवर चाल करून ती शहरें लुटलीं, तेव्हां त्यांच्या त्रासांतून मुक्त होण्यासाठीं खानानें आपण होऊनच चौथाईचे हक्क मराठ्यांस कबूल करून दिले. शाहूच्या एका आज्ञापत्रांत या कबुलातीचा उल्लेख दिसतो. 'प्रांत गुजरात व माळवा येथील तह रा. अंबाजी त्रिंबक, मुतालिक दिम्मत पंतप्रधान, यानीं सरबुलंदखानापाशीं चौथाई सरदेशमुखीचा तह केला आहे, तरी तुम्ही प्रांत मजकूरचा चौथाईचा आकार होईल त्यापैकीं बाबती वजा करून राहिला ऐवज मोकासबाब निम्मे चिमणाजी बल्लाळ यांजकडे व निम्मे त्रिंबकराव दाभाडे याजकडे पावावे. तरी तुम्हीं त्याप्रमाणें उपसर्ग न करणें.' असें पत्र ता. २३.४.१७२६ रोजीं कंठाजी कदम बांडे व पिलाजी गायकवाड यांस लिहिलेलें आहे. ¶

‡ शा. रो. १६० ता. २३.३.१७२६.

$ निजामानें त्यास आपल्याकडे बोलावून नादेडच्या कारभारावर नेमिले. पुढें स. १७३० त हमीदखान मरण पावला, त्यामुळें केवळ उजवा हात गेल्याप्रमाणें निजामास दुःख झालें.

¶ स. १७२५-२६ त बाजीराव कर्नाटकांत असून त्यानें पिलाजी जाधव व अंबाजी पुरंदरे यांस माळवा गुजरातच्या कामगिरीवर पाठविलें, त्यांची हकीकत पे. द. १२.२८–३० यांत पहावी. सरबुलंदखानाकडून मराठ्यांस सनदा छ ९ रजब सन जुलूसी ९ च्या [ता. १९ डिसेंबर, स. १७२७] मिळाल्या. पहा पे. द. १५ पृ. ८४–८५.

स. १७२६ चा पावसाळा पुरा होतांच कंठाजी कदम उत्तर गुजरात प्रांतांत कडी विजापुर भागावर चालून गेला. सरबुलंदखानास लढण्याची उत्कंठा नव्हतीच, आणि कंठाजीसही बिनत्रासानें आपला कार्यभाग साधेल तर हवाच होता. तेव्हां उभय पक्षांत तडजोड चालू होऊन कंठाजीनें आपला वकील सुरतसिंग याचे मार्फत चौथाईचा तह सरबुलंदखानाकडून लिहून घेतला. अहंमदाबाद शहर शिवाय करून मही नदीच्या पश्चिमेकडील सर्व भागावर चौथाई वसूल करण्याचा हक्क या तहानें कंठाजीनें मिळविला, आणि सर्व फौजदारांस तशा मतलबाचे हुकूम खानानें सुरतसिंगाच्या हवाली केले. याप्रमाणें प्रथम कंठाजीची तोड काढून मग सरबुलंदनें वढवाण येथील व काठेवाडांतील इतर जमीनदारांस वठणीस आणिलें.

सरबुलंदखानाचा हा तह कंठाजीचा त्रास तात्पुरता मिटविणारें ढोंग होतें, पण पेशवे दाभाडे यांचा कलह त्या योगानें वाढत गेला. सेनापतीस गुजरातच्या मुलुखगिरीची व बाजीरावास माळव्याचे मुलुखगिरीची, अशी वांटणी महाराजांची असतां, बाजीरावानें सेनापतीशीं बोलणें घातलें,‡ कीं "गुजरातेतील महाल तुम्ही निंमे आम्हाकडे द्यावे, व माळव्यांतील महाल आम्ही सर करूं त्यांतील निंमे तुम्हीं घ्यावे." त्यावर सेनापतींनी उत्तर केलें, कीं "महाराजांनी तुम्हांस माळव्याची मोहीम व आम्हांस गुजरातची सांगितली. तुमचा कारभार तुम्हीं करावा, आमचा आम्हीं करावा, वांटणी मागूं नये." या वाक्यांत पुढील तंट्याचें बीज आहे. शाहूनें मुलूखगिरीचे प्रांत दरएक सरदारास स्वतंत्र तोडून दिले, ही व्यवस्था पेशव्यांस मान्य झाली नाहीं. येणेंकरून मराठ्यांची एकजूट राहणार नाही, जो तो सरदार मध्यकारभारांतून निराळा पडेल आणि तेणेंकरून राज्य बलहीन होईल, या कारणास्तव सर्व ठिकाणीं मुख्य प्रधानाची देखरेख व हुकमत चालावी; सर्वांनीं पेशव्याचे आज्ञेंत चालावें; पेशवे व महाराज मिळून मध्यवर्ती सरकार होय; अशी भावना पेशव्याची होती. आणि ही व्यवस्था तडीस नेण्यासाठींच सेनापति दाभाडे, आंगरे, रघूजी व फत्तेसिंग भोसले वगैरे सरदारांशीं पेशव्यांचे झगडे झाले. वेळोवेळीं राज्याच्या व्यवस्थेसाठीं पेशव्यांना हें अनिष्ट कार्य स्वीकारणें भाग पडलें.

गुजरातेंत बांडे व पवार हे शाहूच्या तर्फे मुलूखगिरीवर असून पिलाजी गायकवाड सेनापतीचे तर्फेनें वागत होता. बांडे व पिलाजी यांजमध्यें तंटा

‡ का. सं. दाभाड्यांची हकीकत पृ. ८.

उपस्थित होऊन त्यांची स. १७२५ च्या एप्रिलांत खंबायतजवळ जोराची लढाई झाली, तींत पिलाजी पराभव पावून खेड्याकडे गेला, आणि कंठाजीनें खंबायतेंतून हजार रुपये वसूल केले. तेथें इंग्रजांची वखार होती तीतून कंठाजीनें पांच हजार रुपये मागितले.§ दोघां मराठे सरदारांमधील हा विकोप शाहूस उद्वेगकर वाटला. वास्तविक पेशवे-सेनापतींचें भांडण कदम व गायकवाड या त्यांच्या हस्तकांनीं उचललेलें होतें, आणि शाहू आपणाकडून उभयतांची तडजोड ठरवीत होता. तितक्यात उदाजी पवार यासही बाजीरावानें चौथाई वसूल करण्यासाठीं गुजरातेंत पाठविलें. त्यास पिलाजीनें विरोध केला. डभई येथें उदाजी व पिलाजी यांची लढाई होऊन तेथचा कोट उदाजीनें हस्तगत केला. त्यावर कंठाजी व पिलाजी एक होऊन उदाजीवर चालून आले. तेव्हां उदाजीनें गुजरातचा नाद सोडून माळव्यांत प्रयाण केलें. इकडे कंठाजी व पिलाजी यांनीं बडोदें व डभई येथें आपला बंदोबस्त केला. तसेंच कंठाजी कदमाचा दत्तक मुलगा कृष्णाजी यानें चांपानेर काबीज करून तेथे आपली व्यवस्था लाविली.

या वेळीं गुजरातचा निमे मोकासा चिमाजी आपाकडे होता, तो शाहूनें तां. ३१ जुलै रोजी दूर करून खंडेराव दाभाडे याजकडे बेगमीस दिला. तरी खंडेरावानें पेशव्याचे क्षेत्रांत हात घालण्यास कमी केलें नाही. निजाम-बाजीरावाचें युद्ध स. १७२८ त निकरावर आलें असतांच दाभाड्याने माळव्यावर जाऊन तेथें धामधूम उडवून खंडण्या वसूल केल्या. शाहूनें या आगळिकीबद्दल ता. २१ मे, स. १७२८ रोजी दाभाड्यास जरब दिली की, "तुम्हास माळवे प्रांती जाऊन धामधूम करून पैका घ्यावयास, मुलूख खराब करावयास गरज काय ? या उपर तुम्हीं पैका घेतला आहे तो बाजीराव पंडित यांजकडे फिराऊन देणें. या उपर माळवे प्रांतीं उपसर्ग न देणें, फिरून बोभाट येऊं न देणें" ‡ पण अशा जरबेनें कलह थांबला नाहीं.

मराठ्यांशी सामना करण्यास आपणांस पैशाची व फौजेची मदत पुरेशी नाहीं अशी सरबुलंदखानाची तक्रार बादशहाकडे सारखी चालू होती. मराठ्यांची सरशी पाहून स्वतः बादशहानेंच गुजरातेंत येण्याचा विचार केला. परंतु तो सिद्धीस गेला नाही. तरी त्यानें मोठी मदत सरबुलंदखानास पाठविली. हा

§ Father Gense's Gaikwads' Selections, Vol. 1, p.4.

‡ शा. रो. २१४

प्रकार बाजीरावास कळल्यावर त्यानें आपला वकील शामराव यास सरबुलंदखानाकडे पाठवून, दक्षिणच्या प्रमाणेंच गुजरातची चौथाई आम्हांस द्या, म्हणजे आम्ही सर्व शत्रूंचा बंदोबस्त करून बादशहाचा कारभार सुरळीत चालवूं, असें बोलणें स. १७२८ त सुरू केलें. या वेळी निजामाशीं मुंगीशेवगांवचा तह ठरत होता; आणि कंठाजी व पिलाजी हे अहंमदाबादेजवळ सरबुलंदखानापासून पराभव पावून मुलखांत लुटालूट करीत होते. पुढें दिल्लीहून मदत येणार होती ती आली नाहीं, आणि बाजीरावाच्या मागणीप्रमाणें चौथाईचे हक्क कबूल केल्याशिवाय मराठ्यांचा उपद्रव बंद होईना. सरबुलंदखानास आणखी अडचणीत गांठून गुजरात प्रांताची चौथाई कायम करून घेण्याकरितां स. १७३० च्या फेब्रुवारीत चिमाजी आपा माळव्यांतून उदाजी पवारासह गुजरातेंत आला. बासवाडा, झालोद, दाहोद या मार्गानें चिमाजी मोठ्या आवेशानें सरबुलंदखानास शह देण्यास गेला. दाहोद, चापानेर वगैरे स्थळें त्यानें कबजांत घेतलीं. एकामागून एक प्रदेश लुटीत व खंडण्या घेत, चिमाजीनें स. १७३० च्या मार्च महिन्यात पेटलादेंतून खंडणी घेऊन, धोलका शहर लुटलें; आणि सरबुलंदखानापासून चौथाईची मागणी केली. बाजीरावानेंही खानास कळविलें, कीं चौथाई सरदेशमुखीचे हक्क करार करून द्याल तरच आमच्या फौजा परत येतील. त्याजवरून सरबुलंदखानानें नाइलाजास्तव पेशव्यांचा वकील शामराव याचे मार्फत, सुरत शहर खेरीज करून, तमाम गुजरात प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीचे हक्क शाहूमहाराजांस करारानें लिहून दिले. अहंमदाबाद शहरच्या उत्पन्नावर पांच टक्केच घ्यावे असा या करारांत उल्लेख होता. हे करार दक्षिणच्या करारासारखे असून ग्रँट डफ यास पाहण्यास मिळाले होते. दक्षिण प्रांतांत हे हक्क दिल्यापासून सुव्यवस्था होऊन रयतेची आबादानी झाली, तसाच परिणाम गुजरातेंतही व्हावा, म्हणून हे हक्क मराठ्यांस लिहून दिले आहेत, असा उल्लेख आरंभी सरबुलंदखानानें त्या लेखांत केलेला आहे.

मराठ्यांनी पंचवीसशें फौज गुजरातेंत कायमची ठेवून बादशहाच्या शत्रूंचा बंदोबस्त करावा, आणि त्याजबद्दल वरील हक्क बादशहाकडून त्यांस मिळावे, असा हा करार होता. पिलाजी गायकवाड भिल्ल व कोळी लोकांस सामील करून घेऊन प्रांतास उपद्रव देईल तर त्याचा बंदोबस्त करण्याची हमी बाजीरावानें घेऊन ती या करारांत लिहून दिली होती. ता. २३ मार्च, स. १७३० चा पुढील उल्लेख आढळतो.—"सरदेशमुखीच्या अमलाविशीं गुजरात सुभ्याचीं

पत्रें सरबुलंदखान याचीं कीं गुजरातचे चवेताळीस महाल खंडेराव याजकडून तगीर करून बाजीराव यांजकडे करार केले. हिशेब प्रमाणें देत जावे."

सरबुलदखानानें मराठ्यांचा बंदोबस्त करण्याऐवजी उलट त्यांस घाबरून चौथाई सरदेशमुखी कायमच्या करार करून दिल्या, हा प्रकार बादशहा व त्याचा वजीर खानडौरान यांस पसंत पडला नाही. खानडौरानें व सरबुलंद-खानाचें वाकडें होतें. निजामाप्रमाणेंच सरबुलंदखानही स्वतंत्र होण्यासाठीं बंडखोरी करतो अशी समजूत होऊन, त्याचें पारिपत्य करण्यासाठीं बादशहानें मारवाडचा राजा अभयसिंग यास गुजरातच्या सुभ्यावर नेमून पाठविलें. या अभयसिंगाचें दिल्लींत मोठें प्रस्थ वाढून वजीरास तो तेथें नको होता. सरबुलंदचे पारिपत्यास कोण जातो असें बादशहानें विचारलें असतां भर-दरबारांत विडा उचलून अभयसिंगानें ती कामगिरी पत्करली.§ सन १७३० च्या जून महिन्यांत अभयसिंग दिल्लीहून निघाला. रस्त्यांत अजमीर येथें त्यानें जयसिंगाची भेट घेतली; आणि दोघांनी मिळून इतर मंडळी स्वतंत्र पंथास लागलेली पाहून आपणही बादशहाचा नाद सोडून आपलीं राज्यें शक्य तितकीं वाढवावीं असा बेत ठरविला. पुढें अभयसिंगानें गुजरातेंत येऊन स. १७३० च्या विजयादशमीस (१० ऑक्टोबर) अहंमदाबाद काबीज करून सरबुलंदखानास पकडून दिल्लीस पाठविलें. तेथें बादशहानें खानाची फारच विटंबना केली. तेथें तो पुढें हालअपेष्टा होऊन स. १७४२ त मरण पावला. इकडे अभयसिंगानें गुजरातेंतून चार कोटि रुपये व एक हजार तोफा इतकी लूट जोधपुरास आणिली, असें टॉड म्हणतो. हिंदुस्थानांतील द्रव्यानें केवळ मराठ्यांच्याच तोंडास पाणी सुटलें असें नाहीं; ज्यास सामर्थ्य झालें त्यानें तेंच काम त्या वेळीं केलें आहे. अभयसिंगाला तर गुजरात प्रांत जिंकण्याची अतिशय हाव होती. राजपुतांच्या या सर्व हालचाली बाजीरावास त्याच्या वकिलामार्फत कळत होत्या.

**३ वर्दळीचीं पूर्वचिन्हें.**—गुजरातचे घोटाळे, निजामाचा कहर, संभाजीवरील स्वारी अशा नानाविध विवंचनांनीं स. १७३० च्या उन्हाळ्यांत शाहूचें मन अत्यंत व्यग्र व उदास झालें. पुढील मनसुबा ठरविण्याकरितां

§ या प्रसंगाचें रसभरीत वर्णन टॉडनें केलें आहे, पु. २ पृ. ७८–८३; व अर्विन भा. २ पृ. २०५–२१५.

शाहूनें बाजीरावादि प्रमुखांस निकडीची पत्रें लिहून जवळ बोलावलें. गुजरातच्या क्षेत्रांत पेशव्यानें हस्तक्षेप केला त्यामुळें दाभाडे संतप्त झाला आणि निजामाकडे संधान करून बाजीरावाचें वर्चस्व नाहीसें करण्याच्या उद्योगास लागला. उदाजी पवारादि विरोधकांस त्यानें पेशव्याकडून काढून आपल्या पक्षांत आणिलें. इकडे याच पावसाळ्यांत दीपसिंग वगैरे वकील साताऱ्यास येऊन समजुतीच्या मार्गानें तंटे मिटविण्याची शिकस्त शाहू करीत असतांच दाभाडे व पेशवे यांची चुरस वृद्धिंगत होऊं लागली. बाजीरावानें जशास तसें वर्तन चालविलें. आवजी कवडे, भावसिंग ठोके मुदाणेकर, दलपतराव ठोके आभोणेकर बजाजी आटोळे, सिन्नरचा देशमुख कुवर बहादूर इत्यादि दाभाड्यांच्या पदरची मंडळी बाजीरावानें युक्तीनें फोडून त्यांजकरवी निजामाच्या व खुद्द उमाबाईच्या प्रदेशांत गांधील माशांसारखा असा कांही उच्छेद उडवून दिला की, भीक नको पण कुत्रा आवर अशी अवस्था दाभाड्याची झाली. "तुम्ही मोगलाईत याल तर खापर हातीं घेऊन भीक मागाल," असें बाजीरावाच्या निजामशाहींतील वकिलांनी त्या फितुरी मंडळीस खासें भविष्य दाखवून दिलें. उमाबाईचा जळफळाट वर्णन करणारीं इतकीं कांही पत्रे आहेत कीं त्या सर्वांचा संग्रह करणें शक्य नाहीं. भेदनीतीचा प्रभाव निजामानें मराठी दरबारांत चालविला, तेंच हत्यार बाजीरावानें निजामशाहीत जास्त परिणामानें वापरून दाखविलें. †

नासिक जिल्ह्यांत पेठ संस्थान आहे, तेथील जमीदार लक्षधीर दलपतराव व आभोण्याचे ठोके यांचा आप्तसंबंध होता. दाभाडे, आटोळे, ठोके वगैरे पराक्रमी कुटुंबें खानदेश बागलाणांत दीर्घकाल वावरत असल्यामुळें त्यांचें वजन त्या बाजूस विशेष होतें. या कुटुंबांस आपल्या बाजूस वळविण्याचा उद्योग पेशव्यांनीं चालविला, तो हाणून पाडण्यासाठीं स्वतः निजाम लष्कर व तोफखाना बरोबर घेऊन स. १७३० च्या अखेरीस तिकडे चालून गेला; आणि

† आभोणे व मुदाणे हीं स्थलें बागलाणांत आहेत, तालुका कलवण, (जि० नासिक) ता. २५ नोव्हेंबर, स. १७३० रोजी भावसिंग ठोके यास बाजीरावानें सरजाम दिला (पे. द. ३० पृ. ३०१). ता. ५ ऑक्टोबर, स. १७३० रोजीं कुवर बहादुरास वस्त्रें दिलीं. (पे. द. २२. ५१). हा गृहस्थ डभईच्या लढाईत जखमी होऊन पाडाव आला. भेदनीतीचा अवलंब व परिस्थिति पे. द. १०.६८, ६९, ७३, ७५, ७६, ८०, १०६ इत्यादि कागदांवरून ध्यानीं येईल.

तोफांच्या योगानें त्यानें ठिकठिकाणीं असा कांहीं प्रळय उडवून दिला, कीं लोक अत्यंत हैराण झाले. या तोफा जर पुढें निजामाकडून डभईच्या संग्रामावर वेळेवर पोंचल्या तर बाजीरावाचा निभाव लागला नसता. निजामाचा तोफखाना दाखल होण्यापूर्वींच बाजीरावानें दाभाड्याशीं गांठ घातली. प्रस्तुत निजामाचा मुख्य मतलब दाभाड्याचें संरक्षण करून बाजीरावाची सत्ता बागलाणांतून नाहींशी करावी असा होता. हा उपक्रम ध्यानांत ठेवला तरच डभईचा संग्राम व संभाजीचा पाडाव या दोन मुख्य प्रकरणांची संगति जुळते. निजामाचा हा डाव लक्षांत येतांच बाजीरावानें चिमाजी आपास खानदेशच्या बाजूस रवाना करून त्याच्या हाताखाली सिंदे होळकरास नेमून दिलें. स. १७३१ च्या मार्चांत बंगश व निजाम यांचें संगनमत झालें, तेव्हां होळकरानें त्यांस अशा युक्तीनें गुंतवून ठेविलें की गुजरातेंत ते दाभाड्याच्या मदतीस वेळेवर येऊं शकले नाहींत. आभोणेकर ठोके, पेठकर लक्षधीर इत्यादिकांचे तपशील स्वतंत्र रीतीनें जुळविणें एतत्कालीन इतिहासपरिपोष समजण्यास अत्यंत जरूर आहे. ¶

निजामाचा उच्छेद वाढूं लागला. बाजीराव-चिमाजी सावधान चित्तानें संकटनिवारणास उद्युक्त झाले, तर शाहूनें नेहमींचा गोडबोलीचा उपाय चालू केला. "दाभाड्यांनीं मुलकांत धामधूम मांडली आहे येविशीं राजश्री स्वामींस विचारता आज्ञा केली कीं दाभाड्यास पत्र लेहून माणसें पाठवून स्थितरीत पाहून आणावी म्हणजे आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. त्यावरून तपास आला की त्याची वर्तणूक आहे तैसी आहे. उत्तम रीतीनें पारिपत्य केल्याविना देहावर येणार नाहींत, त्यास पारिपत्य करावें न करावें येविसीचा विचार लिहून पाठवावा," असें ता. १४ ऑक्टोबर रोजी पुरंदऱ्यानें बाजीरावास विचारलें.§ गुजरात दाभाड्याचे हवाली करून कब्जा वारावा असें शाहूनें बाजीरावास सुचविलें. बाजीरावानें चिमाजीचा अभिप्राय विचारला. ता. १२ नोव्हेंबर, स. १७३० रोजी चिमाजीनें साफीचा जबाब कळविला कीं, "दाभाड्यांनीं कब्जा केला तर तो आम्ही सांभाळतों, त्याची फिकीर बिलकूल नाहीं. पण ते जर

¶ ठोक्याचे संदर्भ, पे. द. १०. ४०, ४३, ७६, ८४; १२. ४०; १३.५७; १७.२९; ३०.४०, ८४, ९३. कुबरबहादूरचे संदर्भ—पे. द. १२. ४२, ५०, ६०, ८४, १०४; ३०-१६५. कुवरबहादूर ता. २२ एप्रिल स. १७३६ रोजीं मरण पावला.

§ पु. द. ३. १७८.

निजामास जाऊन भेटले तर त्यांचा हुद्दा परिच्छिन्न दूर करावा. एवढी गोष्ट महाराजांपाशीं पक्की ठरवून मग दाभाड्यांना गुजरातच्या सनदा द्याव्या. "¶

शाहू व बाजीराव यांनी समजुतीचे उपाय थोडे नाही केले. मुख्यतः अंबाजी त्रिंबक, नारो राम व नारो गंगाधर अशा वजनदार माणसांस उमाबाईचे व त्रिंबकरावाचे भेटीस तळेगांवास व प्रांतांत पाठविलें. शाहू, बाजीराव, चिमाजी अशा सर्वांस एकत्र जमवून वाटाघाटीचा घोळ घालीत बसावें ही रीत दाभाड्यांची, तर त्याचे उलट वायफळ गप्पा, वचनें, लेख यापूर्वी पुष्कळ झाले, आतां आम्ही सांगूं तसे चाला, अशी वृत्ति बाजीरावानें धरून भेटीस अवकाश न देतां युद्धाची तयारी चालविली. नारो रामास तर स्वतः पोंच नव्हताच. निजामास भेटले, त्याचें म्हणणें खरें वाटावें; उमाबाईस भेटले, तिचें म्हणणें खरें वाटावें. ‡ "पुरातन जे आहे तें एक खेडें उणें न होतां आमचें आम्हांकडे देऊन सेवा घ्यावी," हें म्हणणें बाईचें. पण बाहेर पराक्रम गाजविणें ते असल्या घरच्या बोलण्यांनी सिद्धीस जात नसतात. साहसानें राष्ट्रसेवा करणें हातून घडेना, वडिलार्जित दौलत मात्र पाहिजे. नारबाला मोठी भीति काय तर चंद्रसेनाप्रमाणें दाभाडेही राज्यांतून फुटून बाहेर जातील. 'हें निमित्त तुम्ही न घ्यावें. श्रीनें तुम्हांस यश दिल्हें तें जतन करणें,' असा गुळमुळित निकाल त्यानें कळविला. उमाबाईनें [illegible] रोख ओळखला आणि मुलखांत धामधूम आरंभिली, पण बाजीरावाची कल्पकता, हिमत व साह्य-कर्त्यांची जूट विरुद्ध पक्षांत उत्पन्न झाली नाही. प्रकरण निकरावर येतेसें पाहून शाहूनें गुजरातचा मोकासा पूर्वीप्रमाणें दाभाड्यास देऊन कानउघाडणीचें पत्र गौरवून लिहिलें, "अलीकडे तुमचा मुकाम कोठें आहे, काय मनसबा योजिला आहे हें कळत नाही, तुम्ही साहेबांचे एकनिष्ठ कार्याचे हिंदुसेवक, यास्तव साहेब तुम्हावरी बहुत सदयचित्तें कृपा करीत असतां हाली चित्तांत विपर्यास आणून दुसऱ्याचा आश्रा करून, राज्यास अपाय करावा, आपले एकनिष्ठतेस बोल लावून घ्यावा यांत फायदा काय! हें तुम्हां लोकांस उत्तम नव्हे. जे विश्वासघातकी स्वामिद्रोही जाले त्यांचा परिणाम कळतच आहे. साहेबांचे राज्याचें कल्याण आणि तुमचें स्वहित जन बरें म्हणे ऐसा मनसबा करणें. दिवसेंदिवस तुमचें ऊर्जित होऊन साहेब संतोषी होत तो विचार

¶ पे. द. १२. ३९. ‡ पे. द. १२. ४२, १०४

करणें. परराज्य साधे, साहेबांचा दाब बसे, ठाणीं व जागे साध्य होत, दुष्टांस नतीजा पावे ऐसा यत्न–उपाय करणें. तुम्ही साहेबांचे विश्वासु सेवक इतबारी आहां. आपल्या थोरपणास उचित तें स्वामिकार्य करून साहेबांस संतोषवाल हा भरंवसाच आहे. आमच्या स्वराज्यात रयतेस उपद्रव लागों न देणें. कोणी दुष्ट शत्रु लबाडी करतील त्यांस शासन करणें. तुम्ही अखत्यारी सेवक म्हणवीत आहां जाणून हें पत्र तुम्हांस पाठविलें आहे. ¶

तंट्याचें मूळ कारण गुजरातचा निंमा मुकासा शाहूनें चिमाजीस दिला हें असून, दाभाड्यास संतुष्ट करण्यासाठीं ता. १५ डिसेंबर, स. १७३० रोजीं चिमाजीकडचा मुकासा काढून तो त्यानें पूर्ववत् त्रिंबकजीस दिला आणि तुम्ही प्रांतमजकुरीं दखलगिरी न करणें अशी ताकीद दिली. †

विरुद्ध पक्षाचा जोर वाढत चाललेला स्पष्ट दिसूं लागल्यावर पुढें प्रसंग हातघाईवर आल्यास तोंड देण्याची तयारी स. १७३० च्या पावसाळ्यांत करून दसरा झाल्यावर बाजीराव व चिमाजी बाहेर पडले. चिमाजी पिलाजी जाधवास घेऊन खानदेशांत निजामाच्या हालचालींवर नजर ठेवीत राहिला. स्वतः बाजीराव नासिक, पेठ, बासदा मार्गानें डिसेंबरअखेर सुरतेस आला. पिलाजी गायकवाड बडोद्यांत होता, त्यास तेथून काढून देण्याच्या इराद्यानें बाजीराव पुढें भडोचवरून बडोद्यास जाणार तों अभयसिंगानें भेटीस बोलावल्यावरून तो तसाच अहंमदाबादेस गेला. पण या पूर्वीच चिमाजीआपाला जेव्हां कळलें कीं निजाम नर्मदेकडे जातो, तेव्हां त्यानें ताडलें की हा दाभाडे. गायकवाडांच्यां साह्यास जातो. निजामानें बंगसास भेटण्यासाठीं नर्मदेकडे कूच केलें हा प्रकार चिमाजीस ठाऊक नव्हता. म्हणून निजामास अडविण्यासाठीं चिमाजी मोठ्या त्वरेनें महीच्या उत्तरेस मेमदाबाद पावेतों पोंचला. तेथें अभयसिंग होता त्याची भेट घेऊन त्यानें दोस्ती संपादिली, आणि राजपुतांची फौज व तोफखाना यांची मदत मिळविली. तेव्हांपासून दोघे बंधु एकत्रच होते.§ मात्र सिंदे, होळकर, रामचंद्र मल्हार, अंबाजी त्रिंबक इत्यादि जिव्हाळ्याची

¶ पे. द. १७. १२. हें महत्त्वाचें पत्र शाहूच्या अंतर्बहिर्वृत्तींचें व राजकारणी बुद्धीचे निदर्शक आहे. याचा आरंभ "यांस आज्ञा ऐसीजे" अशा शब्दांनीं केला आहे. संदर्भावरून ते डभईच्या प्रसंगापूर्वी त्रिंबकराव दाभाड्यास लिहिलेलें दिसते.

† पे. द. ३० पृ. २९९

§ पहा पे. द. १२.२७. पत्राची तारीख रविवार २८ फेब्रुवारी, स. १७३१ पाहिजे.

मंडळी नर्मदेच्या प्रदेशांत ठिकठिकाणचीं संधानें राखीत फाकलेली होती. अशा सर्व दूरदृष्टीचा व बुद्धिकौशल्याचा परिणाम डभईच्या समरभूमीवर दिसून आला.

एवढ्या मोठ्या भानगडीच्या प्रकरणांत व भिन्न प्रकृतींच्या कल्लोळात आगळीक कोणाची किती, गुन्हेगार कोण, गुन्ह्याचें स्वरूप काय हें आज निश्चित करणें अशक्यप्राय आहे. ज्यांनीं माळवा-बुंदेलखंडांतील बहाद्दरांस खडे चारले, ते सेनापतीपुढें हार जाणारे नव्हते. संभाजीला पुढें आणून शाहूचा पाडाव करण्याचा निजाम-दाभाड्यांचा डाव साफ हाणून पाडण्याचा निश्चय पेशवेबंधूंनीं योजिला. आपण दोघे एका धन्याचे सेवक असलों तरी, राज्याची जबाबदारी पेशव्यावर असल्यामुळें सेनापतीनें त्याचे आज्ञेत वागलें पाहिजे, आपसांत कितीही भांडूं तंडूं, पण आपसांतला तंटा तोडण्यास परस्थ निजामाची मध्यस्थी आपण चालूं देणार नाहीं, हा दंडक दाभाडे व त्याच्या पुढ्यांतले इतर विरोधक यांस शिकविण्याची तयारी त्यांनीं केली. त्यासाठीं अंतस्थ खटपटीनें त्यांनीं शत्रुपक्षाचें बळ कमी केलें. उदाजी व आनंदराव पवार विरुद्ध वागतातसें कळल्यावरून ता. २९ जानेवारी, स. १७३१ रोजीं त्यांचे मुकासे पेशव्यानें काढून घेतले. ‡

स. १७३० त संभाजीवरील मोहिम शाहूचे अंगावर असतांच निजाम-दाभाड्यांचा हा डाव स्वतंत्र चालला होता. बाजीराव व चिमाजी यांनीं माळवा व गुजरात हे मोठे प्रांत बळकाविलेले पाहून बादशहानें त्यांच्या प्रतिकारासाठीं अभयसिंगास गुजरातेवर व महमंदखान बंगाशास माळव्यावर पाठविलें. डिसेंबर १७३०त महंमदखान उज्जनजवळ आला, तेव्हां त्याजबरोबर निजामाचें कारस्थान चालू झालें. निजामानें बंगाशास कळविलें की, 'पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांचें बाजीरावाशीं वाकडें आलें असून ते मुसलमानांशीं संगनमत करण्यास तयार आहेत. आपण सर्व एक झालों म्हणजे यश येण्यास विलंब नाहीं. आम्ही लवकरच नर्मदेवर येऊन तुम्हांस भेटतों.' त्याप्रमाणें निजाम बंगशाचे भेटीस नर्मदेवर गेला. अकबरपुरच्या उतारावर ता. १७ ते ता. २८ मार्चपावेतों बारा दिवस उभयतांचें भरपूर खलबत झालें. ता. २८ रोजी बंगश परत उज्जनीस व निजाम दाभाड्याचे साह्यास सुरतेकडे निघाले.

‡ पे. द. २२.५८, व ३० पृ. ३०२.

बाजीरावाची काकदृष्टि या हालचालींवर खिळलेली असल्यामुळें त्यानें ता. १ एप्रिल रोजीं डभईच्या रणभूमीवर निजामाचा डाव हाणून पाडिला.

बाजीरावानें होळकरास निजाम-बंगशावर टेहळणी करण्यास नेमलें होतें, तें काम त्यानें उत्कृष्ट बजावलें. केव्हां समोर तर केव्हा आडरस्त्यानें येऊन स. १७३१ च्या पहिल्या तीन महिन्यांत होळकरानें बंगशास बिलकूल चैन पडूं दिलें नाहीं. मात्र निजाम सावधगिरीनें वागून बाजीरावाविरुद्ध कारस्थानें रचीत होता. कंठाजी कदम व त्याचा भाऊ रघूजी ऊर्फ सवाई कटसिंग हे बाजीरावाचे विरुद्ध वागूं लागले, त्यांस त्रिंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड अनुकूल झाले. बाजीराव निजामावर नजर ठेवीत फिरत असतां या त्रिवर्गांनी पेशव्याच्या 'खानदेशच्या भागांत धामधूम मांडिली, आणि प्रधानाचे फौजेशी कटकट सुरू केली,' याबद्दल स. १७३० च्या नोव्हेंबरांत त्या त्रिवर्ग मराठे सरदारांचा शाहूनें निषेध केला. †

निजामाशी बंगशानें गोडी करणें बादशहास इष्ट नव्हते. माळव्यांत मराठ्याचा बंदोबस्त केल्यावर मग निजामाचा पाडाव करावा, अशीच बादशहाची बंगशास आज्ञा होती. निदान उभयतांच्या भेटी होण्यापूर्वी निजामाच्या फौजेंत तरी सर्वांचा समज असा होता, की आतां निजामाचें व बंगशाचें युद्ध जुंपणार, याचे उलट जेव्हां ते दोघे नर्मदेवर भेटून गोडगोड खलबतें खेळूं लागले, तेव्हां हे दोघे बंडखोर आपणांस भारी होतील या समजुतीवर बादशहानें मराठ्यांचा निषेध केला नाही. बखरकार दाभाडे-बाजीरावाच्या कलहाची मीमांसा सांगतो ती अशी §.—

'निजामउल्मुल्कचा व बाजीरावाचा तह झाला असतांही त्याजला बाजीराव यानी आपला नाश केल्याचें स्मरण होतें. त्यानें आपलें अंग न दाखवितां, दुसऱ्याकडून सूड उगविण्याचें मनांत आणिलें. त्रिंबकराव दाभाडे त्या कामाचे उपयोगी त्यास वाटला. त्याचें व बाजीरावाचें पहिलेंच वाकडें होतें. गुजरातची चौथ व सरदेशमुखी हातांतून गेल्याचें वैषम्य वाटून दाभाडे पेशव्याशी लढण्याच्या इराद्यानें फौज वाढवूं लागला. आणि मराठमंडळांत फूट पाडून त्यानें बाजीरावाविरुद्ध कारस्थान चालविलें. ३५ हजार फौज जमा केल्यावर निजामाचें

† शा. रो. ४९, २१८; अर्व्हिन २.२५०

§ शा. रो. ५१, ५३; चिटणीस, ग्रेट डफ, शकावल्या वगैरेंची एकवाक्यता असून दाभाडे बखर पेशव्याचे विरुद्ध दिसते. खं. २ शकावलि पहा.

साह्य आपणास मिळेल असें समजून, तो दक्षिणेवर चालून येण्यास सिद्ध झाला व लोकांत असेंही प्रसिद्ध करूं लागला, की आमचा धनी मराठा याचें राज्य बाजीरावानें घेतलें तें त्याचे त्यास द्यावयास जातों. असें बोलून पिलाजी गायकवाड, कंठाजी व रघूजी कदम बांडे, उदाजी व आनंदराव पवार आणि चिमणाजी दामोदर असे मदतीस घेतले. हें वर्तमान पेशव्यास समजताच तोही फौजेसहित खानदेशांत गुजरातचे सरहद्दीवर आला. त्या वेळीं बाजीरावाजवळ दाभाड्याच्या निमेमुद्धां फौज नव्हती. दाभाडे व निजामउल्मुल्क यांच्या बेतांची सर्व माहिती बाजीरावास होती. हीं कारस्थानें बाजीरावानें शाहूस कळविली. मराठी राज्याचे दोन हिस्से करून कोल्हापुरच्या संभाजीला पुढाकार द्यावयाचा, असाही या कारस्थानाचा आशय होता, त्यामुळें शाहूलाही सेनापतीबद्दल राग उत्पन्न झाला.'

ही कारस्थानें कशी बनलीं पाहूं. सरबुलंदखानाशीं तह झाल्याबरोबर चिमाजीआपा उंब्रज येथें जाऊन ८ जुलै, स. १७३० रोजीं शाहूमहाराजांस भेटला. बहुधा बाजीरावही त्याजबरोबर होता. महिना पंधरा दिवस शाहूचीं व त्यांचीं खलबतें होऊन पुढील विचार ठरला असला पाहिजे. शाहूच्या रोजनिशीतील कागदपत्र वाचले म्हणजे सातारा व पन्हाळा या शेजारच्या टापूपलीकडील कारस्थानांचें क्षेत्र शाहूच्या दृष्टिक्षेपांत उतरलेलें बिलकूल दिसत नाहीं. थोरात, मरलष्कर, शंभुसिंग जाधव, सोमवंशी इत्यादि आजूबाजूच्या सरदारांच्या पाटिलकीचे, देशमुखीचे वगैरे अंतस्थ कलह मिटविण्यात शाहू आपल्या वजनाचा व जरबेचा उपयोग अव्याहत करी; परंतु माळवा, गुजरात, वऱ्हाड, नागपुर वगैरे ठिकाणीं त्याच्या सरदारांचे किंवा बादशाही उमरावांचे काय उद्योग चालले होते, त्यांचें स्वरूप केवढें प्रचंड होतें व त्यांचा पुढें आपल्या राज्यावर काय परिणाम होणार, याचा अंदाज शाहूचे मनात उतरलेला दिसत नाहीं.

निरनिराळया पक्षांची व प्रतिपक्षांची बातमी ठेवून पुढील धोरण ओळखून स. १७३० च्या पावसाळ्यांतच बाजीरावानें आपली तयारी गुप्त रीतीनें चालविली. सेनापति विरुद्ध वागतो अशी शाहूची खात्री झाली होती. गुजरातेत जाऊन युक्तीनें सेनापतीस महाराजांकडे घेऊन यावें, निजामाची व त्याची गाठ पडूं देऊं नये, असा बेत महाराजापाशीं ठरवून बाजीराव ऑगस्टांत पुण्यास आला; आणि तेथें पुढील स्वारीची व्यवस्था लावून ता. १०.१०.१७३० रोजीं दसऱ्यास

संगमावर डेरे देऊन चिमाजीसह मोहिमेस निघाला, तो डभईची मोहीम आटपून ता. १४ मे रोजीं परत पुण्यास आला.

निजामानें राज्यांत धुमाकूळ आरंभिला, दाभाड्याची त्याचीं कारस्थानें खेळूं लागलीं; कदम, बांडे, पवार वगैरे सरदार पेशव्याचे विरुद्ध आचरण करूं लागले; कोल्हापुरचा प्रधान चिमणाजी दामोदर सेनापतीचे कटांत सामील झाला; बंगश व निजाम यांचें संगनमत होणार; हे प्रकार सर्व लक्षांत आणून बाजीरावानें नेटानें प्रसंग पार पाडण्याचा निश्चय ठरविला. इकडे निजाम, जयसिंग व उदेपुरचा राणा यांस पोषाख पाठवून शाहू त्यांचा लोभ सांभाळीत होता. बाजीरावाचे हस्तक आवजी कवडे, अंबाजी पुरंदरे, रघुनाथजी प्रभु, आयाबा मुजूमदार, फडणीस वगैरे मंडळी ठिकठिकाणचा अंदाज काढीत बासद्याचे वाटेनें डिसेंबरांत सुरतेजवळ आली. कंठाजी कदमाची आगळीक बाजीरावानें शाहूचे कानांवर घालून त्यास आळा घालण्याची परवानगी मिळविली. ता. ६ डिसेंबरपासून जानेवारीअखेर बाजीराव सुरत, भडोच, बडोदें करीत नडियादेस आला. ता. २९ जानेवारी, स. १७३१ रोजीं त्यानें पवाराचे देशीं असलेले मुकासे काढून घेतले. ¶

पिलाजी गायकवाड बडोद्यास बंदोबस्त करून होता, त्यास तेथून हुसकून द्यावें अशी बाजीरावाची इच्छा असून, तीच इच्छा अभयसिंग सुभा अहंमदाबादेस होता, त्याचीही होती. बाजीराव जवळ आल्याचें कळताच त्यास अभयसिंगानें अहंमदाबादेस भेटीस बोलाविलें. बाजीरावालाही अभयसिंगाशी स्नेह ठेवावयाची इच्छा असल्यामुळें त्यानें फेब्रुवारींत जाऊन त्याची भेट घेतली. अहंमदाबादच्या शाहीबागेंत उभयतांची भेट होऊन ठरलें कीं पिलाजीस काढण्यांत बाजीरावानें अभयसिंगास साह्य करावें आणि अभयसिंगानें मराठ्यांस चौथाईचा हक्क पुरा करून द्यावा. उभयताचा हा करार निश्चित ठरून बाजीराव बडोद्यास वेढा घालण्याचे तयारीनें अभयसिंगाची मदत घेऊन अहंमदाबादेहून निघाला, तो ता. २५ मार्चचे सुमारें सावळीपावेतों आला. तेथें त्यास खबर कळली कीं दाभाडे, कंठाजी, पिलाजी, उदाजी हे एकत्र होऊन आपणांवर चालून येणार, आणि निजामाची फौज दाखल होतांच हल्ला करणार. अशा स्थितींत निजामाची फौज त्यांस मिळण्यापूर्वीच सेनापतीशी गांठ घालण्याचें

¶ पे. द. २२.६०, ६१, ६२, ५८; शा. रो. २१८; पे. द. ३० पृ. ३०२.

ठरवून बाजीरावानें भिलापुर-डभईचे मैदानांत सेनापतीचा तळ होता, त्याजवर ता. १ एप्रिल रोजीं अचानक हल्ला चढविला.

**४ डभईवर दाभाड्याचें कंदन** ( १ एप्रिल, १७३१ ).—'माळवा प्रांत आपल्याकडे ठेवून शिवाय हे पेशवे या ( गुजरात ) प्रातीं स्वारी करितात, हिंदुस्थान आपण ( दाभाड्यानें ) काबीज करावें तें हे करीत चालले आहेत, ऐसें चित्तीं आणोन नबाबापासून कांहीं द्रव्य घेऊन त्यास अनुकूल झाले. हे बातमी बाजीराव यांस कळली. सेनापति सरकारचे पदरचे मातबर सरदार असोन हे बुद्धि धरिली, म्हणून महाराजांस वर्तमान लिहिलें. त्यावरून महाराजांनीं आज्ञापत्र पाठविले जे, 'तुम्ही त्या मार्गे येऊन सेनापति यांस बुद्धिवाद करून समजोन सांगून येतां बरोबर घेऊन यावें. येथें उभयतांचा तह करून देऊन एकविचारें चालेल असें करतां येईल.' या आज्ञेनुसार बाजीराव समजुतीसाठीं येत असतां सेनापति चालून पुढें आडवे आले जे, तुम्ही आमचे तालुक्यांत येऊं नये, ऐसें लिहिलें. तिकडून नबाबही चालून पुढें आले. त्यावरून जलदी करून बाजीराव पुढें आले. सेनापतीची फौज चाळीस हजार. बाजीरावापाशीं पंचवीस हजार. याचा विचार कसा करावा ? या समयीं सेनापति विरोध करून नबाबाहातीं आमची फौज बुडवितात. सरकारचा बदनक्ष होतो, त्या अर्थी सेनापतीनीं विरुद्ध केल्यानें यांशीच लढाई देणें प्राप्त आलें. सरकारची आज्ञा आणविण्यास अवकाश नाहीं. म्हणोन आपले फौजेंतील धारकरी किती हे निवड केली; व त्यांचे फौजेंत किती हे बातमी आणितां, आपणापाशीं याहून अधिक माणसें कामाचीं आहेत, असें दिसून आलें.' डफ् सांगतो, पुणें सोडल्यापासून बाजीराव दाभाड्याशीं सलुखाचीं बोलणी करून प्रत्यक्ष लढाई सुरू होईपर्यंत त्याचें मन वळवीत होता. आवजी कवडे याच्या हाताखालीं बाजीरावाच्या आघाडीची तुकडी होती, तिनें नर्मदा उतरून पलीकडे जातांच दाभाड्याकडील दमाजी गायकवाडानें त्याजवर हल्ला करून त्याचा पराभव केला. हें पाहून बाजीरावास त्वेष आला; आणि स्वतःची फौज थोडी असतांही त्यानें एकदम दाभाड्यावर चाल केली. हें पाहताच कंठाजी कदम दाभाड्याचा पक्ष सोडून चालता झाला. चिटणीस पुढें लिहितो,—

'महाराजांचे पायांशीं सेनापतीनें बदनेद धरिली, तेव्हा त्यास यश कदापि यावयाचें नाहीं म्हणोन तसेच पुढें चालून आले. आम्हांस सरकारी प्रांतांत

उपद्रव करावयाचा नाहीं; नबाब फौज मुद्धां पिच्छावरी आहेत, याजकरिता त्या मार्गानें जाणार म्हणोन लिहिलें असता त्रिंबकराव सेनापति लढाईचा इरादा करून चालून आले. आपण जातीनें हत्तीवर बसून युद्धास प्रवर्तले. तीन प्रहरपर्यंत लढाई झाली. दोहींकडील नामी माणसें रणात बहुत पडली. सेनापति हत्तीवरून तिरंदाजी करतां बोटाची साले गेली. बाजीराव यांनीं धारकरी याजबरोबर जातीनें घोडा घालून तरवार केली. नामी लोक निवड करून हत्तीपर्यंत जातीनें चालून घेतले. त्रिंबकराव जातीनें अडून उभे राहिले. लोक थोडे राहिले. हत्तीवरील महात पडला असता जातीनें पायानें हत्ती चालवून तिरंदाजी केली. बाजीराव यांनीं सांडणीस्वार पाठविला, जे 'अशी लढाई शत्रूंशी करून महाराजास संतुष्ट करावें, आम्ही लढाई तहकूब करतों आणि भेटीस येतों.' परंतु वीरश्रीस पडून तसाच हत्ती पुढें चालविला. बाजीराव यांनीं आपले लोकास ताकीद केली की सेनापतीस कोणी जायां करूं नये. परंतु इतक्यात सेनापतीच्या कपाळास गोळी लागली, ठार झाले, हें पाहून बाजीराव मागें सरले. 'लूट पाठलाग करूं नये, हत्ती घोडे पाडाव झाला असेल तें सोडून द्यावें, मातबर मजला करून निघून जावें,' असें सांगून निघाले, महाराजांस वर्तमान लिहून पाठविलें; आणि महाराजांस येऊन भेटले. महाराजांनी चित्तांत आणिलें जे, 'अविवेकें करून नबाबाशी राजकारण केलें, दुर्बुद्धि धरून आगळीक करून आपणातच लढाई केली, त्याचें फळ झालें. परंतु मोठे माणूस पदरचे, व्यर्थ जायां झाले. झाली ते गोष्ट पुनः येत नाहीं. पुढें उभयतांचेंही मनास आणून करणें तसें करतां येईल,' असें म्हणून प्रधान यांस पुण्यास जावयास निरोप दिला.'

ही लढाई ता. १ एप्रिल, १७३१ रोजीं डभईनजीक भिलापुर येथें झाली. तिचें वर्णन खुद्द बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामीस § लिहिलें तें असें-' त्रिंबकराव दाभाडे, उदाजी व आनंदराव पवार, कंठाजी व रघूजी कदम आणि पिलाजी गाईकवाड व चिमणाजीपंत दादा ऐसे तीस हजार फौजेनिशीं आम्हांशीं युद्धास आले. ता. ४ सवाली युद्ध जाहलें. त्रिंबकराव दाभाडे, जावजी दाभाडे व मालोजी पवार व पिलाजी गाईकवाडाचा पुत्र असे चौघे ठार जाहले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडव जाहले. आनंदराव पवार व पिलाजी गाईकवाड व

§ ब्र. च. ले. १८८ व २६. हा ले० २६ व रा. खं. ३-३० दोनही एकच आहेत. पुढील पत्र रिंगणगावकर चिमणाजी दामोदर यांचे दप्तरांतले श्री. वि. आठल्ये यांनीं दिलें.

कुवर बहादुर जखमी होऊन पळून गेले व बांडे पळाले. फौज लुटली. हत्ती पाडाव केले. सारांश स्वामीचे आशिर्वादें फत्ते जाहली. आपणांस कळावें यास्तव लिहिलें आहे. आमचेकडील नारायणजी ढमढेरे ठार पडले, व आणखीही कितेक लोक पडले व जखमी झाले. परंतु कार्य झालें. कळलें पाहिजे."

बाजीरावानें आपला सरदार कृष्णाजी कदम मागं सुरतेकडे मदतीची फौज घेऊन होता, त्यास खालील पत्र लिहिलें, 'काल छ ५ सवाली आमचा मुक्काम डभई अलीकडे पांच कोसांवरी झाला होता, तेथें त्रिंबकराव दाभाडे, बांडे, गायकवाड, पवार, चिमणाजीपंत कुल चालून आले. त्यांची मारून शिकस्त केली. त्रिंबकराव व मालोजी पवार ठार पडले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव झाले. आनंदराव पवार, पिलाजी गायकवाड, यशवंतराव व जावजी दाभाडे, कुवरबहादर जखमी होऊन पळाले. त्रिंबकरावाचा मुरदा व पिलाजीचा जखमी लेक पाठवून दिल्हे. वरकड त्याजकडील शिपाई लोक व मोगल मारले गेले. कित्येक जखमी जाले. नारायणजी ढमढेरे मातबर मनुष्य व त्याजकडील चौघे भले माणूस व आणखीही लष्करचे लोक मातबर कामास आले. दोन्ही फौजांचे युद्ध बहुत इरेचें झालें. त्यांची फौज व सामान बहुत होतें तें तुम्हांसही ठावकेंच आहे. सारांश, धन्याचे पुण्यें यश आलें. लोकीं मेहनत बहुत केली. सुरतेस नवा किल्लेदार मुस्ताफाखान आला आहे, त्याणी पिलाजीकडील लोक मदतीस आणिले आहेत, त्याचे खबरींत राहून, त्यास ताराज करणें, म्हणजे अवघा प्रसंग निःप्रांजल होईल.' याच कृष्णाजी कदमास बाजीरावानें लिहिलेलें दुसरें पत्र आहे, त्यांत 'सेनापति व निजामउल्मुल्काची फौज ऐसी डबईस आली. आम्हीही दों कोसावरी दोन रोज मुक्काम केला. नित्य सेनापति कोसावरी येऊन युद्धास उभे राहत तेथें युद्धास न बने यास्तव डबई येथें आलों,'¶ असा आणखी जास्त मजकूर आहे, त्यावरून निजामाची प्रत्यक्ष फौज सेनापतीचे साह्यास होती व त्यांचा सरदार मोमीनयारखान लढाईत पडला असें अभयसिंगाचे पत्रांत आहे. डभई स्थळ सोयीचें पसंत करीपर्यंत बाजीरावानें सेनापतीशीं सामना केला नाही, यांत त्याचें युद्धनैपुण्य दिसतें.

डभईच्या लढाईवर एक पोवाडा मल्हारदास शाहिरानें रचलेला पाहतां त्यांतील ऐतिहासिक माहिती बहुतेक बिनचूक व विश्वसनीय दिसते. त्या

¶ पे. द. १२.४६; ऐ. टि. ३.२४.

पोवाड्याची चिकित्सा अभ्यासूंनीं पहावी. § त्रिंबकराव आश्विन शु० ८ गुरुवार ता. ८ ऑक्टोबर, स. १७३० रोजी तळेगांवाहून निघाला, इंदुरी येथें मुक्काम करून आश्विन व० १ स त्यानें वडिलांचे वर्षश्राद्ध केलें तेथून नारायणगांवावरून तो संगमनेरास गेला, तेथें तुरुकताजखानाची भेट घेतली. गीर नदीवर निजामाची भेट त्यानें घेतली. ती गीर म्हणजे गिरणा नदी मनमाडवरून उत्तरेकडे जाते, म्हणून वरील भेट चाळिसगांवाजवळ झाली असावी. मिन्नरचा देशमुख कुवर बहादूर यास निजामानें दाभाड्याचे मदतीस दिलें चिमणाजी दामोदर संभाजीचा प्रधान झाला होता, तो याच वाटेवर दाभाड्यास सामील झाला. ताहराबाद मुल्हेरवरून गुजरातेंत उतरल्यावर दाभाड्यास पिलाजी गायकवाड, पवार बंधु वगैरे सुरतेच्या बाजूस येऊन मिळाले, नंतर त्यांनी दुर्जनसिंगापासून मांडवीचा किल्ला काबीज करून जवळच शिमगी पूर्णिमा ( १२ मार्च, १७३१ ) साजरी केली. नर्मदापार होऊन कर्नाळीवर त्याचा अमावास्येचा मुक्काम झाला ( २६ मार्च ). तेथें बाजीरावाचे जासुदांनी त्यास पत्र आणून दिलें. पत्र वाचताच त्यानें लढाईचा निश्चय केला. अशी हकीकत पवाड्यांत मिळते.

'धन्याचे पुण्ये यश आले', 'स्वामीचे आशीर्वादें फत्ते जाली' या वाक्यांवरून, दाभाडे, गायकवाड, पवार, चिमणाजी दामोदर वगैरे मंडळी निजामास मिलाफी होऊन बंडखोरी करीत असून, त्यांचा बंदोबस्त करण्याविषयी बाजीरावास शाहूची आज्ञा होती हें निःसंशय दिसतें; आणि एवढ्या मोठ्या अरिष्टाचें निरसन तडकाफडकी करण्यांत बाजीरावाची चतुराई दिसून येते. या फितुरी मंडळीचें पारिपत्य करून बाजीरावानें त्यांची चूक पदरांत घातल्यावर मग पुढें त्यांजशी पूर्ववत् स्नेहभाव ठेविला आणि तेही पुढें मराठशाहीच्या उद्योगात सामील झाले. एक दाभाड्यांशिवाय या प्रसंगाचें वैमनस्य कोणाच्याही मनांत कायम राहिलें नाही, हें त्यांच्या पुढील कामगिरीवरून कळून येईल. ‡

डभईच्या लढाईसंबंधानें दाभाड्यांच्या बखरींत थोडा जास्त मजकूर आहे, तो असा–' बाजीराव एकदम डभईवर चालून आला. त्र्यंबकरावास हें वर्तमान

§ त्रै. व. १३ अ. ४, पृ. १२८

‡ चिमणाजी दामोदर व त्याचा वंश यांची पुढील हकीकत म. वि. ३ चे घराण्यांत स्वतंत्र दिली आहे.

समजतांच तोही त्याजबरोबर सामना करण्यास आला. त्याचे फौजेंत बाजीरावानें फितूर केला होता तें त्याजला माहीत नव्हतें. त्याचीं कित्येक पथकें पाण्यावर जाण्याच्या निमित्तानें जाऊन पेशव्यास मिळालीं. त्रिंबकरावाचे भाऊ यशवंतराव§ व बाबूराव मागें वीस कोसांवर होते. हुजरातीचे पांच हजार स्वारांनिशीं त्रिंबकराव लढाईस उभा राहिला. त्यास बाजीरावानें वेढा घातला. सूर्योदयापासून तिसरा प्रहरपर्यंत मोठ्या शिकस्तीनें त्रिंबकराव लढला. पेशव्यांकडील पुष्कळ लोक त्यानें मारिले. पेशव्यांची फौज एक कोस मागें हटली. फत्ते झाली म्हणोन शहाजनें वाजों लागलीं. इतक्यांत त्रिंबकरावाचे सापत्न मामा भावसिंगराव टोके पेशव्याचे फितुरात होते त्यांनीं बारगिरांस सांगून गोळी मारविली, ती त्रिंबकरावाचे कानफटीत लागून त्या योगें सायंकाळीं मृत्यु पावले. गोळी मारणारास सेनापतीचे बारगिरानें ठार मारिलें. जातीनिशी तिरंदाजी करून युद्ध केलें. ते समयीं कमातीच्या चिल्यानें बोटांची कातडी उडोन गेली. लढाई शिकस्त जाली. पिलाजी गायकवाड याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी गायकवाड कामास आला. समागमें पागा हुजरात होती ती कामास आली. लेकवळे कामास आले. शिलेदार पथकें होतीं तीं फितूर होऊन पेशवे यांशीं मिळालीं. पाणी पाजावयाचे मिसें चाळीस हजार फोज पळून गेली. सायंकाळ जाल्यानंतर पेशवे यांचे फौजेनें हत्ती सहा घटका रात्रीस मुडद्या मुद्धां लष्करांत नेला. नंतर हें वर्तमान मागें यशवंतराव सेनाखासखेल यांस सांडणीस्वार लढाई सुरू जाल्यावर रवाना जाला होता तो पोहोंचल्यावर कळलें. ते फौजेनिशीं तयार होऊन चढोन गेले. त्यांनीं युद्धप्रसंग करून मुडदा व निशाणें वगैरे नेलीं होतीं, तीं आणून त्रिंबकराव सेनापति यांस अग्न देऊन, तैसेच पंतप्रधान यांचे मागें लागले. पेशवे पुढें पळों लागले. ते पुढें, हे मागें कूच दरकूच सातारियास दाखल जाले. सेनाखासखेल व बाबूराव आले त्यांस राजश्री यांनीं आज्ञा केली कीं, तुम्हीं माझा गळा कापून ब्राह्मणास मारणें, मी अपराधी आहें. ऐसें उत्तर महाराजांचें ऐकोन उभयतां बंधु कूच करोन रुसोन तळेगांवीं आले. मागें राजश्री तयारी करून समजाविशीकरितां तळेगांवास आले, बोलण्याचालण्याची तोड पाडून, राजश्रीस मेजवानी सवाई यांचे वाड्यांत केली. तेथें मोहरा रुपयांचा चौतरा करून वर राजश्रीस बसविलें. ते समयीं राजश्रींनीं गळ्यांत पडदाळे व तरवार घालून, बाजीराव यांस हातीं धरून, उमाबाईस

§ लढाईंत होते, जखमी होऊन पळून गेले असें वरील पत्रांत आहे.

बोलावून आणून, पडदाळयांतील तरवार काढोन बाईपुढें ठेविली व बाजीराव याजला पायांवर घातलें, आणि बोलले की, तूं आपले हातें याचा गळा काप. नंतर समजूत पटली. परस्परें बहुमान दिल्हे. नंतर राजश्री यांनी कृपा करोन यशवंतराव दाभाडे यांस सेनापतीचें पद दिधलें व सवाईबाबूराव दाभाडे यास सेनाखासखेलचें पद दिधलें. नंतर महाराज साताऱ्यास गेले. ‡

डभई येथें मोठ्या शिकस्तीचें लढणें होऊन सेनापति पडल्यामुळें बाजीरावास जय मिळाला तरी त्याची परिस्थिति बिकटच होती. 'बाजीराव बावापिराच्या घाटें नर्मदा उतरोन अलीकडे आले. त्यांच्या मागें दाभाड्यांच्या फौजा आहेत; व पुढें यांच्या सा गावच्या अंतऱ्यानें किलीजखान व बंगश आहेत. यांचा हर्षामर्ष होणार आहे. उदाजी पवार व चिमणाजी दामोदर या उभयतांस वस्त्रे व हत्ती देऊन सोडिलें. हें वर्तमान महाराजांस बाजीरावांचे कागद जेजुरीच्या मुक्कामीं आले त्यावरून लिहिलें आहे.' 'प्रधानपंत रेवा उतरोन अंकलेश्वरावर आले हें वर्तमान आज ( म्हणजे २८.४.१७३१ रोजीं) आलें.' दाभाड्याचा चुलतभाऊ कृष्णाजी लिहितो, 'सेनापतीस युद्धीं जखमा लागोन देवाज्ञा जाल्यावरी महाराज स्वामी व समस्त सरदार कुल तळेगांवास जाऊन मातुश्री उमाबाईचें बहुत प्रकारें समाधान करून मातुश्रीस फौजेसहवर्तमान साताऱ्यास घेऊन आले. मनोदयानुरूप कारभार होऊन, अविलंबें निरोप घेऊन, माघारे तळेगांवास जाऊं.' हें ता. १५.५.१७३१ चें साताऱ्याहून लिहिलेलें आहे. §

या प्रकरणासंबंधानें निजामानें अब्दुन्नबीखान यास लिहिलेलें एक फारसी पत्र सर जदुनाथांनी मिळविलें, त्याचा इंग्रजी तर्जुमा पाहतां, त्यांत निजामाचे हेतु व हालचाली थोड्या वेगळया दिलेल्या आढळतात. बाजीरावाची भरपूर निंदा करून या पत्रांत निजाम अशी बढाई मारतो, कीं गुजरात व माळवा हे दोन सुभे मराठ्यांच्या ताब्यांतून मी सोडविले आणि सुरत बंदर, जें मक्केच्या पवित्र यात्रेचें व पर्यायानें अल्लाच्या दर्शनाचें द्वार तें मी मराठ्यांच्या

‡ दावलजी सोमवंशी सरलष्कर युद्धात नव्हता. त्याने ता. २० जून रोजी पत्र पाठवून पेशव्यांचें अभिनंदन केलें. (खं. ३.१६७. व पे. द. ३०.८२.)

§ ब्र. च. ३५२ व १८८.

कबजांतून हिसकून घेतलें.' ह्या बढाईच्या बाता किती खऱ्या आहेत तें पुढील इतिहासच सांगतो निजामाचें हें सगळें लांब पत्र देण्याची जरूर नाही. तो म्हणतो, 'बडोद्यास बाजीरावानें वेढा घातलेला ऐकून मी नर्मदा उतरून उत्तर कांठानें अलीमोहनपर्यंत चालून गेलों. ही बातमी येताच बाजीराव बडोद्याहून घाबऱ्या घाबऱ्या रातोरात पळून नर्मदापार होऊन दक्षिणेंत येऊं लागला. वाटेंत त्यानें अंकलेश्वर परगणा व जवळचा मुलूख लुटून फस्त केला. बाजीरावाचा पाठलाग करतां यावा म्हणून मी अकबरपुरावरूनच तोफा व जड सामान सर्व बऱ्हाणपुरास पाठवून दिलें आणि बाजीराव परत फिरल्याचें ऐकून मी त्वरा करून नंदुरबारवर आलों. तेथें आणखी भारी सामान होतें तें ठेवून मी लांब मजलांनी सुरतेजवळ आलों. रस्त्यांत मला मराठ्यांची फौज आढळली. आम्ही आल्याचें ऐकून ते आपलें सामान टाकून घाईघाईनें पळून गेले. पळतांना पुष्कळसे नदींत बुडून मेले, कित्येकांना आमच्या लोकांनीं कापून काढिलें. नंतर मराठे पळून दमणकडील जंगलांत गडप झाले, असें पाहून मी त्यांस अडविण्यासाठीं परत बागलाणकडे आलों. अशा रीतीनें मी माळवा, गुजरात व सुरत यांचा बचाव केला. परमेश्वरानें माझी सेवा रुजू करून घेतली.'

डभईवर जय मिळाल्यावरही बाजीरावास निजामाची धास्ती होतीच. त्यास चुकविण्यासाठी तो डभईहून परत निघाला तो नैर्ऋत्य बाजूनें बाबापीरावर नर्मदा ओलांडून अंकलेश्वरास दाखल झाला. तेथून पुढें जातांना वाटेंत कोठें तरी सुरतेच्या बाजूस निजामानें कांहीं मराठे सैनिकांस गांठलें. ही चकमक ता. ८ एप्रिलचे सुमारास झाली.§ ता. २९ मेपासून ता. ९ डिसेंबरपावेतों बाजीरावाचा मुक्काम साताऱ्यास होता.

बाजीरावानें डभईवर सेनापतीस ठार मारिलें असा गहजब दक्षिणेंत उडाला. उमाबाईनें अकांडतांडव केलें, त्यावरून खुद्द शाहूनें तळेगांवास जाऊन उमाबाईस समजुतीसाठीं साताऱ्यास आणिलें. चहूंकडे या प्रकरणाची चर्चा चालू झाली. 'मारत्याची सर्व पृथ्वी आहे', असें ब्रह्मेन्द्रस्वामीनें

§ ऐ. १५ पृ. २९; अर्व्हिन; पे. द. १०.३४; ३०. ३१८, ब्र. ले. ३५२, ३५९

सेखोजी आंगऱ्यास लिहिलें, त्यावर सेखोजीनें जबाब कळविला, 'त्रिंबकराव निधन पावले ही गोष्ट भावी अनर्थानुरूप झाली. राजश्री सामादिक सहवर्तमान तळेगांवास उमाबाईचे समाधानास गेले. मातुश्रीस बरोबर साताऱ्यास नेली. बाजीरावाचा पिच्छा निजामानें केला. हे लांबलाब मजला करून मिळून पुण्यास आले. राजदर्शनास जातील.' पुढें दिलसफाईचे प्रयत्न चालले, त्यांचीं निरनिराळीं वर्णनें उपलब्ध आहेत. होऊन गेलेला प्रकार बदलत नाही, पुढें सेनापतीच्या कुटुंबाचा सन्मान यथायोग्य राहावा अशी तजवीज शाहूनें केली. तथापि खरी दिलसफाई कधीच घडून आली नाहीं. उमाबाई व तिचे पुत्र यांनी निजामाकडे संधानें बांधिली; सरकारचे हुकूम मानले नाहींत; ते हिशेब देईनात, चाकरी करीनात; असा प्रकार झाल्यामुळें शाहूही उमाबाईवर चिडून गेला. त्यानें बाजीरावास लिहून हुकूम पाठविला कीं कळेल त्या रीतीनें उमाबाईकडे जाऊन तिला महाराजांचे भेटीस आणावें. प्रसंगानुरूप जबरदस्ती करूनही आणावी. ता. २८ मे, स. १७३४ चे हें पत्र अभ्यसनीय आहे. "ता. ४ नोव्हेंबर, स. १७३४ रोजीं प्रधानपंत व सेनापति यांचें सख्य साताऱ्यास केलें." पुढील जानेवारीत बाजीराव तळेगांवास गेल्याचा उल्लेख आढळतो. ‡

**५ राज्यकारभारावर परिणाम.**—एकाच राजछत्राखाली नांदणारे दोन सरदार आपसांत लढले आणि पेशव्याकडून सेनापति मारला गेला हा प्रकार कोणासच योग्य वाटला नाही. तथापि सर्व अन्याय बाजीरावाचाच होता असें मात्र कोणी मानले नाहीं. सेनापतीला कृतकर्माचे प्रायश्चित्त मिळालें असाच अभिप्राय सामान्यतः प्रगट झालेला आढळतो. निजामास सामील होऊन सेनापतीनें राजद्रोह आरंभिला. बाजीरावानें त्याचा बंदोबस्त केला नसता तर पुनः मराठी राज्यास अपाय होण्याची पाळी आली असती. अगदीं निकरावर आलें तेव्हांच शाहूनें बाजीरावास सेनापतीचा बंडावा मोडण्याची आज्ञा केली. चंद्रसेनाचा पूर्वीचा प्रकार आतां दाभाड्यानें करूं नये अशी तजवीज शाहूला करणें भाग पडलें. तथापि सेनापति बळवान होता, हें ओळखून बाजीराव व चिमाजी यांनीं सावधगिरीनें डाव खेळून त्यास गोत्यांत

‡ पे. द. १२. ६५, शा. रो. ११०; रा. खं. ६. ७९; खं. ३. २४९; अर्व्हिन २ पृ. २५२ इ०

आणिलें. सेनापतीस ठार मारावें अशी इच्छा बाजीरावाची असण्याचें कारण नाहीं. सोयीनें तो शाहूच्या भेटीस गेला असता, किंवा कैद झाला असता तर बाजीरावाचें काम भागलें असतें. पण त्रिंबकराव बाणेदार असून थोडासा गैरसावध राहिला म्हणून फसला. खुद्द बाजीराव व चिमाजी चालून येतातसें पाहून सेनापतीचे कित्येक साथीदार त्यास सोडून गेले. पुढें शाहूनें उदार अंतःकरणानें वागून राज्याचे हिताचे दृष्टीनें प्रकरण मिटविलें. इकडे दाभाडे प्रकरण चालू असतांच शाहूनें संभाजीस भेटास आणून वारणेचा तह घडविला, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

स. १७३१ च्या पावसाळयांत सातारा येथें दाभाडे प्रकरणाची वाटाघाट झाली. उमाबाईची समजूत करण्याकरितां शाहू मुद्दाम तळेगांवास गेला. रस्त्यात श्रीशंभुमहादेव व जेजुरी येथें देवदर्शन करून त्यानें सेनापतीच्या वधाचें लौकिक रीत्या थोडेंसे पापक्षालन केलें. बाजीरावास व चिमाजीआप्पास उमाबाईचे पायांवर घालून तिच्याकडून त्यांस क्षमा करविली. माळवा व गुजरात यांची हद्द ठरवून निम्मे स्वराज्याचा ऐवज पेशव्यांचे मार्फत सरकारांत द्यावा, आणि बाकीच्या अर्ध्यांत फौजेचा व आपला खर्च भागवावा, सर्व व्यवहारांचा हिशेब वेळच्या वेळी सरकारांत द्यावा, जातीचे खर्चाची नेमणूक करून नजराणा येईल तो हुजूर द्यावा, असा उभयतांचा तह करून दिला. त्रिंबकरावाचा भाऊ यशवंतराव यास सेनापतीचीं वस्त्रें दिलीं आणि दुसरा भाऊ बाबूराव यास सेनाखासखेल हें पद व पिलाजीस दाभाड्याचा कारभारी नेमून उभयतांनी उमाबाईचे आज्ञेत चालावें असें ठरवून दिलें. ता. १५. १.१७३७ च्या पत्रांत खालील मजकूर आहे.–'उमाबाई व प्रधान यांची गोडी झाली. ते पुणेस आली. हेही तळेगांवास गेले. बहुत उचित झालें.'† परंतु ही गोडी टिकली नाही. उमाबाई व दाभाडे पुढें मराठ्यांच्या राज्योद्योगांत भाग घेईनातसे झाले असें शाहू रोजनिशी ले. ६८ वरून दिसून येतें.

वरील सेनापतीचा ठराव विशेष स्मरणीय आहे. उमाबाईच्या समजुतीसाठीं गुजरातच्या उद्योगांत पेशव्यानें हात घालूं नये असें जरी शाहूनें ठरवून दिलें, तरी सेनापतीनें पेशव्याचे ताब्यांत राहिलें पाहिजे, त्यास सर्व हिशेब दिला

† ऐ. स. सा. २ ले. २२१.

पाहिजे, एकंदर प्राप्तीचा ठरीव अंश सरकारांत भरला पाहिजे, हें तत्त्व शाहूनें अंमलांत आणिलें. याचा अर्थ असा झाला, की उत्पन्नाचा हिस्सा सरकारात न दिला किंवा हिशेब न दाखविला, तर तो त्यांजकडून घेण्यासाठी सरदारांवर शस्त्र उचलणें पेशव्यास भाग पडूं लागलें. हिशेबासंबंधानें बयादा सांगून सरदार सरकारदेणें देईनातसे झाले, म्हणजे त्यास वठणीवर आणण्यासाठी पेशव्यास शस्त्र घ्यावें लागल्याचे अनेक प्रसंग आहेत. नानासाहेब पेशवा व नागपूरकर रघूजी भोसले याचा तंटा असाच पुढे उपस्थित झाला, पण तो शाहूनें वेळीच तोडला. तूर्त गुजरातेतून बाजीरावानें आपलें लक्ष काढून घेतलें, ही बापाची आठवण पुढें त्याचा मुलगा नानासाहेब यास होऊन त्यानें कैक वर्षे खटपट करून शेवटीं आरंभीच्या ठरावाप्रमाणें स. १७५२ त निम्मी गुजरात गायकवाडापासून हस्तगत करून घेतली, तो प्रकार पुढें येईल.

त्रिंबकरावानंतर सेनापतीच्या घराण्यांत पराक्रमी पुरुष निघाला नाहीं. यशवंतराव व्यसनाधीन होता आणि त्याच्या हातून राष्ट्रकार्य काहींच झालें नाहीं. तेणेंकरून गायकवाडास पुढे येण्यास संधि मिळाली; आणि इतउत्तर दाभाड्यांचें कर्तृत्व नाहींसें होऊन गुजरातेंतील कारभार गायकवाडच मुखत्यारीनें पाहूं लागले. सेनापति हें नाव मात्र दाभाड्याच्या घराण्यात राहिलें. यशवंतराव नालायक आहे असें समजतांच त्याचें सेनापतिपद काढून शाहूनें तें गायकवाडास दिलें असतें तर शाहूचा दरारा बसला असता. परंतु उमाबाईचे हयातींत तें शक्य नव्हतें. उमाबाईला शाहू व पेशवे चांगलाच मान देत असत. शाहूचे पश्चात् दाभाड्यांनी नानासाहेब पेशव्याशी थोडीशी बंडाळी केली तो प्रकार पुढें येईल. यशवंतरावास शाहूनें प्रोत्साहन देण्याची शिकस्त केली, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. उदाहरणार्थ, खालील पत्र पहा. ‘ राजमान्य राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापति यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री बाजीराव पंडित प्रधान उत्तर प्रांतास जातात, त्यांस आपली फौज सामील करणें म्हणून तुम्हांस आज्ञा केली होती. परंतु फौज त्यां समागमें दिली नाहीं व हुजूरही यावयाचा प्रसंग जाला नाहीं. रनाळ्यास कालहरण करीत राहिले आहां, यावरून काय म्हणावें ? तुम्हीं सेनापति आणि हे नूर तुमची, सेवा करून जग नामोष करून घ्यावयाची होत असतां ईरे व उमेद धरीत नाहीं. तेव्हां पुढें आतां तुमचें हातें काय होणें! हल्लीं राजश्री प्रधानपंतास व निजाम उत्मुल्कास समीपता होऊन गांठ पडली असेल. औरंगाबादची फौज जमा जाहली आहे,

ते निजामाकडेस कुमकेस जाणार. गेलियानें निजाम भारी होईल. याजकरितां इकडेच अडकवून पाडावी, जाऊं न द्यावी असें आहे. तरी तुम्ही आपले सारे फौजेनशी राजश्री चिमणाजी बल्लाळ यांस शिताबीनें सामील होऊन स्वामी संतोषी होत असें करणें. पत्र पावतेक्षणीं फौजेनिशी जाऊन सामील होणे. दिरंग एक क्षणाचा न करणे. बहुत शिताबीनें जाणें. घालवसरीवर सर्वथा न घालणें सुज्ञ असा.'¶

सेनापतीस सामील झालेल्या सरदारांवर बाजीरावानें वक्रदृष्टि ठेविली नाहीं. पवार, गायकवाड यांस त्यांची कामें पूर्ववत् सांगितलीं. राणोजी व मल्हारराव यांनीं आपली भीड खर्चून आनंदराव पवाराची समजूत काढिली. चिमणाजी दामोदरानेंही पेशव्याशीं सख्य जोडिलें. §

सेनापतीच्या प्रकरणानें बऱ्याच गोष्टींचा निकाल लागला. डोईजड सरदारास नरम करण्यास शाहू कमी करीत नाहीं अशी सरदाराची खात्री झाली. चंद्रसेन व त्रिंबकराव दाभाडे असे एकामागून एक दोन सेनापति बंडखोर निघाले आणि त्यांस वठणीस आणण्यास पेशव्यांनीं कमी केलें नाहीं, यावरून मराठी राज्य फुटूं न देण्याची पेशव्यांची व शाहूची धमक व्यक्त होते. प्रथम पालखेडावर, त्यानंतर संभाजीच्या प्रकरणांत, व हल्लीं सेनापतीनें व निजामानें शाहू व पेशवे यांजला मोठ्या उपद्व्यापाचा विरोध केला असता, तीनही प्रसंगीं बाजीरावानें त्यास चीत केलें, यामुळें त्याचा लौकिक वाढला, आणि मराठ्यांच्या राज्यकारभारास संघटित स्वरूप येऊन, पुढील पांच दहा वर्षांत बाजीरावाचे हातून राज्याची वृद्धि चांगली झाली. शत्रूंवर सुद्धां मराठ्यांची छाप बसली; आणि राजपुताना दिल्लीपावेतों मराठ्याचे उद्योगास जोर आला. लवकरच हबशास व पोर्तुगीझास जिंकून मराठ्यांनीं कोंकणपट्टीचा समुद्रकिनारा कबजांत आणिला. सारांश, यापुढील नऊ वर्षांत पेशव्याच्या कर्तबगारीची दहशत देशांत केवढी बसली, ही गोष्ट इंग्रजांनीं मराठ्यांशीं स्नेह जोडण्याच्या इच्छेनें कॅ. गोर्डन यास स. १७३९ त साताऱ्यास पाठविलें त्याच्या हकीकतीवरून पटणारी आहे.

**६ अभयसिंगाची नामुष्की.**—अभयसिंग मारवाडचा राजा हा मतलबसाधु व वेळ येईल तशी पाठ फिरविणारा होता. कोणीकडून त्यास गुजरात

¶ ऐ. प. २३. § पे. द. १३. ४३; ३०. ३१८, ३२०

प्रांत हाताखालीं घालावयाचा असल्यामुळें बाजीरावास जय मिळतांच त्यानें दिल्ली येथील आपल्या वकिलास ता. १० एप्रिल रोजीं लिहिलें, " डभई येथें बाजीराव व त्रिंबकराव यांचा संग्राम होऊन त्रिंबकराव मारला गेला, तसेंच निजामाकडील मदत फौजेचा सेनानी मोमीनयारखान व मालोजी पवार हेही मारले गेले. उदाजी पवार, चिमणाजी दामोदर व पिलाजीचा पुत्र असे जिवंत पकडले गेले. तुम्ही ही बातमी तेथें वजीर खानडौरान यांस ताबडतोब कळवा. निजामाला चांगली तंबी पोचविणें जरूर पडल्यावरून त्या कामीं आम्ही मुद्दाम बाजीरावांस आमचे पक्षांत आणिलें. निजामांनी बाजीरावासंबंधानें बादशहांचा भलताच गैरसमज करून दिला आहे, पण खरा प्रकार काय तो त्यांस स्पष्ट कळला पाहिजे. निजाम, बांडे, गायकवाड व दाभाडे यांनी मोठीच बंडखोरी आरंभिली होती. या सर्व बंडखोरांची चांगली खोड मोडण्याकरिता आम्ही मुद्दाम बाजीरावांचें मन वळवून त्यांचें साह्य घेतलें, आणि त्यांजबरोबर आमची फौज व मजबूद तोफखाना देऊन बंडखोरांचा पाडाव केला. या साह्याबद्दल बादशहांनी शाहू महाराज, पेशवे बाजीराव व त्यांचे बंधु चिमणाजी पंडित यांस पोषाक पाठवून त्याचा गौरव करावा अशी तजवीज तुम्ही मुद्दाम वजिरांमार्फत करावी. या प्रसंगी पेशव्यांनीं बादशहांचें मोठेंच कार्य केलें आहे. गुजरात प्रात निजामाचे कबजांत जाण्याचा योग आला होता, तो बाजीरावाच्या करामतीनें फसला. वजिरांना खरा प्रकार माहीत नसल्यामुळें त्यांनी उलट बाजीरावांचा विरोध चालविला आहे तें बरोबर नाही. निजामाची ही सर्व कारवाई बादशहाविरुद्ध चाललेली आहे. इतक्या उपर वजीर व बादशहा आमचें साह्य करण्यास तयार नसतील तर आम्हांस या प्रांताच्या सुभेगिरीची जरूर नाही. दुसरा सुभेदार कोण तो नेमून पाठवा म्हणजे आम्ही हा प्रांत सोडून खुशाल मारवाडांत परत जाऊं. पदरचा खर्च करून आणखी वर बादशहाचा ठपका आम्हांस नको. बाजीरावांची समजूत घालून त्यास आम्ही साह्यास आणलें नसतें तर पिलाजी गायकवाड व कंठाजी कदम यास हाताशीं घेऊन त्यांनीं सगळी गुजरात केव्हांच हस्तगत केली असती. हा सर्व खरा प्रकार तुम्ही पत्र पावतांच वजीर व बादशहा यांस अवश्य कळवावा. " †

पण अभयसिंगास मराठे गुजरातेंत नकोच होते. त्यानें बाजीरावाची साथ अल्प काल केली तरी मराठ्यांचा पाडाव करणें हेंच त्याचें मुख्य ध्येय होतें.

† पंडित विश्वेश्वरनाथ रेऊ, जोधपुर, यांचा लेख, इं. हि. रे. कमिशन १९३९.

डभईचा संग्राम उरकतांच अभयसिंगानें पिलाजी गायकवाडाचा उच्छेद चालविला. त्रिंबकराव दाभाडे पडल्यावर मराठी फौजा परत गेल्या, तेव्हां पिलाजी व त्याचे पराक्रमी भाऊ व मुलगे यांनीं अनेक युक्त्या करून गुजरातेंत हळू हळू आपला जम बसविला. स. १७२९ अखेर चिमाजी आपा गुजरातेंत उतरला. स. १७३० च्या जानेवारींत पावागड हस्तगत करून प्रांताची लूट केली. नंतर महीच्या उत्तरेस विरमगांवपर्यंत अंमल बसवून जून महिन्यांत चिमाजी पुण्यास आला. त्या वेळीं बडोदें पिलाजीच्या ताब्यांत होतें, तें अभयसिंगानें हिसकावून घेतलें, आणि डभईस वेढा घातला. नंतर तहासंबंधानें उभयतांची वाटाघाट सुरू झाली. त्याकरितां एकमेकांचे वकील एकमेकांकडे जाऊं येऊं लागले. अशा उपक्रमानें अभयसिंगानें कपटव्यूह रचून एका मारवाड्याच्या मदतीनें डाकोर येथें पिलाजीचा खून करविला. ( १४ एप्रिल, स. १७३२ ). † पिलाजीच्या लोकांनीं त्या खुनी इसमास लगेच कापून काढिलें, आणि मही अलीकडे सावळीस येऊन तेथें पिलाजीच्या मुर्द्याचें दहन केलें. पिलाजी शूर, धोरणी व बाणेदार होता आणि त्याचेंच उदाहरण पुढें त्याचे घराण्यास प्रोत्साहक झालें. डभई त्यांनीं हातची जाऊं दिली नाही. ता. १९.४.१७३२ रोजीं शाहूनें पत्र लिहून दमाजी गायकवाडाचें समाधान केलें. 'पिलाजीस घोकळसिंगानें दगा केला, त्यामागें तुम्हीं हिंमत धरून अंगेजणी बरीच केली, म्हणून यशवंतराव दाभाडे सेनापतीनें लिहिलें. तरी होणार ती गोष्ट झाली. त्याचा खेद न करणें. तुम्हांविषयीं सेनापतीस आज्ञा केली आहे. ते तुमचें उभारणी करून चालवितील. तुम्हीं त्यांचे हुकमाप्रमाणें वर्तणूक करणें.'

पिलाजीच्या खुनापासून अभयसिंगास कांही एक निष्पत्ति झाली नाही. उलट पिलाजीचे पुत्रांस व भाऊ महादजीस व उमाबाईस विशेष चेव येऊन त्यांनीं बडोदें व डभई ही ठाणी तर परत घेतलींच, परंतु खुद्द अहंमदाबादेवर चाल करून, त्याच्या पूर्वेकडील जोधपुरच्या हद्दींत धुमाकूळ उडवून दिला. तेव्हां अभयसिंगानें दमाजी गायकवाडास चौथाई व सरदेशमुखी देण्याचा करार लिहून दिला, आणि शिवाय अहंमदाबादच्या खजिन्यांतून ८० हजार रु. रोख देण्याचें ठरविलें. रक्कम पदरात पडेपर्यंत जवानमर्दखान बाबी यास ओलीस ठेविलें. पुढें कांही काळ भानगडी चालून स. १७३४ त शेरखानबाबीकडून

† शा. रो. १६१; रा. ख. २ पृ. ६४; पे. द. ३०. ३१७, व १२. ३८

बडोदें दमाजीच्या कबजांत आलें तें अद्यापि त्यांजकडे आहे. दमाजीशी कसाबसा तह करून अभयसिंगास आपलें राज्य बचावण्यासाठीं गुजरात सोडून परत जावें लागलें. जातांना त्यानें आपला एक हस्तक रतनसिंग भंडारी अहंमदाबाद येथें ठेवून दिला. पण गायकवाडांपुढें त्याचा टिकाव लागला नाहीं. त्यांनीं अहंमदाबादेंतून चौथाईचे हक्क वसूल केले. पुढें अभयसिंगानें आपले भाऊ आनंदसिंग व रायसिंग यांस गुजरातेंत पाठविलें. त्यांनी शिंदे होळकरांस [illegible] आणून जवानमर्दखान बाबी हा गृहस्थ अहंमदाबाद बळकावून बसला होता त्याजवर चाल केली. तेव्हां शिंदे होळकरांस पावणे दोन लाख रुपये देऊन जवानमर्दखानानें आपला बचाव केला. दोन तीन वर्षे अशा भानगडी चालल्यावर स. १७३७ त¶ मोमीनखान याची गुजरातेवर नेमणूक झाली, तो ५५ वा सुभेदार होय.

मोमीनखानास रतनसिंग कारभार देईना, तेव्हा त्यानें दमाजीची मदत घेतली. दमाजीनें रंगाजी गायकवाडास मोमीनखानाचे मदतीस पाठविलें. त्यांनीं २० मे, १७३७ रोजी अहंमदाबाद हस्तगत केलें, आणि तेथील वसूल पुढें उभयतांनीं निमेनीम घ्यावा असें ठरविलें. सन १७४३ पर्यंत कारभार करून मोमीनखान मरण पावला. त्यानंतर अबदुल अजीजखान यानें बनावट फर्मान आणून सुभेदारी बळकाविली, परंतु दमाजीनें त्याचा जम बसूं दिला नाहीं. स. १७४४ त फकरुद्दौला सुजायतजंग बहादुर याची ५९ वा सुभेदार म्हणून दिल्लीहून नेमणूक होऊन त्याचे हाताखालीं जवानमर्दखान बाबी यास ठेवण्यात आलें. हळूहळू दमाजी मोठा झाला, आणि बापाच्या खुनामुळें त्वेष चढून त्या भानगडीच्या दिवसांत त्यानें नानाप्रकारचे उद्योग करून आपल्या घराण्यांत पहिल्या प्रतीचें नाव कमाविलें, त्याची हकीकत पुढें येईल.

¶ बर्गेसची शकावली. डफ १७३५ देतो.

## ८

# जंजिऱ्याचें युद्ध

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १६४९ | | | ब्रह्मेन्द्रस्वामीचा जन्म. |
| १७०७ | | | जंजिरेकर सीदी कासम मृ.; परशुराम देवालयाचा जीर्णोद्धार ब्रह्मेन्द्रस्वामीकडून. |
| १७०७–१७३१ | | | सीदी रसूल याकूदखानाची कारकीर्द. |
| १७२७ | फेब्रु० | ८ | परशुराम देवालयाचा सीदीकडून विध्वंस. |
| १७२८ | | | ब्रह्मेन्द्रस्वामीचें धावडसीस आगमन. |
| १७२९ | जुलै | ४ | कान्होजी आंगरे मृ. |
| १७२९ | ,, | २१ | सेखोजी आंगरे सरखेलीवर दाखल. |
| १७३२ | फेब्रु० | १२ | कुलाब्यास बाजीराव–सेखोजी भेट. |
| १७३३ | फेब्रु० | | सीदी रसूल मृ. |
| ,, | एप्रिल | | बाजीरावाची सीदीवर चढाई. |
| ,, | मे | | प्रतिनिधि व दुसरे सरदार कोंकणांत उतरले. |
| ,, | जून | ८ | रायगड हस्तगत. |
| ,, | जुलै | ८ | गोवळकोटची लढाई |
| ,, | ऑगस्ट | २८ | सेखोजी आंगरे मृ. |
| ,, | डिसें० | ६ | इंग्रज-सीदींचा मराठ्यांविरुद्ध बचाव-चढाईचा तह. |
| ,, | ,, | | बाजीरावानें सीदीची मोहीम आवरली. |
| १७३४ | जाने० | १० | रायगडाखालीं सीदी अंबर अफवानीचा लढाईंत मृ. |
| १७३४ | मार्च | ८ | बाणकोट मराठ्यांनीं काबीज केला. |
| १७३५ | डिसें० | ५ | बाणकोट सीदीनें परत काबीज केला. |
| १७३६ | एप्रिल | १९ | रेवासच्या लढाईत सीदीसात मृ. |
| १७४५ | जाने० | २३ | अंजनवेल व गोवळकोट तुळाजी आंगऱ्यानें काबीज केले. |
| १७४५ | जुलै | २६ | ब्रह्मेन्द्रस्वामी मृ. |

# ८

# जंजिऱ्याचें युद्ध



**१ स्वारीचा उद्भव.**—जंजिऱ्याच्या स्वारीचा उद्भव ब्रह्मेन्द्रस्वामीमुळें झाला. राजाराम जिंजीस असतां त्यास स्वामींचा उपयोग घडला म्हणून त्यास त्यानें कोंकणांतील धामणी गांव इनाम दिला. त्या गांवांतील रानांत स्वामी तपश्चर्येस येऊन राहत असतां रानात बाळ गौळी गुरें चारावयास येई, त्यास स्वामीचें दर्शन झालें, आणि त्याच्यामार्फत स्वामीच्या अद्भुत सामर्थ्यासंबंधाची लोकांत प्रसिद्धि झाली. तेव्हांपासून लोक स्वामीच्या दर्शनास येऊं लागले. हळूहळू स्वामीच्या सर्व मोठमोठ्या लोकांशी ओळखी होऊं लागल्या. त्यांत बाळाजी विश्वनाथाची व स्वामीची ओळख होऊन, बाळाजीची भक्ति पाहून 'तूं महत्पदास चढशील' असा स्वामीनें त्यास आशीर्वाद दिला. बाळाजीचें व हबशाचें वाकडें होतें हें मागें सांगितलेंच आहे. पेशवाई मिळाल्यावर बाळाजीस आंगरे व हबशी यांचे भांडणांत पडावें लागलें. जंजिऱ्याचा हबशी हा मोगल बादशहाचा अंकित समजला जात असे, म्हणून त्याचा उच्छेद करावयाचा हें शिवाजीपासून मराठशाहीचें एक कर्तव्यच बनलें होतें; तशांत ही आपली जन्मभूमि कोंकण प्रांत मराठशाहीखाली सलंग आपल्या कबजांत असावा असें बाळाजीस वाटे. पेशवेपद प्राप्त झाल्यापासून स्वामीवर बाळाजीची भक्ति अतोनात बसली; आणि बाळाजीचें सर्व कुटुंब स्वामीची सेवा करण्यांत अग्रेसर बनलें. असा हा या जंजिरा प्रकरणाचा पूर्वसंबंध आहे. †

---

† **या प्रकरणाचे आधार**—ब्र. ले. २३, व पत्र पृ. ४३; रा. खं. ३ प्रस्ता०, व ले ५६८ चेउलची बखर; खं. २ शकावलि; इ. सं. आंगऱ्यांची बखर; शा. म. ची रोजनिशी; पारसनीसकृत ब्र. स्वा. च, त्यावर आळेकरकृत टीका, ग्रंथमाला; आठल्येकृत जंजिऱ्याची मोहीम, केसरी २१.६.१९०४ पासून जानेवारी १९०५ (हे लेख विशेष मार्मिक आहेत). भा. व. पु. २ यांत जंजिरेकराचा वृत्तान्त खुलासेवार आहे. पे. द. भाग ३ व ३३ हे मोठी नवीन भर घालतात.

मीयाचे कारभारांत सीदीसात नावाचा जहांबाज सरदार असून स. १७१५ त बाळाजीनें ठरविलेला तह मोडून मराठ्यांचा उच्छेद करण्याकडे त्याची प्रवृत्ति होती. निजाम व शाहू याचा वैरभाव वाढत गेल्याबरोबर स. १७२६ त आगऱ्याचा व सीदीचा वैरभाव चालू झाला. कान्होजीनें शाहूकडे मदत मागितली. दसरा झाल्यावर फौजेचें साह्य करूं असें शाहूनें त्यास कळविलें. परंतु निजामाचें प्रकरण वाढल्यामुळे सीदीचें प्रकरण हातीं घेण्यास शाहूस त्या वेळीं सवड झाली नाही.

जंजिऱ्याचा अधिकारी सीदी कासम स. १७०७ त मरण पावला, तेव्हापासून स. १७३१ पर्यंत सीदी रसूल याकूदखान जंजिरा येथें कारभार करीत होता. ब्रह्मेन्द्रस्वामीच्या अद्भुत शक्तीची माहिती याकूदखानास होऊन त्याने स्वामीच्या परशुराम येथील देवालयाच्या खर्चासाठीं पेढें व आंबडस हे दोन गाव इनाम दिले. दाभोळ खाडीच्या मुखावरील दक्षिण बाजूचें अंजनवेल ठाणें हबशाचे ताब्यांत असून तेथें उपद्यापी सीदीसात अधिकारी होता. त्यास कर्नाटकांतील सावनूरच्या नबाबाकडून एक सुंदर हत्ती बक्षीस मिळाला. तो इतक्या लांबून अंजनवेल येथें सुरक्षित आणणें हें काम मोठें बिकट होतें. तें सीदीसातानें ब्रह्मेन्द्रस्वामीस सांगितलें. स. १७२५ च्या डिसेंबरपासून स. १७२६ च्या मेपर्यंत, पेशवे, भोसले वगैरे प्रमुख सरदारांनी कर्नाटकांत स्वारी केली, त्याच वेळी ब्रह्मेन्द्रस्वामीही भिक्षाटनार्थ तिकडे गेला असतां, त्याजकडे ही हत्ती आणण्याची कामगिरी सीदीसातानें सोंपविली. स्वामीस लोकप्रियतेची मोठी आवड व पाहिजे त्याला जरबेंत आणण्याची घमेंड असल्यामुळें, त्यानें हें काम अंगावर घेतलें. त्या वेळी देशांत ठिकठिकाणी निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या चौक्या असत, आणि त्या चौक्यांतून परवानगीशिवाय फौज, जनावरें किंवा माल सोडण्यांत येत नसे. विशाळगडच्या घाटात हत्तीस अडवूं नये अशाबद्दलचीं छत्रपति संभाजीची व प्रतिनिधीची दस्तकें स्वामीस पूर्वीच मिळाली होतीं. तेथून हत्ती सुरक्षित आला. परंतु संगमेश्वरच्या पुढें माखजनच्या चौकीवरील आंगऱ्याच्या लोकांनी हत्तीस अटकाव करून तो जयगडास पाठविला. कान्होजी आंगरे आपला शिष्य असल्यामुळें हत्तीस अटकाव होईल असें स्वामीस वाटलें नव्हतें, म्हणून त्यानें आंगऱ्याचें दस्तक घेतलें नव्हतें. आपला हत्ती आंगऱ्याच्या लोकांनीं नेला असें ऐकून सीदीसात खवळला आणि जबरदस्तीनें हत्ती आणण्याकरितां त्यानें कांहीं फौज अंजनवेलीहून

जयगडाकडे रवाना केली. त्या लोकांस आंगऱ्यांकडील लोकांनीं हांकून दिलें. माखजनच्या चौकीवर हत्तीस आगऱ्याकडून झालेला अटकाव स्वामीस मागच्या मुक्कामावर कळला. त्याबरोबर हत्ती सोडून देण्याविषयीं स्वामीनें कान्होजीस पत्र लिहिलें. कान्होजीनें लगेच जयगडास हुकूम पाठवून हत्ती सोडून दिला. त्यापूर्वीच' सीदीसाताचे लोक हत्ती घेतल्याशिवाय परत आलेले पाहून तो जास्तच चिडला, आणि हें सर्व कृत्य स्वामीच्याच मसलतीनें घडलें असा बहाणा करून, सीदीसातानें एकदम अविचारानें स्वामीच्या परशुराम येथील देवालयावर स्वारी केली. ता. ८ फेब्रुआरी, स. १७२७ रोजी शिवरात्रीच्या समयीं त्या पवित्र स्थानाचा सीदीनें विध्वंस केला; देवालयाची व ब्राह्मणांची संपत्ति लुटून नेली; आणि पळून न जातां जे ब्राह्मण तसेच तेथें राहिले, त्यांस द्रव्य दाखविण्याकरितां मार देऊन त्यांची नानाप्रकारें हालअपेष्टा केली. ‡

हा प्रकार पाहून स्वामीस अतोनात दुःख झालें. त्यानें सीदीचा हत्ती जयगडाहून चिपळुणाजवळ गोवळकोटास आणिला; सीदीसात यास बोलावणें पाठवून हत्ती त्याचे स्वाधीन केला; आणि 'देवब्राह्मणांचा तूं उच्छेद केलास, अतःपर तुझाही उच्छेद लवकरच होईल,' असा सीदीस शाप देऊन स्वामी परशुरामास गेला. तेथील एकंदर भयंकर विध्वंस पाहून स्वामीस अत्यंत क्रोध आला. कान्होजीच्याही लक्षात हें सर्व प्रकरण येऊन त्यानें स्वामीस आपणाकडे समजुतीसाठीं बोलाविलें. परंतु स्वामीनें तें ऐकिलें नाहीं. जंजिऱ्याचा मुख्य सीदी रसूल यानेंही स्वामीस समजुतीसाठीं जंजिऱ्यास बोलाविलें व दोन गांव इनाम देण्याचें आश्वासन दिलें. परंतु हिंदुधर्माचा उच्छेद ज्याच्या राज्यांत होतो, त्यास भेटणें स्वामीस योग्य वाटलें नाहीं. तथापि सीदी रसूलनें सीदीसातास हुकूम पाठवून स्वामीच्या देवालयाची नेलेली चीजवस्त त्यास परत देवविली. यापुढे कोंकणांत रहावयाचें नाहीं असें स्वामीच्या मनानें घेतलें; आणि बाजीरावाच्या विचारानें त्यानें देशावर जाण्याचा निश्चय केला. स्वामीनें कोंकण सोडून जाऊं नये म्हणून कान्होजी आगऱ्यानेंही पुष्कळ मध्यस्थी केली; आणि शेवटीं शपथही घातली. त्यावरून स्वामी आणखी एक वर्ष कोंकणांत राहिला. दरम्यान सीदीसातानें पुनः स्वामीस थोडीशी तंबी दिली. त्यावरून कान्होजीनें स्वामींची कुचंबणा पाहून व आपल्या एकट्याच्या हातून सीदीचा पाडाव होणें कठिण असा विचार करून, स्वामीस घातलेली शपथ मोकळी

‡ पा. ब्र. च., पृ. २३. वरील पत्र

केली; तेव्हां स्वामी परशुराम सोडून साताऱ्यानजीक धावडशी येथें जाऊन राहिला (स. १७२८).

जंजिऱ्याचा अधिकारी सीदी रसूल याकूदखान हा भला मनुष्य होता. कान्होजीचा कुलाबा किल्ला घेण्यासाठीं त्याजबरोबर सीदी रसूलचा कैक वर्षे झगडा चालला होता. पण कान्होजी आंगऱ्याचा व सीदीचा तह बाळाजी विश्वनाथानें जुळविला तेव्हांपासून दहा वर्षे हबशी व आंगरे यांची गोडी होती. स्वामीचें प्रकरण उपस्थित झालें नसतें, तर ही गोडी तेव्हां एकदम बिघडण्याचें कारण नव्हतें. परंतु आपल्या मंदिराची दुर्दशा सहन न होऊन कान्होजीच्या मार्फत सीदीस तंबी पोचविण्याचा प्रयत्न स्वामीनें सुरू केला. कान्होजीनें तें काम एकदम अंगावर घेतलें नाहीं. त्यानें शाहूस कळविलें, कीं ' श्यामल व वरकड शत्रूंचा उपद्रव बहुत आहे. हुजुरून साहित्य गनीमास नतीजा पावावयाचें होत नाहीं; स्वामींनीं आपले स्थळास दुसरा पाठवून आपणास मामल्यापासून मुक्त करावें. ' स. १७२७ च्या दसऱ्याचे दिवशीं कान्होजी साताऱ्यास जाऊन शाहूस भेटला. या भेटींत हबशाचें प्रकरण सलुखानें मिटवावें असें ठरलें असावें. कारण या वेळीं निजामाच्या संबंधानें शाहूची तारांबळ होती आणि आंग्ऱ्यास तरी ही नवीन उठाठेव अंगावर घेण्याची उत्कंठा मुळींच नव्हती. सीदीनें मराठी मुलखावर छापे घालण्याचा क्रमच सुरू केला. कान्होजी स. १७२९ त मरण पावला, लगेच स. १७३०-३१ त बाजीरावानें संभाजी व दाभाडे यांची प्रकरणें उरकलीं, तेव्हां ब्रह्मेन्द्राच्या टोचणीमुळें हबशास जिंकण्याची कामगिरी स्वीकृत कर्तव्याचें एक मुख्य अंग समजून शाहूनें स. १७३३ त अंगावर घेतली.

जंजिऱ्यावरील मोहिमेचा पूर्ववृत्तान्त हा अशा प्रकारचा आहे. धावडशीस गेल्यावर स्वामीनें साताऱच्या मुत्सद्द्यास व शाहूस भर घालून जंजिरा काबीज करण्याची खटपट सुरू केली. मराठमंडळाची शक्ति पाहिजे तितकी असूनही त्याची रचना राज्यवृद्धीस कशी अपायकारक होती याचें विशिष्ट उदाहरण ही जंजिऱ्यावरची मोहीम होय. जंजिरा जिंकून पश्चिम किनारा पूर्णपणें निर्धास्त करणें हें स्वराज्याचें पहिलें कर्तव्य प्रत्येक सरदार जाणत होता. प्रतिनिधि, पेशवे, आंगरे, फत्तेसिंग भोसले वगैरे सरदार व्यक्तिशः प्रबळ व कर्तृत्ववान होते; पण गेल्या पाच सात वर्षांच्या कारभारांत प्रत्येकास असा कांहीं अनुभव आला होता, कीं एकानें दुसऱ्याच्या भानगडींत केव्हांही पडूं नये, आपल्या एकट्याच्या हातून होईल तें करावें, आणि साधेल तितका

स्वतःचा पंथ स्वतंत्र ठेवावा; सर्वांची मोट एक ठिकाणीं बांधल्यापासून नुकसान मात्र होतें, आणि फलप्राप्ति कांहींच होत नाहीं, हा अनुभव बाजीरावासही वारंवार आला. उत्तर हिंदुस्थानांत जसें त्याला एकतंत्री स्वतंत्र क्षेत्र मिळालें, तसें या जंजिरा स्वारींत मिळालें नाहीं.

**२ वाटाघाट व तयारी.**—जंजिऱ्यावर स्वारी करण्यासंबंधानें स्वामीनें प्रमुख मुत्सद्द्यांमार्फत जोराची खटपट चालविली. स्वतः शाहूनें कुटुंबसहवर्तमान धावडशीस येऊन स्वामीचें दर्शन घेतलें. हिंदूंच्या राज्यांत देवब्राह्मणांचा छल होणें ही गोष्ट किती लज्जास्पद आहे हें स्वामीनें शाहूच्या मनांत भरविलें. बाजीरावासही वारंवार पत्रें लिहून स्वामीनें त्यास या कामीं पुष्कळ गळ घातली. परंतु १७३१–३२ पावेतों प्रमुख सरदार निरनिराळ्या कामांत गुंतलेले होते, म्हणून या कामासाठीं त्यांस फुरसतच झाली नाहीं.

कान्होजी आंगरे मराठमंडळाशीं थोडाबहुत फटकून वागे. पश्चिम किनारा हा कान्होजीचें कार्यक्षेत्र, यामुळें शाहूला त्यांत फारसा हात घालतां येत नव्हता. कान्होजी ता. ४ जुलै १७२९ त वारल्यानंतर त्याच्या पश्चात् सेखोजी आंगरे यास शाहूनें सरखेलीचा कारभार ता. २१.७.१७२९ रोजीं सांगितला. हा सखाराम उर्फ सेखोजी राजनिष्ठ व इमानी असून हबशांचें प्राबल्य मोडून मराठी राज्याच्या अभिवृद्धीसाठीं मनापासून झटणारा होता. हुकमत, शौर्य, सचोटी हे गुण सेखोजीच्या अंगी विशेष होते. ता. १२ फेब्रुवारी, स. १७३२ रोजी बाजीराव कुलाब्यास गेला. 'त्यांच्या आमच्या परस्पर भेटी झाल्या, उत्तम प्रतीनें सौरस्य जाहलें,' असें सेखोजी लिहितो. या भेटींत त्यांनीं जंजिऱ्याच्या मोहिमेची वाटाघाट करून एकमेकांस साह्य करण्याचें निश्चित केलें. ‡

हबशांचें निर्मूलन करण्याचा उद्योग ब्रह्मेन्द्रस्वामीनें तसाच नेटानें चालविला. त्यावरून यशवंतराव महादेव पोतनीस यास शाहूनें जंजिऱ्याचें कारस्थान रचण्यास कोंकणांत पाठविलें. त्या सुमारास म्हणजे स. १७३३ च्या फेब्रुवारींत जंजिऱ्याचा मुख्य अधिकारी सीदी रसूल मरण पावला. त्यास अबदुल्ला नांवाचा वडील मुलगा असून सीदी संबूल, सीदी अंबर, सीदी रहयान, याकूत, हसन वगैरे आणखी सहा लहान मुलगे होते. अबदुल्लाचा मुलगा सीदी रहमान हा आणखी एक वारस असून त्याचा इतरांशीं बेबनाव होता. शिवाय शेख याकूब नांवाचा हबशांचा एक पराक्रमी सरदार मूळचा कोळी असून

‡ रा. खं. ३. २४४

मुसलमान झाला होता, तो शेखजी या नांवानें प्रसिद्ध असून हबशांचे कारभारात त्याचें वजन मोठें होतें. त्यास आपल्या बाजूस वळवून त्याच्या मार्फत यशवंतराव महादेवानें व्यवस्था ठरविली, की सेखजीनें मराठ्यांना सर्वोपरी साह्य करावें आणि त्याचा मोबदला म्हणून सर्व आरमाराचें आधिपत्य, हबशांच्या सर्व मुलखाची सुभेदारी, कित्येक किल्ले व इनाम गांवें, पेणपासून कोल्हापूरहद्दीपर्यंत तळकोंकणांतील सरगोंडपणाचा हक्क, या गोष्टी त्यास मराठ्यांनी द्याव्या ; तसेंच त्याच्या भावास रायगडची किल्लेदारी व फौजेंतील लोकांस एक लक्ष रुपये बक्षिसादाखल कबूल करण्यांत आले. हें कारस्थान घाटून तयार होतें तों इकडे किल्ल्यांत क्रांति होऊन सीदी रसूलचा वडील मुलगा व गादीचा वारस अबदुल्ला मारला गेला व आजाचा मुर्दा दफन करण्याकरतां राजपुरीस आलेला अबदुल्लाचा मुलगा सीदी रहमान बाहेरच राहिला. त्यानें लगेच शेखजीच्या मार्फत मराठ्यांकडे मदत मागितली. या कारस्थानाची पूर्तता शाहूनेंही तात्काळ केली. त्यानें बाजीरावास ताबडतोब साताऱ्यास बोलाविलें. "आधीं पत्र न वाचणें. घोड्यावर बसणें, मग पत्र वाचणें" अशी पत्रें शाहूनें बाजीरावास लिहून त्यास साताऱ्यास बोलाविलें. आणि खर्चाची तजवीज करून त्यास कोंकणांत रवाना केलें. हुजरात फौजेचें आधिपत्य फत्तेसिग भोसल्याकडे देण्यांत आलें. फत्तेसिंग व बाजीराव पुण्यास एकत्र होऊन शत्रूवर अचानक हल्ला चढविण्याकरता अत्यंत नजीकच्या मार्गानें भोरच्या डोंगराळ प्रदेशांतून स. १७३३ च्या एप्रिलांत मोठ्या तांतडीनें कोंकणांत उतरून सीदीच्या प्रदेशात घुसले.

या वेळीं शाहूनें लढण्याची तयारी फार चांगली केली. दाभाडे, आंगरे, गायकवाड या सर्वांस बाजीरावाची कुमक करण्याविषयीं त्यानें आग्रहाची पत्रें लिहिलीं. सुरतेहून सीदी मसूद जंजिऱ्यास कुमक घेऊन येणार होता, त्यास अडवून धरून हस्तगत करण्याची तर्तूद करणें, असें दाभाडे-गायकवाडांस शाहूनें पुनः पुनः लिहिलें. बाजीरावानें सेखोजीस पालीच्या मुक्कामीं भेटावयास बोलाविलें. शेखजीच्या गुप्त मसलतीनें पेशव्यानें सीदीचीं जंजिऱ्याजवळचीं मुख्य स्थळें हस्तगत करण्याचा क्रम चालविला. कोंकणच्या मोहिमेस घोडदौडी फौजेपेक्षां पायदळ ज्यास्त उपयोगी म्हणून शाहूनें मुद्दाम दोन हजार निवडक मावळे पाईक तयार करून पाठविले. मोहिमेची खबर वरचेवर मिळावी

म्हणून सचिवाचे मुलखांत डाक बसविण्यांत आली. आंग्र्यानें मदत करण्यांत मागेंपुढें पाहूं नये म्हणून महाराजांनी जिवाजी खंडेराव चिटणिसास कुलाब्यास रवाना केले आणि सेखोजीचा कारभारी रघुनाथ हरि याच्या मार्फत त्यास भरपूर उत्तेजन दिलें. ब्रह्मेन्द्रस्वामींनेंही सेखोजी व संभाजी आंगरे या उभयतांस उत्तेजनपर पत्रें लिहिली. §

३ **मुख्य मोहीम** (मे–ऑगस्ट, १७३३).—बाणकोट खाडीपासून उत्तरेस थेट रेवदंडापर्यंतच्या किनाऱ्यानें पूर्वेस सह्याद्रीच्या पायथ्यास लागलेला प्रदेश हा सिदीच्या मुलखाचा गाभा होय. शिवाय मुंबईजवळचें उंदेरी बेट व रेवस, थळ, बाणकोट, जयगड, दाभोळ इत्यादि पश्चिम किनाऱ्यावरील कित्येक स्थळें त्याच्या ताब्यांत होतीं. या बंदरांतून लगतच्या मराठी मुलखावर हल्ले करून हिंदु प्रजेस छळण्याचा सीदीचा क्रम कित्येक वर्षे चालू होता. तेव्हां ही स्थळें सोडवून खुद्द जंजिरा हस्तगत करणें व सीदीला नेस्तनाबूत करणें हें मराठ्यांचे उद्दिष्ट बनलें. शिवाजीपासून मराठ्यांच्या सीदीशीं झटापटी चालू असून हल्लीं सीदीच्या घरात झालेल्या यादवीनें त्यांना योग्य ती संधि मिळाली. बाजीराव फौजेनिशीं वेगानें निघाला तो वैशाखी अमावास्येस (ता. २ मे रोजीं) राजपुरीवर जाऊन बसला. सीदीस मराठी फौजांच्या आगमनाची वार्ता नव्हती. त्यांची लढण्याची तयारी काय असणार असें त्याला वाटे. राजपुरी, खोकरी, त्याचप्रमाणें तळें, घोसाळें, बिरवाडी इत्यादि ठाणीं मराठ्यांनीं भराभर सर केलीं. सीदीचें बंदरांत असलेलें आरमार आयतेंच त्याच्या हातांत पडलें. अबदुल रहमान व शेखजी मराठ्यांना येऊन मिळाले आणि राजपुरीतील बालारोझा मशिदीजवळ छावणी करून पेशव्यानें खुद्द जंजिरा किल्ल्यावर हल्ला करण्याची तयारी चालविली. किल्ल्यांतून सीदी रहयान बाजीरावावर चालून आला, त्या वेळीं निकराचें युद्ध होऊन रहयान व त्याचे १०० लोक ठार झाले. एक सीदी सरदार मराठ्यांचे कबजांत आला. या विजयानें लोकांत अफवा उठली, की बाजीरावानें जंजिरा काबीज केला. पण वास्तविक प्रकार असा नव्हता. राजपुरी येथें पराभव पावल्यानंतर सीदी सरदार जंजिरा किल्ल्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिले आणि त्यांनीं पाण्यांतून लढाईची सिद्धता केली.

बाजीरावाचें व सेखोजी आंगऱ्याचे संगनमत होतें. जंजिऱ्याजवळ उत्तरेस युद्धाला तोंड लागतांच दक्षिणेस असलेल्या आंगऱ्यांच्या फौजांनी सीदीच्या

§ शा. रो. ३६४, ५६, ५८, ५९, ६१; ब्र. ले. ३१०.

नाक्याच्या जागांवर हल्ले सुरू केले. सुवर्णदुर्गचा किल्लेदार बकाजी नाईक यानें लगोलग बाणकोट व मंडणगड हीं माऱ्याचीं ठिकाणें हस्तगत केलीं; व गोवळकोटाकडे मोर्चा वळविला. जयगडचा किल्लेदार म्हसके यानें शेजारच्या विजयगड किल्लयास लवकरच हारीस आणिलें. मराठ्यांचें विजयी निशाण मंडणगडावर फडकूं लागल्याचें मनोरंजक वर्णन कान्होजीची बायको मथुराबाई इनें ब्रह्मेन्द्रस्वामीस लिहिलें. स्वामींनें ईर्षात्मक उलट उत्तर मथुराबाईस पाठविलें. श्रावणमासीं स्वामी एक महिना समाधि लावून बसत असे. या सालीं समाधीसाठीं स्वामीनें परशुरामास यावें असा मथुराबाईचा आग्रह होता, परंतु गोवळकोट व अंजनवेल हस्तगत झाल्याशिवाय कोंकणांत समाधीस येत नाहीं, असा स्वामीनें आपला निर्धार तिला कळविला. त्यावरून कोंकणांतील ही मोहीम त्वरेनें संपविण्याकरतां शाहूनें ता. २० मेच्या सुमारास श्रीनिवास प्रतिनिधि, आनंदराव सोमवंशी सरलष्कर, कृष्णाजी दाभाडे वगैरे सरदारांस फौज देऊन कोंकणांत रवाना केलें. उदाजी चव्हाण, शंभुसिंग जाधव व सचिव यांसही कोंकणांत फौजा पाठविण्यास शाहूनें आज्ञा केली. †

शाहूच्या हुकमाप्रमाणें प्रतिनिधि मे महिन्यांत कोकणांत उतरला. त्याची नेमणूक अगोदर झाली असतांही त्यानें आपल्या हालचाली सावकाशीनें चालविल्या. ता. २५ मेला महाडवर प्रतिनिधीचा मुक्काम झाला. जवळचा रायगड किल्ला काबीज करण्याचें कारस्थान यशवंतराव पोतनिसानें सिद्ध केलें होतें त्यास अनुसरून बाजीरावानें खटपटही सुरू केली होती; पण बाजीरावास न कळवितां प्रतिनिधीनें वेगळेंच कारस्थान रचून हा इतिहासप्रसिद्ध किल्ला, मराठ्याच्या 'तख्ताची जागा' ता. ८ जून रोजीं सर केली. कोंकणांत उतरून लगोलग रायगडसारखें महत्त्वाचें स्थान काबीज केल्यामुळें दरबारांत प्रतिनिधीची मोठी वाहवा झाली. पण त्यामुळें पेशवा संतप्त झाला. एक तर पेशव्यास राजपुरीवर भेटून प्रतिनिधीनें आपला कार्यक्रम आंखावा अशी योजना होती, पण प्रतिनिधीनें पेशव्याची भेट घेण्याचेंही नाकारिलें. नवीन कारस्थान रचून त्याचा सुगावाही पेशव्यास न लागूं देतां त्यानें रायगड मिळविला. आधींच बाजीरावाचें मन प्रतिनिधीबद्दल स्वच्छ नव्हतें आणि या त्याच्या कृत्यानें दोघांमधील द्वेषभाव वाढत जाऊन मोहिमेचा बोजवारा उडाला. प्रतिनिधीस

† ब्र. ले. २३ व ३३० का. सं. प. या. ले. २२ व शा. रो. ६३; पे. द. भाग ३ मधील नकाशा पहा.

यश मिळूं नये म्हणून बाजीरावानें सेखोजी आंगऱ्याकरवीं बकाजी नाईकास चिथवून दिलें आणि अंजनवेलचा किल्लेदार सीदीसात यासही अंतस्थ रीतीनें गुप्त निरोप पाठविले, तो प्रकार पुढें सांगण्यांत येईल.

रायगड राजधानी हस्तगत झाल्याचें वर्तमान ऐकून शाहूनें ता. २० जून, स. १७३३ रोजीं स्वहस्तानें पत्र लिहिलें त्यांत खालील मजकूर आहे. “ घेतल्या स्थळाचें संरक्षण होय तें करणें. आम्ही ईश्वरी इच्छा आहे तर श्रावणांत रायरी व बाजे किल्ले पाहावयास येऊं. रा० शिवाजीमहाराज व रा० आबासाहेब संभाजीमहाराज व काकासाहेब ( राजाराममहाराज ) व मातुश्री ताराबाई यांस कोणास न जाहलें तें कार्य चि० फत्तेसिंगबाबा व रा० प्रधान यांनीं केलें ही कीर्त जगत्रयीं व निजाम उल्मुल्क व दिल्लीपावेतों जाहली. हा लौकिक जेणेंकरून कायम राहे तें करणें. अनारंभो मनुष्याणां प्रथमं [illegible]. जें सांगणें तें जाते समयीं सांगितलेंच आहे. ” ¶

अंबाजी त्रिंबक बाजीरावास कळवितो, ‘ आम्ही तेथून स्वार होतेसमयीं खर्चाविशीं राजश्री स्वामीस लिहिलें त्यावरून पंधरा हजार रु. रवानगी झाली व हल्लीं आम्ही येथें पावल्यावरी पंधरा हजार रु. रवाना करविले आहेत. एका दो रोजांत रवाना होतील. स्वामींनीं तेथील बंदोबस्तास अंतराय न करावा. सीदीसाताकडील राजकारणाचा अर्थ पूर्वी लिहिलाच आहे. त्यास, छ. १३ सफरी (१४.७.१७३३) रोजीं राजश्री पंत प्रतिनिधीच्या भेटीस सीदीसात आला. भेटी झाली. सारा कोंकण प्रांत आपले स्वाधीन करावा, असे कित्येक मुद्दे बहुतच भारी घातले. यामुळें यांचा त्याचा बनाव झाला नाहीं. फिरोन माघारा गोवळकोटांत गेला आहे. बोलीचालीची हालमेल लागलीच आहे, म्हणोन वर्तमान आलें आहे. पुढें काय जें वर्तमान येईल तें लेहून पाठवूं. विदित जालें पाहिजे. ’

तडकाफडकी हल्ला चढवून जंजिरा हस्तगत करावयाचा हा बाजीरावाचा विचार, पण जंजिरा हें बेट असल्यामुळें त्याच्या फौजांस किल्ल्यास भिडतां येईना. बाजीरावानें जंजिऱ्यावरील हल्ल्याची वाटाघाट करण्याकरतां सेखोजी आंगऱ्यास भेटीस बोलाविलें. ती भेट ता. ६ मेला झाली. सेखोजीचें कांहीं आरमार या वेळीं दक्षिणेंत रत्नागिरीकडे गेलें होतें, आणि राहिलेल्या आरमारानिशीं ज्येष्ठाच्या वादळी हवेंत जंजिऱ्यावर हल्ला चढविण्यास सेखोजी

¶ ऐ. व. ११ अं. १ पृ. ४८ ; रा. खं. १६.८१ व १७.१९ वगैरे पहावे.

तयार होईना. शेखजीनें खोकरीची वाट मराठ्यांना दाखविली, पण जंजिऱ्याचा शत्रूनें जादा बंदोबस्त केल्यामुळें त्यांचा इलाज चालेना. यास्तव शत्रु गोंधळला असतां हल्ला चढवून जंजिरा काबीज करण्याची कल्पना पेशव्यास सोडून द्यावी लागली, आणि आंगऱ्याचे सांगण्यावरून युद्धाची नवी मांडणी करण्यात आली. राजपुरीस पेशव्यानें पावसाळ्यांत छावणी करून किल्ल्याची रसद तोडावी, दक्षिणेकडे प्रतिनिधीच्या हुकमतीखाली जें सैन्य आलें होतें त्यानें अंजनवेलीवर हल्ला करून सीद्याचा एक हात जायबंदी करावा, आणि खुद्द सेखोजीनें उत्तरेंतील सीद्याची रेवस, थळ, उंदेरी हीं स्थळें काबीज करून जंजिऱ्यास बाहेरून येणारी कुमक बंद करावी; पावसाळ्याच्या चार महिन्यांत शत्रू टेकीस येईल आणि अशा परिस्थितीत पावसाळा सरतांच जलमार्ग चालू झाले म्हणजे आंगऱ्यानें आरमारानिशी पेशव्यास राजपुरीवर सामील व्हावें आणि मग जंजिऱ्यावर हल्ला चढवावा अशी योजना ठरविण्यांत आली.

जंजिऱ्यावर चढाई करावयाची म्हणजे आरमाराशिवाय निभण्यासारखें नव्हतें आणि या बाबतींत तर बाजीराव अनभिज्ञ. आंगऱ्याची योजना मान्य करण्याशिवाय त्याला दुसरा मार्गच उरला नाही. स्वारीच्या व्यवस्थेसंबंधी बाजीरावानें साताऱ्यास अंबाजीपंत पुरंदऱ्यास कळविलें कीं, "हबशी शत्रु सामान्य नव्हे. जंजिऱ्यावर कशा मोहिमा झाल्या, पण तो हारीस आला नाहीं. अगदी निर्मूलच करावयास मेहनत फार पाहिजे. आरमारानें चहूंकडे बंद राखावा, खर्च मबलग लागेल, माणूस कनिष्ठ पक्षीं पंधरा हजार पाहिजे. वर्ष दोन वर्षे लागतील. हबशाचे दोन हात जबरदस्त आहेत, एक अंजनवेल व एक उंदेरी. दोन्ही स्थळें हातास आलीयावर त्याची हिंमत कमी होईल. पैका पाण्यासारखा वेचावयास पाहिजे. आम्हास अनुकूल पडलें तितका खर्च केला. आतां आमचे वस्तु बनत नाहीं. धणी खर्चास पुरवितील तरी आम्ही मेहनत करूं. जिवाकडे न पाहतां धण्याचे काम होईल तें करूं. सेखोजी आंगरे आले. पंधरा सोळा दिवस राहून मानाजी आंगरे येथें ठेवून कुलाबियास गेले. बंकाजी नायकांनीं मोर्चे मंडणगडास लाविले आहेत. सेखोजींनीं उंदेरीस लागावेंसें मान्य केलें आहे."

"राज्याभिवृद्धि जीवाभ्य मेहेनत करावी ऐशी आज्ञा राजश्री स्वामींची, त्यास मावळे हशम लोक उठोन गेले, लोकांची हिंमत नाहीं, आज्ञेवरून दम

धरून राहिलों आहों. पत्रदर्शनी हशम बारगीर व बरकंदाज अविलंबें पाठवावे. पाऊस लागला, रात्र अंधारी, विशाळगडी पातशाहाची दैना झाली तशी गत आमची होईल. मुरतेचा हबशी याची कुमक करील. विना पांची स्थळें हस्तगत जाल्याखेरीज मुलख राखवणार नाही. प्रतिनिधीस राजपुरीस जावयासी सांगितलें, परंतु जात नाहीत. " § पावसाळ्याचा अवकाश सीदीस मिळाला. आंतोणें, नागोठणें, अश्वधारा, अवचितगड, बिरवाडी, निजामपूर, रायगड, वगैरे स्थळें मराठ्यांच्या हाती गेलीं, पण अंजनवेल, गोवळकोट, विजयगड, जंजिरा, उंदेरी हे सीद्यांचे बळकट किल्ले असून त्यांवर त्यांचा बंदोबस्तही चांगला होता. पावसाळ्याचा अवधि मिळून सीद्यास स्फुरण चढलें. चौलचे पोर्तुगीज, मुंबईचे इंग्रज, सुरतेचा मोगल, निजाम अशा अनेकांकडे आपणास मदत करण्याबद्दल सीदीनी कारस्थानें केली. दिल्लीच्या बादशहाकडेही त्यानी या आणीबाणीच्या प्रसंगी आपला बचाव करण्याची विनंती केली. वजिरानें त्यांस फौजेची व आरमाराची मदत ताबडतोब करण्याविषयी मुंबईच्या इंग्रजांस हुकूम पाठविला. " आमचा धंदा व्यापाराचा आहे, तत्राप आपण फौजेची व पैशाची मदत केल्यास, आम्ही आरमार पाठवून सीदीस मदत करूं. " असें इंग्रजानी बादशहास उत्तर केलें. जंजिऱ्याच्या गादीवर जो सीदी सरदार होता त्याच्या नांवानें पातशाही फर्मानही सीदींनीं आणविलें.

हबशांनीं बाहेर नेटानें शहाची कारस्थानें प्रतिकार सुरू केल्यानें मराठ्यांचा जोर कमी पडला. शेखजी व सीदी रहमान हे मराठ्यांना मिळाल्यामुळें त्यांची आपल्या जातभाईकडे फार नाचक्की झाली. इकडे मराठ्यांच्या हातून काम तडकाफडकी होईना तेव्हां शेखजीही थोडासा शिथिल झाला. पन्नास हजार रुपये द्यावयाचा करार असतां बाजीरावानें दहा पांच हजारांवर त्याची बोळवण केली, त्यामुळें तो बेदिल झाला. कबिले ठेवण्यासाठीं नुकताच काबीज केलेला अवचितगड किल्ला जंजिऱ्याचे ईशान्येस सुमारें २० मैलांवर होता तो शेखजीनें मागितल्यावरून त्यास देणें बाजीरावास भाग पडलें. आजाराचें ढोंग करून पर्जन्यकाळचे चार महिने आपल्या हातून कांहीं होणें नाहीं असें त्यानें बाजीरावास कळविलें. एकंदरींत खोकरींतून किल्ल्याची वाट दाखविण्यापलीकडे पोतनिसाच्या करारप्रमाणें शेखजीनें मराठ्यांचें कांहीं एक काम केलें नाहीं.

§ ब्र. ले. ३५८; का. सं. प. या. २२; रा. खं. २ पृ. ६८; पु. द. भा. १. ले. १०२—१०८.

तथापि या मोहिमेंत शाहूचें लक्ष किती होतें आणि तो सरदारांची समजूत कशी काढीत होता, हें त्यानें बाजीरावास लिहिलेल्या खालील पत्रावरून कळून येतें. ' सहा किल्ले फत्ते झाले, उत्तम गोष्ट जाली. तुम्ही कार्यकर्ते बुद्धिमंत सेवक आहां, कार्यसिद्धि होऊन ये, तोच अर्थ संपादाल हा स्वामीस निशा आहे. तुम्ही सामदामभेदबुद्धि कर्तव्य तैसी करून महद्यश संपादणें.सर्वांचें मनोधारण करून कार्यसिद्धि करणें. रा. श्रीनिवास पंडित प्रतिनिधीकडील जमाव व सचिव पंताकडील जमाव तुम्हांसंनिध आहे त्यांचा व जे मराठे लोक भेटले असतील त्यांचा, बहुतां प्रकारें दीलदिलासा करून खर्चा वेंचास देत जाणें. उभयतां एकामतें वर्तोन सेवेचा मजुरा करून घेणें. सविस्तर फत्तेसिंग भोसले यास लिहिलें आहे त्यावरून कळों येईल, सुज्ञ असा. ' निरानिराळया सरदारांत अंतस्थ चुरस असून त्याचा परिणाम अनिष्ट होईल असा शाहूच्या मनांतील ध्वनि या पत्रांत व्यक्त होतो.

आरभीं आंगरे, प्रतिनिधि, पेशवे वगैरे सरदारांनीं सीदीची अगदीं त्रेधा उडवून दिली. जूनच्या अखेरीपावेतों मुंबईजवळचा थळचा मोठा किल्ला व पेणनदीजवळचा रावळी किल्ला सेखोजी आंगऱ्यानें सीदीपासून सर केला, त्यामुळें मुंबईस इंग्रजांस मोठी धास्ती पडली. पोर्तुगीझ लोक हबशांस मदत करीत, सबब त्यांचा चौल शहराचा भाग आंगऱ्यानें हस्तगत करण्याचा प्रयत्न चालविला. इंग्रजांचें ' रोझ ' नांवाचें जहाज त्यानें पाडाव केलें होतें, तें ७६०३ रुपये दंड घेऊन इंग्रजांस परत दिलें. सेखोजी आंगरे उत्तरेकडे गुंतला असता, त्यानें व त्याची आई मथुराबाई इनें बंकाजी नाईकास अंजनवेल, गोवळकोट वगैरे ठिकाणें काबीज करण्यास पाठविलें. बंकाजीच्या या वेळच्या पराक्रमाची हकीकत मथुराबाईनें ब्रह्मेन्द्रस्वामीस कळविलेली वाचण्यालायक आहे, ती अशी. ¶

' अंजनवेल व गोवळकोट दोनी स्थळें स्वराज्यांत झालीं, म्हणजे मोठी सुकीर्ति होईल, यास्तव बंकाजी नाईक याबरोबर जमावाची बळकटी करून रवानगी केली होती. विजयगड किल्ला सा सात रोज भांडला. चिपळुणीं एक दोन युद्धें बंकाजी नाइकाजवळ हबशानें तुंबळ दिलीं. आषाढ शु. ७ स सीदीसात तीनही गांवचा जमाव भारी करून चालून आला. हजार दीड हजार जमाव त्याचा झाला, आम्हांकडील तीनशें माणूस होतें. तेथें युद्ध बहुत तुंबळ

¶ ख. ६.८५ ता. १६-५.१७३३; ख. ३-३०५. या पत्राची तारीख ९-८-१७३३ पाहिजे.

झालें. मोड होऊन गनीम मारून काढिला, गोवळकोटांत घालविला. तों श्रीपतराव श्रीस्थळीं (परशुरामास) येऊन आपले नजरेनें युद्ध पाहिलें त्याउपर जयगडाहून तोफा व जमाव आला. § गोवळकोटास मोर्चे देऊन जागा घ्यावा, तों राजश्री प्रतिनिधि यांहीं गोवळकोटास अनुसंधान लाविलें. बंकाजी नाईक व प्रतिनिधीच्या भेटी झाल्या तों मजकूर प्रतिनिधीनें घातला कीं, गनीम सुलाखेंकरून घेतों, तुम्हांस भांडावयासी प्रयोजन नाहीं. त्या उपरी बंकाजी नाईक बोलिले, तुम्ही अंजनवेलीस जावें, त्यांचा तो जागा घ्या, आम्ही गोवळकोट घेतों. तें कबूल करीतना. त्याकडील अनुसंधान चाललें. सीदीसाताची व प्रतिनिधीची भेट झाली. त्यावरून तेथें राहून कारण नाहीं असें पाहून, बंकाजी नाईक परत आणविले. त्यामागें सीदीसातानें प्रतिनिधीशीं एक दोन युद्धें तुंबळ दिलीं. त्यांचे हातून कार्यसिद्धि होतां दिसत नाहीं. पुढें प्रसंग होईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल.' या मजकुरावरून त्या वेळची मराठे सरदारांची आपसांतली चुरस व्यक्त होते. प्रतिनिधीला सीदीचा कावा समजला नाहीं आणि त्यानें बंकाजीस मदत केली नाहीं.

बंकाजीची वर सांगितलेली गोवळकोटची निकराची लढाई ता. ८ जुलै रोजीं झाली. त्या प्रसंगीं बंकाजीनें दाखविलेली चिकाटी अप्रतिम असून त्यामुळेंच पराभव झालेला नाहींसा होऊन मराठ्यांस जय मिळाला. पराभव झाला तरी चिकाटी न सोडतां फिरून उद्योग करणें हा गुण इंग्रजांच्या संबधानें विशेष परिचयाचा आहे. प्रतिनिधीनें निराळाच उपक्रम आरंभिल्याबरोबर मथुराबाईनें बंकाजीस मोहिमेवरून परत बोलाविलें. सरलष्कर आनंदराव सोमवंशी प्रतिनिधीस सोडून जात होता, त्यास शाहूनें निषेधदर्शक पत्र लिहिलें.‡

**४ मराठ्यांचा लंगडेपणा.**—बाजीरावानें जंजिरा काबीज करण्याची शिकस्त चालविली होती. हबशाचा बराचसा मुलूख हस्तगत झाला. खुद्द जंजिरा, अंजनवेल, वगैरे चार पांच मजबूद ठिकाणें मात्र त्यांजकडे राहिलीं. तरी सीदीही मोठ्या आवेशानें लढत होते. त्यांनीं चहूंकडून कारस्थानें चालवून मदत आणिली, व निजामाचे मार्फत शाहूशीं तह करण्याचाही उपक्रम चालविला. प्रतिनिधि व पेशवे यांजमध्यें थोडासा बेबनाव असल्यामुळें मोहीमेस जोर चढला नाहीं. ते एकमेकांच्या कागाळ्या छत्रपतीस लिहून कळवीत. आपणास

§ चिपळूण, परशुराम, गोवळकोट हीं स्थळें मैल दोन मैलांच्या अंतरांत आहेत.
‡ शा. रो. ६०, ता. ३० ऑगस्ट; ऐ. प. १६—२२.

खरा हकीकत कळावी म्हणून शाहूला मुद्दाम आपल्या भरंवशाचे इसम स्वारींत पाठवून खरी माहिती आणवावी लागे. पेशव्यांचा हस्तक लिहितो. ' पांडुरंग गोविंद परभु राजश्री स्वामीनीं जंजिऱ्यास पाठविला होता, तो काल शुक्रवारी संध्याकाळी आला. त्यानें वर्तमान निवेदन केलें, की राजश्री पंतप्रधान शामळास सांगोन पाठवितात कीं तुम्ही चिंता न करणें, तुमचें अधिष्ठान मोडीत नाहीं, आपण कांहीं तुमच्या वाटेस जात नाहीं. पहिल्यानें आपण कांहीं येत नव्हतों. परंतु स्वावंदाच्या आग्रहास्तव आलों. आतां तुम्हीं कोणे गोष्टीची फिकीर न करणें. आपण तुमच्या वाटेस जात नाही. ऐसें शामळास सांगोन पाठवितात. तेणेंकरून श्यामळ खुशाल आहेत. जंजिऱ्यांत मनुष्य तर पांचशें. ऐसें सामान्य वर्तमान पांडुरंग गोविंद याणें रा. स्वामीस सांगितलें. तेणेंकरून बहुत श्रमी जाले. राजश्री नारबाही श्रमी जाले, की ' आजपर्यंत कोंकणस्थांचा लौकिक बरा जाला, परंतु या गोष्टीनें भ्रम गेला. याजकरितां श्रमी आहेत. येथें तजविजा होत आहेत, की रा. स्वामी खुद्द आपण रायगडीं येणार. रा. नारबावास राजपुरीवर पाठविणार. यमाजी शिवदेव व उदाजी चव्हाण ऐसे अंजनवेलीस पाठविणार. ऐशा तजविजा होत आहेत. राजश्री स्वामी बोलले कीं अंबाजीपंत राजपुरीस गेले आहेत, ते चार गोष्टी प्रधानांस सांगोन, कार्य होऊन येई ऐसें जालें तर उत्तम आहे. ऐसें येथील वर्तमान तुम्हास कळावें म्हणून लिहिलें आहे. प्रतिनिधीचा बहुमान बराच होत आहे. कार्यकर्ते विश्वासनिधि तर तेच. प्रतिनिधीस बहुमान कडीं तोडे व वस्त्रें पाठवूं लागले, तेव्हां राजश्री नारबांहीं व यमाजीपंतीं बहुतशी रदबदल केली, की प्रधानपंतांस बहुमान पाठविल्याशिवाय राव ( प्रतिनिधि ) घेणार नाहींत, तेव्हां उभयतांच्या आग्रहास्तव बहुमान (उभयतांस) पाठविला.' यावरून त्या वेळच्या खटपटी लक्षांत येतील. अशा द्वैधीभावाची अडचण बाजीराव व इतर मुत्सद्यास एकसारखी जाचत असे.¶

जुलैअखेरपावेतों मराठ्यांची सरशी होती. हबशी नाहींसा झाल्यानें आंगऱ्यांचा जोर वाढून शेजारीं मुंबईस आपला निभाव लागणार नाहीं अशी इंग्रजांस धास्ती पडली. आंगऱ्यांविषयीं त्यांचे मनांत नेहमींच द्वेष होता, म्हणून इंग्रजांनीं हबशास फौज, दारूगोळा, अन्नसामुग्री वगैरेचा पुरवठा केला. रेवस, थळ, चौल हीं बंदरें आंग्र्याच्या हातांत गेलीं व लवकरच उंदेरीवर हल्ला होणार

¶ खं. ६.८६, ता. १६.६.१७३३; आनंदराव सुमंताचें पत्र, ऐ. प. १८, तारीख १६.७.१७३३; ब्र. ले. ३०६

अशा बातम्या येऊं लागल्या. उंदेरी आग्र्यानें घेतल्यास आपला मुंबईचा व्यापार कायमचा बसेल अशी इंग्रजांस मोठी धास्ती वाटूं लागली. शत्रु घरांत येऊन ठेपतो असें दिसतांच इंग्रजानें उंदेरीवर ठाणें देण्याचें ठरविलें. उंदेरी किल्ला हबशांचे कबजांत होता तो त्यानें इंग्रजांस या प्रसंगीं दिला. इंग्रजांनी टॉमस होल्डन यास ' मेरी ' नांवाचें जहाज व मुबलक साहित्य देऊन उंदेरीवर रवाना केलें. कॅप्टिन इंचबर्ड हाही जहाजावर होता. इंग्रजांनीं जुलै १६ रोजीं उंदेरीवर फौज उतरवून आपलें निशाण चढविलें. तेव्हां नजीकचा खांदेरीचा किल्ला मराठ्यांचा होता, त्यावरून मराठ्यांनी उंदेरीवर मारा चालू केला. या आगळिकीबद्दल इंग्रजांचीही खोड मोडण्याचा शाहूनें विचार चालविला. ' बंदरोबंदरीचे सावकारांशीं इंग्रजांस प्रयोजन काय ? उंदेरी त्यांस श्यामलानें विकत दिली असेल तर पैके दिले असतील ते घेऊन त्यांनीं स्थळ द्यावें व सल्रख करावा ' अशी खटपट चालविली. येणेंकरून मराठ्यांचे प्रयत्न शिथिल बनले.

सेप्टेंबर महिन्यांत इंग्रजांनीं सीदीच्या मदतीकरितां एक थोरलें लढाऊ जहाज पाठविलें व जंजिऱ्यासही लहान मोठीं लढाऊ जहाजें रवाना केलीं, त्यामुळें सीदीस मोठाच हुरूप आला. तिकडे निजामानें हबशांच्या तर्फेनें कारस्थान चालविलें. निजामावर देखरेख ठेवण्याकरितां चिमाजीआपा पुण्यास राहिला. सुरतेहून सीदी मसूद हबशाचे मदतीस येणार अशी बातमी आली, तेव्हा त्यास अडवून धरण्यासाठीं शाहूनें उमाबाई दाभाडे व दमाजी गायकवाड यांस निकडीचे हुकूम पाठविले. दाभाडे व गायकवाड यांचें व बाजीरावाचें वांकडें असल्यामुळें वरील हुकूम त्यांनीं मानले नाहींत, आणि सेप्टेंबरांत सुरतेची मदत जंजिऱ्यास आली, तेणेंकरून जंजिरा बळावत चालला. आपसांतील कलह व सीदीला चहूंकडून येत असलेली ही मदत यांमुळें मोहीम फसण्याचा रंग येत चालला. इतक्यांत सेखोजी आंगरे २८ ऑगस्ट, स. १७३३ रोजीं मृत्यु पावला. तेणेंकरून चाललेल्या स्वारीला मोठीच आपत्ति उत्पन्न झाली.

संभाजी आंगरे विजयदुर्गचा कारभार पाहत असे. त्यानें जंजिऱ्याचे युद्धांत बिलकूल भाग घेतला नाहीं. पुढें तो सुवर्णदुर्गास राहिला व सेखोजीच्या मृत्यूनंतर कुलाब्यास आला. त्याचा दुसरा बंधु मानाजी बाजीरावाजवळ राजपुरीस होता. सेखोजी स्वारीची उस्तवारी करीत कुलाबा येथें असतां त्यास ज्वर येऊं लागला. ता. २१ ऑगस्ट, स. १७३३ रोजीं तो बाजीरावास लिहितो, ' सांप्रत श्रमामुळें शरीरीं अनारोग्य ज्वरादि पीडा जाली आहे. ' दुखणें विकोपास

जाईल असें कोणासच वाटलें नाहीं. ता. २५ रोजीं तो लिहितो, 'आज नऊ रोज शरीर बेजार आहे. तीन दिवस ज्वरातिशय होऊन उष्णतेमुळें नासिकद्वारें रुधिरस्राव होऊं लागला. श्रीकृपेनें आरोग्य लवकरच होईल.' 'दिवसेंदिवस व्यथा अधिकोत्तर होत गेली. पिशाच पीडाही आहे. त्यास घडीचा विलंब न लावतां पिलाजी जाधव यांस पाठवावें,' असें ता. २६ चें पत्र आलें. पिलाजी जाधव बाजीरावाजवळ राजपुरीस होता, त्यास लगेच कुलाब्यास पाठविलें. ता. २७ रोजीं मध्यरात्रीं पिलाजी तेथें पोंचला आणि दुसरे दिवशीं ता. २८ ऑगस्ट 'श्रावण व. ३० स दोन तास दिवसास सरखेल यांस वैकुंठवास जाला. सौ. आनंदीबाई व रक्षा तिघी चौघींनीं अग्निप्रवेश केला,' असें पिलाजीनें बाजीरावास लिहिलें. ‡

सेखोजीनें ब्रह्मेन्द्रस्वामीस व बाजीरावास लिहिलेली पत्रें वाचलीं म्हणजे त्यांत त्याची इभ्रत व आस्था दिसून येते. बाजीराव, संभाजी आंगरे वगैरे सर्वांशीं सेखोजीचें वर्तन गोड व अष्टपैलू होतें. कुटुंबातील बायामाणसांवर जरब व प्रेम असे. कान्होजीचा वक्रपणा त्याच्यांत नव्हता. तो अल्पायुषी झाला हें त्याच्या घराण्याचें व एकंदर राज्याचें मोठें नुकसान होय. †

जंजिरा मोहीम मुख्यतः सेखोजीचे बळावर चालली होती. तिच्यावरच आंगऱ्यांचे जीवन अवलंबून होतें. नाविक सिद्धता आंगऱ्यांना मात्र शक्य होती. सबब सेखोजी मेल्याबरोबर त्याच्या बंधूंत वैमनस्य उद्भवलें तेणेंकरून मोहीम जास्तच बिघडली ती यशस्वी न होण्याचे मुख्य कारण आंगऱ्याचा बेबनाव होय. सीदीचा जोर पाहून स्वामीनें स्वतः संभाजीस व इतरांस पत्रें लिहून बिघडलेली घडी पुनः बसविण्याचा प्रयत्न केला, पण उपयोग झाला नाहीं. संभाजी आंगरे कुलाबा येथें सरखेलीच्या पदावर दाखल झाला, तो तिरसट, उतावळा व तऱ्हेवाईक होता. भावांचें व त्याचें बरें नव्हतें. मानाजी त्याजविरुद्ध पेशव्यांस मिळून होता. स. १७३१ पासूनच संभाजीनें आपल्या तक्रारी शाहूकडे नेल्या होत्या ता. २४.१.१७३१ रोजीं साताऱ्यास जाऊन त्यानें शाहूची व राण्यांची भेट घेतली. त्यांनीं त्याचा गौरव केला. त्यानें सेखोजीच्या पश्चात् कारभारी रघुनाथ हरि यास शाहूकडे पाठविलें, तेव्हां त्याजबरोबर शाहूनें संभाजीस उत्तेजनाच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या. परंतु

‡ पे. द. ३ ले. ६५, ७०, ७२, ७५, ७८.

† शा. रो. ६१, ५८. ५९; ब्र. ले. १२८; खं. ३ ले. २४२–२६०.

संभाजीची समजूत पटली नाही. सरखेलीचे पदावर दाखल झाल्यावर त्याची त्रेधा उडाली. साबाजी प्रभु चिटणिसास लिहिलेलीं ५.१०.१७३३ ची पत्रें या संबंधांत निर्णायक आहेत. सीदी व इंग्रज यांचा एकदम जोर झाला, त्यासंबंधी आपल्या अडचणी शाहूचे कानावर घालण्यासाठी त्यानें साबाजी प्रभूस पाठविलें. बंकाजी नाइकास हे गृहकलह माहीत असल्यामुळें 'धन्याचा हुकूम झाल्याशिवाय मला गोवळकोटावर जाता येत नाही,' असे त्यानें स्वामीस ता. ६.१०.१७३३ रोजी साफ कळविलें. एवंच सरदारांत दुही उत्पन्न होऊन बहुतेक यशस्वी झालेली ही मोहीम फुकट गेली. 'फौजा येऊन मनसबा निरर्थक झाला. दुहीमुळें काम फसून गेलें. इंग्रजांचा मोठा शह आहे.' असें संभाजी आंगरे स्वामीस लिहितो. ही दुही दोन प्रकारची होती. सर्व सरदार एकाच्या. तंत्रानें चालत नव्हते. प्रत्येकास शाहूमहाराजांकडून स्वतंत्र हुकूम येत. शिवाय आंगऱ्याचे घरातील दुही होती तिचा फायदा इंग्रजांनी घेतला. कान्होजी आंगरे मरतो केव्हां म्हणून इंग्रज टपून बसले होते. तो मेल्याबरोबर त्याच्या मुलांस आपले शत्रु ठरवून त्यांचा नाश करण्याचे तह इंग्रजांनी सावंतवाडीकर व जंजिरेकर यांच्यांशीं केले. मानाजी व संभाजी याचे वाकडें पाहून मुंबईच्या इंग्रजास उत्तेजन आलें. ता. ६ डिसेंबर, स. १७३३ रोजी इंग्रज व सीदी यांनी बचाव व चढाई अशा दोनही बाबतीत एकमेकांनी एकमेकांस पूर्ण साह्य करावे असा तह ठरविला, आणि मराठ्यावर विशेषतः आंगऱ्यावर उघड शस्त्र धारण केलें. † इंग्रजांनीं मानाजीस मदत करण्याच्या निमित्तानें आपलें आरमार कॅप्टन इंचबर्डचे हाताखालीं कुलाब्यावर पाठविलें. या भानगडी वाढत चाललेल्या पाहून बाजीरावानें पुढें या प्रकरणातून अंग काढून घेतलें.

इंग्रजांच्या मध्यस्थीनें शेखजी व अब्दुल रहमान यांची व इतर सरदाराची गोडी होऊन सीदी व इंग्रज यांचा वर सांगितलेला कायम दोस्तीचा तह ठरला, त्यांत एकमेकांच्या शत्रूंस पादाक्रान्त करण्यासाठी एकमेकांस मदत करावी, आंगऱ्यांचा निःपात करावा, खांदेरीचा किल्ला आंगऱ्यांपासून घेऊन इंग्रजांस द्यावा, आणि कुलाबा जमीनदोस्त करावा, वगैरे कलमें होतीं. या तहामुळें लगेच जरी आंगऱ्याचें वांकडें झालें नाहीं, तरी बाजीरावानें मोहिमेंतून आपलें अंग काढून घेतले. डिसेंबर स. १७३३ च्या आरंभी सीदीशीं जसा

† Surat Diaries by Forest, Vol. 2, P. 61.

तसा तह करून जंजिऱ्याचा वेढा उठवून बाजीराव साताऱ्यास आला. 'सीदी अब्दुल रहमान यास जंजिऱ्यांत तख्तावर बसवून किल्ले घेतले, त्यांपैकीं रायगड व महाड हुजूर महाराजांनीं ठेवून वरकड किल्ल्यांचा बंदोबस्त बाजीरावसाहेब यांनीं केला. साडेपांच महाल हबशास देऊन वरकड सरकारांत घेतले.' हा तह [illegible] नवदरें येथें झाला. ¶

**५ सीदीसाताचा पाडाव** ( १९.४.१७३६ ) §.—बाजीराव निघून गेल्यावर संभाजी आंगऱ्यानें जंजिऱ्याची मोहीम तशीच शाहूच्या हुकुमानें पुढें चालविली. अंजनवेल व गोवळकोट काबीज झाल्याशिवाय युद्ध बंद करणें शाहूस पसंत नव्हतें. ता. १४ जानेवारी, स. १७३४ रोजीं तो फोंड सावंतास लिहितो, 'अंजनवेलीस शह देऊन स्थल हस्तगत करावें, अशी संभाजी आंगरे यास आज्ञा केली आहे. त्यांजकडील प्रांतास उपसर्ग न लावणें, ते तुम्हांस उपसर्ग लावणार नाहींत. नारो राम मंत्री यांस येविशीं आज्ञा केली आहे, ते तुम्हांस लिहितील.' ता. २५ डिसेंबर, स. १७३४ त गोवळकोटास फौज रवाना करण्याविषयीं आनंदराव सोमवंशी सरलष्कर यास आज्ञा आहे. फौजा जमविण्याविषयीं या वेळच्या शाहूच्या आज्ञा, जीव तोडतोडून लिहिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें वतनदार मराठे सरदारांस ऑगस्ट ता. १६ स. १७३५ ची शाहूची ताकीद आहे; आणि ता. २६ डिसेंबर, स. १७३५ ला उमाबाई दाभाडे यांस लिहिलेलें पत्र असून त्यांत 'कोंकणचे मसलतीस आज तीन वर्षें झालीं' असा मजकूर आहे. ता. १ ऑक्टोबर, १७३६ चे पत्रांत उदाजी पवार यास कोंकणांत फौज पाठविण्यास आज्ञा केली आहे. सारांश, परशुराम-क्षेत्राजवळील अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें मराठ्यांनीं काबीज करावीं असा ब्रह्मेन्द्रस्वामीचा आग्रह सारखा चालू होता; आणि शाहूनेंही त्या कामीं पूर्ण लक्ष ठेवलें होतें. उदाजी पवार, देवराव मेघशाम, हरि मोरेश्वर राजाज्ञा, शेखमिरा, बाजी भीवराव, वगैरे सरदार शाहूच्या आज्ञेनें या कामीं वावरत

---

¶ शा. रो. १४०, १४१; खं. ६. ८७, ८८; खं. ३. ३३१; ब्र. च. पृ. ५४, ५६, ५८ वरील पत्रें; ता. १७.४.१७३० चे तह, एचिसन पहा; Anderson's Western India; भा. व. २ सीदींची इ०; पे. ब. खं. ४; पे. द. ३३.१३१, १३६; पे. द. ३. ५६, १००, १०२.इ०

§ शा. रो. ले. ६२, ६६—६८, ७०, १९३, २६८ व २६९.

होते. दरम्यान सीदीसातास फितविण्याचाही उपक्रम शाहू व स्वामी यांनीं आपापल्यापरी चालविला.

संभाजी व मानाजी यांच्या तंट्यामुळें जंजिऱ्यावरील मोहिमेचा परिणाम निष्फळ होत चालला. स. १७३४ त 'राजश्रींनीं उदाजी पवारास श्यामलावर पाठविला, त्याजबरोबर वाडी पाचाड येथें सीदी अंबर अफवानी युद्धास उभा राहिला. त्याचा मोड करून अफवानीचें शीर कापून आणिलें. महाड, बाणकोट हस्तगत केला. रायगडचे मोर्चे उठविले. मग गोवळकोटावर गेला, तेथें राजश्रीकडील बाबूराऊ यांसी न पटे म्हणून परत आले.' बाणकोट फत्ते जाल्याची बातमी १४.३.१७३४ रोजीं आली. तथापि शाहूनें व स्वामीनें हबशाचा पिच्छा मनांतून सोडिला नव्हता. स. १७३६ चे आरंभीं पिलाजी जाधवास शाहूनें कोंकणांत पाठविलें. पिलाजीनें बाणकोट काबीज करून पुढें गोवळकोट व अंजनवेलवर चाल केली. §

या आक्रमणास आळा घालण्याचा सीदीसातानें सपाटा चालविला. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी शाहूनें चिमाजी आपास मुद्दाम कोंकणांत पाठविलें. सीदीसात व त्याचे पराक्रमी साथीदार आरमार व फौजा घेऊन नागोठण्याच्या खाडीच्या तोंडाशी रेवास बंदर आहे, तेथून सागरगडावर येऊं लागले, त्यांचा बंदोबस्त आंगऱ्याचे हातून न होतां उलट इतके दिवस केलेला उद्योग फुकट जाण्याची वेळ आली. म्हणून मानाजीच्या आग्रहावरून चिमाजी आपा मुद्दाम घाईघाईनें कोंकणांत ता. २० मार्च, स. १७३६ रोजीं गेला. मानाजीचा बचाव करणें हेंही त्याचें अगत्याचें काम होतें. रेवासनजीक कामारलें तर्फ श्रीगांव येथें सीदीची व मराठ्यांची लढाई झाली. सीदीची दोन अडीच हजार फौज लढाईस आली, पैकीं १३०० लोक कापले गेले. मराठ्यांकडील ८०० माणूस कामास आले. मानाजी आंगऱ्यास उरांत गोळी लागली. सीदीसातास नानाजीराव सुर्वे यानें स्वतः ठार केला त्यांत त्याला २७ जखमा लागल्या, ह्याबद्दल त्यास कुसगांव इनाम मिळाला. 'राज्य घेईन, नाहीं तर मरून जाईन,' अशा निकरानें सीदीसात लढला. त्यास पळून जाण्यास चिमाजीनें संधि दिली असतां तो पळून गेला नाहीं, उलट जास्त त्वेषानें चालून आला, तेव्हां चिमाजीनेंही शिताफीनें चरईनजीक चाल करून

§ भा. व. श. पृ. १०; ब्र. ले. २७८; इ. सं. ऐ. चरि. १.७.

.... मारिलें (ता. १९.४.१७३६). 'सीदीसात खासा, उंदेरीचा सीदी याकूब, कृष्णाजी व सुभानजी घाटगे, कोंडनाईक व बाळाजी शेणवई ऐसे ठार पडले. महाराजांचे प्रतापें, कै. नानांचे व पंतप्रधानांचे आशीर्वादें चिमाजी आपांस थोर यश आलें.' हें यश घेऊन मानाजी व चिमाजीआपा कुलाब्यास आले. उंदेरीचा किल्लेदार सीदी याकूबही वरील लढाईत मारला गेला. या विजयानें मराठमंडळास मोठा आनंद झाला. शाहू, ब्रह्मेन्द्रस्वामी, फत्तेसिंह भोसले, जिवाजी खंडेराव चिटणीस या सर्वांनीं चिमाजीचें अभिनंदन केलें, कीं 'सीदीसात केवळ रावणासारखा दैत्य, तो मारून हबशांचा मूळ कंदच उपटून काढिला. चहूंकडे लौकिक विशेषात्कारें जोडिला.' बहुमानवस्त्रें, हिरेजडित पदक, मोत्याची कंठी, रत्नखचित तलवार, असे वस्त्रालंकार शाहूनें चिमाजीस अर्पण केले. हबशाचे दोन प्रबळ सरदार पडल्यामुळें त्यांच्या दोन पक्षांपैकीं एक मोडला जाऊन, दुसऱ्याचा प्रमुख सीदी रहमान यानें पेशव्याशीं पूर्वीचा तह कायम करून युद्ध थांबविलें. अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें तूर्त हबशाकडे राहिलीं.§ पैकीं अंजनवेल तुळाजी आंगऱ्यानें ता. २३ जानेवारी, स. १७४५ रोजीं व लगेच गोवळकोटही घेतला. परशुरामक्षेत्राजवळचा हा किल्ला कबजात आलेला पाहण्याचें भाग्य ब्रह्मेन्द्रस्वामीस लाभलें, ती हकीकत पुढें सांगितली आहे.

**६ पर्यालोचन.**—जंजिरा-स्वारीतील एक महत्त्वाच्या चर्चेचा राजकारणी विषय म्हणजे पेशवा व प्रतिनिधि यांचा बेबनाव हा होय. पेशव्यांच्या व प्रतिनिधीच्या पुरस्कर्त्यांनीं या प्रकरणांत एकमेकांवर तोंडसुख घेतलेलें दृष्टीस पडतें, त्यावरून वस्तुस्थितीचा बराच विपर्यास झालेला आहे. प्रतिनिधि, सुमंत व नारबाबा मंत्री हे तीन इसम शाहूच्या मर्जीतले, पण बाजीरावाप्रमाणें स्वयंस्फूर्त किंवा कर्तबगार नव्हते. बाजीराव व चिमाजी हे अल्पवयी अनुभवहीन पोर अशा समजुतीनें वरील तिघे त्यांच्याशीं वागत गेल्यामुळें प्रथमपासूनच हे दोघे आपला कार्यक्रम स्वतंत्र ठेवून वरच्यांशीं संबंध येईल असें काम पत्करीत

§ ब्र. ले. ३६४, २८१, १२९, १३०, २७, ४६, १३६; खं. १०. ३७८. तह व करारमदार पृ. १०७; ऐ. चरि. १.७ पिलाजी जाधवाचीं पत्रें; ऐ टि. १.५, व २.२१, इ. सं. आगऱ्यांची हकीकत, खं. २ पृ. १०१; पे. द. भाग ३ व ३३ भरपूर; व भाग ३१ ले. १३८.

नसत. याचा परिणाम असा होई, कीं हे पेशवे बंधु आपला स्वार्थ पाहतात, धन्याचें नुकसान करितात, वेळी त्याच्या आज्ञा पार झुगारून देऊन आपल्याच मुखत्यारीनें वाटेल ती कामें परभारें उरकतात, अशी समजूत ते शाहूची करून देत. यास्तव शाहू मुद्दामच त्या दोघां स्वयंवृत्त तरुणाना आळा घालण्याकरितां त्यांच्याशीं या इतराची सांगड घालून देई. जंजिऱ्यासारख्या जवळच्या प्रकरणात शाहूची ही दखलगिरी थोडीबहुत चाले, माळवा दिल्लीसारख्या दूरवर्ती कामांत शाहूला तें शक्य नव्हतें. सीदी रसूल मरण पावल्यावर यशवंतराव पोतनीस व प्रतिनिधि यांनी जंजिरा-प्रकरणांत हस्तक्षेप करून प्रत्यक्ष युद्धाशिवाय युक्तीच्या वाटे आपले मतलब साधण्याची योजना बनविली, तेव्हा ती त्यांच्याच मार्फत सिद्धीस नेणे अवश्य असल्यामुळे शाहूने प्रतिनिधीस कोंकणांत पाठविले आणि सीदीचा कजाख स्वभाव जाणून काही कडू प्रसंग आल्यास युद्धाची योजना बाजीरावाकडे सुप्रत केली. बाजीरावाच्या तल्लख स्वभावाला प्रतिनिधीचा सौम्य तडजोडी बाणा खपणारा नव्हता, त्यामुळें आरंभी काम थोडेसे नासत गेलें.

प्रत्यक्ष लढण्यावांचून समक्ष वाटाघाटीनें प्रकरण निकालांत आणावें अशी बुद्धि प्रतिनिधीची, शिवाय संग्रामविषयक डावपेचांत तो कच्चा, यामुळें त्याच्या शिष्टाईंत वैगुण्य आलें, आणि बाजीरावानें सत्तेच्या जोरावर आंगऱ्यास आपले बाजूस वळवून प्रतिनिधीचा बोजवारा उडविण्याचा थोडा बहुत प्रयत्न केला. अशी चुरस सामान्यतः युद्धासारख्या मोठ्या कामांत सर्वत्र आढळते, तिचा दोष मुख्यतः धन्याकडे येतो. स. १७३३ च्या जून महिन्यात प्रतिनिधि गोवळकोटावर दाखल झाला, तेथें सीदीसातानें त्यास भूलथापा देऊन फसविले. पुढें निजामाच्या मार्फत मराठे-सीदीची तहाची योजना ठरून आनंदराव सुमंत निजामाचा वकील घेऊन राजपुरीस बाजीरावाचे भेटीस गेला, तेव्हां प्रतिनिधि ता. २७ ऑक्टोबर रोजीं आपली छावणी आवरून साताऱ्यास परत गेला.

बाजीरावाची व प्रतिनिधीची तक्रार कशी उद्भवली तें मागें दर्शविलें आहे. बंकाजी नाईक हा आंगऱ्यांचा शूर सरदार, सुवर्णदुर्गचा किल्लेदार बाजीरावाचे आज्ञेंत वागत होता. तो प्रतिनिधीचें साह्य करीना. बाजीरावानें त्यास कळविलें, ‘ श्रमसाहस तुम्ही कराल आणि प्रतिनिधि यशास पात्र होतील तो प्रकार न

करणें, त्यांस यश न देणें ' अशी आज्ञा बाजीरावानें बंकाजीस दिली. ' प्रतिनिधि व तुम्ही एक होऊन काम करतां म्हणोन कळों येतें, तर हे गोष्ट कार्याची नव्हे. आपल्या राजकारणांत दुसऱ्याचा हात शिरूं देऊं नये, त्यांचा दम पुरा द्यावा, तदुत्तर कर्तव्य प्रसंग तो करावा ' अशीं पत्रें बाजीरावानें सखोजी आगरे वगैरे प्रमुखांस पाठविलीं. त्यावरून बंकाजी नाईक मोहीम टाकून परत सुवर्णदुर्गास गेला आणि गोवळकोटचें काम बिघडलें. प्रतिनिधीला या कारवाई-बद्दल अत्यंत उद्वेग उत्पन्न होऊन तो मोहीम सोडून परत गेला. ' गनीम कायम राहिला आणि प्रतिनिधीची शत्रुता आंगऱ्याचे पदरी पडली, ' असा या अंतर्वितुष्टाचा परिणाम घडला. प्रतिनिधीचा पुतण्या गंगाधरपंत विशाळगडावर होता त्यास त्यानें आपल्या मदतीस गोवळकोटास आणिलें, पण तेवढ्यानें काम भागलें नाहीं. अंजनवेल घेतल्याशिवाय परत फिरणार नाहीं असें त्यानें अनेकदा महाराजांस कळविलें होतें, पण त्यास माघार घ्यावी लागली. शाहूला पेशव्याचा हा दुःस्वास पसंत पडला नाहीं; त्यानें बोलून दाखविलें, " निजामाच्या बिघाडाच्या वेळेस प्रधानपंतांनी निःसीम महत्कार्य केलें. स्वामिकार्य काय तें तितकेंच, बाकीचे उद्योग केले ते केवळ आपल्या उपयोगाचे केले. " [1]

पण आज विसाव्या शतकाच्या सुधारणेच्या काळांत देखील असले स्वयंविघातक प्रसंग पृथ्वीच्या पाठीवर कांहीं थोडे घडत नाहींत ; आणि प्रतिनिधि-पेशव्यांच्या वरील चुरशीवरून एकंदर मराठी राष्ट्राच्या कर्तबगारीची कल्पना बांधणें अयोग्य होईल. वरील चुरस केवळ अल्प व वैयक्तिक स्वरूपाची होती. ती घडली नसती तरी एकंदर स्वारीचा परिणाम विशेष निराळा झाला नसता, मोहिम पूर्ण यशस्वी न होण्यास बाह्य कारणेंच बलवत्तर होतीं. शाहू, बाजीराव व सेखोजी आंगरे या तिघांच्या लेखांत स्वारीचे दोष व फलितार्थ यांची चर्चा सहजगत्या येऊन गेलेली स्मरणीय आहे. कोणताही नवीन मनसबा हातीं घेतांना बाजीरावास अडचणी कशा येत त्यांचें मार्मिक वर्णन अनेकानी छत्रपतीस लिहिलेलें इतिहासाभ्यासकांनीं विशेष लक्षांत ठेवावें. सत्ता महाराजाची. कर्तृत्व बाजीरावाचें, या दोहोंचा मेळ बसला नाहीं म्हणजे कारभारांत घोटाळे

[1] यासबंधाचे कागद विपुल आहेत. पहा पे. द. भा. ३ ले. १५, १९, २१, ३३, ३६, ३७, ३८, ८२, ९८, १२३; भा. ३३ ले. ४८, ६२, ६९ इ०

उत्पन्न होत. यश आलें तर हे आपल्या स्वहितावर नजर देतात, अपयश आलें तर हे महाराजांची मर्जी संभाळीत नाहीत, असा शाहूचा ग्रह होई. त्यातून जंजिरा, मिरज सारख्या जवळच्या मोहिमाची चिकित्सा जशी शाहूस करतां येई, तशी माळवा–दिल्लीकडच्या प्रचंड घडामोडीची येत नसे. जंजिऱ्याचे मोहिमेंत बाजीरावाला यश न येण्याचें कारण वरील द्विमुखी कारभार होय. बाजीराव महाराजास लिहितो, "शामलास साह्य (इंग्रज, फिरंगी, सुरतवाला नबाब यांचें) जबरदस्त जालें. महाराज सर्वजाण आहेत. दीर्घ दृष्टीनें विचार करून ठरवितील. आम्ही सेवक लोक, ज्या गोष्टींत महाराजांचा नक्ष व कीर्ति तेंच आम्ही सांगावें, महाराजांनी चित्तांत आणून कर्तव्य तें करावें. सेवक लोकांस दुसरा विचार काय ! सर्व अख्त्यार धन्याचा. धन्याची आज्ञा होईल तें करावें. महाराजांस अशक्य काय आहे ? पदरी फौजांचे सरदार आम्ही त्रिवर्ग (स्वतः, चिमाजी व नाना) व सेनापति, सरलष्कर, शंभुसिंग जाधव, कान्होजी व राणोजी भोसले, हिमत बहादर उदाजी चव्हाण, भुईंजकर जाधव, पवार वगैरे सरदार मबलग आहेत. सर्व चित्तावर धरून करतील तर काय नव्हे ? कुल फौजा जमा करून तिकडे निजामास पायबंद द्यावा, इकडे कोंकणचा मनसबा राखावा. जो फौज घेऊन चाकरीस येईल आणि चाकरी करील त्याचा बहुमान करावा. जो आज्ञेप्रमाणें वर्तणूक न करील त्याचा धंदा परिच्छिन्न काढून, दुसऱ्याकडून काम घ्यावें, म्हणजे न होयसें काय आहे ? चाकरीस अंतर पडलियावरी धनी इतराजी करतात असें चाकराचे चित्तांत आलें म्हणजे ते दुरुस्ती करितील. परंतु यातायात आहे. महाराजांनी विचार करणें तो पोख्ता करावा." †

एका मोठ्या पत्रांतला हा अल्प उतारा आहे. शाहूचा ढिलेपणा यांत बाजीरावानें मोठ्या नम्रतेनें त्याचे नजरेस आणला आहे. शाहूच्या प्रभावळीतले कित्येक सरदार कुचराई करतात, कामें उठवीत नाहींत, असें बाजीराव सांगतो. वरील नामावळींत सिंदे होळकरादि पेशव्यांचे हस्तकांचा निर्देश नाहीं. यामुळेंच बाजीरावास थोडा बहुत स्वतंत्र पंथ पहावा लागला. कर्तबगार पुरुषास दुसरा उपाय नाही. वरील दोनही कागद अभ्यासकांनी नीट विचारांत आणावे.

† पे. द. ३३.७९. पे. द भा. ३ ले. ४३ त शाहूनें आपले विचार सेखोजीस कळविले त्याला हें बाजीरावाचे उत्तर आहे. दोन्ही अभ्यसनीय आहेत.

' या कामास सत्ता एकरूप असावी, म्हणजे चाकर लोक ठिकाणी राहून शत्रु पादाक्रान्त होईल ' अशा मतलबाचे उद्गार सर्व अनुभवी सरदारांच्या लिहिण्यांत वारंवार आलेले या स्वारीचें मुख्य व्यंग व्यक्त करितात, तें ध्यानांत ठेवले, म्हणजे झालें हेंच पुष्कळ असें म्हणावें लागतें. इतकेंच नाही, पण मे, स. १७३३ पासून एप्रिल, स. १७३६ पावेतोंच्या तीन वर्षाच्या या स्वारीत शौर्याचे, पराक्रमाचे, निःस्वार्थ राष्ट्रसेवेचे प्रसंग काही थोडे घडले नाहीत. अनेक सरदाराच्या भांडाभांडीच्या भारुडांत वरील स्मरणीय प्रसंग खरें म्हटलें असता झांकून गेले आहेत. स. १७३४ चे जानेवारीत सीदीनें पाचाड हस्तगत करून पुढे तो रायगडावर चढणार तों मराठ्यांनी बेर तुंबळ युद्ध केलें. हरि गणेश राजाज्ञा, उदाजी पवार, बाजी भीवराव, सोमवंशी बंधु अशांनी शिकस्त करून गनीम मारून काढिला. त्याचा मुख्य सरदार सीदी अंबर अफवानी मारला गेला. शेंकडों लोक कापले. सारांश यश घेऊन स्वामिकार्य साधलें ( ता. १० जानेवारी, स. १७३४ ). शाहूला फार खुशाली होऊन त्यानें लिहिलें, " आफवानीचें डोचके कापून आणलें आहे तें हुजूर पाठविणे, हबशी सांपडले असतील त्यांची डोचकीं मारणें. " रायगडच्या या लढाईत शाहूचा पहिला विरोधक पण आतां त्याचा एकनिष्ठ सरदार बनलेला कृष्णराव खटावकर मारला गेला. ¶

बाणकोटचा संग्राम असाच स्मरणीय बनला. हा किल्ला सीदीच्या कबजात होता, तो काबीज करण्याची आज्ञा महाराजानी हरि मोरेश्वर राजाज्ञा यास केली. राजाज्ञानें पु. द. १.१०० च्या पत्रात आपली तयारी महाराजांस कळविली. मराठ्यांनी तो किल्ला ता. ८ मार्च, स. १७३४ रोजी घेतला. त्या कामीं बाजी भीवराव वगैरे सरदारांनी जिवापाड कष्ट केले. सीदींनी वारंवार हल्ले करून मराठ्यांचे हातांतून तो किल्ला ता. ५ डिसेंबर, स. १७३५ रोजीं परत घेतला, त्या प्रसंगांत पेशव्यांचा सरदार हरि गणेश मारला गेला, त्या समागमे वीस सरदार भले व दोन तीनशें माणूस मारले गेले. अशा किती तरी प्रसंगांत लहानापासून थोरांपर्यंत मराठ्यांनीं अप्रतिम शौर्य व धाडस प्रगट केलें. पे. द. ३.१२८ चें चिमाजीचें शाहूस लिहिलेलें पत्र उद्बोधक

¶ पे. द. भा. ३३ ले. १४९-१५२.

आहे. ‡ गोवळकोटावर, अंजनवेलीवर बारा वर्षे पावेतों किती हल्ले झाले, किती मोर्चे बसले व मारले, किती लोकांचा संहार झाला, त्याचे पूर्ण तपशील काढण्यास स्वतंत्र हिशेबनीस बसवावे लागतील. बाबूराव जोशी घोटवडेकर गोवळकोटावर ता. १३ मे, १७३४ त मारला गेला. † जंजिऱ्याची स्वारी आपसांतील भांडणामुळें निष्फळ झाली असें जे प्रतिपादित असतील त्यांनी पे. द. च्या ३ व ३३ या दोन भागांत मिळून ७०० कागद प्रसिद्ध झालेले वाचावे म्हणजे पुष्कळसे विपर्यास निरास पावतील.

मराठशाहीतले सर्व प्रमुख सरदार व मुत्सद्दी चार वर्षेपावेतों या प्रकरणात गुंतले होते. आंगऱ्यांचें घराणें तर सर्वस्वी त्याच कामीं खपलें. बाजीराव व चिमाजी आपा ह्यांनी त्यात आपली एकंदर तपश्चर्या खर्चिली. पिलाजी जाधव, बाजी भीवराव, फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधि, तुबाजी अनंत, रामचंद्र हरि व बंधु गोविंद हरि ( पटवर्धन ), दाभाडे मंडळी, भाटम, सोमवंशी वगैरे समस्त कुटुंबे राष्ट्रसेवेच्या भावनेने व स्वधर्मरक्षणाच्या आंचेनें त्यांत झगडली. मावळे, कोळी, महार, हेटकरी असे जितके म्हणून शाहूच्या दृष्टींत आले त्या सर्वांस त्यानें या स्वारीत रवाना केलें. पाण्यासारखा पैसा ओतला. समजुती काढल्या. चार वर्षे पावेतो शाहूला दुसरा निदिध्यास नव्हता. या उद्योगाचा समुचित परिणाम एवढा झाला, की ' जिवाचा सत्का माल व इजतीचा सत्का जीव ' § ही उदात्त शिकवण मराठमंडळांत उत्पन्न झाली. याच पहिल्या कमाईवर मराठशाहीचा पुढील संसार वृद्धिंगत झाला. जंजिऱ्याच्या प्रकरणाची ही नैतिक बाजू पुष्कळांच्या लक्षांतून सुटते. स्वतःला हलकें समजण्याची जणूं आपल्या राष्ट्राला खोडच फार वर्षांच्या दास्यस्थितीनें लागलेली आहे. दुर्गुण दाखवितांना खरे गुण झांकण्याची जरूर नाही.

बाणकोट हातचा गेलेला ऐकून शाहूची चित्तवृत्ति पराकाष्ठेची क्षुब्ध झाली. तोच आवेश त्यानें चिमाजीच्या व पिलाजी जाधवाच्या ठिकाणीं उत्पन्न करून त्यांस लगबगीनें सीदीवर रवाना केलें. चिमाजीनें जाऊन तडकाफडकी सीदीसातास गांठून त्याचें व तेराशें माणसांचें कंदन करून मोठा कीर्तिघोष

‡ पे. द. ३३.१४०, १७०, २५६.

† पे. द. ३३.१९३. § पे. द. ३. १३५. जिवासाठीं संपत्ति द्यावी, पण मानासाठीं जीव द्यावा. वित्तं त्यजेज्जीवितार्थे मानार्थे जीवितं त्यजेत ।

संपादिला. हें मागें विस्तारानें सांगितलेंच आहे. या एकंदर संग्रामांचे वाङ्मय प्रचंड बनलेले असून त्याचा अभ्यास कसोशीनें झाला पाहिजे.

मुंबईचे इंग्रज, चौलचे पोर्तुगीझ, सुरतेचे मोगल व औरंगाबादचा निजाम या सर्वांनीं मराठे-सीदींच्या युद्धांत सीदीला हस्तें परहस्तें एवढें साह्य केलें, कीं त्यांना एकदम तोंड देणें मराठ्यांना शक्य झालें नाहीं. 'इंग्रज फिरंगियांस स्वामी बंदावरी ठेवतील, तर श्यामलाचा हिसाब नाहीं, मारून मोकळाच करूं,' असें संभाजी आंगऱ्यानें पेशव्यास कळविलें. इंग्रजांची कारवाई व शक्ति स. १७३५ त देखील केवढी भारी होती याचा अंदाज वरील पत्रांत भरपूर मिळतो. आज जशा इतर अठरापगड जाती हिंदूंच्या विरुद्ध एक होतात, तसाच देखावा जंजिरा-युद्धांतही पूर्ण प्रत्ययास आला, हें लक्षांत ठेविलें म्हणजे निजाम-सीदीसारखे जवळचे शत्रु पेशव्यांनी कायमचे नष्ट केले नाहींत याबद्दल आश्चर्य वाटणार नाहीं. खुद्द सीदी देखील मोठ्या आवेशानें व निकरानें झगडले हेंही विसरून चालणार नाहीं. मलिकंबरच्या वेळेपासून जंजिरेकर सीद्याचा पराक्रम व आत्मविश्वास एवढा दुर्दम्य बनलेला दिसतो, कीं मराठ्यांचें राज्य कधींच संपलें, पण सीदी आज तीनशें वर्षें जंजिऱ्यास कायम आहेत.

दुसऱ्या एका दृष्टीनें या जंजिरा-मोहिमेचा विचार कोणी करीत नाहीं. बाजीराव व चिमाजी हे आपल्या वडिलांबरोबर कोंकणांत कधीं गेले होते कीं नाहीं कोणास ठाऊक; पण जंजिरा स्वारीच्या चार वर्षांत दोघांनाही तेथें प्रत्यक्ष खपून व हुकमत राखून जो अनुभव आला, त्यामुळेंच त्यांना वसईच्या प्रकरणांत पोर्तुगीझांसारख्या प्रवीण नाविकांवर मात करतां आली. कोंकणची भौगोलिक रचना, पर्जन्य, नद्या नाले, माणसांचा व जनावरांचा संचार, समुद्रांत व किनाऱ्यावर उद्भवणाऱ्या अडचणी आणि त्यांचें निवारण करण्यास लागणारी नानाविध साहित्याची तयारी या सर्व गोष्टी त्यांना जंजिरा-स्वारींत माहीत झाल्या, म्हणूनच पुढें वसईची मोहीम त्यांना यशस्वी करतां आली. देवा-ब्राह्मणांची ही कोंकणभूमि परचक्रापासून सोडविल्याचा योग्य अभिमान छत्रपति शाहू व पेशवे यांस नेहमीं वाटूं लागला तो उगीच नाहीं. एक लेखक येसाजी रघुनाथ खालील मार्मिक सवाल बाजीरावास टाकतो. ‡

§ पे. द. ३.१३७, १४४, १६५, १७५, १७९, १८९, १८७, १९२ व १९८.

‡ पे. द. ३३. १४२.

' स्वामींची कीर्ति दिगंती होऊन दिवसेंदिवस यशाची अभिवृद्धि होत आहे. परंतु आपले चित्तांत ऐसें नये कीं कोंकणांत एखादा जागा आपलामा करून जैसी वरघाटें कीर्ति तैसी तळकोंकणांत व सागरांत व्हावी. परंतु वरघांटी एक द्रव्यच मिळेल. कोंकण म्हणजे नवनिधि आहे. कोंकण आपले वतनादाखल आहे. नुसती नजर टाकली तर सिद्धीस जाईल ऐसें आहे. चित्तांत आणून लिहिल्याचें सार्थक होय तें करणें. '

बाजीराव-चिमाजीचे अपुरे कार्यभाग पुढे नानासाहेबानें युक्तीनें सिद्धीस नेले. शाहू व नानासाहेब यांनीं अंजनवेल व गोवळकोट हीं स्थलें काबीज करण्याची कामगिरी बाजीरावाचे पश्चात् तुळाजीस सांगून इंग्रजांनीं या कामीं ढवळाढवळ करूं नये अशी तजवीज केली. तुळाजीनें एका झपाट्यांत ता. २३ जानेवारी, स. १७४५ रोजीं अंजनवेल व लगेच गोवळकोट हस्तगत केले. अंजनवेलचें नांव गोपाळगड ठेविलें. तुळाजी शाहूमहाराजांचे भेटीस सातान्यास गेला. तेथे महाराजांनी त्याचा मोठा गौरव केला. याच वेळी उंदेरी व खुद्द जंजिरा घेण्याचा पेशव्याचा विचार होता, तो सिद्धीस गेला नाहीं. ता. २९ जानेवारी, स. १७६० रोजीं उंदेरी हस्तगत झाली, पण खुद्द जंजिरा मराठ्यांना जिंकता आला नाही. गोवळकोट व अंजनवेल काबीज करणारा एवढा पराक्रमी तुळाजी आंगरे पुढें पेशव्याच्या विरोधास बळी पडलेला पाहून खेद वाटल्याशिवाय राहत नाही. ¶

पश्चिम किन्यावरील राजकारण व युद्धपद्धति माळवा, गुजरात, बुंदेलखंड या प्रांतांच्या परिस्थितीहून अगदीं भिन्न व बाजीरावाच्या गनिमी काव्याला दु:साध्य होती. त्याच्या एकंदर हयातींत जंजिरा-स्वारीचा सहा महिन्यांचा काळ कर्तृत्वाच्या दृष्टीनें विफल गेलेला दिसतो. भर पावसाळ्याचे सबंद दिवस तो तेथें अडकून पडला. त्याचें अंतःकरण त्या कामांत बिलकूल रंगलें नाहीं; आणि त्यानें सवड सांपडतांच त्यांतून आपलें अंग काढून घेतलें यांतच राज्याचें कल्याण झालें. सीदी, आंगरे व पोर्तुगीझ यांचीं भानगडीचीं प्रकरणें चिमाजीनें तडीस नेलीं, यावरून कोंकणची परिस्थिति व दर्यावरील संग्राम हे विषय बाजीरावापेक्षां चिमाजी आपासच ज्यास्त साध्य झाले. या अडचणीच्या प्रकरणांतून बाजीराव मुक्त झाल्यामुळेंच स. १७३५ पासूनच्या पुढील चार

¶ ढबूकृत कुलाबकर आंगरे शका० व समा०; पे. द ३१. १३८; भा. व. श.

वर्षांत त्याला उत्तरहिंदचे व्यवहार झपाट्यानें उरकतां आले. शाहूची देखील या संबंधानें समजूत पडलेली दिसते.

जंजिरा व वसई हीं दोन मराठ्यांच्या इतिहासांतलीं महत्त्वाचीं प्रकरणें असून सीदीसाताचा वध व वसईचा पाडाव या दोन बनावानीं त्या इतिहासास पराकाष्ठेचा उजाळा प्राप्त झाला, ही गोष्ट मराठशाहीच्या अखेरपर्यंत सर्व मराठे अभिमानानें बोलत. या दोन विषयावर पेशवे-दप्तराचे चार भाग खर्ची पडले आहेत, त्यांतले बाराशे कागद सर्वच अभ्यासकांना उपयुक्त वाटतील. तथापि या पत्रसंभारांत जंजिरा व वसई या दोन प्रकरणांतला विशिष्ट भेदही तितकाच दृग्गोचर होतो. राजकारणाच्या व शाहूच्या दृष्टीनें ज्या भानगडी, अव्यवस्था किंवा वैयक्तिक रागद्वेष जंजिराप्रकरणात उद्भवले, तसले प्रकार वसईच्या बाबतींत निर्माणच झाले नाहीत. खुद्द शाहूनें जंजिरा-प्रकरणांत जें लक्ष घातलें, तशी ढवळाढवळ त्यानें वसईसंबंधानें केली नाहीं. वसईचा इत्थंभूत कारभार एकहाती चिमाजीआपाकडे होता आणि क्वचित् एखाद्या विशिष्ट बाबतीपलीकडे शाहूचे हुकूम आणण्याची त्याला जरूर पडली नाहीं. परंतु जंजिरा-प्रकरण म्हणजे बारभाईची खेती. आंगरे, सीदी, इंग्रज, पोर्तुगीझ, निजाम, सुरतेचे व दिल्लीचे मोगल इतक्या बाह्य मंडळींचे हितसंबंध जंजिरा-प्रकरणात गोवले गेले, त्यांशिवाय खुद्द शाहू व त्याचे हस्तक प्रतिनिधि, सुमंत, नारो राम, फत्तेसिंग भोसले अशा अनेकांची ढवळाढवळ त्यांत चालू राहिली ब्रह्मेन्द्रस्वामीचें तर त्यात सर्वस्वच गुंतलेलें होतें. यामुळें जंजिराप्रकरणचे कागद जसे भिन्न मनोविकारांनीं चित्ताकर्षक वाटतात तसे वसईचे वाटत नाहीत. वसईच्या कागदांत बाह्य भानगडी नाहीत, सर्व कारभार एकसूत्री आहे. वेढेमोर्चे, दारूतोफांचे संग्राम, प्राणहानि, खर्च अशा बाबतींची एकाच फर्म्याची वसईचीं वर्णनें वाचतांना मनास कंटाळा येतो. दहावीस ठिकाणीं तीन वर्षेपावेतों हे संग्राम सारखे एकाच स्वरूपाचे बनल्यामुळें त्यांत विविधता उत्पन्न झाली नाहीं. म्हणून युद्धविषयांत वसईचे कागद उपयोगी पडतील, तितके जंजिऱ्याचे पडणार नाहीत. पण राजकारणाच्या व मनुष्य-स्वभावाच्या भानगडी जशा जंजिराप्रकरणांत व्यक्त झाल्या, तशा वसईत झाल्या नाहीत, हा या उभय स्वाऱ्यांचा भेद मार्मिक वाचकांना स्मरणीय वाटेल.

**७ ब्रह्मेन्द्रस्वामीचें जीवनचरित्र.**—पेशव्यांचा उदय होण्यास ब्रह्मेन्द्र स्वामीचें वजन पुष्कळसें कारण झालें. थोड्याबहुत अंशानें स्वामी ही एक

त्या वेळीं राजकारण बनविणारी व्यक्ति होती. यास्तव त्याचें जीवनचरित्र व कामगिरी यांचा निर्देश मराठ्यांच्या इतिहासात अवश्य होय.

वऱ्हाडांत दुधेवाडी गांवी महादेवभट नांवाचा एक ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण राहत असे. त्याच्या पत्नीचें नांव उमाबाई. त्यांना स. १६४९ च्या सुमारास मुलगा झाला, त्याचे नांव विष्णु. त्याच्या बाराव्या वर्षी आईबाप निवर्तले. लहानपणापासूनच त्याचा कल ईश्वरभक्तीकडे असून त्यानें राजुरी येथील गणपतीची आराधना सुरू केली आणि प्रतिवर्षी श्रावण शुद्ध प्रतिपदेपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत एकान्तात समाधि लावून तपश्चर्या चालविली. पुढें स. १६६३ च्या सुमारास तो काशीस गेला. तेथें चतुर्थाश्रम स्वीकारून विष्णूनें ब्रह्मेन्द्रस्वामी असें नांव धारण केलें. नंतर त्यानें [illegible] रामेश्वरपर्यंत फिरून तीर्थयात्रा केली. फिरतां फिरतां तो महाराष्ट्रांत कृष्णातीरीं आला. तेथील देशस्थिति अवलोकन करून स्वामी सह्याद्रि उतरून [illegible] पेढे नामक गावी परशुरामाचें देवस्थान आहे तेथें गेला. त्या स्थानाच्या पश्चिमेस धामणी सोनगावच्या रानांत एका रम्य ठिकाणी त्यानें तपश्चर्या चालविली. ह्या रानांत बाळ गौळी नांवाचा इसम गुरें चारण्यास येत असे. तेथें स्वामीची व त्याची ओळख झाली आणि त्याची स्वामीवर भक्ति जडली. परशुरामनजीक चिपळूण हें प्रसिद्ध बंदर जंजिरेकर हबशाच्या ताब्यांत होतें. तेथील मिठाच्या कामावर बाळाजी विश्वनाथ भट त्या वेळीं असून, बाळ गौळ्याचे मार्फत बाळाजीची व स्वामीची ओळख झाली. स्वामीची कठोर तपश्चर्या पाहून बाळाजी विश्वनाथ त्याचे भजनी लागला. 'स. १६९८ साली पौष शुद्ध पौर्णिमेस श्रीपरशुरामी स्वामी प्रगट झाले,' असा उल्लेख सापडतो. श्रावण मासीं एकान्तांत समाधि लावून बसण्याचा क्रम स्वामीचा सदैव चालूच होता. हळूहळू स्वामीचें भक्तमंडळ वाढत गेलें; आणि त्याच्या ठिकाणी अलौकिक सामर्थ्य आहे अशी लोकांत प्रसिद्धि झाली. परशुरामाचें देवालय जीर्ण झालें होतें, त्याचा उद्धार करण्यासाठी भिक्षाद्रव्य मिळविण्याचा उपक्रम स्वामीनें स. १७०७ त सुरू केला.

ह्याच सुमारास शाहूची सुटका होऊन महाराष्ट्राचें राजकारण बदललें आणि पुढें बाळाजी विश्वनाथ ह्यास पेशवाईचीं वस्त्रें प्राप्त झालीं. इकडे स्वामीनें

जंजिरा येथील हबशापासून पेढें व आंबडस हे गांव परशुरामाच्या देवस्थानास इनाम म्हणून मिळविले आणि देवस्थानाच्या इमारतीच्या कामावर बापूजीपंत व धोंडोपंत तांबे म्हणून कारकून नेमिले. बापूजीपंतांची बहीण राधाबाई व तिचा पुत्र चिमणाजी कृष्ण भागवत, राहणार सोनवडें हे स्वामीच्या सेवेस परशुराम येथें येऊन राहिले. चिमणाजीपंत, धोंडोपंत व बापूजीपंत हे स्वामीच्या सेवेंत तत्पर राहून त्याच्याच कामांत पुढें प्रसिद्धीस आले. बाळाजी विश्वनाथानें शाहूचा पक्ष स्वीकारण्यात आणि पुढें त्यास पेशवाई मिळवून देण्यांत ब्रह्मेन्द्रस्वामीची अंतस्थ खटपट कारण झाली असावी असा संभव आहे. कोंकणांत परशुरामपंत प्रतिनिधि व कान्होजी आंगरे ह्याचाही अंमल असल्यामुळें त्यांचा व स्वामीचा परिचय झाला. परशुरामपंत प्रतिनिधीनें डोरलें व महाळुगें हे दोन गांव परशुरामाच्या देवस्थानास इनाम दिले. बाळाजी विश्वनाथ व चिमणाजी दामोदर ह्यांचा स्वामीशी पत्रव्यवहार असून पैशाची देवघेवही होती, असें दिसते. द्रव्यसंचय झाल्यावर स्वामीने व्याजबट्ट्याचा व्यापार सुरू केला आणि अशा रीतीनें महाराष्ट्रांतील प्रमुख मंडळीवर व शाहू छत्रपतीवर त्याची छाप बसत चालली.

स्वामीचा स्वभाव कडक होता. केव्हां ममत्वाचा उमाळा व केव्हा तपःसामर्थ्याचा धाक दाखवून त्यानें लोकांवर आपलें वजन वाढविलें. तेणेंकरून आपलें व आपल्या भक्तांचें महत्त्व वाढविण्याचा त्याने उपक्रम आरंभिला. बाळाजी विश्वनाथाची स्वामीवर निःसीम भक्ति होती आणि हरएक प्रसंगीं स्वामीनेंही बाळाजीची बाजू उचलून धरिली. बाळाजीच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांनातवांवरही स्वामीची कृपादृष्टि कायम राहिली. बाजीरावास वस्त्रें मिळणें आणि लगेच धावडशी गांव शाहूकडून स्वामीच्या देवालयास इनाम मिळणें या गोष्टीचा कार्यकारण संबंध संभवनीय आहे. प्रतिनिधि, आंगरे, हबशी वगैरेंच्या साह्यानें परशुरामाच्या मंदिराचें भव्य काम लवकरच पुरें झालें; आणि मंदिराजवळ ब्राह्मणांची वसति, पूजा, उत्सव वगैरे थाटानें होऊं लागले. इनामी गांवांचा कारभार करण्यास स्वामीनें निरनिराळे इसम नेमून पैसा व कारखाना वाढविला. स्वामी बहुश्रुत व लिहिणारा बांका होता. गौरवून किंवा खोंचून लिहिण्यांत तो कुशल असून त्यानें लिहिलेलीं व त्याजला आलेलीं पत्रें आज उपलब्ध आहेत ती पाहिलीं म्हणजे स्वामीचा व्याप केवढा प्रचंड होता

हें कळतें. अनेक सरदार व स्त्रीपुरुष स्वामीच्या दर्शनास येत आणि त्याचा प्रसाद व आशीर्वाद भक्तिभावानें ग्रहण करीत.

भिक्षाटनाच्या निमित्तानें स्वामी वारंवार घाटावर जाऊं लागल्यानें त्याचें भक्तमंडळ वाढलें. स. १७२५ सालीं वीरमाडें व अनेवाडी हे आणखी दोन गांव शाहूनें स्वामीस इनाम दिले. स. १७२६ त स्वामीचे इनाम गांव आठ होते. याच सुमारास हत्तीच्या संबंधानें सीदीचा व स्वामीचा तंटा उपस्थित होऊन सीदीनें ता. २७ फेब्रुवारी, स. १७२७ रोजीं परशुरामाचें देवालय लुटलें, वगैरे प्रकार सीदीच्या युद्धांत सांगितले आहेत. या प्रकरणावरून पुढें परशुरामाची व्यवस्था गणेश बल्लाळ ताम्बे याजकडे सांगून स. १७२८ च्या सुमारास कोंकण सोडून स्वामी वरघांटी साताऱ्याजवळ धावडशीस येऊन राहूं लागला. तेथें त्यानें एक वाडा, एक तलाव व देवालय बांधून झाडें बागा वगैरेंचा हळू हळू बराच पसारा वाढविला. छत्रपति शाहू, त्याच्या राण्या व सरदार स्वामीच्या दर्शनासाठीं मोठ्या भक्तिभावानें धावडशीस येऊं लागले. तेणेंकरून स्वामीचा बडेजाव वाढत गेला. शाहूमहाराज, बाजीराव व चिमाजी आपा हे तर स्वामीच्या अगदीं अर्ध्या वचनांत असत. इकडे मराठी राज्योची वृद्धि होत चालली ती स्वामीच्या आशीर्वादाचें फळ होय, अशी भावना लोकांत उत्पन्न झाली. धावडशीस आल्यावर स्वामीची कीर्ति सर्व महाराष्ट्रांत पसरून त्याचा लोकांस वेध लागला. कोंकणांत स्वामीचा ऐवज, वस्त्रपात्र वगैरे रसाळगडचा अधिकारी संभाजी शिंदे याजपाशीं ठेवलेला होता, तो पुढें स्वामीनें धावडशीस आणिला.

शाहू व त्याच्या राण्या यांनीं स्वामीचा अगत्यवाद धरिल्यामुळें राजकारणातही स्वामीचें वजन वाढंत गेलें. ज्यास कांहीं आपलें कार्य करून घ्यावयाचें असे, तो स्वामीच्या मार्फत अधिकाऱ्यांकडे खटपट करूं लागला. स्वामीच्या शब्दानें लोकांचीं कामें होऊं लागलीं. स्वामीच्या ब्रह्मनिष्ठ बाण्यामुळें त्याच्या वचनाचा अव्हेर करण्यास कोणी धजत नसे. प्रमुख सरदार आपणास स्वामीचे दास म्हणवूं लागले स. १७२८ पासून १७४५ पर्यंत मराठशाहींत जीं जीं कारस्थानें झालीं, त्यांत स्वामीचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष थोडेंबहुत तरी अंग होतें. स्वामीचा हा संबंध महत्त्वाच्या कारभारापेक्षां क्षुल्लक व्यवहारांत जास्त असे. कारण महत्त्वाचे कारभार उलगडण्याचें सामर्थ्य स्वामींत नव्हतें. विशेषतः

सराफीच्या व्यापारामुळें स्वामीची सर्वांस गरज लागे. त्या वेळच्या मोहिमा म्हणजे आंतबट्ट्याचा व्यापार असे. बरेचसे सरदार सदैव कर्जांत बुडालेले असत. अडचणीच्या प्रसंगीं स्वामी बाजीरावास पैशाची मदत करी आणि त्याची फेड वेळेवर न झाल्यामुळें मागाहून तगादे लावी.

पुरुषांप्रमाणें अनेक स्त्रियांची सुद्धां स्वामींचे ठायीं निष्ठा होती. राणी सगुणाबाई व सकवारबाई, तसेंच विरूबाई, राधाबाई पेशवे, मथुराबाई व लक्ष्मीबाई आंगरे, उमाबाई दाभाडे, राजसबाई निंबाळकर, गौतमाबाई होळकर पिलाजी जाधवांची आई हंसाई, रघूजी भोसल्याची आई काशीबाई, इत्यादि बायांचा स्वामींशीं झालेला पत्रव्यवहार उपलब्ध आहे. साधु पुरुषांच्या ठिकाणी अलौकिक सामर्थ्य असतें ही भावना हल्लींपेक्षां त्या वेळीं बलवत्तर होती. शिवाय प्रत्यक्ष व्यवहारांतही स्वामीच्या मध्यस्थीचा परिणाम होई म्हणून लोक त्याच्या भजनी लागले. स्वामीला तरी या व्यावहारिक बडेजावापलीकडे दुसरें कांहीं साध्य नव्हतें. निरनिराळ्या सरदारांत वैमनस्यें सुरू असतां शाहूपाशीं आपला पगडा कायम राखण्यास बाजीरावास स्वामीचा उपयोग विशेष झाला. ‘ राजश्रीजवळ तुमची फारशी शिफारस केली, कित्येक तुमच्या स्वहिताच्या गोष्टी सांगितल्या, ’ असें स्वामी स. १७३४ त बाजीरावास लिहितो. त्यावर बाजीरावाचें उत्तर, ‘ मायबाप देवधर्म स्वामींचे पाय. न्यूनपूर्ण सर्व आम्ही स्वामींचे चरणांकित. सर्व चिंता स्वामीस आहे, ’ वगैरे. अशा अनेक उल्लेखांवरून स्वामीचा व बाजीरावाचा एकमेकांस कसा उपयोग होत असे तें दिसून येतें. भिक्षेच्या निमित्तानें सरदारांपासून स्वामी द्रव्य घेत असे आणि त्याचे बदल्यांत स्वामी त्यांचें अभीष्टचिंतन करी. या द्रव्यानें स्वामीनें ठिकठिकाणीं सार्वजनिक उपयोगाचीं कामें केलीं. हबशांच्या व वसईच्या प्रकरणांत सरदारांस उत्तेजन व कार्यसिद्धीचा आशीर्वाद देऊन स्वामीनें तत्कालीन राजकीय उद्योगास व राज्याभिवृद्धीस अप्रत्यक्षपणें बरीच मदत केली असें म्हणतां येईल.

उत्तरेकडील कारस्थानें, निजामाचें उच्चाटन, जंजिऱ्याची व वसईची मोहीम, अशा कित्येक प्रसंगांशीं स्वामीचा थोडाबहुत संबंध असून, स्वामीच्या विस्तृत पत्रव्यवहारावरून त्या त्या प्रसंगांच्या हकीकती हल्लीं बऱ्याच खुलासेवार कळून येतात. अनेक प्रसंगांत बाजीरावानें स्वामीची सल्ला विचारलेली आहे.

वसईच्या मोहिमेनंतर लवकरच बाजीराव एकाएकीं मृत्यु पावला, त्यामुळें स्वामीस अपरिहार्य दुःख झालें. ' बाजीरावासारखा शिष्य गेला, याउपर मुलखांतून जावें किंवा प्राण सोडावा, काय करावें तें लिहिणें, ' असें स्वामीनें चिमाजीस विचारिलें. चिमाजीनें खालील हिंमतीचें उत्तर लिहिलें, ' आजपावेतों कृपाकटाक्षें पाहत आहां, तैसेंच स्वस्थ चित्तें राहाल तर चि. रा. नानास बाजीरायाची जागा आहे. स्वामींची कृपा मस्तकीं असलियावर, यांपेक्षां अधिकपणें, स्वामींच्या शिष्यत्वाचें नांव राखील. उमेद तों आमची या प्रकारची आहे. सर्व हिंमत स्वामीच्या आशीर्वादबळाची आहे. स्वामींनीं नानावर, आम्हांवर, सर्व बाळकांवर नजर देऊन संतोषरूप राहवें. आशीर्वाद असल्यावर काय न्यून होणार ! सर्व प्रकारचें ऊर्जितच होईल. ' बाजीरावाचे पश्चात् नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें मिळण्यांत स्वामींचें साह्य झालें असलें पाहिजे. याच सुमारास स्वामीचा मुख्य कारभारी चिमणाजी कृष्ण भागवत मृत्यु पावला, चिमाजी आपाही वारला, तेणेंकरून स्वामीनें शोकाकुल होऊन ऐहिक व्यवहारांतून आपलें चित्त बहुतेक काढिलें. त्याचें वयही नव्वदाचे वर होतें. नानासाहेब व सदाशिवराव यांचें व स्वामींचें, बाजीरावासारखें रहस्य जमलें नाहीं. शिफारसी वगैरे करून स्वामी राज्यकारभारांत ढवळाढवळ करी ती नानासाहेबास खपत नसावी. चिमणाजीपंत भागवताचा मुलगा जगन्नाथपंत याजकडे संस्थानचा कारभार सांगून, आपले पश्चात् संस्थानचा बंदोबस्त पूर्ववत् यथास्थित चालविण्याविषयीं स्वामीनें शाहूस विनंती केली; आपल्या सर्व परिवाराचें व सेवकजनांचें पालग्रहण करण्याविषयीं राणी सगुणाबाईचीं अभयपत्रें घेतलीं. स्वामीचें शरीर कृश झालेलें पाहून शाहू व त्याच्या राण्या वारंवार धावडशीस जाऊन त्याचा समाचार घेत. स. १७४५ च्या श्रावण महिन्यांत कृष्णातीरीं वार्षिक समाधीचें अनुष्ठान स्वामीनें चालविलें. नववे दिवशींच समाधि सोडून बाहेर येऊन दर्भासनावर मृगासन पसरून, श्रावण शु० ९ भृगुवार, ता. २६ जुलै, स. १७४५ रोजीं रामनामोच्चार करीत शेवटची निद्रा केली. शाहूमहाराज व असंख्य लोक त्या ठिकाणीं धावून आले. त्यांनीं स्वामीचें कलेवर पालखींत घालून धावडशीस आणिलें, आणि तेथें त्याचे अंत्योपचार केले. स्वामीच्या समाधीजवळच धावडशीस शाहूनें पुढें एक मोठें मंदिर बांधण्यास सुरुवात केली, तें मंदिर स. १७५८ त पुरें होऊन त्यास सुमारें एक लक्ष वीस हजार

रुपये खर्च झाला. हें मंदिर प्रेक्षणीय आहे. तेथील कारभार जगन्नाथ चिमणाजी भागवत याचे वंशज पाहतात. स. १७४५ च्या जानेवारींत तुळाजी आंगऱ्यानें कोंकणांतील परशुराममंदिराजवळचा गोवळकोट व किनाऱ्यावरचा अंजनवेल हे दोन किल्ले हस्तगत केले, त्यामुळें जंजिरास्वारीचा मूळचा उद्देश सफल झालेला पाहण्याचें भाग्य स्वामीस मरणापूर्वी लाभलें.

ब्रह्मेन्द्रस्वामीला वार्षिक भिक्षेची प्राप्ति सुमारें सोळा हजारांची असून त्याशिवाय उत्सवप्रसंगीं पुष्कळ पैसा व सामान जमा होई. देवालयाचा व संस्थानाचा थाट त्या वेळीं अपूर्व होता. मंदिरें, विहिरी, तलाव, घाट, पूल, सडका वगैरे बांधण्यांत स्वामीनें पुष्कळ पैसा खर्च केला. यवतजवळ भुलेश्वरच्या डोंगरा-वर भुलेश्वर नांवाचें भव्य मंदिर त्यानें बांधिलें. अशा कामीं स्वामीचा एकंदर खर्च नऊ दहा लाख झालेला आहे. आपल्या देवाच्या नांवानें भार्गवपट्टी म्हणून एक कायम कर मराठी राज्यांत गांवगन्ना बसविण्याचा स्वामीचा विचार होता.

८ **ब्रह्मेन्द्रस्वामीची योग्यता.**—स्वामीची योग्यता व राष्ट्रीय कामगिरी यासंबंधानें महाराष्ट्रांत यापूर्वी पुष्कळ चर्चा झाली असून दोन विरुद्ध मतें व्यक्त झालेलीं आहेत. प्रथम धावडशी संस्थानाचा पत्रव्यवहार तपासून रा. ब. पारसनीस यांनीं स. १९०० त स्वामीचें एक सुसंबद्ध व विस्तृत चरित्र लिहून प्रसिद्ध केलें. त्यांतून विवेचनात्मक भाग वगळले, तरी स्वामीच्या संबंधाची विविध माहिती एकत्र ग्रथित करून तत्कालीन राज्यकारभारावर पुष्कळच नवीन प्रकाश पाडल्याबद्दल महाराष्ट्रानें पारसनिसांचे उपकार स्मरले पाहिजेत. ज्यास्त माहिती व चर्चा होऊन वरील प्रयत्नांतले दोष उघडकीस आले, म्हणून त्या पहिल्या प्रयत्नाची किंमत कमी होत नाहीं. त्यानंतर रा. राजवाडे यांनीं आपल्या तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत विरुद्ध टीका करून, स्वामींचा व पारसनिसांचा भरपूर समाचार घेतला. पुढें दोन तीन वर्षेपावेतों केसरी, ग्रंथमाला, वि. ज्ञा. विस्तार वगैरे ठिकाणीं या संबंधानें वेळोवेळीं पुष्कळ चर्चा या विषयाची झाली. त्यावरून निघणारा मथितार्थ या ठिकाणीं सांगितला म्हणजे बस आहे. स्वामींची तरफदारी करणाऱ्या पक्षाचें म्हणणें असें आहे, कीं शिवाजीच्या वेळेस जसा रामदास, तसाच बाजीरावाच्या वेळेस ब्रह्मेन्द्रस्वामी परोपकारी व राष्ट्रास स्फूर्ति देणारा गुरु झाला. ह्यावर विरुद्ध पक्षाचें म्हणणें असें आहे, कीं ब्रह्मेन्द्रस्वामी अत्यंत स्वार्थसाधु, व्याजबट्टे करणारा, कलागती

लावणारा, नसतीं लफडीं उपस्थित करून मनाप्रमाणें झालें नाहीं म्हणजे शिव्याशाप देणारा, असा उपद्व्यापी गृहस्थ होता.

प्रथमच हें सांगितलें पाहिजे, कीं रामदासाची योग्यता ब्रह्मेन्द्रस्वामीस नाहीं. मनुष्यस्वभावाचें व जगाचें ज्ञान आणि राष्ट्रोद्धरणास लागणारें साहित्य व नैतिक सामर्थ्य जसें रामदासास अवगत होतें तसें ब्रह्मेन्द्रस्वामीस नव्हतें. रामदासासारखे निःस्वार्थी राष्ट्रपुरुष क्वचित् काळीं निर्माण होतात. तेव्हां त्यांजबरोबर ब्रह्मेन्द्राची तुलना करणें युक्त नाहीं. साधुपुरुषांचें माहात्म्य आज सुद्धां पाश्चात्य सुधारणेच्या काळांत जर आपण एवढें मोठें पाहतों, तर अठराव्या शतकांत तें अतोनात होतें ह्यांत संशय नाहीं. साधु पुरुष तपःसामर्थ्यानें अघटित कृत्यें करूं शकतात आणि त्यांच्या आशीर्वादाशिवाय आपलें चालावयाचें नाहीं, अशी भावना त्या वेळीं बहुतेक लहान थोर पुरुषांची होती. विशेषतः सांसारिक व्यक्तींना कोणी तरी गुरु हा असेच; आणि त्याच्या आज्ञेनें ते वर्तत. अशा सामान्य साधूंपैकींच ब्रह्मेन्द्रस्वामी होता. त्यास राष्ट्राची किंवा राजकारणाची जाणीव नव्हती. पण अशी जाणीव इतर व्यक्तींपैकीं सुद्धां फारच थोड्यांस असते. आपल्या शिष्यांचें कल्याण चिंतून त्यांजकडून महत्कृत्यें करवावीं आणि त्यांत आपलाही ऐहिक मनोरथ साधून घ्यावा, अशी ह्या सामान्य साधूंची प्रवृत्ति असते. हा ऐहिक मनोरथ सर्वस्वी आपलपोटेपणाचा होता असें नाहीं. मंदिरें बांधणें, विहिरी, तलाव, घाट, धर्मशाळा इत्यादि लोकोपयोगी कामें करणें, देवतांचे उत्सव व अन्नदान करणें, ह्या गोष्टी पुण्यप्रद व लोकोपयोगी आहेत, असा समज त्या वेळीं होता व अद्यापिही आहे. हीं कामें करण्यास पैसा पाहिजे आणि तो पैसा वाशिल्यानें, धाकदपटशानें, व्यापारधंद्यानें, जसा मिळेल तसा मिळवावा, मात्र तो वरच्यासारखा सत्कृत्यांत खर्चिला म्हणजे झालें, तेणेंकरून पुण्य लागतें आणि हें पुण्य परमेश्वराजवळ रुजू असतें, अशी यांची भावना असे. अशानें पुण्य लागतें कीं नाहीं हा प्रश्न वेगळा, पण यांची भावना मात्र खरी होती. अशा समजुतीनें पाहतां ब्रह्मेन्द्रानें जगद्व्यतिरिक्त कांहीं अनुचित कर्म केलें असें नाहीं, किंवा असें अनुचित कर्म आपण करितों असें त्यास वाटलें नाहीं. सारांश, रामदासाची तुलना प्रथम मनांत आणून मागाहून ब्रह्मेन्द्र रामदासाइतका थोर नसल्याबद्दल त्यास दोष देणें वाजवी नाहीं. आपणांस लोकांनीं भजावें, मोठमोठे लोक आपल्या शिष्यगणांत असावे, त्यांजकडून लोकांचीं व आपलीं

अनेक कार्यें साधून घ्यावीं, अशी व्यावहारिक महत्त्वाकांक्षा ब्रह्मेन्द्राची होती. अर्थात् त्याचें तेज व प्रभाव तितक्या मानानें कमीच होता; परंतु रामदासानें कोणत्याही प्रत्यक्ष व्यवहाराशीं किंवा व्यक्तीशीं आपला हितसंबंध कधीं ठेविला नाहीं.

तत्कालीन परिस्थिति ब्रह्मेन्द्रास चांगली अवगत होती. त्यानें प्रवास केलेला होता. शिवाजीच्या वेळेपासून मराठी राज्याचा वर्तनक्रम त्यानें पाहिलेला होता. त्यावरून शिवाजीचे हेतु सिद्धीस नेण्यास पुढें काय केलें पाहिजे, याची त्यास उमज पडली पाहिजे होती. परंतु एकाद्या व्यक्तीच्या उत्कर्षापलीकडे समग्र राष्ट्राचें चिरंतन कल्याण कशांत आहे हें जाणण्याची पात्रताच त्यास नव्हती. त्याच्या एवढ्या मोठ्या पत्रव्यवहारांत अशी राष्ट्रीय भावना व्यक्त करणारें एकही वाक्य नाहीं. स्वतःच्या परशुरामक्षेत्रास उपसर्ग झाला म्हणून हबशाचा पाडाव करण्याची त्यास तळमळ लागली; पश्चिम किनारा सर्वस्वी ताब्यांत घेऊन आपली राज्यमर्यादा निर्बाध करावी हें शिवाजीचें धोरण त्यास कळलें नाहीं. वसईचा पाडाव कां व्हावा तर त्यांत आपले शिष्य पेशव्यांची बडेजाव होते म्हणून; बाकी पोर्तुगीझ, इंग्रज, व हबशी या सर्वांस तो सारखाच आळवी. त्यांचे राष्ट्रीय कावे स्वामीस समजले नाहींत. निजामाकडे किंवा हबशाकडे आपल्या वजनाचा उपयोग करून त्यास कांहीं कार्यभाग करतां आला, त्याचप्रमाणें मुंबईस इंग्रजांकडे जाऊन त्यांजकडून आपण आपलें काम करून घेऊं असें त्यास वाटे. पुष्कळदां मराठ्यांच्या शत्रूंकडे पत्रव्यवहार करून व वशिले बांधून उत्पन्न व द्रव्य वगैरे मिळविण्यासही स्वामी कमी करीत नसे. अशा दृष्टीनें स्वामीचें चरित्र तपासलें म्हणजे त्याच्या वर्तनाची संगति जुळते. राजकारण किंवा मुत्सद्दी धोरण त्यास नव्हते. अंगीं योग्यता नसून केवळ तपोबलाच्या सामर्थ्यावर तो धाकदपटशा दाखवी, त्यामुळें तो आपलें हसें मात्र करून घेई. प्रतिनिधि व पेशवे असे दोन तट राज्यांत असून त्यांचा परिणाम विघातक होत होता, तो मिटविण्याचा प्रयत्न स्वामीनें केला नाहीं. उलट पेशव्यांची बाजू उचलून धरण्यांत त्यानें दुसऱ्या पक्षास थोडेसें चिथविलेंच असावें. आंगऱ्यांचे घरांतील तंटा त्यास मिटवितां आला नाहीं. शाहूची त्याजवर भक्ति असल्यामुळें प्रतिनिधि पक्ष उघडपणें स्वामीवर कधीं तुटून पडला नाहीं. बाजीरावानें मात्र स्वामीचा उपयोग आपल्या कार्याकडे हवा तसा करून घेतला. स्वामी आपणास पेशव्यांचा जागली म्हणे. गौरवयुक्त

विशेषणें व गोडगोड पत्रें लिहून लहानथोर मंडळीस खूष करून आपलीं कामें करून घेण्याची कला स्वामीस चांगली येत होती.

जेव्हां जेव्हां बाजीरावाबद्दल शाहूस संशय येऊन प्रकरण विकोपास जाई, तेव्हां तेव्हा स्वामी बाजीरावाची तरफदारी करून शाहूचे संशय दूर करी शिवाय बाजीरावास वेळी अवेळी स्वामीकडून कर्ज वगैरे मिळे आणि त्याजविरुद्ध उठणाऱ्या लहान मोठ्या शत्रूंचा परभारें निरास होई. स्वामीचा उपयोग बाजीराव समजून उमजून करीत होता. 'चिरंजीव रघुपति', 'विजयीभव रघुनाथजी', 'मननिर्मल-गंगाजल', 'आचारें पुण्यशील भक्तराज', 'रामसेवक हनुमंत', 'भार्गवसेवक', 'धीर रघुनाथाचा सेवक', 'सत्यवक्ता', 'चौदा ताल कोंकणचा धनी', 'एकवचनी', 'सहस्रायु', 'चिरंजीव' अशा प्रकारचे गौरवाचे मायने स्वामी बाजीराव व चिमाजी आपा यांस लिहीत असे. बाजीरावाचा मुलगा नानासाहेब जास्त धूर्त असल्यामुळें स्वामीचें वर्तन व हेतु त्यास लगेच कळत आणि त्याच्या मनात स्वामीविषयी फारशी पूज्यबुद्धि राहिली नाही. सारांश, मुद्दाम जरी स्वामीनें राष्ट्राचें अकल्याण असें केलें नाहीं, तरी त्याच्या स्वार्थी वर्तनाचा परिणाम राज्यास थोडा बहुत अपायकारक झाला. आपसांतील दुही मोडण्याचा प्रयत्न त्यास करतां आला असता, तो त्याच्या हातून झाला नाहीं. उलट पक्षीं नानाप्रकारचे मतलबी लोक नसतीं लफडीं घेऊन त्याजकडे येत, त्यांजला हाताशीं धरल्यानें स्वामीला निष्कारण राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा प्रसंग येई, तें कोणासही खपत नसे. 'आपलें व्याज वसूल करण्यास सरकारी अंमलदारांचा उपयोग करणें, आपला रोष असलेल्या इसमास शिक्षा करविणें, आपल्या भक्तमंडळीस गुन्ह्याबद्दल झालेल्या शिक्षा माफ करविणें, वतनें व नेमणुका यांच्या घालमेली करणें, भिक्षेच्या व दक्षणेच्या नांवाखाली पैसा उकळणें, जकातीची माफी मागणें, अशी किती तरी कृत्यें नियमित राज्यकारभाराशीं विरोध असलेलीं स्वामीकडून झालीं.' स्वामीचा हा उपद्याप नानासाहेबास खपत नसे म्हणून त्याचें व स्वामीचें पटलें नाहीं, तरी बाजीरावाचे वेळचा प्रयोग नानासाहेबासंबंधानेंही स्वामी करण्यास चुकत नसे. सदाशिवरावभाऊ मुद्धां सौम्य शब्दांनीं जरब दाखवून स्वामीच्या मागण्या फेटाळून लावी, आणि स्वामीचा लकडा पाठीवर आलेला पाहून कंटाळून जाई. अशा स्थितीत आपला बोज राखण्यासाठीं स्वामीस मागच्या आठवणी देणेची जरूर पडे. स्वामिसंबंधाची चिमाजीची निष्कपट भावना सदाशिवरावाचे ठिकाणीं

नव्हती. केव्हां केव्हां तर शाहूला सुद्धां स्वामीच्या मागणीचा कंटाळा आलेला दिसतो. बाजीरावही प्रसंग विशेषीं स्वामीला हळूच चिमटे घेत असे. सकवारबाई राणीनें त्यास चोख जबाब दिला आहे. पिलाजी जाधवाच्या द्रव्यसंचयावर स्वामीचा डोळा कसा होता हें ब्र. ले. २९३ वरून दिसतें. ‡

कर्जाच्या देवघेवीसंबंधानें बाजीरावाचीं व स्वामीचीं पत्रें वाचण्यालायक आहेत. प्रत्येकास आशीर्वाद द्यावा व त्याचें कार्य सिद्धीस गेलें म्हणजे श्रीभार्गवाच्या नांवानें त्याजकडून यथाशक्ति द्रव्य घ्यावें, हा स्वामीचा वर्तनक्रम होता. कोंकणांत असतांनाच आंगऱ्यांस स्वामीनें द्रव्य व साह्य केल्याचे उल्लेख आहेत. स्वामीचें कर्ज बहुतेक प्रमुख सरदारांकडे होतें. सालिना सहा हजार, आठ हजार, दहा हजार एवढ्या रकमा केवळ व्याजाच्याच होत असत. पेशव्यांकडे तर लाखों रुपये गुंतलेले होते. बाजीरावास स्वामीपुढें हृदयद्रावक विनवण्या कराव्या लागत. 'आम्हांस कर्जानें बुडविलें, एवढे गोष्टीकरितां प्राण जाता तरी बरें होतें, विष खाऊन मरावें इतकेंच, किंवा स्वामीचे पाय धरून बसावें, इतकाच अर्थ उरला आहे. स्वामीस कृपा येईल तरी आम्ही कर्जापासून मुक्त होऊं. लोकांचे नरकवासापासून दूर होऊं तो पदार्थ करावा. तरीच मज बाळकावर पूर्ण कृपा आहे. नित्य उठोन कर्जदारांचे पायां पडावें, शिलेदारांचे पायां पडतां पडतां कपाळ छिनत चाललें. आतां ही सुखें आम्हांस नकोत. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तों आमचा जीवच आहे, येथें येऊन घेणें, अगर तेथें बोलावशील तरी सर्व संग टाकून येतों. तुम्ही थोर देव. तुमचें झाड लाविलें तोडाल तरी आतां तोडा, वाढवाल तरी वाढवा. मारशील तरी तूंच बावा मारशील. यांतही कीर्ति तुझीच आहे आम्हा लेकरांचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होशील तरी तूंच होशील. कर्ज फिटत नाहीं. आतां वांचल्याचें सार्थक काय ? आपला जिवाचा त्याग करतों.'¶ अशा प्रकारचीं अनेक पत्रें आहेत. बाजीरावाची आर्थिक स्थिति इतकी निकृष्ट असेल असें वाटत नाहीं. स्वामीचा लकडा चुकविण्यासाठीं मुद्दाम आपली दीनावस्था त्यानें लिहून कळविली असें भासतें. हें कर्ज तरी पांच पन्नास हजारांवर नसून राजपूत राजांकडून किंवा बादशहाकडून अल्पावकाशांत लाखों रुपये खंडणीचे वसूल करणारास हें भारी होतें असें म्हणतां येत नाहीं.

‡ ब्र. च. ले. २६७–२८०, ७७, ९५, १२३, १५१, १५७, ६९–७०, १५९, १६०, १६३, १६४, १६५, २९१, १३३, १३४, २६४, ३८, ९५, १४१.

¶ ब्र. च. ले. १४६, १५५, २९०, ३०–३२; पे. द. ३३. ४४२, ४४६.

स्वतःस कांहीच साध्य नसतां स्वामी जेव्हां जें दिसेल तें वाटेल त्याच्याकडे मागत सुटे, तेव्हां त्याजबद्दल, राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें, थोडा बहुत वीट उत्पन्न होतो यांत संशय नाही. अमुक एका पत्रांत त्यानें कोणाकडे कांहीं मागितलें नाहीं असें बहुधा व्हावयाचें नाहीं. पारसनिसांचे पुस्तकांत स्वामीच्या पत्रव्यवहाराची ३७५ पत्रें छापली आहेत, त्यांशिवाय राजवाड्यांचे तिसऱ्या खंडांत सुमारें १०० व का. सं. पत्रें यादींत सुमारें १०।२० असा एकंदर बराच मोठा संग्रह प्रसिद्ध झालेला वाचला, म्हणजे स्वामीच्या एकंदर चरित्राची संगति लागते. बऱ्याच पत्रांत पैशाचा व कर्जाचा विषय आहे. बाजीरावाकडून कर्जाची फेड होईना, तेव्हां स्वामीनें त्रागा आरंभिला. आम्हीं गरीब गोसावी, आम्हांस कशाची जरूर नाही, असें तोंडानें म्हणून सर्वांकडे तो कांहींना कांहीं मागत सुटे. अशा मागणीचा उल्लेख बहुतेक पत्रांतून आहे. तुळया, वांसे, लाकडें, पानें, झाडें, घोडे व घोड्या, घंटा, चुना, लवंग, साखर, जायफळ, तूप, गूळ, मध, औषधि, हेमगर्भ, नारायण तेल, कृष्णागर, दुलया, दुपटा, पासोडी, मखमल, साड्या, सकलाद, शालजोड्या, किनखाब, पातळ, चांदणी, नीलवर्णी तापता, शालू, मोत्यें, हस्तिदंत, अपूर्ववस्त्र, नळे चंद्रज्योति, म्हैस, इत्यादि नानाप्रकारच्या असंख्य वस्तु हिंदुस्थानभर ठिकठिकाणीं होणाऱ्या त्या त्या मंडळीकडून स्वामीनें आणविल्या. या वस्तूंचा त्याजवळ मोठा संचय असून प्रसंगविशेषीं तो भेटीस येणाऱ्या मंडळीस त्या वस्तु देई. प्रत्येकानें कांहीं अपूर्व चीज पाठवावी अशी स्वामीची ताकीद असे. सारांश, भिक्षेवर सधन झालेलें व समग्रवस्तुजातानें भरलेलें हें स्वामीचें संस्थान ऐहिक थाटास सर्वथैव शोभणारें होतें. मात्र स्वामीचें स्वतःचें आचरण निष्कलंक असून, वरील वस्तूंचा उपयोग केव्हांही असन्मार्गाकडे झालेला नाहीं, आणि स्वामीनें आपल्या पैशाचा अगर वजनाचा उपयोग अनीतीकडे केव्हांही केलेला नाहीं, हें नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे. युद्धप्रसंगीं स्वामी पेशव्यांस प्रासादिक पोषाख पाठवी, त्यास तो वज्रकवच म्हणे आणि तें घालून लढाईस जावें, असें सांगे.

स्वामीच्या योग्यतेसंबंधानें रा. राजवाड्यांचा अभिप्राय, कठोर शब्दयोजना वगळल्यास, सारांशानें निर्विकार मनास पटण्याजोगा आहे. ज्या पुरुषाविषयीं सर्व प्रमुख राष्ट्राची पूज्यबुद्धि होती, त्याची अप्रयोजक शब्दांनीं निर्भर्त्सना करणें

योग्य नाहीं. † आज आपणास काय वाटतें यापेक्षां तत्कालीन लोकांस स्वामीबद्दल काय वाटत होतें तेंच जमेस धरिलें पाहिजे, असें रा. आठल्ये म्हणतात तें वास्तविक वावगें नाहीं. परंतु तत्कालीन समाजाची साधूंविषयीं भावना कशा प्रकारची होती याचें विवेचन वर केलेंच आहे. ब्रह्मेन्द्रस्वामीच्या मृत्यूनंतर चार पांच वर्षांनी एक गोसावी ताराबाईच्या व भगवंतराव अमात्याच्या मदतीनें धावडशीची गादी बळकावूं पाहत होता. परंतु तो राजद्वारीं फजित पावला. स्वामीच्या पश्चात् आंगऱ्यांनी स्वामीचे गांवास उपद्रव केलेला ऐकून तो ताबडतोब बंद करण्यासाठीं शाहूनें एक सणसणीत आज्ञापत्र तुळाजी आंगऱ्यास लिहिले. त्यावरून शाहूची स्वामीवरील निष्ठा चांगली व्यक्त होते. मानाजी आंगरेही स्वामीस चांगला मानीत होता. संभाजी आंगरे याचें मत तशाच प्रकारचें होतें. अशा अनेक व्यक्तींचा पूज्यभाव दाखविणारी पुष्कळ पत्रें आहेत. बाजीरावाची तर स्वामीवर पूर्ण भक्ति होती. वसई काबीज करितांना स्वामीच्या प्रोत्साहनाचा आपणास केवढा पाठिंबा मिळाला, त्याचा उच्चार चिमाजी आपानें अनेकवार केलेला आहे. नानासाहेब पेशवेही स्वामीस वचकून होता. त्याचीं व स्वामीचीं वरील कित्येक पत्रें उपरोधिक आहेत, त्यावरून त्यांच्या मनोभावनेचा अंदाज करितां येतो. §

आंगऱ्याच्या कुटुंबांत स्वामीनें कलह वाढविले, अगर उलट पक्षी आपसांतील कलह मोडून राष्ट्रहिताच्या कामीं सर्वांनी एकजूट व्हावें असा स्वामीचा अव्याहत प्रयत्न होता, हे दोनही पक्ष सत्यास धरून नाहीत. राष्ट्रीय व्यवहारांची जाणीव स्वामीस नव्हती हे वर सांगितलेंच आहे. व्यावहारिक उलाढाल्या करून आपली व आपल्या शिष्यांची बडेजाव वाढविण्याचा स्वामीचा खटाटोप होता. अशा उलाढाल्या करितांना काहीं प्रसंगीं भांडणें लागत, कांहीं मिटत; पण तो स्वामीच्या बुद्धिपुरःसर प्रयत्नाचा हेतु नव्हता. शाहूच्या दरबारांत दोन विरुद्ध पक्ष होते, त्यापासून राज्याची हानि होते ही गोष्ट स्वामीस कळती तर, त्यानें आपल्या वजनाचा उपयोग ते मिटविण्याकडे केला असता. मुद्दाम कुटुंबांतील तंटे त्यानें वाढविले नाहीत; आणि असे तंटे

† असाच अभिप्राय या विषयावर रणकंदन माजले तेव्हा मी २४-९-१९०१ च्या सयाजीविजयांत प्रसिद्ध केला होता. रा. आठल्ये यांनीं स्वामींची तरफदारी, ता. ३, २४, व ३१ जानेवारी १९०५ च्या केसरीच्या अंकांत केली आहे.

§ ब्र. च. पृ. १३३–१३४ व १३९; खं. ३.३२१, १२१, २७३, १२१, ६७; ब्र. ले. २८–३२, ११९, २९१, ५२, ८८, ७२, १५८, १६९, २९०, २९१, ६७.

मिटविण्याचे उपदेशपर समजुतीचे चार शब्द त्यानें लिहिले म्हणून तेवढ्यावरून राज्यांतील दुही मोडण्याचा त्यानें प्रयत्न केला असेंही होत नाही. आंगऱ्यांचे घराण्यावर स्वामीचा लोभ होता हें खरें. परंतु तसा लोभ पुष्कळांवर होता, आणि विनाकारण राज्याचे विरुद्ध जाण्याचें स्वामीस प्रयोजन नव्हतें. सर्वांशीं सारखें प्रेम ठेवितील तरच त्यांचें साधुत्व कायम राहील. स्वामीस पैशाचा लोभ होता तो केवळ तत्कालीन धर्मसमजुतीचा परिणाम होय. स्वतः असें कांहींच कर्तव्य नसतां त्यानें असा लोभ ठेविला हेंच आश्चर्य. 'स्वामी देवालयें, वापी, कूप, तडागें, झाड झाडोरा लावतात हे कीर्ति अक्षय करिजेती. यापेक्षां उत्तम काय आहे ? आम्हांस या गोष्टीचा बहुतसा संतोष आहे,' असें शाहू लिहितो. त्यावरून स्वामी म्हणजे त्या वेळचें 'पब्लिक वर्क्स खातें' असें मानण्यास हरकत नाही.

हल्लीं धावडशी संस्थानाकडे खालील गांवें आहेत,—साताऱ्याचे वायव्येस सहा मैलांवर धावडशी येथें स्वामीची समाधि व भार्गवरामाचें मंदिर असून तीन लहान तळीं आहेत. अनेवाडी व वीरमाडें हे दोन गांव साताऱ्याचे उत्तरेस दहा बारा मैलांवर कृष्णेच्या नजीक आहेत. वीरमाडें येथें कृष्णेस घाट असून याच घाटावर गुहेंत स्वामी समाधि लावी. याच ठिकाणी त्याचें देहावसान झालें. पुरंदर तालुक्यांत राजेवाडी स्टेशनापासून ईशान्येस आठ मैलांवर माळशिरस म्हणून गांव आहे, तेथील घाटमाथ्यावर श्रीभुलेश्वराचें हेमाडपंती मंदिर स्वामीनें बांधिलेलें आहे. जवळच पिंपरी गांवीं स्वामीचें वाघेश्वर मंदिर आहे. शिवाय फलटण संस्थानांत रावडी, रत्नागिरी जिल्ह्यांत देवाचें गोठणें, डोरलें व महाळुंगें, हे गांव धावडशी संस्थानाकडे चालतात.' †

भुलेश्वर मंदिरास माळशिरस गांव शाहूनें दिला. हें मंदिर स्वामीनें स. १७३७ त बांधिलें. तुकोजी होळकरानें या देवालयाचा जीर्णोद्धार केला. देवालयाच्या पहिल्या बांधणीचा वृत्तान्त ब्र० स्वामीचा पत्रव्यवहार ले. १३३ यांत चिमाजी आपानें दिला आहे. ब्रह्मेन्द्रस्वामीस निरनिराळे लोक प्रौढ विशेषणांनीं युक्त असे मायने लिहीत त्याचे मासले पाहण्यालायक आहेत. राष्ट्रीय दृष्टीनें स्वामीच्या उद्योगाचा मराठशाहीशीं निकट संबंध येत असून कैक वर्षे स्वामीच्या योग्यतेसंबंधानें मोठा वाद महाराष्ट्रांत माजला आणि प्रचंड वाङ्मय बनलें, म्हणूनच त्याची वरील हकीकत एवढ्या विस्तारानें द्यावी लागली आहे.

† ब्र. च. पृ. ९३, व ले. ३२५,१, २००–२०२.

# ९

# मध्यंतरीं

## कालसूची

| | |
|---|---|
| १६७३ | खानडौरानचा जन्म. |
| १७२३–३९ | खानडौरान मीरबक्षी. |
| १७२९ आक्टो० | जयसिंगाची माळवा सुभेगिरीवर नेमणूक. |
| ,, सेप्टें० | जयसिंगानें बुंदी हस्तगत केली. |
| १७३० | माळव्यावर बंगसाची नेमणूक. |
| १७३२ | बंगसानें सिरोंजवर छावणी केली. |
| ,, जुलै २९ | माळव्यांतील महालांची वांटणी पेशव्यानें केली. |
| ,, आक्टो० २० | चिमाजीआपा माळव्याचे स्वारीस गेला. |
| ,, डिसेंबर २७ | रोहेंरामेश्वर येथें निजाम बाजीरावाची भेट. |
| १७३३ फेब्रु० | जयसिंगाचा मंदसोरजवळ कोंडमारा. |
| ,, जून ७ | चिमाजी माळव्यांतून परत आला. |
| ,, ऑगस्ट | शाहूकडून सिंदे होळकरांचा बहुमान. |
| ,, डिसें० | पिलाजी जाधवाची माळव्यावर स्वारी, पुढील उन्हाळयांत परत दक्षिणेंत. |
| १७३४ एप्रिल २२ | सिंदेहोळकरांनीं बुंदी हस्तगत केली. |
| ,, जुलै १० | मराठ्यांच्या विरुद्ध राजपुतांची जूट. |
| ,, नोव्हें० | पिलाजी जाधवाची बुंदेलखंडांत स्वारी, पुढील उन्हाळयांत परत. |
| १७३५ फेब्रु० १३ | रामपुऱ्याजवळ सिंदे होळकरांकडून मोगलांचा पराभव. |
| १७३५ फेब्रु० १४ | राधाबाई काशीयात्रेस निघाली ती स. १७३६ च्या मे अखेर पुण्यास परत आली. |

| | |
|---|---|
| १७३५ फेब्रु० २८ | सांबरची लूट होळकरानें केली. |
| ,, मार्च २४ | कोटा येथें खानडौरान व जयसिंग यांनीं चौथाईचा करार पुरा करून दिला. |
| ,, जुलै ६ | सिंदेहोळकरांचा पुण्यास व साताऱ्यास बहुमान. |
| ,, नोव्हें० ६ | भगवतसिंग अडारू यास सादतखानानें ठार मारून गाजीपूर घेतलें. |

# ९

# मध्यंतरीं

## स. १७३२–१७३५



**१ जयसिंगाची शिष्टाई.**—औरंगजेबाच्या वेळेपासून हिंदुधर्माचा उच्छेद होऊं लागला त्यामुळें मराठ्यांना स्वधर्मसंरक्षणार्थ झगडण्याची ईर्षा आली. यश येत गेलें, तसा त्यांचा दम वाढला आणि उत्तर–दक्षिणेंतील हिंदूंच्या आकांक्षा बळावत जाऊन हिंदुपदपातशाहीची कल्पना स्थिरावत गेली. दक्षिणेंत शाहू व उत्तरेंत सवाई जयसिग हे या कल्पनेचे, पुरस्कर्ते बनले. औरंगजेबाच्या पश्चात् हिंदूंचा छळ जरी मुख्यतः बंद पडला, तरी त्यांच्या उमेदी वृद्धि पावल्या. उभयतांनीं एकमेकांचा पाठपुरावा करून हिंदुपदपातशाहीचा उद्योग हातीं घेतला. यांत मोगल बादशहाला नाहींसा करावा अशी कोणाचीच इच्छा नव्हती. फक्त हिंदूंना पिळून मन मानेल तशी अरेरावी गाजविण्याचा क्रम मुसलमानांनीं चालविलेला बदलून हिंदूंनाही राज्यकर्त्यांच्या बरोबरीनें वागविण्यांत यावें, कारभार हिंदूंच्या हातीं ठेवून बादशहानें निर्धास्त राहवें, असा या हिंदुपदपातशाहीचा मतलब होता. निजामसादतखान, बंगश वगैरे बादशाही उमरावांना हिंदूंची ही चढाई तिरस्करणीय वाटून त्यांनीं तिला सडकून विरोध चालविला, त्याची प्रतिक्रिया म्हणजेच मराठ्यांचें आक्रमण होय. गिरिधर बहादूर जरी हिंदु होता तरी त्याचें पाठबळ सर्वथा चढेल मुसलमान पक्षास असल्यामुळें बाजीरावानें त्यास मारून आपला प्रभाव दाखविला, आणि पुढें हिंदूंशीं कसें वागलें पाहिजे याची प्रत्यक्ष खात्री पटविली. मराठे बलवान आहेत, त्यांच्याशीं विरोध करून आपला निभाव लागणार

नाहीं, त्यांची समजूत करून उभय पक्षांतील स्नेहभाव वाढविल्यानेंच निभाव लागेल, अशी जयसिंग पक्षाची व मीर बक्षी खानडौरान वगैरे कित्येक उमरावांची प्रामाणिक भावना बनली. यामुळें बादशाही दरबारांत दोन विरुद्ध पक्ष उपस्थित होऊन, स्वतःची हिंमत नसलेला बादशहा हेलकावे खात बसला. असें हें दिल्लीचें राजकारण आपण सदैव दृष्टिपुढें ठेविलें पाहिजे.

गिरिधर बहादुराच्या प्रकारानें दिल्लीस प्रचंड खळबळ उडाली. बादशहानें पुष्कळ वाटाघाट करून जयसिंगाची सल्ला मराठ्यांची समजूत घालण्याची पसंत करून त्यासच त्यानें माळव्याच्या सुभेगिरीवर नेमिलें. स. १७२९ च्या ऑक्टोबरांत तो आपल्या कामावर दाखल झाला, तो तसाच पुढें कांही काळ तेथें टिकता तर पुष्कळ भावी अरिष्टें टळलीं असतीं. मराठ्यांच्या मागण्या तरी काय, त्यांची समजूत कशी पडेल याचा अंदाज काढण्यासाठीं बादशहा व जयसिंग यांनीं शाहूकडे आपले इभ्रतीचे वकील पाठविण्याचे ठरविलें आणि त्या कामीं दीपसिंहाची रवानगी केली. त्यापूर्वीच शाहूकडे पत्रें लिहून त्यानें मांडवगड परत घेवविला. † स. १७३० च्या आरंभी जयसिंग उज्जनीस आला, तेव्हां पूर्वीच्या व आजच्या स्थितीत जमीन अस्मानाचें अंतर पडल्याचें त्याला आढळून आलें. निजामानें दक्षिण उपटली, मराठ्यांनीं माळवा खाल्ला, मिळून बादशाही सत्ता अगदींच संपुष्टांत आली. बुंदेलखंडांतही मराठे ठाणीं घालून बसले; त्यांची हद्द चंबळ–यमुनांस पोंचली. एवढ्या प्रदेशांत जेवढे म्हणून लहान मोठे जमीनदार पूर्वी मोगल सत्तेखालीं नांदत होते त्यांनीं मराठ्यांचें वर्चस्व उघडपणें स्वीकारिलें. मोगल वर्चस्वापेक्षां मराठ्यांची ताबेदारी त्यांना जास्त मानवली. हा प्रकार जयसिंगाला इतका पटला कीं आतां मराठ्यांना आळा घालणें किंवा त्यांना साफ माळव्यांतून घालवून देणें अशक्य आहे, तेव्हां त्यांच्याशीं तडजोड करून त्यांच्या आपल्या समजुतीनें जो काय निभाव करतां येईल तेवढाच पहावा या मार्गास तो लागला. प्रत्यक्ष निजामानें तरी दुसरें काय केलें ? दक्षिणेची चौथाई मराठ्यास देण्याचें कबूल केलेंच कीं नाहीं ! त्यांच्याशीं संग्रामही करून पाहिले, आणि त्यांची राजकारणी तडजोडीनें समजूत घालण्याचाच जो प्रयत्न त्यानें जन्मभर केला तोच मार्ग मृत्युसमयीं त्यानें आपल्या पुत्रांस पढवून ठेविला, कीं 'मराठे दक्षिण देशचे जमीदार आहेत, त्यांशीं सल्लेनें वागावें.' ‡ जें धोरण निजामानें दक्षिणेंत

† शा. रो. १९८. ‡ इ. सं. पे. द. पृ. ३१७.

ठेविलें, तेंच जयसिंगानें माळव्यांत स्वीकारलें, यांत त्याला हरामखोरीचें दूषण लावण्यापेक्षां मुत्सद्दी दूरदृष्टीबद्दल शाबासकी देणेंच योग्य होईल.

मीर्झा राजा जयसिंगानें शिवाजीशीं हेंच नाहीं का धोरण स्वीकारलें ? औरंगजेबानें तें पसंत न करतां मराठ्यांना शस्त्रानें जिंकण्याचा उद्योग अवलंबिला त्याचा परिणाम पुढें पन्नास वर्षें कसा घडला तो सर्वांच्या दृष्टीपुढें स्पष्ट दिसत होता. शिवाजीचा सर्व खटाटोप स्वधर्मसंरक्षणाचा, मीर्झा राजा जयसिंग देखील त्याच धर्माचा उपासक. पुरंदरच्या तहानें शिवाजीला निभावून घेण्याची सल्ला मीर्झा राजानें बादशहाला दिली ही गोष्ट शाहूच्या स्मरणांत असून त्याजबद्दल तो मीर्झा राजाचें कौतुक करी. शाहू सज्ञान, विचारी, पापभीरु होता ही गोष्ट सवाई जयसिंगाला चांगली ठाऊक होती. सरदार सर्व शाहूच्या धाकांत कसे वागत होते हेंही तो जाणत होता, तेव्हां शाहूच्या मार्फत आपण ही सर्व कटकट कायमची मिटवून बादशहाचें भलें करून दाखवावे आणि उभयतांचाही निभाव करून कायमचा स्नेहभाव घडवून आणावा, असा पोक्त व दूरदृष्टीचा विचार जयसिंगानें योजिला. एकंदर बादशाहींत त्याच्या इतका विचारी व निरीक्षक पुरुष त्या वेळी दुसरा कोणी नव्हता. पराक्रमीही तसाच, पण पराक्रमास युक्तीची जोड नसल्यास कसा घात होतो हेंही तो जाणून होता.

तेव्हां असा सगळा विचार करूनच जयसिंगानें शाहूपुढें अशी योजना मांडली, कीं माळव्याच्या चौथाईबद्दल सालाचे दहा लक्ष रुपये उत्पन्नाचे महाल जागिरीदाखल शाहूचा दत्तकपुत्र कुशलसिंग याचे नांवें करून द्यावे ; ¶ शाहूच्या एका सरदारानें फौजेनिशीं माळव्यांत राहून बादशहाची नोकरी व वरील जागिरीची वहिवाट करावी आणि प्रांतांत बंदोबस्त राखावा ;—चौथाईबद्दल दहा लाख मराठ्यांस देण्याचा हा सौदा अत्यंत माफक व फायदेशीरच गणला पाहिजे. दहा लाख म्हणजे एक कोटि वसुलाचा एक दशांश होय. शाहूचा वकील दादो भीमसेन जयसिंगाजवळ होता, त्यानें शाहूची लेखी मान्यता या तहास आणून दिली.

पण योग्यायोग्य पाहून स्वतः एक निश्चय ठरविण्याची ऐपत बादशहाचे अंगीं नसल्यामुळें चार चौघांच्या विचक्षणेंत जयसिंगाची ही तडजोड त्यानें मान्य केली नाहीं. मीरबक्षी खानडौरान यानें जयसिंगाचा पक्ष घेतला तर

¶ जयपुर-दप्तरांत ही माहिती आहे.

महंमदखान बंगश आगऱ्याचा सुभेदार होता, त्याला हें नामर्दपणाचें धोरण बिलकूल पसंत पडलें नाहीं. तत्कालीन मुस्लीम उमरावांत तोच एक शूर व पराक्रमी गणला जात होता. त्यानें बादशहाला कळविलें, " मराठ्यांची समजूत काढण्यांत जो खर्च तुम्ही करणार तोच जर माझ्या हातीं द्याल तर मी जाऊन मराठ्यांना माळव्यांतून कायमचे हाकून लावतों." यावर जयसिंगानें शांतपणें बादशहास लिहून कळविलें, " आज वीस वर्षे मराठ्यांना हाकलून देण्याचा तुमचा प्रयोग चालला आहे, त्यास किती खर्च आला आणि तो कितीसा यशस्वी झाला हें मनांत आणा म्हणजे माझीच सूचना व्यवहार्य व फायद्याची आहे असें आपणास दिसून येईल."

जयसिंगाच्या या विनंतीला बादशहानें स्वहस्तानें कबुली देखील प्रथम लिहून दिली. पण लगेच बंगशानें वगैरे गवगवा केल्यावरून त्याचें मन फिरलें आणि जयसिंगाची एकदम बदली करून माळव्याच्या सुभ्यावर बंगशाची नेमणूक केली. स. १७३० च्या ऑगस्टांत दीपसिंह शाहूजवळ तडजोडीची वाटाघाट करीत असतांच जयसिंगाचा अधिकार जाऊन बंगशाकडे मुखत्यारी आली, ती त्याजकडे दोन वर्षे टिकली. तेवढ्या अवधींत मराठ्यांनीं बंगशाचा कसा धुव्वा उडवून दिला, तें अन्यत्र सांगितलें आहे. स. १७३२ च्या अखेरीस निजामानें रोहेरामेश्वर येथें बाजीरावाची भेट घेऊन जयसिंगाचीच तडजोड मान्य केली. हा एकंदर प्रकार लक्षांत घेऊन जयसिंगाच्या वर्तनाचा विचार केला पाहिजे. मीरबक्षी खानडौरान जयसिंगाचे विचारानें वागत होता, त्याची थोडी ओळख वाचकांनीं केली पाहिजे.

**२ खानडौरानची ओळख.**—खानडौरान स्वभावानें उपद्यापी नसल्यामुळें मराठ्यांचे उद्योग बरेच दिवस अविच्छिन्न चालले. माळव्यांतही मराठ्यांचें वर्चस्व बसण्यास या वजिराचा समंजस कारभारच कांहीं अंशी कारण झाला. याचें मूळचें नांव ख्वाजा आसीम व बापाचें नांव ख्वाजा कासम. आसीमचा जन्म स. १६७२–७३ त झाला. मोठा झाल्यावर त्यानें बंगाल्यांत अजीमुश्शानची नोकरी पत्करिली. पुढें फर्रुखसेयरबरोबर राहून त्यानें सय्यदांची मेहरबानी संपादिली आणि त्यांच्याच वशिल्यानें दरबारांत त्याचें वजन वाढून खान डौरान बहादुर मनसूरजंग हे भव्य किताब त्यास मिळाले. निजाम दक्षिणेंत आल्यावर महंमदशहानें त्यास मीरबक्षीचें काम दिलें, तें स. १७२३ पासून १७३९ पावेतों त्यानें केलें. त्या सालीं नादीरशहाच्या हल्लयांत तो मारला

गेला. मराठ्यांचे कागदांत 'खानडौरा' असा त्याचा उल्लेख आहे. दरबारांत कोणाशींही अतिप्रसंग करावयाचा नाहीं, होतां होईल तों सर्वांस खूष ठेवून आपला कार्यभाग साधावयाचा, अशा वृत्तीनें त्यानें महंमदशहाचा कारभार पुष्कळ वर्षें बरेपणें निभावला. त्याच्या अंगीं विशेष कौशल्य किंवा कर्तृत्व नव्हतें, परंतु गोड भाषण व रुबाबदार वर्तन यांमुळें त्याचे दोष झाकले जात. अतिप्रसंग किंवा निकराच्या भानगडी अंगावर न घेतल्यामुळें महंमदशहाची कारकीर्द एकंदरींत लांब व व शांततेंत गेली. मात्र मराठे, राजपूत व जाठ यांचा जोर वाढत जाऊन बादशाही कमकुवत झाली.

**३ बंगशाचीं दोन वर्षें.**—मराठ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें स. १७३० चे अखेरीस महंमदखान बंगशाची नेमणूक केली, तेव्हां बुंदेलखंडाप्रमाणें माळव्यांतही त्यानें मराठ्यांचा उच्छेद आरंभिला. बढवाणीच्या उत्तरेस चिंखलदा नांवाचें ठाणें उदाजी पवाराच्या ताब्यांत होतें, तें त्यानें ता. १०.४.१७३१ रोजीं काबीज केलें. या वेळीं दाभाड्याशीं झगडण्यांत बाजीरावाचें सर्व लक्ष गुंतलेलें असल्यामुळें बंगशास माळव्यांत बराच मोकळा हात सांपडला. लगेच तो मल्हाररावावर मंडलेश्वराकडे चालून गेला, परंतु मल्हारराव त्यास चुकवून जयपुराकडे निघून गेला. ता. १९.५.१७३१ रोजीं बंगश उज्जनीस आला, आणि तेथून जून महिन्यांत अंताजी माणकेश्वराचा पराभव करून त्यानें आपली छावणी पावसाळ्यांत सिरोंज येथें नेली.† इकडे त्यानें शाहूशीं पत्रव्यवहार करून, माळव्यांतून आपल्या सरदारांस परत बोलवा, अशी खटपट सुरू केली. परंतु शाहूनें एकच निक्षून जबाब त्यास दिला कीं, 'आम्हीं सर्व कारभाराची मुखत्यारी बाजीरावाकडे दिली आहे, त्यांच्याशींच तुम्हीं काय तें बोलणें करा.' पुढें स. १७३१ च्या अखेरीस सिंदे होळकरांस बाजीरावानें पुनः माळव्यांत पाठविलें त्यांच्याशीं बंगशाच्या अनेक चकमकी झडल्या. परंतु ते आपणास आटपत नाहींत असा अंदाज बांधून, त्यानें होळकर वगैरे कित्येकांस गौरवून आणून त्यांच्याशीं कांहीं करार ठरविले. स. १७३२ च्या पावसाळ्यांत त्यानें पुनः सिरोंज येथें छावणी केली आणि बादशहास निकरानें कळविलें, कीं तावडतोब मोठी फौज पाठवा, नाहीं तर सर्व प्रांत हातचा गेला आणि पुढें प्रत्यक्ष दिल्लीवरही हे मराठे घाला घालणार, असें समजा. बादशहाला दोन वर्षांत बंगशाकडून वसूल तर कांहीं आला

† अर्विन २ पृ. २५४.५५.

नाहीं, उलट त्याजबद्दल स्थानिक जमीनदारांकडून नाहीं नाहीं त्या कागाळया मात्र बादशहाकडे पोंचल्या. शिवाय निजामाशीं संगनमत करून हा बंगशच आपल्याशीं बंडखोरी करीत आहे, अशी बादशहाची भावना झाली. वजीर कमरुद्दीनखान व मीरबक्षी खानडौरान हे दोघेही बंगशाचे विरुद्ध होते. खान डौरानचें जयसिंगाशी सख्य होतें. त्यानें जयसिंगाचीच नेमणूक माळव्यावर करावी, दुसऱ्याचे हातून मराठ्यांचा बंदोबस्त होऊं शकणार नाही, असा बादशहास आग्रह केला. तो मान्य करून बादशहानें बंगशास परत बोलाविलें आणि बंगश कारभार सोडून ता. १६.१२.१७३२ रोजीं परत आग्र्यास पोंचला. त्यापुढें चार वर्षे माळव्याचा कारभार जयसिंगाकडे राहिला, त्या अवधींत काय प्रकार घडले ते पुढें सांगण्यांत येतील.

स. १७३० व ३१ या दोन सालांत संभाजी व दाभाडे या दोन प्रकरणांत गुंतल्यामुळें खुद्द पेशवा किंवा त्याचा बंधु उत्तरेंत गेले नाहींत. सिंदे-होळकरांनींच बंगशाला जेरीस आणून सर्व माळवा प्रांतांत आपला अंमल रगडून बसविला. बंगशाची नाचक्की होऊन त्यास बादशहानें कामावरून दूर केलें. सिंदे-पवार-होळकरांनीं पुण्यास येऊन चिमाजीच्या मार्फत शाहूकडून माळव्यांतील महालांची वांटणी राजरोस करून घेतली. ता. २९ जुलै, स. १७३२ चा हा तह इ. सं. पे. द. पृ. २०८ वर दाखल आहे. बादशहाची मंजुरी येण्यास जरी आणखी कैक वर्षे अवकाश लागला, तरी या वेळेपासून माळव्यांत मराठ्यांची सत्ता प्रत्यक्ष कायम झाली. वरील तारखेसच खालील पत्र पेशव्यानें आनंदराव पवारास लिहिलेलें आहे. ‘ रा. मल्हारजी होळकर व राणोजी सिंदे व तुकोजी पवार व जिवाजी पवार व तुम्हांस प्रांत माळवा येथील प्रांताची वांटणी करून दिल्ही आहे. सनदा सादर आहेत. त्याखेरीज परमुलूख सुभा अजमेर, सुभा प्रयाग व वोडसें व दतिया वगैरे मुलूख येथील आकार होईल त्यापैकीं दिवाणच्या बाबती व सरदेशमुखीचा ऐवज काढून बाकी राहिले ऐवज त्यास दरसद्दे रुपये १६ प्रमाणें तुम्ही आपली तक्षीम घेत जाणें. छ. १० सफर सु॥ सल्लास सल्लासीन. ’ †

**४ रोहेरामेश्वरची भेट, गुप्त करार** ( २७.१२.१७३२ ).— स. १७२८ पासून स. १७३२ अखेरच्या पांच वर्षांत बाजीराव व चिमाजी आपा या दोघां बंधूंची छाप हिंदुस्थानच्या दक्षिणोत्तर प्रांतांत एवढी बसली,

† अर्विन २.२५२; माळवा इन्‌-ट्रॅ. पृ. २१६; शा. रो. ५५.

कीं हे मोठे यशस्वी, ज्यास स्पर्श करतील त्याचें सोनें बनवितील, यांच्या पराक्रमापुढें कोणाचाही निभाव लागणार नाहीं, असा समज चहूंकडे पसरला. प्रत्यक्ष शाहूला जसें वाटूं लागलें, कीं यांच्या पुढें आपलें कांहीं चालणार नाहीं- तशीच तिकडे दिल्लीच्या बादशहाचीही समजूत झाली. निजाम, बंगश, दया, बहादूर यांच्यासारखे कर्ते व अनुभवी पुरुष या बंधूंपुढें निःसत्त्व बनले. त्यांच्या हाताखालीं त्यांच्याच तोडीचे सिंदे होळकर, पवार, कदम बांडे, आवजी कवडे, पिलाजी जाधव किती तरी जुने नवे वृद्ध तरुण पुरुष स्वतःच्या मुखत्यारीवर प्रचंड घडामोडी बनविण्यास समर्थ झाले. त्यांनीं सर्व देश हालवून सोडिला. माळवा, गुजरात, बुंदेलखंड या तीन प्रांतांत मराठ्यांचें वर्चस्व सिद्ध झालें. इकडे सेनापति दाभाडे व कोल्हापुरकर संभाजी यांचा पूर्णपणें पाडाव होऊन शाहूचें आसन निष्कंटक बनलें. दीपसिंगानें जाऊन जयसिंगाची खात्री केली, कीं या पेशवे बंधूंपुढें विरोध करून तुमचें भागणार नाहीं. त्यांना संतुष्ट ठेवण्यांतच तुमचा व प्रत्यक्ष बादशहाचाही निभाव आहे. त्यांच्याशीं विरोध करण्यानें तुमचेंच दिवसेंदिवस नुकसान होत जाईल. म्हणून गोडी बांधण्याचें धोरण तुम्ही स्वतः ठेवा आणि बादशहालाही तशीच सल्ला द्या. प्रत्यक्ष निजामानें देखील हा मार्ग स्वीकारिला. निजाम वरील वस्तुस्थिति जितकी ओळखून होता, दक्षिणेंतील प्रत्येक व्यक्तीची व व्यवहाराची त्याला जितकी माहिती होती तितकी त्या वेळीं दुसरी कोणालाही नसेल. म्हणून शाहूकडे निरोप पाठवून निजामानें बाजीरावाची भेट मुद्दाम घडवून आणिली.

अशा भेटीस, शब्दांस किंवा लेखांस खुद्द बाजीराव फारशी किंमत देत नव्हता. त्याचे मनास भेटीस जावयाचें नव्हतें. अशा कोणत्या गोष्टी ठरवायच्या होत्या, कीं ज्या पत्रोपत्रीं किंवा वकिलांमार्फत निकालांत आल्या नसत्या ? बाजीरावाची मनाची खात्री होती कीं आपणास पाहिजे असलेल्या गोष्टी आपण आपल्या सामर्थ्यानें घडवून आणूं. मुद्दाम होऊन निजामाचे वाटेस आपण जाणार नाहीं. पण गुजरात माळव्याकडे तो आपणास अडवूं लागेल तर त्याची खोड मोडण्यास आपण सिद्ध आहों; हा उपद्व्याप सोडून निजाम हैदराबादेस आपल्या मुलखांत राहून पूर्वीचे करार पाळील तर आपण त्याचे वाटेस जाणार नाहीं, किंवा दक्षिणेंतून त्यास साफ उखडून काढण्याचीही आपली इच्छा नाहीं, हें त्याचें ठरलेलें धोरण होतें. सबब प्रत्यक्ष भेटीची यातायात टाळावी असा विचार त्याचा स्वतःचा होता. परंतु सुमंत, नारबावा यांचे मार्फत निजामानें

शाहूकडे आग्रह चालविला, कीं एकदा आमची व रायांची भेट व्हावी, समक्ष बोलणीं होऊन अंतःकरणांतील सर्व संशय दूर व्हावे, मध्यस्थ मंडळी भलत्या बातम्या पसरवून किंवा उगाच नसत्या उठाठेवी करून स्नेहांत बिघाड करतात, तो प्रकार टाळून कायमची मैत्री ठरवून चाललेल्या भानगडी मिटवाव्या, याजकरितां समक्ष भेटीची सूचना निजामाकडून शाहूकडे आली. शाहूनें लगेच ती गोष्ट बाजीरावास कळवून निजामाकडे जाण्याची आज्ञा केली. ती आज्ञा लगोलग मान्य न करितां बाजीराव सबबी सांगून वेळ काढूं लागला, हें पाहून शाहूला फार राग आला. त्यानें निक्षून निरोप व माणसें पाठवून पिच्छा पुरविला, तेव्हां नाइलाज होऊन निजामाचे भेटीस जाणें बाजीरावास भाग पडलें.

स. १७३२ च्या पावसाळयांतला हा प्रकार आहे. या भेटीचा व निजाम-शाहूच्या या आग्रहातिरेकाचा एवढा बभ्रा बाहेर उडाला, की यांत कांहीं तरी त्या दोघांचा भलताच डाव आहे अशी कंडी पिकली. निजामाचे मनांत भयंकर कावा आहे, भेटीच्या निमित्तानें बोलावून आणून बाजीरावाचा घात करावा, यासाठी तसा योग जुळविण्याकरितां निजामानें शाहूमहाराजांस दोन कोट रुपये लांच देऊं केला आहे, महाराजांनाही बाजीरावाचा शिरजोरपणा दुःसह झाला आहे, तेव्हां परभारें कांटा निघाला तर उभयतांना बरेंच झालें असा शाहूचा भाव असल्याच्या अफवा जनतेंत पसरल्या.

प्रत्यक्ष मातुःश्रीनें व दुसऱ्या अनेक जिव्हाळयाच्या माणसांनी बाजीरावास पराकाष्ठेचा मोडा घालून कळकळीनें कळविलें, या भेटींत निश्चित तुमचा घात योजलेला आहे तर तुम्ही कशाही युक्तीनें भेटीचें हें संकट अंगावर घेऊं नका. बाजीरावाच्या मातुश्रीस त्याची मामी लिहिते, " राऊ तांब्राच्या भेटीस जातात म्हणून ऐकिलें, तर भेटीस न जावें हा सर्वांचा विचार आहे. तुम्ही म्हणाल कीं पेशवाईपदाचा महिमा म्हटला कीं छत्रपतींची आज्ञा प्रमाण, परंतु प्रस्तुतचा प्रकार राजकीय नाहीं. तांब्रानें छत्रपतींस दोन कोट रुपये देऊं केले आहेत, या लोभास्तव ते यांस पाठवितात असें सर्वतोमुखीं आहे. यास्तव यांचें जाणें न होय तें करावें. कदाचित् जाणें भागच असेल तर चिमाजी आपाची फौज जवळ आणविणें, दोघे एकत्र होऊन मग काय तो विचार करणें. उतावळी करून एकस्थांस जाऊं न देणें." खुद्द बाजीरावास तिनें कळविलें, " तुम्ही भेटीस सहसा जाऊं नये. चिमाजी आपा इकडे होते, तेव्हां

आपा दूर जातांच निकड केली. इतकेंही असून जाणेंच असेल तर चिमाजी आपाची व दुसरी जिल्ह्याळयाची फौज जवळ ठेवून विचारें करून काय तें करावें. जानोजी निंबाळकर व तुरुकताजखान तुम्हांस न्यावयास येणार होते, पण तुम्हांस या गोष्टीचा भेद कळेल म्हणोन न आले." मातुःश्रीनेंही बाजीरावास आग्रहाचा मोडा घातला. ¶

शाहू छत्रपतीला ही वरील जनवार्ता कळली असावी असें त्यानें आनंदराव सोमवंशी यास लिहिलेल्या पुढील मजकुरावरून दिसतें. "बाजीरावांसमागमें जावयाची तुम्हांस आज्ञा केली असतां, तुम्ही जाण्याचा विचार करीत नाहीं यास काय म्हणावें ! हाल्लीं हें आज्ञापत्र खास दस्तकाचें सादर केलें आहे. पत्रदर्शनी स्वार होऊन प्रधानपंतांस सामील व्हावें. ये गोष्टीस उजूर कराल तरी स्वामी तुमच्यावर इतराजी करितील." बाजीरावाचा ब्रह्मेन्द्रस्वामीनेंही निषेध केला, त्यावर त्यानें स्वामीस कळविलें, "आपण जाऊं नये म्हणून सांगितलें तें यथार्थच आहे, पण महाराजांचे आज्ञेस इलाज काय ! सर्व संकट निवारणार श्रीस्वामी समर्थ आहां." §

अगोदरच दसऱ्याचे मुहूर्तानें चिमाजी आपा व सिंदे होळकर, पिलाजी जाधव वगैरे झाडून सारे प्रमुख सरदार उत्तर हिंदच्या स्वारीस रवाना झाले होते, म्हणून स्वतःच्या मनाचा निश्चय व प्रसंगास तोंड देण्याची अंतःकरणाची हिंमत यांचा अवलंब करून बाजीरावानें धन्याची आज्ञा पूर्ण करून दाखविली. बायकी सल्ला कितीही कळकळीची आणि बाजारगप्पा कितीही भीषण असल्या तरी त्यांस त्यानें काडीचें मोल दिलें नाही. नेहमीं अशा भेटी औरंगाबादसारख्या परिचित भूप्रदेशांत व्हावयाच्या. पण प्रस्तुतची ही भेट भलत्याच अप्रसिद्ध जागीं पंढरपुर कमाळा या वाटेनें औसा नजीक मांजरा नदीच्या कांठीं रोहेरामेश्वर ‡ येथें निजामानें ठरविली. मोगली काव्याचा अवलंब न होतां भेट सुव्यवस्थित प्रकारें सिद्धीस गेली. दावलजी सोमवंशी, संताजी व शंभुसिंग जाधव हे सरदार बरोबर होते. "पौष व० ७ छ २० रजब बुधवार ( ता. २७ डिसेंबर, स. १७३२ ) ते दिवशीं पंतप्रधान व नबाब यांच्या भेटी मांजरेच्या कांठीं रोहेरामेश्वर येथें जाल्या. पहिले भेटीचे समयीं रायास एक हत्ती व एक मोत्यांची जोडी, दोन घोडे, ७ पर्चे वस्त्रें व एक

¶ पे. द. ३०.९०, ९१, ३२; पे. द. ९.७.

§ ब्र. १२१. ‡ रोहे रामेश्वर लातूरच्या उत्तरेस ८ मैल.

पंजा ऐसें दिल्हें." ¶ स्वामी यशस्वी होऊन परत आले. वर्तमान अंबाजीपंतांनीं परमहंसस्वामींस कळविलें. बहुत समाधान पावले आणि पांच तोफा सोडल्या. नौबत वाजविली. शर्करा वांटली. बहुत उत्सव केला. नानांनीं खुपीनें वर्तमान चिमाजीआपांस लिहून पाठविलें. प्रत्यक्ष छत्रपतीस व मातुश्रीस आनंदाच्या कोटी उत्पन्न झाल्या.

एवढ्या मिंनतवारीनें घडवून आणलेल्या इतिहास [illegible] या दोन व्यक्तींच्या वरील भेटीत फलितार्थ काय ठरला त्याचा खुलासा कोठेंच मिळत नाहीं. एखादा करार झाला असेल तो त्या वेळीं गुप्त स्वरूपाचा असल्यामुळें प्रसिद्धीत आला नाहीं, तेणेंकरून इतिहासलेखकांची नजर त्याला कायमची मुकली. गुप्त ठराव झाला त्याचा मतलब एवढाच की मोगलांच्या नर्मदोत्तर प्रदेशांत बाजीराव जे उद्योग चालवील त्यास निजामानें व्यत्यय न आणल्यास, निजामाच्या दक्षिणच्या उद्योगात आपण दखलगिरी करणार नाहीं असें पेशव्यानें कबूल केलें. पुढील चार वर्षे पावेतों निजामबाजीरावाचा संमर्द किंवा उघड झगडा उपस्थित झाला नाहीं, यावरून वरील गुप्त करार कांहीं काळ त्यांनीं बरोबर पाळला असें दिसून येतें. §

पे. द. १५ पृ. ९४ वर 'यादी बाजीराव पंतप्रधान याचे मतलबाची निजाम उल्मुल्क यास दिली,' या मथळ्याखालील कलमें कदाचित् रोहेरामेश्वरच्या भेटीची कदाचित् अन्य प्रसंगाचीं असलीं तरी प्रस्तुत विषयास लागू दिसतात.–१ चंदीचंदावरचें राज्य शिवाजीराजांस होतें, त्याप्रमाणें शाहूराजांस द्यावें. २ पंतप्रधान यांस कर्जाची ओढ झाली त्यास खर्चाची मदत करावी. ३ खानदेश, औरंगाबाद, विजापुर या तीन सुभ्यांत पन्नास लक्ष उत्पन्नाचा मुलूख पेशव्यास द्यावा. ४ दक्षिणची वतनी सरदेशपांडेगिरी दर शेकडा पांच करार करून द्यावी. ५ दक्षिणचा बंदोबस्त रावप्रधानांचे विद्यमानें करावा. ६ शिवनेरचा किल्ला पंतप्रधानास द्यावा. ७ कित्येक गांव इनाम करून द्यावे. 'या कलमांचा जाबसाल जबानीनें केला असे' असा शेरा शेवटीं आहे, त्यावरून त्यांचीं उत्तरें निजामानें तोंडीं दिलीं, लेखी करार दिला नाहीं असा निष्कर्ष दिसतो.

¶ रा. ख. ३.९७, पे. द. ३०.३२; १०.८३,८५; १८.३४.

§ Irvine II p. 252.

**५ चिमाजीआपाची स्वारी.**—स. १७३२ साल बाह्य उद्योगाच्या दृष्टीनें शाहूच्या दरबारास व मुख्यतः पेशव्यास अनाक्रमणात्मक व विफल गेलें असें म्हणतां येईल. कारण या सालीं सिंदे होळकर पवार हे सरदार जरी माळव्याच्या मुलूखगिरीवर होते, तरी पेशवे बंधु बाहेर संचारास गेले नाहींत. दाभाड्याचें प्रकरण झालें, संभाजी ठिकाणीं बसला, निजामानें सुमंताचे मार्फत शाहूकडे बोलणें करून बाजीरावाशीं कायमचें सख्य जोडण्याची इच्छा दर्शविली, दीपसिंग परत गेल्यावर जयसिंगानें बादशहाचें मन वळवून बाजीरावाची समजूत काढावी असा प्रयत्न दादो भीमसेन, हिंगणे इत्यादींच्या मार्फत जोरानें चालू झाला, तेव्हां लोभानें ज्या गोष्टी सिद्धीस जाणें शक्य आहे, त्यासंबंधानें बादशाही दरबारास विनाकारण दुखवूं नये, गोंडी जर घडून आली नाही, तर पुढें शस्त्राचें आक्रमण हातीं आहेच, अशा विचारानें बाजीराव शाहूच्या आग्रहास्तव एक वर्ष अगदी स्तब्ध बसला. सिंदे, होळकर, पवार यांना मात्र माळव्यांत आपलें आसन स्थिर करण्यासाठीं पाठविण्यांत आलें. त्यांनींही बंगशास आळा घालून आपापलें बस्तान कायमचें बसविण्यांत वरील संधीचा उपयोग केला. उज्जन, इंदूर, धार, देवास या ज्या मराठ्यांच्या राजधान्या हळूहळू निर्माण झाल्या, त्यांचा पहिला पाया वरील सरदारांनीं मुख्यतः रामचंद्रबाबाच्या सल्यानें घातला. रयतेकडून भलाई मिळवून मोगली अमलापेक्षां मराठ्यांचा अंमल जास्त सुखकर आहे अशी भावना उत्पन्न करण्याचा प्रयत्न झटून करण्यांत आला. उदाजी पवार मागें पडला तरी त्याचा बंधु आनंदराव यानें पेशव्यांचे मर्जीनें वागून सिंदे होळकरांशीं सख्य ठेविलें आणि सर्वांनी एकजुटीनें वागून आपल्या चांगुलपणाचा लौकिक वाढविला. येणेंकरून बादशहालाही संतोष होऊन त्याला बंगशाचा वीट येऊन माळव्याच्या कारभारावर त्यानें मराठ्यांना अनुकूल असलेल्या जयसिंगाची नेमणूक केली. अशा प्रकारें जो कारभार या वेळेपासून सुरू झाला त्यासंबंधानें माल्कमनें देखील आपल्या लेखांत आदरोद्गार काढले आहेत. मोगलाईतील दुर्बळ व अव्यवस्थित कारभारापेक्षां मराठ्यांचें राज्य लोकांस गोड व सुखकारक वाटलें, म्हणूनच तें राज्य अल्पावकाशांत बद्धमूल झालें, असें तो लिहितो.

स. १७३२ सालीं पेशव्यांस बाहेर जातां आलें नाहीं याचीं आणखी कित्येक महत्त्वाचीं कारणें आहेत. डभईच्या संग्रामानें दाभाड्याच्या मनोवृत्ति इतक्या

दुखावल्या कीं उमाबाईनें गांधीलमाशीप्रमाणें चहूंकडे चावे घेण्याचा सपाटा चालविला, त्यामुळें शाहूनें अस्वस्थ होऊन दाभाड्यांची समजूत पाडण्याची पराकाष्ठा केली, त्यासाठीं त्यानें पेशवे बंधूंस जवळ ठेविलें. शिवाय याच वेळीं जंजिऱ्याचे सीदीचें प्रकरण निकरावर येऊन ब्रह्मेन्द्रस्वामीनें त्याजवर स्वारी करण्याचा आग्रह शाहूचे दरबारीं जोरानें चालविला. म्हणून शाहूनें त्या स्वारीच्या तयारीसाठीं सर्व प्रमुखांस जमवून वाटाघाट केली. ताडफाड निकालाची वृत्ति शाहूचे ठिकाणीं नसल्यामुळें नुसत्या शुष्क विचारांत पुष्कळ काळ निघून गेला. बंगसास काढून बादशहानें माळव्याच्या सुभेगिरीवर सेप्टेंबर, स. १७३२ त पुनरपि जयसिंगाची नेमणूक केली आणि मराठ्यांस माळव्यांतून काढून लावण्यास किती फौज लागेल, दुसऱ्या तजविजी काय करायच्या तें सर्व ठरवून दिलें. बादशहाशीं बोली करून जयसिंग जयपुरास आला आणि तेथून ता. २० ऑक्टोबर, स. १७३२ रोजीं निघून डिसेंबरांत उज्जनीस पोंचला. या हालचालीची इत्थंभूत बातमी ठिकठिकाणच्या वकिलांनीं पुण्यास कळविली. तेव्हां चिमाजी आपा व निरनिराळे सरदार मोगलांच्या प्रतीकारार्थ चहूंकडून धावून गेले. ता. १८ जानेवारी, स. १७३३ रोजीं चिमाजीचा मुक्काम मंदसोरवर होता, तेथून तो तसाच बुंदेलखंडांत गेला, आणि २२ एप्रिल रोजीं परत फिरून ७ जूनला पुण्यास पोंचला.

आदल्या वर्षी अभयसिंगानें पिलाजी गायकवाडास मारून बडोदें हिसकावून घेतलें, त्याचा वचपा घेण्याचा उद्योग दमाजी, दाभाडे, बांडे वगैरे सरदार करीत असून त्यांचे उपराळ्यास सिंदे होळकर गेले होते. त्यांनीं गुजरातेंत चांपानेर काबीज केलें, तों जयसिंग माळव्यांतून मराठ्यांचीं ठाणीं उठवूं लागल्याची बातमी कळतांच ते दोघे परभारें जयसिंगावर चालून गेले. मंदसोरजवळ त्यांनीं व आनंदराव पवार व विठोजी बुळे अशा सर्वांनीं जयसिंगास अवाचित येऊन घेरलें आणि अन्नोदक बंद करून त्याची उपासमार चालविली, त्याबरोबर जयसिंगानें तहाची बोली घातली कीं चौथाईबद्दल सहा लाख रुपये घेऊन सुटका करावी. पण होळकरानें अधिकाचें बोलणें घातलें. दरम्यान सवाईजींनीं कृष्णाजी व उदाजी पवारांस फितवून वश केलें, पण सिंदे होळकरांनीं त्यांस फजित करून ताळयावर आणिलें. मग युद्धप्रसंग बराच झाला. 'स्वामींच्या प्रतापें फत्ते होऊन सलुयावरी आला.'† दिल्लीस वर्तमान

† पे. द. १४.१,२,७,८,९,१२; १७.६०; १५.६.

बादशहास पोंचलें तेव्हां खुद्द आपण तुमचे साह्यास चालून येतों अशी सूचना बादशहानें जयसिंगास पाठविली, त्यावरून तहाचें बोलणें फिसकटलें, 'लढाईचा प्रसंग घातला. मराठे सिद्धच होते. चहूंकडून हल्ला केला. जयसिंगाचा चंडोल म्हणजे पिछाडीची फौज सर्व मारली गेली. होळकराकडील दोनशें घोडीं व दहावीस माणसें कामास आलीं. होळकरानें दूर गेलोंसें दाखवून पुनः एकदम निकराचा हल्ला चढविला. बादशहाची मदत परिणामीं आली नाहीं. तेव्हां निरुपायास्तव जयसिंगानें २८ परगण्यांतील घेतलेल्या खंडण्या व शिवाय सहा लाख रोख मराठ्यांस देण्याचें कबूल केलें.' ( फेब्रु० स. १७३३ ).

चिमाजीआपा उत्तरेंत गेला, त्यापूर्वीच हिरदेसाचे वकील आशाराम व हरिदास पुरोहित बाजीरावाकडे पुण्यास गेले होते, त्यांच्याशीं बोली करून बाजीरावानें आपला हस्तक मुधाजी हरि यास बरोबर देऊन त्यांस चिमाजीकडे बुंदेलखंडांत परत पाठविलें. यापूर्वीच चिमाजी आपानें गोविंदपंत बुंदेल्याचे मार्फत हिरदेसा व जगत्‌राज यांजशीं जागिरीची व चौथाईची तडजोड चालविली होती. चिमाजी दक्षिणेंत परत गेल्यावर मुधाजी हरि दाखल झाला, त्याचा व गोविंदपंताचा मेळ बसला नाहीं. पुढें मुधाजीस पेशव्यानें परत बोलावून घेतलें. गोविंदपंत व मुधाजी हरि यांनीं अनेक राजकारणें खेळवून पेशव्यांचे उद्देश पुष्कळसे परिणामास आणिले.§ चिमाजीनें हिरदेसा व जगत्‌राज यांची पूर्ण समजूत पाडून ओर्च्छा दतिया वगैरे राज्यांवर शह बसविला व खंडण्या वसूल केल्या. एकंदरींत अनेक सत्ताधीशांचीं गुंतागुतीचीं राजकारणें चालल्यामुळें या स्वारींत चिमाजीच्या हातून तडकाफडकी लभ्यांश जरी झाला नाहीं, तरी त्यानें गोडीनें वागून उत्तरेंतील मराठी अंमलास नेट आणिला. चिमाजीचे मागून सिंदे-होळकर दक्षिणेंत आले त्यांना वस्त्रें देऊन शाहूनें बहुमान केला ( ऑगस्ट, स. १७३३ ). सवाई जयसिंगास दाबल्याचें हें पारितोषिक होय. समरांगणावर विजय ताबडतोब मिळवितां येतो, पण त्याचे प्रत्यक्ष फायदे पदरांत पडण्यास वाटाघाटी व राजकारणें यांनीं विलंब कसा लागतो याचें उदाहरण ही स्वारी आहे.

स. १७३३ त चिमाजी उत्तरेंतून पुण्यास आला, तेव्हां बाजीराव पश्चिम किनाऱ्यावर सीदीच्या युद्धांत गुंतला होता. माळवा बुंदेलखंडचा कार्यभाग

§ पे. द. ३०. १०३, ९४, ९६; १४. ९.

अर्धवट राहिलेला पुरा करण्याची निकड असतांही उभयतां बंधूंना दक्षिणेंतून हालण्याची सोय झाली नाहीं. तेव्हां दसऱ्यास त्यांनीं शाहूच्या विद्यमानें पिलाजी जाधवास स्वारीस पाठविण्याचें ठरवून तशी सूचना त्याला केली. त्याला तयारी करून निघायला दोन महिने लागले. या स्वारीस भदावरची स्वारी म्हणतां येईल. डिसेंबरअखेर त्याचा मुकाम अशीरगडाजवळ झाला.† सिंदे, होळकर, पवार, तुबाजी अनंत, गोविंद हरि, येद्माजी सतकर इत्यादि सरदार पिलाजी, बरोबर होते. सिंदे-होळकरांनीं पुढें जाऊन बढवाईस मोर्चे लावून खंडणी पोख्ती घेऊन माळवा गांठला.§ "दतियाचा कारभार उरकून सिंदे-होळकर अहिरवाड्याकडे व आम्ही ग्वालेरीस गेलों. भदावरचा कार्यभाग विल्हेस लावला. पुढें जावें तरी मुलूक सर्व वैराण सबब परत फिरून गोविंद बल्लाळास कार्याची विचारणा करून मजल दरमजल करीत देशास येतों." अशी या स्वारीची फलश्रुति पिलाजीनें नरवराहून ता. ९ एप्रिल, स. १७३४ रोजीं लिहून पाठविली. एकंदरीत पिलाजीच्या हातून या वर्षी भरीव कार्यभाग झाला नाही. बाजीराव मात्र खानदेशांत फेरी मारून परत गेला.‡

जयसिंगाचे अंतःकरणांत होळकराशी दंश उत्पन्न होण्यास बुंदी संस्थानची भानगड कारण झाली तो प्रकार येथें सांगणें अवश्य आहे. मोगल बादशाहीच्या अलीकडच्या ऱ्हासकाळांत सवाई जयसिंग हाच प्रमुख राजपूत सत्ताधीश असून शेजारीं बुंदीचें लहान संस्थान होतें, तें आपल्या कबजांत आणण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. बुंदीचा राजा बुधसिंग दूर गेला असतां स. १७२९ च्या सेप्टेंबरांत जयसिंगानें एकदम फौज पाठवून बुंदीचा कबजा घेतला आणि तेथील गादीवर आपल्या तर्फेचा दलीलसिंग हाडा यास बसविलें. दलीलसिंगानें जयसिंगाच्या कन्येशीं लग्न करून त्याची ताबेदारी पत्करिली. बुधसिंग पुढें दहा वर्षें जिवंत होता, तेवढ्या अवधींत त्यानें जयसिंगास बिलकूल चैन पडूं दिलें नाहीं. शिवाय त्याचा पुत्र उम्मेदसिंग शूर व पराक्रमी निघाला त्यानें तर जयसिंगाचा पिच्छा अखेरपर्यंत पुरवून शेवटीं अठरा वर्षांनीं स. १७४८ त बुंदीची गादी परत मिळविली. दरम्यानच्या एवढ्या अवधींत बुंदीच्या या तंट्यामुळें मराठ्यांना राजपुतांच्या राजकारणांत हस्तक्षेप करण्याची संधि भरपूर सांपडली.

† पे. द. १४. १८. § पे. द. १४. १३. ‡ पे. द. १४. १५; १५.१; ३०. १०६.

राज्य गेल्यामुळें बुधसिंग रानोमाळ भटकूं लागला. दलीलसिंगाचा वडील भाऊ प्रतापसिंग म्हणून होता, तो बुधसिंगास मिळाला. बुधसिंगाची राणी धूर्त व चतुर होती, तिनें नानाप्रकारच्या खटपटी करून आपला नक्ष राखिला. प्रतापसिंगाच्या मार्फत तिनें मराठे सरदारांस आपल्या बाजूस वळविलें. प्रतापसिंगानें साताऱ्यास येऊन शाहूमहाराजांची गांठ घेतली आणि मदतीची याचना केली. शाहूनें ती गोष्ट मान्य करून तसे हुकूम सिंदे होळकरांस पाठविले. चैत्र व. ३० ता. २२ एप्रिल, स. १७३४ रोजीं सूर्यग्रहणसमयीं राणोजी सिंदे, रामचंद्रबावा व मल्हारराव होळकर यांनीं एकदम बुंदीवर हल्ला चढवून तें स्थल काबीज केलें. बुंदीच्या राणीनें मल्हाररावास बंधु मानून सत्कारपूर्वक त्यास राखी बांधिली. पण होळकराची पाठ वळतांच जयसिंगानें फौज पाठवून बुंदीचा ताबा घेतला आणि मराठ्यांचा प्रतिकार करण्याच्या हेतूनें त्यानें राजपूत संस्थानिकांचें ऐक्य घडवून आणण्यासाठीं त्यांचें एक बडें संमेलन भरविलें तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे. बुंदीचें प्रकरण पुष्कळ वर्षे चिघळत गेलें. स. १७३६ च्या माघमासीं बाजीराव व जयसिंग यांची भेट झाली, तेव्हां मल्हाररावास बाजीरावानें भेटीस नेलें नाहीं. दिल्लीच्या मोठ्या राजकारणाचा बिघाड होऊं नये, म्हणून बाजीरावानें होळकरास दूर ठेवून जयसिंगाचा संतोष राखिला.

दिवसेंदिवस मराठे बळावत चालले आणि माळव्यांतून त्यांना साफ काढून लावणें मोगल दरबारला अशक्यप्राय होऊन बसलें. कसें झालें तरी चाळीस वर्षे एकसारखा चिकाटीनें चालविलेला उद्योग मोडून काढणें कोणास झालें म्हणून सुलभ कसें होणार! पश्चिम किनाऱ्यावरील कामें अपुरीं टाकून बाहेर जाण्यास बाजीराव-चिमाजींना शाहूची आज्ञा मिळेना. शिवाय जोंपावेतों हस्तकांकडून परभारें दहशत बसवून कार्यभाग उरकतां येतो, तोंपावेतों स्वतः पेशव्याला उत्तरेंत जाण्याची जरूर भासली नाहीं. इतरांनींच वारंवार स्वाऱ्या करून एवढी दहशत उत्तरेंत बसविली, कीं मराठ्यांची कशाही प्रकारें समजूत काढल्याशिवाय निभाव नाहीं अशी तिकडे सर्व प्रमुखांची खात्री होत चालली. जयसिंगाचा पुरोहित व्रजनाथ म्हणून त्याच्या मर्जीतला होता, त्यानें बाबूजी नायकाचे मार्फत पेशव्यास लिहिलें, "गुदस्तां सिंदे-होळकरांनीं धामधूम केल्यामुळें जयसिंग फार खिन्न आहेत. त्यांचे चित्तांत सलूख करावासें आहे. आम्हीं बोलणें करण्यासाठीं आपले भेटीस येऊं इच्छितों. तर समाधानपूर्वक

उत्तरें पाठवावीं." § (ता. १६ ऑगस्ट, स. १७३४) यावरून जयसिंगाची मनोभावना व्यक्त होते.

६ **खानडौराची फजिती.**—मोगल-मराठ्यांच्या झगड्यास आतां चांगलेंच तोंड लागलें. उभय पक्षांनीं निकराच्या झगड्यासाठीं आपापल्यापरी भरपूर सिद्धता केली. स. १७३३ त पेशव्यांचे अंगावर जंजिऱ्याची मोहीम असल्यामुळें त्यांनीं पिलाजी जाधवास माळवा बुंदेलखंडांत पाठविलें. स. १७३४ च्या आरंभीं त्यानें बुंदेलखंडांत जाऊन बादशहाचे पोटांत भयंकर धास्ती उत्पन्न केली. खानडौरा व त्याचा भाऊ मुजफ्फरखान मीरआतीष यांस त्यानें ताबडतोब रवाना केलें. सिरोंजपर्यंत ते चालून आले. जयसिंग या वेळीं बुंदीकोटच्या भांडणांत गुंतला होता, तिकडे मल्हारराव होळकरानें त्याची त्रेधा उडवून दिली. पुढें उन्हाळा वाढत चालला, तसा पिलाजी जाधव दक्षिणेंत परत फिरला आणि मोगल फौजाही विशेष कांहीं न करितां दिल्लीस परत गेल्या.

दोन वर्षें जयसिंगानें कसून मेहनत केली, बादशहानेंही आपले इलाज केले, तरी मराठ्यांची चढाई कमी न होतां वाढत गेली. खुद्द जयसिंगालाहि वाटूं लागलें, एकदां अगदीं निकराचा प्रयत्न करून पहावा. त्यासाठीं राजपूत संस्थानिकांची एकजूट बनविण्याचें ठरवून मेवाडच्या राज्यांत हुर्डा येथें स. १७३४ च्या पावसाळ्यांत त्यांना बोलावणीं पाठवून एकत्र जमविलें, आणि बरेच दिवस विचार व खल करून ता. १७ जुलै रोजीं सर्वानुमतें एक लेखी करार सिद्ध केला. त्यावर त्यांनीं सह्या करून असें ठरविलें, कीं पुढील मोसम सुरू होतांच सर्वांनीं आपापल्या फौजांसह रामपुरा येथें जमावें. परंतु प्रत्यक्ष वेळ आली तेव्हां करार कागदावर राहून फारसे कोणी हजर झाले नाहींत. ¶

एका अर्थानें मोगल व राजपूत यांचा हा शेवटचा निकराचा प्रयत्न होता. स्वतः बादशहानें होती नव्हती तेवढी तयारी करून मराठ्यांना चिरडण्यासाठीं जंगी मोहीम ठरविली. दक्षिणेंत लगोलग बातम्या पोंचल्या. शाहूनें सरदारांस हुकूम काढून पिलाजी जाधवाला उत्तरेच्या स्वारीस जाण्याची आज्ञा केली. बाजीराव-चिमाजी यांची जरूर जंजिऱ्याचे व आंगऱ्यांचे प्रकरणांत असल्यामुळें ते स्वारींत जाऊं शकले नाहींत. दसऱ्यास स्वारीचे बेत झाले. मातुश्री राधाबाई

§ पे. द. ३०.१०८ ¶ Malwa-in Transition p. 229.

यांनीं यात्रेस जाण्याचा बेत ठरविला. त्यासाठीं कुटुंबांतला पुरुष उत्तरेंत असावा म्हणून पिलाजीबरोबर नानास स्वारींत पाठविण्यांत आलें. त्याचें वय आतां तेरा वर्षांचें होऊन त्यालाही उत्तरेकडील स्वारीचा व राजकारणाचा अनुभव घ्यावा असा उद्देश योजण्यांत आला. ता. १७ नोव्हेंबर, स. १७३४ रोजीं पिलाजी जाधव कोरेगांवाहून निघाला तो कुरवाई, ‡ नरवर वरून बुंदेलखंडांत जाऊन मे, स. १७३५ अखेर परत आला. ¶

पण बादशहाचा खरा जोर स. १७३५ त निदर्शनास आला. स. १७२९ पासून मराठ्यांची चढाई वृद्धि पावत होती, तिला आळा घालणें अशक्य आहे ही गोष्ट या सालच्या संग्रामांतून निष्पन्न झाली. पिलाजी जाधव नानासाहेबास घेऊन उत्तरेंत गेला. बादशहानें आपली शिकस्त करून प्रचंड फौजा बनविल्या. दोन भाग एकदम सिद्ध करून एक पश्चिम बाजूनें राजपुतान्यांतून खानडौराचे हाताखालीं माळव्यावर व दुसरा पूर्वेकडून कमरुद्दीनखानाचे हाताखालीं बुंदेलखंडावर चालून आले. दोनही ठिकाणीं निकराचे संग्राम होऊन मोगलांस हार खावी लागली. जयसिंग, अभयसिंग, कोटेकर राव दुर्जनसाल वगैरे सरदार आपापलीं संपूर्ण सैन्यें घेऊन खानडौरास सामील झाले. अशा तमाम फौजांचा अवाढव्य घोळका गाडे, तोफा, जनावरें, बुणगे मिळून महासागराच्या लाटांप्रमाणें मुकुंदरा खिंडींतून पुढें माळव्याच्या बचावास चालून आला. फेब्रुवारींत रामपुऱ्याजवळ त्यांची व सिंदे-होळकरांची गांठ पडली. मोगलांच्या सभोंवार कैक दिवस घिरट्या घालून त्यांनीं असा उच्छेद मांडला, कीं ते अल्पावकाशांत अत्यंत जेरीस आले. जयपुरचा उत्तरेकडील प्रदेश मोकळा पडला ती संधि साधून मल्हाररावानें कांहीं निवडक स्वारांनिशीं जयपुर-जोधपुरच्या प्रदेशांत अचानक प्रवेश करून पुष्कळ लूट पैदा केली. ता. २८ फेब्रुवारीस त्यानें सांबरचें समृद्ध शहर युद्ध करून लुटून घेतलें. सांबरचा फौजदार साफ नागवला गेला. तेथील काझी होता त्यानें बायकांस स्वहस्तानें ठार करून रणांगणांत शिरून प्राणत्याग केला. या वार्ता ऐकून खानडौरान व जयसिंग वगैरे उत्तरेकडील प्रदेशाच्या बचावास धावून गेले. नाइलाजास्तव त्यांनीं सिंदे होळकरांना चौथाईबद्दल २२ लाख देऊन अंगावर आलेलें युद्ध मिटविलें. हा तह † ता. २४ मार्च, स. १७३५ रोजीं कोटाजवळ घडून आला.

‡ रे० स्टे० बिनाचे दक्षिणेस. ¶ पे. द. २२. २०, २१.

† पे. द. १४. २३, २४.

नारो शिवदेव ओढेकरानें या संग्रामाचें वृत्त पेशव्यास लिहून कळविलें तें वाचण्यालायक आहे. "मोगल दोन लाख स्वार व. तोफखाना व आरब यांस तो संख्या नाही, रामपुरा प्रांतें आले. इकडून मल्हारजी होळकर व राणोजी सिंदे ऐसे येऊन (ता. ३-१२ फेब्रु० पावेतों) आठ रोज कजिया केला. चौगीर्दा राहून कहीकबाड, घासदाणा बंद केला. उंटें घोडी आणिलीं. उपरांत गनिमी कावा सुरू केला. बुंदी कोट्यावरून सवाईचे मुलखांत प्रवेश केला. खान दौरा व जयसिंग त्याजवर परत चालून गेले. मल्हाररावांनीं सांबर लुटून फस्त केलें. तेथील फौजदारास माफ नागविलें. काजीनें स्वहस्तें बायकांस मारून आपण कटून मेले.¶

एवंच धावपळीच्या युद्धांत वीस हजार मराठ्यांपुढें दोन लाख मोगल टेकीस आले. जयसिंगाचे विद्यमानें खानडौरानें मल्हारजी व राणोजी यांच्या भेटी घेतल्या. चौथाईबद्दल दरसाल बावीस लाख कबूल होऊन सलूख केला. पैशाची वसुली महादेव भट हिंगणे यास सांगितली.§ समस्त राजपूत व बादशाही उमराव यांजवर सिंदे-होळकरांनीं असा विजय मिळविल्याबद्दल दक्षिणेंत त्यांची वाहवा झाली. दोघे सरदार ता. ६ जुलै, स. १७३५ रोजीं पुण्यास आले. होळकरास संगमापावेतों व सिंद्यांस घोरपडीपावेतों पंतप्रधान सामोरे गेले. उभयतास साताऱ्यास नेऊन महाराजांस भेटविले. त्यांहीं मोटा बहुमान केला. †"

स. १७३५ च्या माळवा बुंदेलखंडांतील या मोहिमांनीं मोगल बादशाहीची दुर्बलता चांगलीच उघडकीस आली. त्याच वेळी पेशव्यांच्या मातुःश्रीनें निर्धास्तपणें प्रवास करून आपल्या यात्रा सिद्धीस नेल्या. वजिरानें परत जातांना भगवंतासिंग अडारूचा समाचार घेतला, तेंही प्रकरण बादशाहीची अवनति सिद्ध करणारें दुसरीकडे सांगितले आहे.

**७ कमरुद्दीनखानाचा पाडाव,** (फेब्रुवारी १७३५).—बादशहानें वजीर व खानडौरान यांस दोन भिन्न दिशांनीं जाऊन मराठ्यांस माळव्यांतून हाकून देण्याची आज्ञा केली. त्यांपैकीं खानडौरानचा प्रकार वर सांगितला. वजीर कमरुद्दीनखान ता. २०.११.१७३४ रोजीं मोठी फौज व तोफखाना घेऊन आगऱ्याहून निघाला. पिलाजी जाधव, राणोजी भोसले, व्यंकटराव नारायण

¶ Sarkar's Fall I p. 254. § आर्व्हिन २ पृ. २८०. † पे. द. २२.२९३.

घोरपडे असे कित्येक सरदार स. १७३५ चे आरंभीं बुंदेलखंडांत आले. 'दिल्लीहून फौजा येत आहेत म्हणून वार्ता दाट आली आहे. प्रसंग कैसा पडेल न कळे, तरी एक महिनापर्यंत दूर प्रांतें न जातां फत्तेपुरामाजींच राहणें.'¶ अशीं खास दस्तखतें शाहूनें १४.१२.३४ रोजीं सरदारांस पाठविलीं. नरवर, ओर्छा वगैरे ठिकाणीं वजीर व मराठे यांची धावपळीची झोंबाझोंबी फेब्रुवारींत झाली, तिचें वर्णन खालील दोन पत्रांत आहे.

'रा. पंतप्रधान तथा चिमणाजी पंत आपा स्वामी गोसावी यांस. पोष्य व्यंकटराव नारायण छ २ सवाल ( १५.२.१७३५ ) मु. हटेगांव प्रांत वोडसें विशेष. नबाब कमरुद्दीनखान पाठीस लागून आला. याकरितां बुंदेलखंडांत बुनगे ठेवावया येऊन राहिलीस पाठविल्याचें व युद्धप्रसंग झाल्याचें वर्तमान आबाजी जासूद व कासीदजोडी रा. धोंडो महादेव यांजकडील आली होती, त्यांबरोबर पत्रीं लिहून दोन पत्रें पाठविली आहेत, ती प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जाहलेंच असेल. त्या अलीकडे ३० रमजानी ( १३.२.१७३५ ) चालते मजलीस युद्ध जालें. कमरग्यामध्यें फौजेनें घालून शें सवाशें उंट आणिले. झुंज होत होत मोगल उदतासिंगाच्या तळ्यावरी मुक्कामास जाऊन मुक्काम केला. आमचेही मुक्काम आदकोसावरी जाहले, दुसरे दिवशी छ १ सवाली मोगलांची ईद होती, परंतु मुक्काम न करिता, नगारा न होतां, मुकाम्यानें कूच पहांटे करून चालिला. आम्ही बातमीस राऊत ठेविले होते, ते खबर घेऊन येतांच, कुलफौजेनशीं चालून जाऊन, मोगलांसभोंवते घेरट्या घेऊन, करोल पुढें घालून मोगलांशी युद्ध जाहलें. हुजरात व रा. सटवोजी जाधव, गोविंद हरि व राणोजी व भिका शिंदे व संताजी मोरे व शिवाजी घालवडे व येद्याजी सतकर, व अर्जुनजी भोसले यांनी व समस्त लोकांनीं बरीचशी मेहनत करून कमरुद्दीनखानासारिखा वजीर खटा करून गोटग्गामध्यें घातला, आणि फौजनशी वेत्रवती उतरोन जाठवाडा व भदावर ग्वालेरीकडे गेलों. याउपरी मोगल आमचे पाठीवरी फिरोन यावयाची उमेद तों नाहीं. कदाचित् आला तरी

¶ शा. रो. ६५. फत्तेपुर दमोच्या उत्तरेस २५ मैल. पुढील दोन पत्रें रा. वा. वि. जोशी, सातारा याजकडून मिळालीं. तीं दुसरीकडे छापलीं नसल्यामुळें येथें समग्र दिलीं आहेत. याच वेळचीं आणखी उपयुक्त पत्रें ऐ. सं. सा. खं. २ ले. २१९-२२४ चीं पहा.

हिसाब धरीत नाहीं. जो मोगल आमचे पाठीवरी चालोन येत होता, त्या मोगलाचे पाठीवरी स्वामीची फौज लागोन, आडा करून वोडशांत घातला, हे सलाबत कांही सामान्य जाहली असें नाही. साराश, स्वामीच्या पुण्याचा अगाध महिमा आहे, तदनुरूप योग घडून आला. स्वामींनी आह्माकडील कोण्हेविशी फिकीर करावी ऐसें नाही. सविस्तर वृत्त रा. जाधवराव याचे पत्री लिहिले आहे, त्यावरून विदित होईल.'

'सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री चिमणाजीपंत आपा स्वामी गोसावी, पोष्य व्यंकटराव नारायण, साष्टांग नमस्कार विनंति उपरी, येथील कुशल ता॥ छ १० सवाल ( २५.२.१७३५ ) जाणून स्वकीय कुशल लेखन करावया आज्ञा केली पाहिजे. विशेष. आपण पत्र छ. ९ रमजानचे पाठविलें ते पावले. राजश्री पिलाजी जाधवराव यांस लिहिले आहे, त्याप्रमाणे जो जो कर्तव्य तो करून वर्तमान लिही ( फाटलें ). ऐशियास ( फाटलें ) जाणून प्रसंगोपात मनमुबा करावया अंतर करितात ऐसें नाही. कमरुद्दीनखान याच्या शहामुळे टक्या पैक्याचें काम चाललें नाही, व ताम्राचे युद्धप्रसंग जाल्याचें वर्तमान पेशजी एक दोन पत्रें पाठविलीं त्यांत व हल्ली तपशिले लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. सारांश, आपल्या पुण्यप्रभावें कमरुद्दीनखानासारिखा वजीर असतां, तंबी पोहचऊन यश संपादिलें व इकडून लौकिक बरासा जाहला. समस्त लोकांनी मेहनत सामान्य केली आहे ऐसें नाही. कळलें पाहिजे. राजश्री आनंदराव पंडित सुमंत यांचें पत्र आलें होतें. त्यांची व राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री राणोजी शिंदे यांची पत्रें आली त्यांच्या नकला करून पाठविल्या आहेत, यांवरून कळों येईल. आम्ही येथून पत्रें चिरंजिवांकडे नांदणीस पाठवावया कारणें पाठविलीं आहेत, तरी स्वामींनी जासूद नांदणीस पाठवून पत्रे पावती केलीं पाहिजेत. त्याची उत्तरें आलिया इकडे आपले कासीद येतील त्यांबरोबर पत्रें येतील तीं पाठविलीं पाहिजेत. बहुत काय लिहिणें कृपा असों दीजे हे विनंति.'

पिलाजी जाधवानें ता. २ मार्चच्या पत्रांत स्वारीचा इत्यर्थ कळविला कीं, 'वजीर वीस पंचवीस हजार फौजेनिशी दिल्लीहून आम्हांवर आला. त्यांचीं आमचीं दोन तीन युद्धें झाली. त्यांची दोन तीनशें उंटें घोडीं पाडाव आलीं. आम्ही निघोन सिप्री कुलारस प्रांतें आलों. कमरुद्दीन पांच लक्ष देतात,

आमचें मनोगत नाहीं. त्यांसी आम्हांसी बारा कोसाची तफावत आहे. पुढें आम्ही बुणगे घेऊन चादे देवगड मुलखांतून देशास येऊं. " ¶

८ वजिरास शह, भगवंतसिंग अडारू.—अलाहाबादच्या पश्चिमेस सुमारें पन्नास मैलांवर फत्तेपुर जिल्ह्यांत यमुनेच्या उत्तरतीराजवळ गाझीपुर नांवाची एक लहान गढी असून तिचा मालक भगवंतसिंग अडारू नावाचा खेची राजपूत सरदार होता. कमरुद्दीनखान वजिराच्या बायकोचा भाऊ जाननिसारखान त्या फत्तेपुर जिल्ह्याचा कारभारी महाअमात्य व चैनी होता. त्यानें भगवंतसिंगावर धर्माच्या बाबतीत कांहीं अत्याचार केल्यामुळें उभयतांचें वाकडें येऊन युद्ध झाले, त्यांत भगवंतसिंगानें खानास ठार मारिलें, (मार्च, १७३२). पुढें भगवंतसिंगास वठणीस आणण्याचा प्रयत्न कमरुद्दीनखानानें केला, तो सिद्धीस गेला नाहीं. बायकोनें त्याचा पिच्छा पुरविला, की ज्यानें माझ्या भावाचा प्राण घेतला, त्याचा सूड तुम्ही घेतला पाहिजे. त्यावरून स. १७३३ च्या उन्हाळ्यांत वजीर कमरुद्दीनखान मली मोठी फौज घेऊन बुंदेलखंडांत चिमाजी आपावर चालून गेला होता, त्या वेळीं चिमाजी दक्षिणेंत परत गेल्यामुळें वजिरानें दिल्लीकडे जातांना वाटेंत गाझीपुरास वेढा घातला, त्या प्रसंगांत भगवंतसिंग पळून बुंदेलखंडांत आला, तेथें छत्रसालाच्या पुत्रांनी त्यास आश्रय दिला. भगवंतसिंगानें गोविंदपंत बुंदेल्यास भेटून मराठ्यांची मदत मागितली. ती मदत घेऊन तो आपल्या प्रांतांत गेला आणि कमरुद्दीनखानाची फौज हाकून देऊन गाझीपुर त्यानें कबजात घेतलें. असा हा भगवंतसिंगाचा बंडावा वाढत चाललेला पाहून बादशहानें स. १७३५ त सादतखानास आज्ञा केली, की तुम्ही जाऊन भगवंतसिंगाचा दंगा मोडा. ता. ६ नोव्हेंबर रोजीं सादतखानाने अचानक गाझीपुरावर येऊन भगवंतसिंगास गाठलें. भगवंतसिंग अत्यंत निकरानें लढून रणांगणीं मारला गेला. झुंज मोठें झालें. पांच हजार माणूस मेलें. सादतखानाचे सोळा मातबर सरदार मारले गेले. खान हतवीर्य झाला पण भगवंतसिंगाचें शीर बादशहास नजर करून त्यानें प्रतिष्ठा मिळविली (२२ नोव्हेंबर, स. १७३५). भगवंतसिंगाचा मुलगा रूपसिंग मराठ्यांचे आश्रयास आला. त्याने स. १७३६ त गोविंदपंत बुंदेल्याचे मार्फत बाजीरावास भेटून बादशाही उमरावांची खोड मोडण्यासाठीं मदत

¶ पे. द. १४.२२.

मागितली. चार वर्षे हें प्रकरण बादशहास पुरलें. उत्तरेंतले राजपूत सुद्धां किती नाराज झाले होते हें त्यांत दिसतें. ¶

९ **राधाबाईची काशीयात्रा.**—बाजीरावाची मातुःश्री राधाबाई हिची काशीयात्रा ही केवळ खासगी कौटुंबिक बाब नसून तो एक प्रकारचा राजकारणी विषय पेशव्यांचें सामर्थ्य व लौकिक दाखविणारा आहे. तिच्या प्रवासाचीं भरपूर वर्णनें उपलब्ध आहेत तीं वाचलीं असतां पेशव्यांच्या कर्तृत्वाविषयीं आदरभाव वाटूं लागतो. उत्तर हिंदुस्थानांतील राजपूत राजे व मुसलमान सत्ताधीश अशा सगळ्यांकडून तिचा मोठा सन्मान करण्यांत आला. बाजीरावासारख्या पराक्रमी पुरुषाची मातुःश्री प्रवास करीत येते, तर तिचे पाय आपल्या भूमीस लागावे, तिच्या सात्त्विक आशीर्वादानें आपलें भलें व्हावें अशा भावनेचीं अनेकांकडून पुण्यास पत्रें आलीं; ठिकठिकाणी तिचा अप्रतिम बहुमान होऊन वस्त्रालंकारादींचा वर्षाव घडला; यावरून मराठ्यांबद्दल त्या वेळी कशी आदरवृत्ति औत्तरीय जनतेंत वसत होती याची कल्पना होईल.

पुण्यांतून राधाबाई ता. १४ फेब्रुवारी, स. १७३५ रोजीं वाट चालूं लागून ता. २६ मे, स. १७३६ रोजीं सर्व यात्रा निर्विघ्नपणें संपवून परत आली. पंधरा महिन्याचा स. १७३५–३६ चा हा काळ उत्तरेंत किती धामधुमीचा होता हें मागें सांगितलेल्या घडामोडींवरून लक्षात येईल. त्या सालीं माळवा प्रांत कबजात घेण्यासाठीं पिलाजी जाधव-सिंदे-होळकर हे सरदार शिकस्त करीत असून, बादशाही उमराव लाखपन्नास हजार फौजांनिशी मध्यहिंदुस्थानवर चालून आले असताच बाईची यात्रा चालली. तिला नेण्याकरितां जयपुरचे पुरोहित आले होते. नुसतें मराठ्यांचें नाक कापण्याच्या हेतूनें एखाद्या लहानशा मोगल टोळीनें राधाबाईला लुटून घेणें किंवा पकडणें शक्य होतें. उदेपूर-जयपुरावर त्याच उन्हाळ्यांत सिंदे-होळकरांनी मोठा धुमाकूळ उडवून दिला होता, त्यामुळें मार्च महिन्यांत बऱ्हाणपुरावर बाईचा मुक्काम असतां, तिचा मुख्य व्यवस्थापक बाबूजी नाईक यास अशा धामधुमींत पुढें जाण्याची मोठी धास्ती पडली. बऱ्हाणपुराहून तो लिहितो, " आम्ही अविवेकें निघालों. पंथ दूर. राजकीय वर्तमान की परस्पर युद्ध होतें. एखादा वाईट प्रसंग आला तर घरास तरी सुरक्षित कसें यावें! बुंदेलखंडावरून जावें तर कमर्दीखानाचा शह, सवाईजीकडे जावें तों ते दूर गेले. लोकापवादाकरितां उगाच साहस करावें तर स्वामींचें

¶ पे. द. १४.४,९,४०–४२; १५–१०; ३०.३२१; माळवा इन् ट्रॅन्झिशन.

नांव थोर, स्वामी पुण्यवान आहेत तों चिंता नाहीं. येथील अविंधानें शेंदोनशें राऊत नर्मदेपावेतों दिले, उदईक पुढें जातां." ¶

बाईबरोबर परिवार विशेष मोठा नव्हता. सर्व मिळून शेंपन्नास असेल. घरचा पुरुष तर समागमें कोणीच नव्हता. आपण विधवाबाई, ठिकठिकाणीं सत्कार होणार त्यासाठीं निदान सदाशिवास तरी बरोबर पाठवा अशी बाईनें चिमाजीआपास गळ घातली. त्यास नुकतें पांचवें वर्ष लागलेलें, लहान म्हणून पाठविलें नाहीं. या संबंधाचें चिमाजीआपाचें मातुःश्रीस लिहिलेलें पत्र मातृवात्सल्याचा उत्कृष्ट नमुना म्हणून सर्व वाचकांनी लक्षांत ठेवण्याजोगें आहे. ‡ बाबूजी नाइकाचा बंधु आबाजी यास भिऊबाई दिलेली, दोघेही बंधु घरच्यासारखे राधाबाईच्या व्यवस्थेस नेमलेले होते. महादोबा पुरंदरे हा दुसरा माहितगार गृहस्थ मातुःश्रीसह व वासुदेव जोशी कल्याणकर हे स्वारींत होते. यांशिवाय प्रमुख माणसांची नावें आढळत नाहीत. मुद्दामच लोकमत अजमावण्याकरितां बाजीराव, चिमाजींनी मातुःश्रीला अशी सडी यात्रेस पाठविली. परिणामावरून त्यांचा हा प्रयोग यशस्वी झाला यांत संशय नाही. मराठ्यासंबंधानें उत्तरेंत बिलकूल आदर वसत नव्हता असें प्रतिपादन जे करितात, त्याचें हें उदाहरण उत्कृष्ट खंडन आहे. निदान बाजीरावाचे वेळीं उत्तरेंत निर्भेळ आदरच सर्वत्र दिसून येत होता.

राधाबाईचे मुक्कामांची संक्षिप्त नोंद अशी—ता. १४.२.१७३५ पुण्याहून प्रयाण; ता. ८ मार्च ब्रह्माणपुर; ता. १८ एप्रिल नर्मदापार बढवाई; ता. ६ मे उदेपुर; ता. १८ मे नाथद्वार; ता. २१ जून जयपुर, मुक्काम १५ सेप्टेंबर पावेतों. सेप्टें० ऑक्टोबर–मथुरा, वृंदावन, कुरुक्षेत्र, प्रयाग (हरद्वार अयोध्येचा उल्लेख नाही); ता. १७ ऑक्टो० काशी येथें दाखल; २३ डिसेंबर काशीहून प्रयाण गयेस; गयेहून जानेवारींत निघून बुंदेलखंडच्या मार्गे सागरवरून बढवाहाजवळ नर्मदा उतरून मे महिन्यांत पुण्यास दाखल. १ जून, स. १७३६ रोजी मावंदें केलें.

यात्रेसंबंधाचीं पुष्कळ पत्रें उपलब्ध आहेत त्या सर्वांचा तात्पर्यार्थ देण्यास सवड नाहीं. संदर्भ दिले आहेत ते अभ्यासूंनीं पाहावे. उदेपुराहून बाबूजी

¶ पे. द. १४. २१. ‡ पे. द. ९. ११.

नाईक ता. १८ मे रोजीं लिहितो, " बढवाईहून वैशाख शु. ७ निघून वद्य १० स उदेपुरास आलों. आठ दहा दिवस राणाजींनीं आपले संनिध ठेवून उत्तम प्रकारें सन्मान केला. महालांत मातुःश्रीस नेली. राणाजी त्याचे दर्शनास गेले. मोत्यांची माळ, पदक व हातचे सोन्याचे चुडे असा बहुमान दिला. हत्तीछावा व पांच हजार रुपये खर्चास दिल्हे. दिवाण बिहारीदास यांनी एक हजार नजर केली. दरमजला लवकरच जयपुरास जाऊन सवाईजींची भेट घेऊं." § उदेपुराहून नाथद्वार करून मंडळी जयपुरास गेली. " मातुःश्रीबाईस पातशहाची दस्तकें त्रिस्थळी यात्रा करून सुखरूप नर्मदापार करून द्यावें ऐसी दिल्ही असून दोन सरदार व हजार स्वार बरोबर दिल्हे आहेत. जागजागां उमरावांनी अहेर मेजवान्या, जवाहीर हत्ती घोडे देऊन गौरवून आपापल्या हद्देतून पोहोंचावून देतात. द्रव्यही खर्चास देतात. "$ जयपुराहून पेशव्याचा वकील सदाशिव बल्लाळ कुंटे लिहितो,—

" मातुःश्री राधाबाईचें आगमन आषाढआरंभीं जयनगरास जालें. बाबूजी नाईक घेऊन आले. तेथून निघणें दसरा जाहालिया उपर होईल. मातुःश्री पुण्यवान याजकरितां सर्व गोष्ट नीट पडली. पुढेही त्यांचेच पुण्यानें गोष्टी होतील. स्वामीचे ( बाजीरावाचे ) अदृष्ट विचित्र आहे, तेणेंकरून चिंता वाटत नाहीं. यात्रा सुखरूप होऊन आपले स्थलास जातील. राय नारायणदासजी यांस महाराजाधिराज सवाईजींनीं मातुःश्री समागमें शेवटपावेतों दिल्हे. त्यांचे व्याही राय हरप्रसाद महंमदखान बंगशाचे दिवाण. स्वामींचें (बाजीरावाचें) अगत्य सर्वास. तेच घडीस आम्हांस यमुनापार उतरून नबाब बंगशाचे भेटीस घेऊन गेले. जाऊन नबाबाची भेटी घेतली. बहुत संतोषी झाले कीं रायांनी आम्हास स्मरण करून पत्र लिहिलें व आमचे भरवंसियार मातुःश्रीस पाठविलें. त्याची मातुःश्री व आमची दोन नाहीत. तेच घडीस आपले तालुक्यापावेतों फौजदारांस ताकिदा लिहून पाठविल्या आणि मातुःश्रींचे सेवेसीं वर्तमान सांगोन विजयादशमीचे मुहूर्ते यमुनापार उतरून दिलीं आणि हरप्रसाद दिवाणाबरोबर हजार रुपये नगद व पाचसाशेंचीं वस्त्रें बादली मातुःश्रीकारणें पाठविली. सवाई जयसिंग बोलले कीं रायांशीं माझा अकृत्रिम स्नेह आहे. उदेपुरच्या राणाजींनी सामंतसिंग वकील स्वामिसेवेसी

§ पे. द. ९. १२. $ पे. द. १४.३९.

पुण्यास पाठविला आहे. येथें स्वामींच्या नांवावर सर्व गर्भगळित आहेत. " ¶ पातशहा, महंमदखान बंगश इत्यादींनीं मातुःश्रीचा आदरानें परामर्ष घेतला यावरून पेशव्यांचा धाक व आदर केवढा वाढला होता याची कल्पना होईल.

यात्रेंतील मामुली प्रसंगांचें वर्णन देण्याचें कारण नाहीं आणि तसें वर्णन उपलब्धही नाहीं. क्षेत्रांतील ब्राह्मण याचकांच्या तक्रारी पुष्कळ आलेल्या जशा त्या वेळीं राधाबाईला उद्वेगकर वाटल्या असतील तशा त्या आजही वाटणाऱ्या आहेत. वाराणसींतून नारायण दीक्षित बाजीरावास लिहितो, " मातुःश्री राधाबाई कार्तिक शु० १२ स श्रीस आली. तीर्थविधि करून पौष वद्य ५ स स्वार होऊन गयेस गेली. येथें जो धर्म जाला तो पत्रीं लिहितां येत नाहीं. महाराष्ट्र ब्राह्मणास एक कपर्दिका कोणास पावली नाही व चित्तपावनांस पांच सात दहापर्यंत पावले. वरकडांस एक दोन, दहापांचांस कांहींच पावलें नाहीं. आमचा विद्यार्थी शिवभट तुम्हांकडे पाठविला आहे यास दोन चार शत ऋण आहे तें फिटेलसें करावें. " † सदाशिव नाईक जोशी यानें काशींत घाट बांधण्याची व अन्नछत्रें, वर्षासनें, अग्निहोत्रें वगैरे चालविण्याची सूचना केली ती पे. द. १८.३६, ३७ व ३०.२८० या कागदांत वाचण्यालायक आहे. काशीसारखीं हिंदूंचीं पवित्र स्थलें ताब्यांत घेऊन धर्मसंस्थापना दृढ करावी हा उद्देश प्रथम बाळाजी वि० नें दिल्लीच्या स्वारीत योजिला, त्याची थोडीबहुत सांगता मराठशाहीच्या अखेर-पर्यंत होत होती. " मातुःश्री व आबाजी नाईक यात्रेंतून आले. बुंदेल्यांच्या मुलखातून आले. गोविंद बल्लाळांनी उभयतां राजांकडून (छत्रसालपुत्रांकडून) भेट बहुमान करविला. सौ०वती भिऊबाई आबाजी नायकांसमागमें आली नाही. वाराणसीमध्यें राहिली. "

जयसिंगानें बुंदीच्या राज्यांत हस्तक्षेप करून आपला जावई दलेलसिंगास तेथील गादी दिली हा संदर्भ मागें आला आहे. " रावराजे दलेलसिंगास मातुःश्री राधाबाईनी सवाई जयसिंगाची कन्या मांडी वर घेऊन राज्य दिधलें, जे माझे वंशींचा जो कोणी असेल तो तुमच्या राज्याकडे वाकड्या नजरेनें पाहणार नाही. त्याचे पन्नास हजार बाईची भेटी देत होते ती बाईंनीं पाटणास येऊन घेतली. " §

¶ पे. द. ३०. १३४

† पे. द. ३०. १४७. § रा. खं. ६. ५५६.

राधाबाईसारख्या धुरीण स्त्रियांच्या तीर्थयात्रा म्हणजे दाक्षिणोत्तर समाजांस एकत्र आणणारें बंधन होय असें या हकीकती वाचल्यानें नजरेस येतें. सामाजिक आचारविचारांत अशा प्रवासांमुळें महत्त्वाचे फरक घडत गेले. मराठ्यांचा अंमल त्या वेळी लोकांस पसंत पडत होता असें अनुमान बांधल्यास तें गैर नाही. प्रवासाचीं साधनें अत्यल्प असतां राधाबाईची यात्रा लवकर व सुकर पार पडली हें नवल होय. बाईचा प्रवास बहुतेक घोड्यावर, कांहीं बैलगाड्यांनी व थोडाबहुत पालखीनें झाला असावा. राजपुतान्यासारख्या रुक्ष प्रदेशांतील भयंकर उन्हाळा पुण्याच्या माफक हवेंत राहणाऱ्या वृद्ध बाईनें सोसला, प्रकृति वगैरे बिघडली नाही हे प्रकार सहज मनांत येतात.§

§ सदभ पे. द. भा. ९.११, १२, १३, १४, १८; पे. द. १४.२१, ३१, ३९, ४७, ५१, पे.द. ३०.११५, १२६, १२८, १३१, १३४, १४७, १६७, २८०: भा. २२-११४, ३२९., ३३०; पे. द. १८.३६-३८; पे. श. इत्यादि.

# १०

# बाजीरावाचें कटु कर्तव्य

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १७३५ | ऑक्टो० | ४ | बाजीराव उत्तरेच्या स्वारीस निघाला. |
| १७३६ | फेब्रुवारी | ३–७ | बाजीराव उदेपुरास मुक्काम. |
| ,, | मार्च | ४ | बाजीराव जयसिंग भेट किशनगडजवळ. |
| ,, | मेअखेर | | बाजीराव पुण्यास परत आला. |
| ,, | नोव्हें० | | बाजीराव दिल्लीचे स्वारीस निघाला. |
| १७३७ | जाने० | १० | भेलसा काबीज. |
| १७३७ | फेब्रु० | १८ | अटेर काबीज. |
| ,, | मार्च | १२ | सादतखानाचा मराठ्यांवर दुआबांत हल्ला. |
| ,, | ,, | २३ | मथुरेवर मोगल उमरावांचा समूह. |
| ,, | ,, | २८ | बाजीरावाचा दिल्लीवर हल्ला. |
| ,, | एप्रिल | ५ | बाजीराव परत जयपुरावर. |
| ,, | जुलै | १७ | बाजीराव परत पुण्यास. |

# १०

# बाजीरावाचें कटु कर्तव्य

**१ बादशाही उमरावांस ठेचगा २ बाजीराव–जयसिंह निष्फळ भेट**
**३ दिल्लीवर चढाई ४ बादशहाचें बळ जोखलें ५ फलितार्थ**

**१ बादशाही उमरावांस ठेचगा.**— मोगल बादशाही कशी मोडकळीस आली होती त्याची कल्पना आज आपणास होते तशी त्या वेळीं कोणास झाली नाहीं. महंमूद गज्नवी, अलाउद्दीन खिलजी यांनीं दहा पांच हजार एक जुटीच्या लढवय्यांस हाताशीं घेऊन, लाखों विसकळित हिंदूंचा धुव्वा उडवून दिला, तोच प्रयोग आतां अल्पसंख्य मराठ्यांनीं मोगलांवर उलटवून दाखविला. बादशहा व उमराव सर्वच नामर्द बनले होते. सिंदे होळकर, पवार, पिलाजी जाधव, कंठाजी कदम, बाजी भीवराव इत्यादींची जूट, आवेश व निग्रह बादशाही उमरावांत नव्हता, म्हणून भगवंतसिंग अडारू-सारख्या लहानशा जमीनदारापुढें ते टेकीस आले. जयसिंगाचा व मराठ्यांचा परिचय स. १७०२ च्या खेळण्याच्या वेढ्यापासून पुढें सारखा तीस चाळीस वर्षें केव्हां सामान्य तर केव्हां निकट झाल्यामुळें उभय पक्षांचें बलाबल त्यालाच चांगलें अजमावतां आलें. गिरिधर बहादूर, बंगश, खानडौरान इत्यादींच्या प्रयत्नांची निष्फलता स्पष्ट दिसत होती. बुंदीच्या प्रकरणांत मल्हाररावाच्या विरोधामुळें जयसिंगाचे हात चांगले पोळून निघाले. तेव्हां प्रत्यक्ष बाजीरावास भेटीस आणून समक्ष बोलीनें तडजोडीचा मार्ग ठरविण्याचा उपाय त्यानें योजिला.

स. १७३५ चा पावसाळा दिल्लीस [illegible] दरबारांत व सातार्‍यास शाहूच्या दरबारांत मोठ्या खळबळीचा गेला ; त्या खळबळींत एकाची चिंता व दुसर्‍याची उमेद जोरानें वाढली होती. बादशहाच्या दरबारांतील सल्लागारांचे दोन विरुद्ध पक्ष बनले, एक खानडौरान व जयसिंग यांचा आणि दुसरा सादतखान, सरबुलंदखान व बंगश यांचा. शाहूच्या दरबारांत झाडाच्या बुंध्याशींच घाव घालण्याची तयारी बाजीरावानें सुचविली असेल तर ती

या वेळची असावी. जयसिंगाचे वकील व उदेपुरचा वकील सामंतसिंग मिळून साताऱ्यास आले. महादेवभट हिंगणे, दादो भीमसेन इत्यादींनीं उत्तरेंतून पेशव्यास पत्रें लिहून पुढील उपक्रम सुचविला. अशा प्रकारें हिंदभूमीचें दक्षिणोत्तर वातावरण या वेळीं क्षुब्ध व भीषण बनलें.

जयसिंगानें भर दरबारांत निर्भीडपणें सर्व परिस्थिति स्पष्टपणें समजावून दिली. त्यानें सवाल टाकला तो असा,—" औरंगजेबासारख्या सामर्थ्यवान बादशहाकडून मराठ्यांस आळा बसूं शकला नाहीं. औरंगजेबानंतरच्या दीर्घ काळांत तर मराठ्यांचे बल अतोनात वाढून दक्षिण, गुजरात, माळवा हे प्रांत वस्तुतः त्यांच्याच कबजांत गेले आहेत. एकाही बादशाही उमरावाची ताकद त्यांस आळा घालण्याची होत नाहीं. त्याची शक्ति वाढत असून उत्तरोत्तर बादशहास नामुष्कीच पदरांत घ्यावी लागत आहे. शाहू छत्रपति, पेशवे व सरदार यांची आमची पूर्ण जानपछान असून त्यांचे विचार व उद्देश आम्ही समजून घेतले आहेत. बादशहास दगा द्यावा किंवा त्यास नेस्तनाबूद करावें अशी एकाची इच्छा नाहीं. उलट त्यांचें कळविणें असें आहे कीं, आमच्या पोटापाण्याची व्यवस्था करून द्या म्हणजे आम्ही होऊन बादशाहीचा बंदोबस्त करून देतों. आम्ही पदरीं फौजा बाळगून शत्रूंचें निवारण करूं. या देशात बादशहाना हिंदु प्रजेवर राज्य करावयाचें आहे. अकबर बादशहा थोर होऊन गेले त्यांजपुढेंही असाच बिकट प्रश्न येऊन पडला. त्यांनीं उदार धोरण ठरवून राजपुतांवर उगारलेलें शस्त्र मागें घेतलें, आणि समजुतीच्या मार्गांनी त्यास खूष ठेवून बादशाहीस बळकटी आणिली. तसाच प्रकार आताही करण्यास काय अडचण आहे! आपण पेशव्यास येथें भेटीस आणून त्याजवर आपल्या संरक्षणाचा भार टाकावा. ही जबाबदारी अंगावर पडली कीं त्यांची बंडखोरी थांबेल! असे स्पष्ट करार पेशव्याशीं करण्यांत बादशहांस लांछन नाहीं. ही सर्व घटना यथायोग्य घडवून आणण्याची जबाबदारी आम्ही स्वतःवर घेतों. प्रस्तुत प्रसंगीं आत्मसंरक्षणाचा अन्य उपाय आम्हांस दिसत नाहीं." अशा प्रकारचा बिनतोड युक्तिवाद जयसिंगानें सुचविला. त्यावर विरोधी पक्षानें उलट प्रतिपादन केलें कीं, " जयसिंग अंतस्थपणें मराठ्यांस सामील होऊन बादशाहीचें अनिष्ट चिंतितात. ते समानधर्मी एकमेकांचें साह्य करतात. आपण सर्व एक दिलानें व निकरानें लढलों तर मराठ्यांचा बंदोबस्त सहज करूं शकूं.

जयसिंग विश्वासघात करतात त्यांचाच प्रतिकार प्रथम करणें जरूर आहे. त्यांजकडील सुभेदारी एकदम काढून घ्यावी." या विरोधास निजामानें दक्षिणेंतून दुजोरा दिला. वजीर कमरुद्दीनखानाचें मत डळमळित, हेंही खरें, त्यांतही तथ्य आहे, अशा प्रकारचें, प्रसंग येईल तशी निभावणूक करणारें होतें.

दरम्यान बाजीरावानें गुजरात, माळवा प्रांतांची सुभेदारी चौथाईच्या तत्त्वावर आम्हांस कायम करारानें लिहून द्या, न द्याल तर लष्करी जोरावर ती आम्ही वसूल करूं, तेणेंकरून बादशाही मुलखास व प्रजेस तोशीस पोचेल त्यास आमचा नाइलाज आहे, अशा आशयाची ठासून मागणी वकिलांमार्फत बादशहास कळविली. खानडौरान व जयसिंग यांनीं बादशहास स्पष्ट बजावलें कीं, सादतखान व निजाम हे मराठ्यांशी लढण्यास किती समर्थ आहेत हें पूर्वींच कळून चुकलें आहे. आपली सत्ता टिकवावी एवढाच त्याचा हेतु असून, पूर्वींच्या सय्यदांप्रमाणें तुम्हास पदावरून काढून दुसरा बादशहा उभा करावा असा याचा घाट आहे. अशी उलटसुलट चर्चा निरनिराळ्या उमरावांची ऐकून बादशहाची केवळ घाबरगुंडी उडून गेली. आज दोन चार वर्षे एका मागून एक पदाधिकारी मराठ्यांपुढें नामुष्की पदरांत घेऊन परत आले. आतां पुढें करायचें काय या विचारानें बादशहाची चिंता व खेद अनावर झाला. धन्याच्या अंगीं स्वतःची धमक नसली म्हणजे त्याचे सेवक तरी काय करणार! सर्व दोष हे उमराव एकमेकांवर लोटूं लागले.§

सादतखानानें तर बादशहास निक्षून कळविलें, "या जयसिंगानें तुमचा सर्वस्वी घात केला. एक कोट रुपये खर्चासाठीं घेऊन माळव्याचें संरक्षण न करितां उलट आज हा प्रसंग आणिला. मला आपण माळवा व आग्रा हे दोन सुभे द्या, म्हणजे मी पहा मराठ्यांचा कसा बंदोबस्त करून दाखवितों. मला त्याबद्दल एक कवडी नको. दक्षिणेंत निजाम माझे दोस्त आहेत, ते मराठ्यांस तिकडे पायबंद देतील आणि मी त्यांचा इकडून समाचार घेईन." सर बुलंदखानानेंही सादतखानाचे म्हणण्यास पुष्टि दिली, त्यावर खानडौरान बोलला, "मराठ्यांना युद्धांत जिकणें अशक्य होय असा आमचा अनुभव सांगतो. त्यांना सलुखानें नियंत्रण घालणेंच शक्य व इष्ट आहे. आपली आज्ञा असेल तर मी

§ या प्रकरणाचे लेख-साहित्य विस्तृत आहे. त्याकरितां अर्व्हिन, सियारुल मुताखरीन, माळवा-इन-ट्रॅन्झिशन, अयोध्येचे दोन नबाब, सरकारकृत फॉल, पेशवे, द. चे. व राजवाड्यांचे खंड इत्यादि पहावे.

पेशव्यांना येथें आपले भेटीस आणितों. त्यांनाच बादशाही अंमलदार बनविलें म्हणजे ते आपल्या प्रदेशास उपद्रव देणार नाहींत. आपण हा मार्ग न पत्कराल तर सादतखान व निजाम हे दोघे एक होऊन, आपणास दगा देतील आणि दुसरा एखादा बादशहा सिंहासनावर बसवितील. बाजीराव व शाहू बादशहाच्या आज्ञा पाळण्यास तत्पर आहेत. हालींच त्याची मातुःश्री निर्भयपणे गंगाजीची तीर्थयात्रा करीत आहेत की नाहींत!"

"दिल्लीहून मयाराम वकिलाचे कागद शाहूकडे आले की अभयसिंग व कमरुद्दीनखान यांचा एक हात पातशहांनीं करून दिल्हा आणि आग्रा व गुजरात या प्रांताची व्यवस्था त्यांजकडे सांगितली. गनिमास पैका देऊन सल्ख केला यामुळें खान दौरा व जयसिंग यांजवर पातशहा इतराज आहेत. खान दौरांनी पातशहांस विदित केलें, गनिमांचे सरदारांसी आपण करार केला की पातशाही मुलखास हरगीज तोसीस न द्यावी, बाजीराव सर्वांविसीं हजरतीचे पदरीं पडतात. दक्षिणेतून गंगास्नानाचे बहाण्यानें कबिले आणितात. सादतखानांनीं मुद्दे घातले आहेत कीं, प्रयागचा सुभा महंमदखान बंगशास द्यावा, म्हणजे तो बुंदेलखंड काबीज करील." (ता. २१ आक्टोबर, स. १७३५)†

माळव्याचा सुभा आपल्या हातचा जाणार हे ऐकून जयसिंग चवताळून गेला. त्यानें बाजीरावाचा वकील सदाशिव बल्लाळ कुंटे जयपुरास होता त्यास बोलावून आपले विचार गुप्तपणें त्याचेमार्फत बाजीरावास कळविले. तो म्हणाला, "जर सादतखान व निजाम एक झाले तर ते दुसरा पातशहा उभारतील, त्यामुळें पातशहा विचारांत आहेत. त्याची बुद्धि क्षणभंगुर आहे. सरदारांनी पांच हजार फौज घेऊन येथें मजपाशीं यावें. वीस लक्ष रुपये आधीं येथे घ्यावे आणि स्वारीसमागमें यावें. शिवाय पाच हजार फौजेचा रोजमरा निराळा घ्यावा. स्वामींनी येऊन सवाईजींची भेटी घ्यावी. खानडौरानचे मार्फत शपथक्रिया पुरस्सर कौलकरार झाले तर बाजीरावांनीं हस्तिनापुरीं पातशहाचे भेटीस जावें. नाही तर माघारे जावें. सवाईजींनीं निश्चयात्मक भरंवशियानें याचें उत्तर मागविलें आहे. उदेपुरचे दिवाण बिहारीदास पंचोली यांचाही सल्ला विचारला आहे." §

† पे. द. १४-३९. § पे. द. १४.४७

इकडे बादशहानें स्वतः जयसिंगावर व मराठ्यांवर चालून जाण्याची घोषणा करून सादतखानास त्यासाठी निकडीनें जवळ बोलावलें. "खान आगऱ्याकडे येत असतां मार्गी भगवंतसिंग अडारूनें दहा हजार फौजेनिशी येऊन झुंज घेतलें. राजा जिवें मारला गेला, सादतखान हतवीर्य झाला. सोळा मातब्बर सरदार पडले. सवाईवर यावें त्या उमेदीत तफावत पडला. खानदौराचा फितवा पूर्ण आहे." § बाजीरावाचा वकील सदाशिव बल्लाळ उदेपुराहून ता. १७ नोव्हेंबर, स. १७३५ रोजीं पेशव्यास लिहितो, "राणाजी व त्यांचे दिवाण बिहारीदास पंचोली यांजपाशीं साफ उत्तर मागितलें. त्यांनी आपले इतबारी सामंतसिंग आपल्या भेटीस साताऱ्यास पाठविले आहेत, त्यांजकडून उत्तर येईल त्याप्रमाणें हे वागतील. स्वामीच्या नांवावर येथें सर्व गर्भगळित आहेत. चमत्कारावांचून यांचे डोळे उघडणार नाहींत." ‡ सिंदे-होळकरांमार्फत बाजीरावानें सर्व राजपुतांस अशी चापती लाविली कीं त्यांना देऊं दिलाऊं करून कालहरण अशक्य झालें. जयसिंगाचें बोलणें आल्यावरून माळव्याच्या व राजपुतान्याच्या खंडणीचा कायम निकाल लावण्याचें बाजीरावानें ठरविलें आणि स. १७३५ च्या धनत्रयोदशीस दक्षिणेंतून प्रयाण केलें. सिंदेहोळकरांशिवाय त्यानें बाजी भीवराव † वगैरे कित्येक जिल्हाळ्याचे सरदार निवडून बरोबर घेतले. मुद्दाम उत्तरेंत जरब बसवून माळवा प्रांत काबीज करण्याचा बाजीरावाचा उद्देश होता. त्यासाठीं प्रथम राजपुत संस्थानिकांच्या व पश्चात् बादशहाच्या भेटी घेऊन सामोपचारानें व्यवहार उलगडले तर बरेंच, नाहीं तर शस्त्रप्रहार सिद्ध आहे अशी या स्वारीची तयारी होती. खानदेशांतून नंदुरबार सुलतानपुरवरून माळवा गुजरातच्या सरहद्दीनें त्यानें प्रयाण केलें. कुक्षी फत्ते करून लुनावाडा, बासवाडा, डोंगरपुरवरून तो उदेपुरास स. १७३६ फेब्रुवारीच्या आरंभीं दाखल झाला.

शाहू व त्याचे दरबारी यांस या साहसाबद्दल मोठी धास्ती वाटत होती. निजामानें युद्धाची तयारी जोरानें चालविली, त्याच तऱ्हेचीं उत्तरेंतील वर्तमानें दक्षिणेंत आलीं. 'कमरुद्दीनखान व बादशहा या सर्वांस ही ठेचगा देऊं ऐसें स्वामी म्हणतील तरी हा मनसबा जगडव्याळ, मनांत आणल्यास सिद्धीस जाईल यांत संशय नाहीं. पण जें करणें तें पुरता विचार ध्यानांत आणून करावें,' असा भीतीचा इशारा पुरंदऱ्यानें दिला. बाजीरावापुढें भीतीचा शब्द

§ पे. द. १४. ४२. ‡ पे. द. ३०-१४२. † पे. द. ३०.१४०, १४१.

उच्चारण्यास लोक कसे कचरत हें यांत दिसून येतें. सिंदे, होळकर, पवार सर्व सरदार ईर्षेनें कंबरा बांधून बाजीरावाचें साह्य करीत होते.‡ "रायांचा पुण्यप्रताप ऐसा जाला आहे कीं हस्तनापुरचें राज्य घेऊन छत्रपतीस देतील तर आज अनुकूल आहे." असा धाक सर्वत्र पसरला.§

पेशवे निकरानें चालून येतात असें दिसतांच राजपूत राजे वगैरे भयभीत झाले "प्रस्तुत महादेव भट हिंगणे राणाजीकडे आले होते. त्यांजबरोबर राजामल सहवर्तमान राणाजींनीं पांच लाखांचा ऐवज पाठविला असे. प्रधानपंतांसही त्वरेनें बोलाविलें आहे. खानडौरांजवळ हुजूर दादोभीमसेन आहेत, राणोजी सिंदे व रामचंद्र बावा यांचे मार्फातीनें जाबसाल चालू आहेत. वीस लाख रुपये नक्त, चाळीस लक्षांची जागीर माळव्यांत आणि भोपाळकराचे मुलखांत तनखा द्यावा असा तह बादशहापाशीं जाला आहे."† पेशव्याच्या मागणीपैकीं किती मंजूर झाले याची वाच्यता यांत मिळते. खुद्द बाजीराव मातुःश्रीस लिहितो. "यात्रा लवकर करून माघारीं बुंदेलखंडांत येणें. मनमुऱ्याने दिवस निघोन जातात तरी तुम्ही सत्वर येणें, दिल्लीकडील राजकारण दृढतर लागलें आहे. खानडौराकडील निजाबतअलीखान खर्चासहित येतात, तसेच सवाईजीकडील आयामल खर्चासहित येतात. मुख्य गोष्ट पृथ्वीपति आदिकरून स्नेह इच्छितात." या पूर्वीच बाजी भीवराव आघाडीस बुंदेलखंडांत उतरून जरबेनें खंडण्या वसूल करीत, आतां पुढें मनसबा काय त्याची आज्ञा बाजीरावास विचारीत होता.¶ जयसिंगाचा दिवाण आयामल, राजामल, मलजी हीं एकाच इसमाचीं नांवें होत.

**२ बाजीराव-जयसिंह, निष्फळ भेट.**—सादतखानाचें बळ कमी पडून त्याचे हातून बाजीरावाला शह बसत नाहीं अशी खात्री झाल्यावर बादशहानें खानडौरान व जयसिंग यांची सल्ला मान्य करून बाजीरावाची भेट घेऊन त्याच्याशीं सख्य जोडण्याचें ठरविलें, आणि वर सांगितलेला तहाचा मसुदा देऊन महादेवभट हिंगणे यास बाजीरावाचे भेटीस जयपुरास पाठविलें. भेट सुखरूपपणें पार पाडण्याची जबाबदारी जयसिंगानें स्वीकारली. खानडौरानचे वकील निजाबतअलीखान, यादगारखान व कृपाराम हेही बाजीरावाच्या

‡ पे. द. १४.३५–३७ § पे. द. ३०.१३४ चे सर्व पत्र अभ्यसनीय आहे.

† पे. द. १४. ५०. ¶ पे. द. १४. ५१, ५२.

भेटीस मागाहून आले. फेब्रुवारीपासून मेअखेर चार महिने पेशव्याचा मुक्काम राजपुतान्यांत व माळव्यांत झाला. राजपुतांचा सत्कार स्वीकारीत बाजीराव उदेपुर, नाथद्वारवरून जयपुरास गेला. मार्गी प्रवास करतांना लहान मोठ्या राजपूत सत्ताधीशांनीं आदरानें पेशव्याची भेट घेऊन स्वागत व सत्कार केला.† उदेपुरचा राणा जगत्सिंह नुकताच एक वर्षापूर्वी गादीवर आला होता, त्याचे तर्फेनें बाबा तख्तसिंग व केशरीसिंग पेशव्याचें स्वागत करण्यास पुढें गेले. बाजीरावानें राजपुतांचे मुलखास उपद्रव देणार नाहीं. असें कबूल केलें. मोठी फौज शहापुऱ्याकडे रवाना करून आपण सात आठ हजारांनिशीं उदेपुरास प्रयाण केलें. चंपाबागेंत उतारा झाला. बाजीरावानें जाऊन राणाजीची भेट घेतली. त्या प्रसंगीं दोन सुवर्णासनें तयार केलीं होतीं. उजव्या आसनावर बाजीरावानें बसावें अशी विनंति राण्यानें केली, तेव्हां बाजीराव म्हणाला, 'आपण चक्रवर्ती, मा आपल्या बरोबरीनें बसणें योग्य नाहीं.' असें बोलून राण्याचे सिंहासनाखालीं दुसरें आसन होतें तें बाजीरावानें स्वीकारलें. मग उभयतांचें संभाषण झालें. पोषाख देण्याघेण्याचे समारंभ उरकले. पांच दिवस फाल्गुन शु. ३ ते ७ पर्यंत म्हणजे स. १७३६ च्या ३ ते ७ फेब्रुवारीपावेतों बाजीरावाचा मुक्काम उदेपुरास झाला. चौथाईबद्दल सालीना दीड लाख रुपये खंडणी राणाजीनें कबूल करून तारण म्हणून बनहाडा परगणा मराठ्यांनीं मागितला. आदरसत्कार व सलुखाचीं बोलणीं भरपूर व निष्कृत्रिम झालीं. उदेपुरचें जलमंदिर पेशव्यानें पाहिलें.

उदेपुरासच महादेवभट हिंगणे व जयसिंगाचा प्रतिनिधि आयामल बरोबर नजराणे आणून बाजीरावास भेटले. खानडौरानचा हस्तक निजाबतअली खानही येऊन दाखल झाला. दररोज पांच दहा हजारांच्या रकमा खानडौरानकडून बाजीरावास आलेल्या दोन महिनेपावेतों रोजकीर्दीस जमा आहेत. शिवाय हत्ती, घोडे, जवाहीर, पालख्या, बंदुका वगैरे नजराणे व रोख रकमा ठिकठिकाणांहून आलेल्या दाखल आहेत. बादशहाकडून जर बाजीरावाचा एवढा सत्कार होतो, तर इतरांना तें प्राप्तच होतें. बाजीरावाची मर्जी सांभाळण्यांतच त्यांचा निभाव होता. उदेपुराहून नाथद्वारास जाऊन बाजीरावानें पत्नीसमवेत देवदर्शन घेतलें. अर्थात् काशीबाई स्वारींत बाजीराबाबरोबर

† पे. द. ३०.३२१.

होती. § ता. ४ मार्चला बाजीराव व जयसिंग यांची भेट किशनगडनजीक बंभोला येथें झाली. मनोहरपुर येथें झाली असें मराठी पत्रांत आहे. स्वाऱ्यांचे हत्ती समोरासमोर येतांच उभयतांनीं खालीं उतरून आलिंगनपूर्वक एकाच आसनावर बैठक स्वीकारली. या प्रसंगीं भर दरबारांत बाजीरावानें हुक्कासेवनाचें असभ्य वर्तन केल्याची हकीकत सर जदुनाथ सांगतात ती भलतीच बाजारगप्प असावी. जयसिंग बाजीरावाहून निदान वीस वर्षांनीं वडील होता, त्याचें मनोधारण करणें बाजीरावास अगत्य होतें. †

'आपलीं पत्रें ता. ५ मार्च, स. १७३६ ची मनोहरपुर मुकामीहून आलीं. सकलार्थ अवगत होऊन परम समाधान जालें. सवाईजीची भेटी होऊन परस्परें सन्मान आदरपुरःसर व स्नेहाभिवृद्धि जाली, उत्तम गोष्ट जाली. आपल्या महत्त्वानुरूप सर्व उत्तमच होईल यांत संदेह नाही.' असें या भेटीचें वर्णन पिलाजी जाधवानें केलें. जयसिंगानें पांच लाख खंडणी बाजीरावास सालोसाल देण्याचें कबूल केलें. तसेंच पूर्वी ठरलेली माळव्याची खंडणी वीस लाख हप्त्यांनीं व जागीर देण्याचा ठराव झाला; आणि आतां लगेच बादशहाची भेट मुक्रर करून त्याजकडून माळवा-गुजरातच्या सनदा मिळवून देण्याचें काम जयसिंगानें पत्करिलें. तत्प्रीत्यर्थ त्यानें आपले वकील आणि बाजीरावाचे तर्फेनें महादेवभट, राणोजी सिंदे, रामचंद्रबावा, दादो भीमसेन इत्यादि मंडळी दिल्लीस रवाना केली. निकाल येईपर्यंत कांहीं काळ बाजीराव आजूबाजूस इतर उद्योग करीत राहिला.

या बनावानें दिल्लीचें वातावरण अत्यंत प्रक्षुब्ध बनलें. ग्वालेरहून बाजी भीवराव लिहितो, 'खानडौरान, जयसिंग व मुख्य हा एक पक्ष, याचे उलट सादतखान व कमरुद्दीनखान यांची गुंज मोडल्याखेरीज केला मनसबा शेवटास जाऊं देत नाहींत. दिल्लीचे बाजूस द्रव्य नाहीं. केवळ फौज भारी जाली म्हणून स्वामींनी सार्वभौमाचे दर्शनास जाऊं नये. बहुतशी तृष्णा न करावी. साधेल तेवढें उत्तम म्हणावें. आम्ही आज्ञा होईल ते समयी सर्वांशें सिद्ध आहों.‡' बाजीरावानें जयपुरकडून व बाजी भीवरावानें चंबळच्या मार्गें दिल्लीकडे

§ पे. रोज० अप्रकाशित; पे. द. ३०.१५६ व १६०; ऐ. च. १ पृ. ६३.

† भेटीचा काल पे. द. कागदांत निश्चित आहे. बंभोला हें नाव वीरविनोद ग्रंथात आढळते. मनोहरपुर येथें भेट झाली असे ऐ. च. १, पृ. ६३ यांत आहे.

‡ पे. द. १४.५५, ५६.

जावयाचें असा बेत होता. महंमदखान बंगश आगऱ्याचा सुभेदार मराठ्यांस अडविण्यास टपला होता, त्याजवर बाजी भीवराव चालून गेला आणि त्यास चंबळ व कुवारी नद्यांच्या चिमट्यांत त्यानें अडवून धरिलें.

बादशहाकडून यादगारखान काश्मिरी व कृपाराम हे दोन गृहस्थ बादशाही दस्तकाच्या याद्या घेऊन बाजीराव-जयसिंगांचे भेटीस आले. पण त्यांत उभयपक्षीं अनेक बाबती संदिग्ध व अपुऱ्या आढळून आल्या. हा यादगारखान खानडौरानचा आत्मिक राजकारणांत मुरलेला हुशार म्हणून गणला जात असे. त्यास अशी ताकीद होती कीं सनदा सर्व एकदम बाजीरावास दाखवूं नयेत; शक्य तोंवर अल्पांत समजूत काढावी, अशा प्रकारचा बाजारांतील हुज्जतीचा प्रकार यादगारखानानें आरंभिला. या संबंधाची अंतस्थ बातमी दिल्लीतून काढून धोंडो महादेवानें येऊन बाजीरावास कळविली असल्यामुळें, त्यानेंही जशास तसें धोरण मुद्दाम स्वीकारलें. त्यानें नवीन जबर मागण्या दाखल करून धोंडो महादेव व बाबूराव मल्हार या दोघांस पुनः दिल्लीस रवाना केलें; आणि याचा जबाब येईपर्यंत तो मुद्दाम हक्कवसुलीसाठीं म्हणून अहिरवाड्यांत जाऊन बसला. एकंदरीत असें दिसतें की ता १५ फेब्रुवारीपासून ८ मार्च-पावेतों जयसिंग बाजीराव यांचा मुक्काम एकत्र होता. दरम्यान वरील वाटाघाटी झाल्या. मे महिन्यापर्यंत त्यानें वाट पाहिली, त्यावरून कालहरणाचा हा बादशाही डाव त्यानें चांगला ताडला.

आतां बाजीराव व बादशहा यांची भेट होणार या वर्तमानानें सर्वत्र मोठी चळवळ उडून गेली. बादशहा बुचकळ्यांत पडला. जयसिंगाची सूचना दरबारांत कोणासच ग्राह्य वाटली नाही. दक्षिणेंतून निजामानें बादशहास कळविलें, बाजीरावाची भेट घ्याल तर घात होईल. पण बाजीरावाच्या सरदारांनीं चहूंकडून दिल्लीकडे आवरण घातलें. बादशहास मोठा पेंच पडला. कांहीं तरी पळवाट काढून आजचें मरण उद्यांवर लोटणें एवढा एक मार्ग हातचा होता तोच बादशहानें स्वीकारला. माळव्याचा सुभा बादशहानें जयसिंगाकडे ठेवून त्याचा नायब म्हणून बाजीरावाची नेमणूक करण्यास मान्यता दिली, पण इतर मागण्या त्यानें अमान्य केल्या, (मे, १७३६). स. १७३६ चा मोसम संपला. बाजीरावानें मनांत चरफडून पुढील सालच्या मोसमावर नजर दृढ केली. मात्र या प्रत्यक्ष भेटीनें बाजीराव व जयसिंग या उभयतांचें हार्दिक सख्य जमलें.

पूर्वीच्या मागण्या सोडून जास्त चढाईच्या नवीन मागण्या सादर केल्यामुळें जम बसला नाहीं असे बादशाही पक्षाचें प्रतिपादन आहे, पण खऱ्याखोट्याचा निर्णय करण्याइतके कागद तारीखवार पुरावा देणारे उपलब्ध नाहीत. अशा स्थितींत बाजीरावाच्या मागण्या तरी काय होत्या तेवढ्या दाखल करणें शक्य आहे.

यादी मतालब धोंडो महादेव याणी बादशहाशी लिहोन दिल्हे कलमें—

१ माळव्याची सुभेदारी, दरोबस्त बादशाही सुभा, किल्ले जागीर व कदीम, राजे व इनामदार खेरीज, आम्हांस द्यावा.

२ दक्षिणच्या सहा सुभ्यांची सरदेशपांडेगिरी आम्हांस द्यावी.

३ मांडवगड, धार व रायसीन हे किल्ले पंतप्रधानास द्यावे.

४ चंबळ नदीपावेतोंचा ( बुंदेलखंडचा ) प्रदेश पंतप्रधानास द्यावा.

५ बंगाल प्रांतांतून पन्नासलक्ष रुपये पेशव्याच्या कर्जफेडीसाठी द्यावे.

६ मथुरा, प्रयाग, काशी व गया हीं तीर्थस्थलें पंतप्रधानांचे कबजांत द्यावीं.

७ याबरोबरच जाननिसारखानाचे मार्फत द्यावयाच्या गुजरातच्या चौथाईचा उल्लेख आहे.

याचे बदल्यांत बाजीरावानें कबूल केलेली कलमें—( १ ) बादशहाची भेट घेऊं. ( २ ) माळव्याखेरीज दुसऱ्या स्थलास उपद्रव करणार नाही. ( ३ ) कोणी मराठ्याची फौज नर्मदा उतरणार नाहीं, जिंमा आमचा. ( ४ ) एक सरदार पांचशें स्वारांनिशीं हुजूर चाकरीस राहील. ( ५ ) हुजूरची फौज बाहीर निघाल्याबर चार हजार स्वारांनिशीं चाकरीस येऊं. फौज हुजूर राहेतों खुराक द्यावी. §

वरील यादींत बंगालच्या उत्पन्नांतून पन्नास लाखांची मागणी व धार मांडवगड रायसीन किल्ल्यांची मागणी या कदाचित् चढाईच्या म्हणतां येतील, पण माळवा ताब्यांत ठेवणारास वरील बंदिस्त स्थलें हाताशीं अवश्य पाहिजेत. चार हिंदूंचीं तीर्थक्षेत्रें धार्मिक आचारास जरूर म्हणून बाजीरावानें मागितलीं यांत अयोग्य कांहीं नाहीं. शिवाजीपासून मराठी राज्याचा हा मुख्य उद्देश असून धर्माच्या बाबतींत सर्वांस पूर्ण स्वातंत्र्य असावें, हिंदूंना मुस्लिम धर्मीयांकडून उपसर्ग लागूं नये एवढाच त्या मागणीचा इत्यर्थ आहे. या चार

§ पे. द. भा. १५ पृ. ९१–९८ पावेतों उलट सुलट सवाल जबाब झाल्याचे कागद दाखल आहेत, त्यांतला मुख्य आशय तेवढा वर दर्शविला आहे.

स्थलांच्या प्राप्तीसाठीं पेशव्यांनीं दीर्घ प्रयत्न केले. शेवटी महादजी सिंद्यानें त्यांची थोडी वासलात लावून घेतली.

या मागण्या पाठवून त्यांच्या जबाबाची वाट पहात बाजीराव एकदोन महिने उत्तरेंत राहिला. ठराव मंजूर होऊन येईनात. उन्हाळा आला. शाहूकडून निकडीची बोलावणी दाखल झालीं. तेव्हां सिंदे, होळकर, पवार या त्रिवर्गास माळव्यांत छावणीस ठेवून, धिटाईनें करार पुरे करून घेण्याची त्यांस निक्षून ताकीद दिली आणि मेअखेर दक्षिणेस प्रयाण केलें.† मराठी फौजा माळव्यांत छावणीस राहण्याचा हा आरंभ होय.

स. १७३६ चा उन्हाळा व बाजीरावाचा राजपुतांकडून सत्कार हे विषय मराठ्यांच्या इतिहासांत एक नवीन क्रान्ति दर्शवितात. पेशव्याच्या मातुःश्रीनें काशीयात्रा स्वीकारून आदल्या वर्षी जो लौकिक संपादिला, त्यांत बाजीरावाच्या या भेटीनें पुष्कळ भर पडली आणि पूर्वीचा उभयतांचा स्नेह विशेष वृद्धिंगत झाला. बाजीराव-जयसिंगाचा संस्कृत पत्रव्यवहार झाला त्यावरून वरील अनुमान होतें.‡

यादगारखानानें परत जाऊन खानडौरान यांस जयपुरच्या वाटाघाटीची हकीकत कळविली, त्यावरून पुनः मराठ्यांवर चालून जाण्याचा निश्चय दरबारांत ठरला, आणि निजामालाही त्या कामीं त्यांनीं आपल्याकडे वळविलें. बाजीरावानें आपला मामेबंधु बाबूराव मल्हार यास विशिष्ट ताकिदी व पत्रें देऊन इंद्रप्रस्थास पाठविलें. तेथून जाब आल्यावर बाजीराव लगेच परत फिरला. जयपुराहून निघण्यापूर्वींच बाजीरावानें सिंदे-होळकरांस मारवाडांतून खंडणी वसूल करण्यास पाठविलें होतें. याचें एक कारण असें की मारवाडचा अभयसिंग हल्लीं बाजीरावाशीं विरोध करून सादतखान व कमरुद्दीनखान यांस मिळाला होता. तीन महिने मोठ्या फौजा राजपुतान्यांत गुंतून पडल्या त्यांचा खर्च भागेनासा झाला. त्यांतून उदेपुर व जयपुर यांच्या मुलखास उपद्रव देऊं नये असा करार होता, त्यामुळें थोडा अवकाश सांपडला, त्यांत सिंदे-होळकर मारवाडावर चालून गेले. दाखल झाले त्याच दिवशीं त्यांनीं मेडतें घेतलें व तेथील किल्ल्यावर चढाई केली, त्यांत बराच तुंबळ रणसंग्राम

† पे. द. ३०. १६७; पे. दे. २२.३३१.

‡ ऐ. ११. १.

झाला. आणि पैसा मिळून फौजांची नड भागली. शाहूला ही मारवाडची स्वारी पसंत पडली.§

बाजी भीवराव बुंदेलखंडांत चौथाई वसूल करीत होता, त्याजकडेही दिल्लीची बातमी येत होती. त्यानें आपलें मत बाजीरावास स्पष्टपणें कळविलें कीं, "याच स्वारींत दिल्लीवर चालून जाण्याचा विचार आपण करूं नये. किलीचखानाचे जासूद अहर्निशीं दिल्लीस जात येत आहेत. तुरेबाजखान, सादतखान, कमरुद्दीनखान व अभेसिंग ऐसे एक होऊन स्वामींचा मनसबा शेवटास जाऊं न द्यावा ऐसे उद्योगांत आहेत. पादशहांचें व स्वामींचें एकमत जालें तर हा मनसबा एकंदर सिद्धीस जाऊं देऊं नये हा या चतुर्वर्गाचा मतलब आहे." ता. ८ मे, स. १७३६ रोजीं राणोजी सिंदे महादेवभट हिंगण्यास दिल्लीस लिहितो, 'उज्जन प्रांतें आलीयावरी तिकडून बाजी भीवराव यांची फौज आली. लष्कर फार जमा जालें. खर्चाचा मोठा गवगवा उडाला. तुम्हांकडून तों कांहीं येऊन न पोंचलें. आठ पंधरा दिवसांनी पांच लाख रुपये येणार ते आले तरी काय होणार! यास्तव राऊसाहेब अवघें लष्कर सुद्धां देशास गेले. आम्ही व राजश्री मल्हारबा व पवार त्रिवर्ग याप्रमाणें फौज पंधरा हजारपर्यंत माळव्यांत छावणीस राहिलों. तरी खर्चाची बेगमी करून जलद पाठविणें, पंचाविसांच्या सनदा बोलीप्रमाणें पाठविणें. ते म्हणतील कीं मुख्य भेटतील तेव्हां देऊं. तरी ते व आम्ही कांहीं दोन नाहीं. तुम्ही ढील कराल तरी पुढें कटकटच राहील. सुभा दिलीयानें गोष्टी (?) बंदोबस्त करूं, तरी अवघा कार्यभाग करणें. कोणे गोष्टीची बाकी न ठेवणें. ते ठेवतील तरी त्यांसी भारी पडेल." या वेळीं सवाई जयसिंग, यादगारखान, कृपाराम सर्व दिल्लीस जमा झाले होते.

यानंतर ता. २२ जून रोजीं पुनः राणोजी महादेवभटास लिहितो, 'दोन महिने जाले, तुम्हांकडील वर्तमान कळलें नाहीं. पंतप्रधान देशास गेले. इकडे आम्ही तमाम गिरासियांचा बंदोबस्त केला. रयतीस कौल दिधला. प्रस्तुत सोंधवाड्यांत छावणी करून आगर परगणियांत आहों. कराराप्रमाणें सनदा करून देतील तरी सत्वरी करणें. नाहीं तरी उठोन येणें. हा कालवरी पातशाही चाकरींत आहों. पातशाहींत हे खबर आहे कीं नाहीं न कळे.' फिरून ता. २५ जून रोजीं राणोजी लिहितो, 'तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. तूर्त लाख रुपये दिल्हे, वरकड पुढें दरमहा देणार, ऐशास दोन महिने जाले. खर्चास

§ पे. द. १४. १४; पे. द. १३. ४९.

काय करावें ? अवघा पैका बोलीप्रमाणें घेणें. सुभ्याची सनद व कुमकेची तर्तूद करून कुलीफर्मान घेऊन येणें." ‡ याप्रमाणें तजवीज झाली नाहीं, म्हणून बाजीरावास पुढें लगोलग उत्तरेंत येणें भाग पडलें. मराठे सरदारांनीं विशेष इलाज माळव्यांत केले कीं पडित जमीन राहूं नये, सर्वांची लावणी व्यवस्थित व्हावी.

**३ दिल्लीवर चढाई.**—मराठ्यांच्या मागण्या पुऱ्या न केल्यामुळें बाजीराव पुनः उत्तरेंत चालून येईल त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें आपल्या सर्व सरदारांस इशारा देऊन शिवाय या कामीं निजामाचा उपयोग विशेष होईल असें जाणून त्यास आर्जवानें उत्तरेंत बोलाविलें, आणि सर्वांनीं मिळून मराठ्यांस नर्मदेपार घालवून देण्याची तयारी चालविली. बाजीरावास या बातम्या कळून त्यानेंही दिल्लीवर स्वारी करण्यासाठीं निवडक सरदार व माणसें जमविलीं. त्यास निजामानें दक्षिणेंतच अटकाव करावा असा घाट होता. बाजीराव नोव्हेंबरांत पुणें सोडून रस्त्यांत निजामास अनायासें चुकवून नर्मदापार गेला. 'पंतप्रधान स्वामींचे आगमन सेनेसहवर्तमान होऊन सेवकास दर्शन लाभ ९ जानेवारीस झाला', असें राणोजी सिंदे लिहितो. १३ जानेवारीस तुकोजी पवार लिहितो, 'प्रधानपंत देशीहून आले. त्यांची आमची भेटी भेलशावर जाली, भेलशास वेढा घातला.' § मल्हारराव होळकर व राणोजी सिंदे वगैरे सरदारांनीं पेशव्यास भेटून एकदम चहूंकडे जोरानें दंगल उसळून मोगलांस जेरीस आणण्याचा निश्चय ठरविला. दिल्लीपासून नर्मदेपावेतोंच्या विस्तृत प्रदेशांत व यमुनेपलीकडील दुआबांत धावपळीच्या युद्धानें सर्व प्रांतांत असा हलकल्लोळ उठवून द्यायचा कीं मिजासी मोगल सेनानी व त्यांचा तोफखाना यांना मराठ्यांचा पाठलाग करतां करतां पुरेवाट व्हावी, बुंदेले किंवा राजपूत सत्ताधीश यांनीं खंडण्या भरून आपापलीं राहतीं स्थळें रक्षण करीत स्वस्थ बसावें, किंवा मोगलांचे बाजूनें लढतील त्यांचा नाश व्हावा, आणि चार दोन महिन्यांच्या अवकाशांत पैशाची पैदास भरपूर होऊन आपलें दैन्य दूर व्हावें, अशी ही गनिमी काव्याची प्रचंड युद्धपद्धति एक विचारानें स्वीकारण्यांत आली. सर्वांत मोठें अवघड काम खुद्द राजधानीवर चालून जाऊन बादशहास

‡ रा. खं. ६ ले. ९५–९८. हीं पत्रें स. १७३४ चीं नसून स. १७३६ चीं आहेत. M. in-Trans. p. 246.

§ पे. द. १५.५, पे. द. ३०.१९२.

दहशत बसविण्याचें स्वतः पेशव्यानें अंगीकारिलें ; त्याचे खालोखाल अंतरवेदींत उतरण्याचें काम होळकर व बाजी भीवराव यांनीं पत्करिलें, आणि दुसरे लहान मोठे सरदार राजपुताना, बुंदेलखंड वगैरे ठिकाणीं मुलूखगिरी व दहशत बसवीत राहिले. मोगल सेनानी निरनिराळ्या दिशांनीं वावरत होते, त्यांचा एकत्र मिलाफ होऊं देऊं नये, त्यांच्या तोफांच्या टप्पांत आपण येऊं नये, आणि शक्य तोंवर एकमेकांची साथ करून खबर देत राहावें, असा हा जगड्व्याळ घसारा जानेवारींत भोपाळ-भेलसाचे दरम्यान सर्व सरदारांनीं एकत्र विचार करून ठरविला, तो किती परिणामकारक झाला हें पुढें दिसून आलेंच. निजामास दक्षिणेंत पायबंद देणें शक्य नव्हतें, पण चिमाजी आपानें खानदेशाच्या बाजूस राहून उत्तरेत निजामास जाणारी मदत तोडून पाडावी आणि प्रसंग पडेल तसें वागून मुख्य उद्देश साधावा अशी तजवीज साक्षेपानें करण्यांत आली. हजार मैल लांब व सुमारें पांचशें मैल रुंद एवढ्या विस्तृत प्रदेशांत युद्धाचा भडका अवघ्या दोन तीन महिन्यांत मराठ्यांनी अशा वेगानें उडवून दिला कीं त्याचें एकत्र आकलन करणें जितकें अवघड आहे तितकेंच त्या प्रयोगाचें लेखभांडारही ठिकठिकाणीं विखुरलेलें व कालस्थलव्यवच्छेदाच्या अभावीं सुसंगत जुळविणेंही अवघड आहे. स. १७३७ च्या तीनचार पण मुख्यतः मार्च महिन्याची ही प्रचंड मोहीम इतिहासात संस्मरणीय बनून तीत वागलेले पुष्कळ तरुण मराठे पुढील उद्योगास उपयोगी पडले.

भेलसा, भोपाळ, चंदेरी, वोडशा, नरवर, दतिया जाठवाडा, भदावर, अटेर, दुआब व शेवटीं दिल्लीवरचा आकस्मिक हल्ला असे युद्धसंग्राम या स्वारींत घडले. भेलशावर थोडी बंदोबस्ती ठेवून बाजीराव बुंदेलखंडांत शिरला. वसुलाचें मुख्य काम बाजी भीवरावाकडे सोपून त्याचे हाताखालीं कमावीस नेमिले. नाना फडणिसाचा बाप बाबा फडणीस हिशेबी कामावर मुख्य होता.

बुंदेलखंडची व्यवस्था लावून बादशाही मुलखात उतरण्यासाठीं पेशवा ग्वाल्हेरवरून भदावरच्या मुलखांत गेला. तेथचा राजा गोपाळसिंग व त्याचा पुत्र अनिरुद्धसिंग कजाख असून पेशव्यास वश होईना. राजाचें उत्तरेकडील नाक्याचें ठाणें अटेर चंबळच्या उतारावर असून त्याच राजाच्या ताब्यांत यमुनेचे, चंबळचे व कुवारीचे उतार असल्यामुळें अटेर आपल्या कबजांत ठेवणें बाजीरावास अत्यंत अवश्य होतें. राजाला आश्रय सादतखानाचा असून आम्ही तुमच्या साह्यास त्वरेनें येत आहों, अटेरचें संरक्षण जोरानें करावें, असें खानाचें

त्याला सांगणें आलें, त्यावरून राजानें लढण्याची तयारी केली. अनिरुद्धाचा एक भाऊ बाजीरावास मिळाला. 'वर्तमान कळतांच सडे फौजेनिशीं शहरावर चालोन घेतलें. शहर घेऊन कोटास मोर्चे लाविले. तेव्हां अनिरुद्धसिंग शरण येऊन भेटला ( १८ फेब्रु०, १७३७ ), वीस लक्ष खंडणी कबूल केली, पंधरा लक्ष रोख दिले, पांचाबद्दल ओलीस दिले. लुटीनें लष्कर अभर झालें. सर्व प्रांत लुटून ताराज केला. दुसरी फौज पाठवून भदावरही लगोलग घेतलें. सादतखानाकडून राजाचें साह्य कांहीं एक झालें नाहीं.' ‡

अनिरुद्धसिंगावर मराठ्यांचा घसरा झालेला ऐकून सादतखान व सफदरजंग फैजाबादेहून तावडतोब त्याचे साह्यास निघाले. यमुनेवर येतांच अटेर पडल्याची वार्ता त्यांस कळली. नदीचे उतार बाजी भीवरावानें कबजांत ठेवल्यामुळें सादतखानास अलीकडे येववेना. उलट त्यांस पायबंद देण्यासाठी होळकर, पिलाजी जाधव व विठोजी बुळे कांहीं थोडे लोक घेऊन पलीकडे दुआबांत घुसले. शिकोहाबाद, फिरोजाबाद, इतिमादपुर इत्यादि ठाणीं लुटून ते जळेश्वरनजीक आले तेथें त्यांस सफदरखानाची आघाडीची फौज आढळली. मुख्य लष्कर मागें सादतखानाजवळ होतें. मराठ्यांचा हल्ला येतांच सफदरखान युक्तीनें मागें सरून सादतखानास मिळाला; लगेच त्या उभयतांनीं ता. १२ मार्च रोजीं मराठ्यांवर असा निकराचा हल्ला केला कीं अल्पसंख्य मराठ्यांना जीव बचावण्यासाठी पलायनच करावें लागलें. आगऱ्याचे ईशान्येस दहा मैलांवर इतिमादपुरचा तलाव आहे त्या ठिकाणीं सुमारें एक हजार मराठे सादतखानानें पकडून घेतले. बाकीचे घाईनें यमुनापार होऊन ग्वालेरनजीक कोटिला येथें बाजीरावाच्या मुख्य फौजेस येऊन मिळाले.§

सादतखानाला वाटलें कीं आपण मराठ्यांच्या मुख्य फौजेशीं लढून मोठा विजय मिळविला. दोन हजार मराठे आपण समरांगणीं कापले, होळकर बुळे वगैरे दोन हजार मराठे यमुनेंत बुडून मेले, अशा प्रकारचीं बढाईखोर वर्णनें त्यानें बादशहाकडे लिहून कळविलीं, त्यावरून बादशहानें खानाचा मोठा गौरव केला, आणि धोंडो गोविंद वकील जवळ होता त्यास काढून दिलें. ता. २३ मार्च, स. १७३७ रोजीं मथुरेनजीक तिघे उमराव एकत्र भेटून मराठ्यांचा पाडाव केल्याबद्दल आनंदोर्मीत निमग्न झाले.

‡ पे. द. १४. ४५, १५. ४७, ३०. ३३३ इ०

§ आशीर्वादीलालकृत अयोध्येचे दोन नबाब.

यापुढील वृत्त खालील उताऱ्यांत व्यक्त होईल.

व्यंकाजीरामानें दिल्लीहून पेशव्यास कळविलें,‡ "सादतखानानें बादशहास अर्ज केला, आपणास आगरा, अजमीर, माळवा व गुजरात चारही सुभे देणें, गनीम उत्तरेंत येऊं देत नाहीं, जामीन देतों. परंतु खानडौरानचे चित्तांत हे गोष्ट नाहीं, कारण यांत जयसिंगास दुखवावें लागणार, जयसिंग व पंतप्रधान हिंदु हिंदु एक. यावरून सादतखान निघून पूर्वेस गेले. बादशहांनीं खानडौरान, कमरुद्दीनखान व बंगश यांस रवाना केलें. निजाम उल्मुल्क बहुत दिवस कृत्रिम बुद्धीनें ब्रऱ्हाणपुरीं बसले आहेत, तेही येतात. स्वामींनीं एकवार त्यांचें यश हिरावून घेतलें. फार दिवसांचे जाले, स्वामींचे हातें त्यांचा मृत्यु होणार. हिंदुस्थानांत तों ऐसा कोणी नाही कीं अघाडी घेऊन स्वामींवर यावें. आतां निजाम आल्यावर युद्ध, मसलत काय तो विचार पाहतात. आपण आगऱ्यास येतात हें वर्तमान ऐकून खानडौरान व बंगश तिकडे चालले. निजामाचा लेक गाजुद्दीखान हुजुरांजवळ आहे त्यास कमरुद्दीनखानांहीं आपली लेक दिल्ही, जावई केले. सवाईजींनीं जाऊन मुख्याची भेटी घेतली. काय जाबसाल जाला कळलें नाहीं. निजाम नर्मदा उतरून चार मजला पुढें आले. ते दाखल होईपर्यंत कांहीं जाब देत नाहींत. हुजूर आलीयावरी काय प्रसंग होईल तो दिसेल."

"पिलाजी जाधव व मल्हारराव होळकर आदिकरून यमुनापार केले. त्यांचें यांचें युद्ध जालें. थंडे केले. बाण फौज सहवर्तमान अलीकडे आले. मागोमाग सादतखानही नांवांचा पूल बांधून अलीकडे येऊन आगऱ्या-नजीक राहिला. मागाहून खानडौरान येऊन सर्व एक जाहले. त्याबरोबर प्रधानपंतांनीं बुणगे बुंदेलखंडास रवाना करून स्वतः सडे फौजेनिशीं लांबलांब मजला करून दिल्लीसन्निध गेले. पुढें जावें तों शहर पुरातन, आद्यस्थान, त्यांतून यवनाधीश सलूख इच्छितात, यास्तव पुरे जाळूं दिल्हे नाहींत. परंतु पातशहास बहुत गडबड झाली. आमचे फौजेचे तोंडावर हसनखान कोका व शिवासिंग वगैरे सरदार पांच सात हजार फौजेनिशीं पाठविले त्यांजवर चालोन घेतलें. शिवसिंग मारला. कोक्यास जखमा लागल्या. पांच सातशें घोडे घेतले. कोकाही मेला म्हणोन वर्तमान आलें. पुढें भदावरकडे येतांना कमरुद्दीनखान आडवे

‡ पे. द. १५. २३, २९, ३३.

आले. युद्ध जालें. शेंपन्नास घोडे व हत्ती खानाचे घेतले. बातमी आली कीं सादतखान व खानडौरान सा कोसांवरी आले. रात्र झाली सबब कमरुद्दीन-खानास सोडून भदावर प्रांतीं आले. बाकी वसूल करून बुंदेलखंडांत येणार." अशी ही धावती हकीकत एकंदर स्वारीची आहे.† त्याचा थोडा विस्तार सांगणें अवश्य दिसतें.

वरील कागदांत अनेक महत्त्वाचीं कृत्यें घडल्याचा उल्लेख आहे त्यांची तारीखवार जंत्री खालीं दाखवितों—

ता. ५.१.१७३७ पेशवा नर्मदापार झाला.

ता. १०.१.१७३७ भेलसा काबीज; बुंदेलखंडांत भदावर स्वारी.

ता. १८.२.१७३७ अटेरचा पाडाव व तह.

ता. १ मार्चच्या सुमारें १७३७ होळकर व बाजी भीवराव यमुनेपार गेले.

ता. १२.३.३७ जळेश्वरनजीक होळकराचा पराभव.

ता. १६.३.३७ सादतखान आगऱ्यासमोर यमुनेवर दाखल.

ता. २२.३.३७ कोटिला येथें होळकर बाजीरावास सामील.

ता. २३.३.३७ तिघां मोगल सरदारांची मथुरेवर भेट.

ता. २८.३.३७ बाजीरावाची दिल्लीवर धाड.

ता. २९.३.३७ रामनवमीस यात्रा लुटली.

ता. ३०.३.३७ बादशाही फौजेचा मोड करून बाजीराव झीलतलावावरून परत फिरला.

ता. ३१.३.३७ मोगल सरदारांच्या अंगावरून बाजीराव निसटला.

ता. १.४.३७ तिघे मोगल सरदार दिल्लीस दाखल.

ता. ५.४.३७ बाजीराव जयपुरानजीक दाखल.

वरील एकंदर बनावाचें विस्तृत व मुद्देसूद वर्णन खुद्द बाजीरावानें लिहून पाठविलें तें असें. ता. ५ एप्रिल स. १७३७.

**४ बादशहाचें बळ जोखलें.**—"श्रियासह चि. रा. आपा यांसी, बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी, येथील कुशल तागाईत छ० १५ जिल्हेज

† पे. द. १५.१७, २८, ४७. पे. द. ३०-१९८ चें वर्णन सुंदर वाटेल.

मु. नजीक सवाई जयनगर. विशेष.§ बुंदेलखंडचा राजा जगतराज याचे हवालीं बुनगे बुंदेलखंडांत रवाना करून आम्ही सडे जाहलों. [यांचें वृत्त सादतखानाचें युद्ध होऊन सरदार आल्याचें वर्तमान विस्तारें लेखन चतुर्भुज कासिदाबरोबर पत्रें पाठविलीं, तीं पावून सविस्तर कळलेंच असेल. सादतखान यमुना उतरोन आगरीयासीं आला. त्यासी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आश्रय असतां मोडे न मोडे. गंभीर यमुनेच्या संगमीं धीर धरून राहवें तरी ते जागीं जाऊन कोतरखळ्या फार; खानडवरा व महंमदखान बंगस वगैरे दिल्लीहून आगरियास येत होते ते, व सादतखान एक झालिया मनसबा भारी पडेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें, सादतखानांनीं बादशहास व आमिरास लिहून पाठविलें कीं, मराठ्यांची फौज यमुना उतरोन आली होती ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले व दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर व विठोबा बुळे कामास आले. बाजीरावाची धाड आली होती तिची गत हे जाहली. आम्ही यमुना उतरोन मराठे बुडवून चमेलीपार करितों. म्हणून कित्येक गप्पा लिहून पाठविल्या.† पातशहांनीं खुशाली कळवून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपाव पाठविला; व वकीलासही शिरपाव दिला. सादतखानांनीं आपली बाजू शेर करून घेतली. वरकड अमीरासही कित्येक प्रकारें धिक्कारून लिहिलें. तें वृत्त रा. धोंडो गोविंद यांनीं वरचेवर लिहून पाठविलें. तात्पर्यार्थ आमचे फौजेंत जीव नाहीं केवळ निर्जीव, बुडवून नेस्तनाबूद केली असें लिहीत. लपंडाव करून दाखविले. मोगली कारभार, आपण ऐकत जाणतच आहेत. करावें थोडें, लिहावें फार. पातशहास सत्य भासलें तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन. एक सादतखानास बुडवावें, किंवा दिल्लीस जाऊन दिल्लीचे पूर जाळावे तेव्हां मिथ्या होईल. त्यास, सादतखान आगरे सोडीनासे देखोन, आम्ही दिल्लीस जावयाचा निश्चय केला. पुरे जाळावे व मराठे आहेत असें पातशहास अवलोकन करवावें, ऐसा विचार करून, २६ जिल्कादीं (१८.३.१७३७) कूच करून पातशाही रस्ता सोडून लांब मजला करून दमनसिंग चूडामण जाठाचे मुलखांतून नेवातयाचे सरहद्दें डोंगर किनाऱ्यानें चालिलों.

§ ब्र. ले. २७. या पत्राची ता.१५ जिल्हेज म्हणजे चैत्र व॥ २, एप्रिल, ५ स. १७३७ पाहिजे. रामनवमीस बाजीराव दिल्लीस पोंचला आणि प्रकरण आटोपल्यावर परत जातांना वाटेंतून चैत्र व॥ २ रोजीं हे पत्र लिहिलें. सेयर मुताखरीनची या मितीस पुष्टि आहे. † पहा पे. द. १५. २२, २७.

खानदौरा व बंगस आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेट २ जिल्हेजीं (२३.३.१७३७) झाली. (पेशव्यांचा वकील) धोंडोपंत खानदौरापाशीं होते. सादतखानानें खानदौरास सांगून पाठविलें, कीं 'बाजीराव याची फौज आपण मोडली. बुनगे पळाले. ते खासाही चमेल उतरोन गेले. अद्याप तुम्ही त्याची खुशामत करितां! वकील ठेवून घेतला आहे हें कोण्या विचारें? वकिलास निरोप देणें.' त्यावरून धोंडो गोविंद वकील यासीं निरोप दिल्हा. आम्हांजवळ आले. कमरुद्दीनखान, अजीमुल्लाखान वगैरे आले. आम्हीं त्यांजसीं गांठ न घातली. सातां कोसांवर उजवे बाजूस आमचे हातें त्यांस टाकून लांबलांब मजली वीस कोसांच्या करून दोन मजलींनी ७ जिल्हेजीं (२८ मार्च) दिल्लीस बारापुला व कालिकेचें देऊळ उजवे हातें टाकून जाऊन कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुऱ्यास आगी देऊन शहर खाक करावें, त्यास दिल्ली महास्थळ, पातशहा बरबात जालियांत फायदा नाहीं. दुसरें, पातशहाचे व खानडौराचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोगल यांस सलूख करूं देत नाहींत. अमर्यादा केल्यास राजकारणाचा दोरा तुटतो. याकरितां आगी लावायाचें तहकूब करून, पातशहास व राजे बखतमल्ल जयसिंगाचा वकील दिल्ली येथें यांसीं पत्रें पाठविलीं. शहरांतून दोन हत्ती व घोडी उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं शहरचे लोक मंगळवार रामनवमी २९ मार्च रोजी भवानीचे यात्रेस बाहेर आले होते, त्यांस झांबडाझांबड केलें. दुसरे दिवशीं बुधवारी (३० मार्च) पातशहाचे आज्ञेनें बख्तमल्ल यांनीं उत्तर पाठविलें कीं, धोंडोपंतास पाठविणें. त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी, आम्ही शहराजवळ आलों, यामुळें दिल्लींत गलबला झाला, यामुळें पाठविले नाहींत. भला मनुष्य व स्वार पाठवून देणें. मशारनिल्हेस पाठवून देतों, आम्हो शहरानजीक राहिल्यानें, शहरास उपसर्ग लागेल, याकरितां कूच करून झीलच्या तलावावर जातों.' म्हणून उत्तर पाठवून आम्हीं कूच केलें.

शहराजवळून येत असतां, पातशहानीं नबाब मीर हसनखान कोका दरोगा खास चौकी, नबाब अमीरखान व खोजे रोजअफजूखान, राजे शिवसिंग जमातदार रिसाले अमीर, व मुजफरखान, नायब बक्षीगिरी आहादी व नबाब मुजफरखान, खानीदौराचे बंधु, सात आठ हजार फौजेनिशीं शहराबाहेर रिकाबगंजाजवळ आले. राजश्री सटवाजी जाधव पुढें गेले होते त्यांची व मोगलांची गांठ पडली. झटपटी होत होती. मशारनिल्हेनीं आम्हांस

सांगोन पाठविलें त्यावरून रा. मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे व तुकोजी पवार व यशवंतराव पवार, व मानाजी पायगुडे व गोविंद हरि पाठविले. त्यांचें यांचें झुंज होऊन मोगल मोडिले. राजे शिवसिंग वगैरे दहा बारा दरबारी ठार झाले. नबाब मीरहसनखानकोका जखमी झाला. दिगरबादे चौकी पातशहाचे अडीच तीनशें मेले. चारशें माणूस जखमी जालें. रोजअफजूखान व अमीरखान व मुज्फरखान वगैरे शहरांत पळोन गेले. रा. राणोजी सिंदे याजकडील इंद्रोजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें उडोन गेलीं. वरकड नामांकित माणूस कोणी ठार झालें नाहीं. घोडे माणूस जखमी झाले. तदनंतर आम्ही झीलच्या तलावावर ¶ मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला, तों कमरुद्दीनखान पातशहापुरावरून आल्याची खबर आली. तेच क्षणीं आम्ही तयार होऊन गेलों. त्यांचे आमचे फौजेचें युद्ध झालें. बारांत गेलेला एक हत्ती रा. यशवंतराव पवार यांणी घेतला. घोडीं उंटें लष्करात आली, त्यास दिवस अस्तमानास गेला. रात्रीचा दम धरून चौगीर्द मोगल वेढून बुडवावा, तरी झीलचा तलाव सोळा कोस लांब, उजवीकडे कमरुद्दीनखान, पुढें शहर. दुसरें, आम्ही दिल्लीस गेल्याचें वर्तमान नबाब खानदौरा व सादतखान व महमदखान बंगस यासी ७ जिल्हेजी (२८ मार्च) मंगळवारीं राधाकुंडाचे मुक्कामीं कळतांच सडेसड होऊन पंचवीस तीस हजार फौजेनें बडेलास बत्तीस कोस येऊन मुक्काम केला. दुसरे दिवशीं (बुधवारीं) अलावर्दीच्या नाल्यावर पंचवीस कोस मुक्काम केला.

गुरुवारीं प्रातःकाळीं खानदौरा, सादतखान, बंगस व कमरुद्दीन सारे एक होणार. एक झाल्यावर सोसणार नाही, व शहर समीप. यास्तव मोगलास टाकून चहूं कोसांवर मुक्काम केला. आम्हाकडील फिरंगोजी पाटणकरास गोळी लागोन ठार झाला. वरकडही दहा पांच माणूस व घोडीं जखमी झालीं, मोगलांकडील दहापांच ठार झाले. दहावीस जखमी झाले.† गुरुवारीं सादतखान व खानदौरा व बंगस सारे कमरुद्दीनखानाजवळ आले. अलावर्दीपासून § झीलच्या तलावापर्यंत मुक्काम करून आहेत. आम्ही मोगल पाठीवर घेऊन, दाबांत आणून बुडवावे, या विचारें कूच करून रेवाडी, कोटपुतळी, मनोहरपुरावरून आलों. अद्याप सारे मोगल अलावर्दी व झीलच्या तलावावरी आहेत

¶ दिल्लीचे दक्षिणेस तीन मैल. झील म्हणजे सखल जमीन.

† पे. द. १५.३७. § सराई अलाविर्दीखान दिल्लीच्या दक्षिणेस १४ मैल.

म्हणोन बातमी वर्तमान आलें. खानदौराचीं पत्रांवरी पत्रें सवाई जयसिंगजीस गेलीं. त्यांवरून ते पंधरा सोळा हजार फौज व तोफखाना देखील स्वार होऊन बासव्यावर § गेले आहेत. भेटीस जातात. सवाईजींचीं पत्रें ममतायुक्त आपला मुलूख रक्षावा म्हणून येतात. आम्हांकडील व्यंकाजीराम त्यांजपाशीं आहेत, त्यांजपासून लिहिवीत असतात. आम्ही त्यांचे मुलखाचे वाटेस जात नाहीं. वाटेनें दाणादुणा देतील. अभयसिंग जोधपुरास आहेत. आम्ही आतां ग्वालेर प्रांतें बाकीसाकी राहिली आहे, ती वसूल करून, मोगल मागें मागें आले तरी त्यास हैराण करून, पायींची धांपा देऊन, धावतां धावतांच खराब होत तेंच करून, दाबांत आणून, गांठ घालून, राजश्री स्वामींचें पुण्यें, व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें, मुख्य गोष्टी खानडौराचे व पातशहाचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोगल यांणीं हिंमत धरिली आहे. त्यांतें शीरोपस्थ सादतखान आहे. त्याचा गर्व श्रीसंकल्पें हत जालियास, सर्व मनोदयानुरूप होईल. मनोदयानुरूप सलूख जालिया करूं, नाहीं तरी सलूख करीत नाहीं. दिल्लीभवता मुलूख खालसा केला. पुढें सोनपतपानपत यमुनापार मुलूख राहिला, तोही ताराज करून मोगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. होईल तें वृत्त मागाहून तुम्हांस लिहून पाठवूं. कदाचित् मोगल दिल्लीस राहिले, तरी आगरियास जाऊन, अंतर्वेदीत उतरून कुल मुलूख ताराज करितों. नबाब निजाम उल्मुल्क यांनीं गडबड केली, रेवा उतरले, तरी तुम्ही मागें शह देणें. पेशजी लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें. मारून ताराज करणें. इकडेस सक नाहीं. तिकडेसही नाहींसा करणें. निजामास पायबंद असलिया उत्तम आहे. लोभ असों दीजे हे आशीर्वाद."

मराठे मोगलांचा वरील झगडा इतिहासांत अपूर्व गणला जाईल. दोनही पक्षांनीं आपलें संपूर्ण बल या वेळीं उपयोगांत आणिलें. मराठ्यांचा पाया फार दूर दक्षिणेंत, व मोगल सर्व स्वगृहीं. त्यांचे सर्व मोठे उमराव एकत्र, तोफखान्याचें सामर्थ्य हाताशीं. मराठ्यांच्या फौजा एकंदर ऐंशी हजार असल्या तरी त्या भोपाळपासून दिल्ली पावेतोंच्या प्रदेशांत ठिकठिकाणीं पांगलेल्या. अशा स्थितीत मराठ्यांनीं युक्तीच्या बळानें मोगलांवर मात केली. अशा या प्रसंगांतले कित्येक तपशील स्पष्ट करणें अवश्य आहे.

§ जयपुर हद्दींतलें एक गांव, जयपुरचे ईशान्येस ३० मैल.

बाजीराव भदावर प्रांतांतून आगऱ्याकडे येतोसें पाहून मोगल अधिकारी ता. ८-३-१७३७ रोजीं त्यास अडविण्यासाठीं गडबडीनें पुढें चालून आले. येथेंच त्यांस जयसिंग जयपुराहून निघाल्याची व बुंदीचा बुधसिंग मराठ्यांस सामील झाल्याची खबर आली.

निरनिराळया मोगल सरदारांच्या फौजा एकत्र होऊं न देतां त्यांस वेगवेगळे गांठण्याचा बाजीरावानें विचार ठरवून मल्हारराव होळकरास यमुनेच्या पलीकडे सादतखानाचे मुकाबल्यास दुआबांत पाठविलें. मल्हाररावानें यमुनापार जाऊन शुकोहाबादेस वेढा घातला. तेथील किल्लेदार लालजी खत्री यानें दीड लाख रुपये व हत्ती मल्हाररावास देऊन आपला बचाव केला. तेथून मल्हारराव लुटालूट करीत फिरोजाबादेवर व तेथून कोलजळेश्वरास जात असतां, एके दिवशीं सकाळीं सादतखानाची फौज एकदम त्याजवर चालून आली. सादतखानाचा पुतण्या अबूल मनसूरखान सफदरजंग आघाडीच्या बारा हजार फौजेवर मुख्य होता. ही फौज अगदीं लहान असेल असें समजून मल्हाररावानें तीस घेरण्याचा यत्न केला, त्यांत सफदरजंग हळूहळू मागें सरत सादतखानाच्या मुख्य पन्नास हजार फौजेस येऊन मिळाला. त्यांनीं एकदम अशा निकरानें होळकरावर हल्ला केला, कीं मराठे परत नदी ओलांडण्यासाठीं मागें पळाले. इतिमादपुराजवळ एक हजार मराठे शत्रूंनीं पकडले. बाकीचे पडत झडत जीव बचावीत यमुने-अलीकडे ता. २३.३.१७३७ रोजीं येऊन बाजीरावास कोटिला येथें मिळाले. सादतखानानें केवढीही वढाई याबद्दल मारिली, तरी मल्हाररावाच्या गनिमी पद्धतीचा तो एक विजयच होय. नदीचा उतार न मिळाल्यामुळें थोडें बहुत नुकसान झालें. मल्हाररावास दुआबांतून घालवून दिल्यावर सादतखान पश्चिमेस जाऊन एप्रिलचे आरंभीं मथुरेजवळ खानडौरान यास जाऊन मिळाला. महमदखान बंगशही त्यांतच होता. रात्रीं हे तिघे सरदार भोजनास बसले असतां बातमी आली की, फत्तेपुरसिक्री व दीग यांचे दरम्यान मोगल फौजांचे मधून त्यांस चुकवून बाजीराव एकदम दिल्लीवर चालून गेला आहे. या बातमीनें ते सर्व गर्भगळित झाले. सादतखानानें बादशहास गर्वोक्तीनें कळविलें होतें, कीं आपण मराठ्यांचा संपूर्ण पराजय केला आहे. त्यावरून बादशहानें आनंद करून मराठ्यांचे वकिलास दरबारांतून घालवून दिलें. ही बातमी बाजीरावास कळतांच, आपण अजून जिवत आहों हें बादशहास प्रत्यक्ष दाखविण्यासाठींच बाजीराव दहा दिवसांचा प्रवास दोन अहोरात्रींत गांठून रामनवमीचे आदले दिवशीं

दिल्लीपुढें येऊन ठेपला. शहराच्या दक्षिणेस काळका देवीची जत्रा चालू होती, त्या जत्रेंतील कांहीं हत्ती व दुकानें मराठ्यांनीं लुटून घेतलीं. ही बातमी विजेसारखी शहरांत व बादशहास पोचली. त्या वेळीं जो गोंधळ सर्वत्र उडाला, त्याचें वर्णन देण्यास पुरेसें स्थल येथें नाहीं. जाळपोळ केली असतां काम चिडीस जाईल असें वाटून, बाजीराव ताल कटोरा ऊर्फ झील तलावाचे नजीक मालचा गांवीं झाडींत तळ देऊन राहिला. तेथून त्यानें बादशहास पत्रें लिहून पुढील बेत कळविला. जत्रेंतील लुटीनें घाबरलेल्या लोकांनीं शहरांत जाऊन भलभलत्या कंड्या पिकविल्या. बादशहाला हें प्रथम खरेंच वाटलें नाहीं. 'दोन फौजा समोर असतां बाजीराव इतक्यांत इकडे येणें शक्य नाहीं, कोणी तरी मेवाती चोर जत्रेंत घुसले असतील, व्यापाऱ्यांनीं असा मोलवान मांल उघड्या मैदानावर न्यावा कशाला!' असेंच बादशहा म्हणाला आणि त्यानें भरंवशाचे लोक ताल कटोरा येथें पाठवून बातमी आणिली तों खरेंच. तेंव्हां मात्र त्याची घाबरगुंडी उडून अहोरात्र नानातऱ्हेचे विचार व बेत चालू झाले. पळून जाण्यासाठीं मागच्या बाजूस यमुनेंत त्यांनीं नावा जमविल्या. समोर जाऊन लढावें, तर पराभव झाल्यास मग तरणोपाय नाहीं. शिवाय अशा भुरट्या चोरांचे अंगावर चालून जाणें बादशहास शोभत नाहीं. असे नाना विचार चालून अमीरखान नावाचा एक अनुभवी गृहस्थ बादशहाच्या मर्जीतला होता, त्यानें राजधानींत असलेली फौज बारा हजार स्वार, वीस हजार पायदळ व तोफखाना अशी बरोबर घेऊन बाजीरावावर चाल केली. राजा शिवसिंग व अजमेरीसिंग हे दोन खासपागेचे राजपूत सरदार व आणखीही कांहीं नामांकित इसम लढाईवर गेले. शहरांत सर्वांनीं सावध राहवें अशा ताकिदी देण्यांत आल्या. अमीरखान आपल्या फौजेसह शहराचे बाहेर मराठ्यांची वाट पाहत बंदोबस्तानें राहिला. परंतु मीर हसन खान कोका लढण्याच्या आवेशानें येऊन अमीरखानास भेटला. त्यांनीं बाजीरावावर चालून येऊं दिलें. बाजीरावानें भ्याल्यासारखें मागें सरून मोगलांस पूर्णपणें अंगावर घेतलें. पकडींत आलेले दिसतांच सटवोजी जाधव, मल्हारराव व राणोजी यांनी चवताळून परत वळून मोगलांस हातोहात तलवारीनें कापून काढिलें. कोका शिवसिंग वगैरे पुष्कळ गृहस्थ कापले गेले. कांहीं जीव घेऊन परत गेले. जखमी झालेल्यांच्या झुंडी शहरांत शिरल्यावर शहरवासीयांची बोबडीच वळली. बाजीरावानें मनांत आणिलें असतें तर दिल्ली शहर हस्तगत केलें

असतें. परंतु बादशहास किंवा लोकांस त्रास देण्याचा त्याचा बिलकूल विचार नव्हता. लोकांचीं मनें शांत करण्याकरितां तो मुद्दाम झील तलाव सोडून दिल्लीहून सात कोसांवर सराई आलाबिर्दीखान येथें दूर जाऊन राहिला आणि तेथें जातांच वजीर व गाजीउद्दीन आपल्यावर चालून येतात, असें ऐकून बाजीराव त्वरेनें दक्षिणेस कोटपुतळीस ९३ मैल येऊन पोचला. वाटेंत त्याजवर वजिराच्या एका तुकडीनें हल्ला केला, परंतु बाजीरावाचें म्हणण्यासारखें नुकसान झालें नाहीं. मराठ्यांची धाड निघून गेलेली ऐकून दिल्लीत जो आनंद झाला तो काय वर्णावा! खानडौरान, सादतखान वगैरे दुसरे सरदारही हळू हळू येऊन दिल्लीजवळ वजिरास सामील झाले. बाजीरावाचा आतां पाठलाग करणें तर त्यांना शक्यच झालें नाहीं. एवढे मोठे सरदार बादशहाजवळ असतां बाजीरावासारख्यानें अल्प फौजेनिशीं खुशाल त्याच्या अंगावरून जावें यावें, त्यांस यांची दाद लागूं नये किंवा यत्किंचित् प्रतिकार करण्याची बुद्धि होऊं नये यावरून मोगल दरबारच्या हीन स्थितीची कल्पना होते.

बादशहाजवळ पेशव्याचा वकील धोंडो गोविंद मोठा धूर्त होता. प्रत्येक उमरावाचा स्वभाव व घाट बरोबर ओळखून आणि मोगलांच्या हालचालींवर योग्य नजर ठेवून त्या धोरणानें काय केलें म्हणजे बाजीरावापुढें हे सर्व फिके पडतील, याची माहिती जेव्हांच्या तेव्हां अंतस्थ रीतीनें त्यानें पुरविली, तदनुसार अल्पावकाशांत बाजीरावानें एवढें अचाट कृत्य करून दाखविलें. वाटेंत बादशहाच्या अवाढव्य फौजा सिद्ध असतां त्यांस चुकवून केव्हां कोणत्या बाजूनें बाजीरावानें दिल्लीवर अचानक धाड घालावी आणि प्रत्यक्ष बादशहास न दुखवितां परभारें उमराव हतवीर्य व्हावे ही हिकमत धोंडो गोविंदाची दिसते. म्हणून त्याजवरच मोगलांचा मोठा रोष होऊन त्यास वजिरानें आपल्याजवळून काढून दिलें, मात्र येणेंकरून बाजीरावाला त्याचा उपयोग भरपूर करून घेतां आला. §

**५ फलितार्थ.**—पेशवे दप्तरांत बाजीरावाच्या या मोहिमेचे इतके कागद छापलेले आहेत, कीं त्यांचें अल्पसार देण्यासही येथें अवकाश नाहीं. सर्व कागद विशेषतः भाग १५ व ३० यांतले काळजीपूर्वक वाचले असतां बाजीरावाची धूर्तता, सहायकांवर पूर्ण भिस्त ठेवून विस्तृत समरक्षेत्रांतून

§ नादीरशहाच्या स्वारीचें याचे पत्र ता. ४ मार्च, स. १७३९ चें त्याच्या धूर्ततेची साक्ष पुरवितें. हा धोंडो गोविंद कोण याचा पत्ता लावणें जरूर आहे.

प्रत्येकाकडून योग्य कामगिरी घडवून आणण्याची हातोटी इत्यादि योजनेबद्दल त्याची प्रशंसा करावी तेवढी थोडीच होईल. एक लेखक लिहितो, ‡ 'स्वामी यंदां सैन्य समुदायें उत्तर प्रांतें मोहिमेस जाऊन, तिकडील अमित्र स्वामींचे प्रतापें शरणागत होऊन, दिग्मंडळीं दिग्विजय विस्तारोन, कीर्तिघोष मिरविला तो पत्रीं लिहिता पुरवेना. मोहीम सिद्धीस जाऊन श्रावण शु० १ स (ता. १७.७.१७३७) पुनरागमन जालें परिसोन बहुत संतोष पावलों.' दुसरा लेखक लिहितो, "अभयसिंगाची भेट होईल म्हणून लिहिलें ऐशीयास स्वामीचे हस्त गालीब (बळकट) आहेत. जे अनिष्ट इच्छितील ते दरिद्र मनोरथ होतील. मोगलांची गुंज फुटली उत्तम जालें. ये प्रांतीं स्वामींची सत्ता पूर्ण आहेच. सर्वभौमादि सर्व स्वामींपासून गौरव इच्छितात; स्वामींपासीं रुजू होऊन मर्जीमाफक वर्तती ऽ.¶"

पुढें दिल्ली दरबारचा विचार कसा बनला ती घटना दिसेलच. राजपूत राजे मात्र इतउत्तर बाजीरावाच्या भजनीं लागले. त्याच्याशीं वैर बांधण्यांत आपलें अहित आहे अशी त्यांची खात्री झाली. व्यंकाजीराम जयपूरचा वकील लिहितो, "जयपूरचे तर्फेचा जोरावरसिंग यानें स्वामींसाठीं पाच हजार रुपये मेजमानी पाठविली; आपण आप्तता व भाऊपणा राखिला, येणेंकरून सवाईजींनीं परमसंतोष मानेचा आम्हास बोलाऊन बहुत संतोषाच्या गोष्टी सांगितल्या जे, राऊ आपणासीं भाऊपणा व माया बहुत राखितात. आमचा सर्व प्रकारें अभिमान त्यासच आहे. स्वामींचें पत्र अक्षरशः वाचून दाखविलें. परम समाधान पावल, बोलले, आपण स्वामींचे सेवक, मुल्कूब त्यांचा, आपण त्यांचे, सर्व प्रकारें रक्षण करणें त्यासच असे. मातुश्रींनी बहुत कृपा केली, स्वामींनींही करावी §"

'पातशहानें महंमदखान बंगश यास सवाईजीकडे पाठविलें. त्यांनीं सवाईजीची फौज पाहिली. सर्व सरदार बाजीरावाच्या हालचालींकडे नजर देऊन बसले.'† अशीं आणखी अनेक लहान मोठीं प्रकरणें या स्वारींत घडलीं. बुंदेल्यांस जरब बसून वसुलाचा भरणा झाला. भदावरचा राजा शरण आला, त्याचें ठाणें अटेर बाजीरावानें तत्काळ काबीज केलें. "अटेरीचा किल्ला घेतला हें वर्तमान दिल्लीस कळल्यावर पातशहांनीं खानदौरास आज्ञा केली, 'तुम्ही पंतप्रधानांस सामोरे जाऊन सल्ला करावा, द्रव्य द्यावें.' स्वामींनां रोहिल्याचा जिल्हा भोपाळ

‡ पे. द. ३०.२१०. ¶ पे. द. १५.३०. § पे. द. १५.२३. † पे. द. ३०, १८६.

काबीज करून अटेरवाल्यास तंग केलें, त्यास सहकुटुंब जीवदान दिधलें, हा सकल प्रसंग अति आनंददायक झाला. स्वामी पूर्ण यशस्वी. प्रतापकटाक्षेंकरून दिवसेंदिवस ताम्रही हतवीर्य होतात. अभयसिंग दहापंधरा हजार फौजेनशीं स्थिर आहेत." ¶

बाजीरावाच्या या स्वारीवर शाहूनें केवढी भिस्त ठेविली होती, आणि बाजीरावावर त्याचा केवढा लोभ होता हें खालील शाहूच्या पत्रात व्यक्त होतें.

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. प्रस्तुत तुम्हांकडून विनंतिपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. कोठें आहां, काय विचार, पुढें कोठपर्यंत जाणार, मुख्य अमीरसहवर्तमान काय करीत आहेत, हें सविस्तर दिनप्रतिदिन लिहीत जाणें. सांप्रत आगरेयानजीक गेलेच असाल. पलीकडील भेटीचा विचार घडणार म्हणून परस्पर ऐकिजेतें. ऐशियास मोगली मनसुबा, इमान देऊन आपला मतलब साधितील. त्यांचा विश्वास मानावा ऐसा अर्थ नाहीं. याजकरितां शहरांत जाऊन भेट घ्यावयाचा मनसुबा करीत असाल तर सर्वथा न करणें. भेट न घेतां दुरूनच ज्याचे हातें तुमचें राजकारण असेल त्यापासून आपले मतलब साधावयाचे ते साधणें. हावभरी होऊन त्याचे विश्वासावरी जाल याजकरितां लिहिलें आहे. तुम्ही बुधमंत कार्यकर्ते यशस्वी सेवक आहांत. विचारास चुकणार नाहीं हा स्वामीस निशा आहे. तरी बहुत विचारें करून जें करणें तें करून आपली बाजू सर होऊन येई तें करणें. पलीकडील अमीर तुम्हांसीं विवेकावरी आहेत, आणि नबाब निजाम उल्मुल्क इकडून फारच वळवळ करून त्या प्रांतें येत आहेत. त्यांचा विचार कांहीं कळत नाहीं तरी बहुत सावधपणें मनसुबा करणें. मोगली विचार तुम्हांस न कळेसा काय आहे! आपला नक्ष राहून, योजिला मनसुबा सिद्धीस पावे, ते गोष्ट करणें. जो विचार करीत असाल व घडोन येत असेल, तो वरचेवरी हुजूर लेहून पाठवीत जाणें. वरकड सविस्तर रा. महादाजी अंबाजी लिहितील त्याजवरून कळों येईल. § आन वृत्त दिनचर्येचें वरचेवर लिहिन. फुड मनसुबा काय व बोली काय मुद्याची तेही लिहिन. फुड कोठवर जान तेही लिहिन. त्याची मुखभान आहे यावर न जान. त्याचे वाटे कदाचित भेटीचा प्रसंग पडला तर लिहिन. बहुत काय लिहिन सुदन असा.

¶ पे. द. १५. १८, १९, ३१.

§ येथून स्वतःचें अक्षर. २२ मोहोरम = १२ मे पत्राची पैवस्ती.

# ११

# निजामाची सद्दी बादशाहीला मारक

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १७३७ | एप्रिल | ७ | बऱ्हाणपुराहून निजामाचें उत्तरेंत प्रयाण. |
| ,, | मे | १० | निजाम नर्मदापार. |
| ,, | ,, | २८ | सिरोंज येथें निजाम व पिलाजी यांची भेट. |
| ,, | जुलै | २ | निजाम दिल्लीस दाखल, बादशहाची भेट. |
| ,, | ऑक्टो० | | निजामाची दिल्लीहून माळव्यावर चाल. |
| ,, | नोव्हें० | १२ | निजामाचा मुक्काम धामुणी. |
| ,, | ,, | | नासिरजंग बापाचे मदतीस निघाला. |
| ,, | ,, | ३० | बाजीराव नर्मदेवर दाखल. |
| ,, | डिसेंबर | २६ | रघूजी भोसले व शुजायतखान यांचा संग्राम. |
| ,, | ,, | १३ | भोपाळजवळ निजाम बाजीरावाचा झगडा. |
| | ,, | १६ | भोपाळवर निजामाचा कोंडमारा. |
| १७३८ | जाने० | ७ | सराई दुराईचा तह. |
| ,, | फेब्रु० | ६ | कोयपरगणा बाजीरावानें लुटला. |
| १७३९ | जाने० | ८ | नादीरशहा लाहोरवर दाखल. |
| ,, | फेब्रु० | १३ | सरहिंदवर बादशहाचा पराभव नादीरशहाकडून. |
| ,, | मार्च | ७ | नादीरशहा दिल्लीस दाखल, पुढें क्रूर कृत्यें. |
| ,, | मार्च | ९ | सादतखानाचें विषप्राशन व मृत्यु. |
| ,, | एप्रिल | २९ | रघूजी भोसल्याचा आवजी कवड्यावर हल्ला. |
| ,, | ,, | २९ | बादशहाचें संरक्षण करण्याबद्दल नादीरशहाचें फर्मान-हिंदी संस्थानिकांस व पेशव्यास. |
| ,, | मे | १ | नादीरशहाचें दिल्लीहून स्वदेशीं प्रयाण. |
| १७४० | ऑगस्ट | | निजाम दिल्लीहून दक्षिणेंत निघाला. |
| १७४१ | जुलै | २३ | दौलताबादजवळ-निजाम नासिरजंगाचा संग्राम, नासिरजंग कैद. |

## ११

# निजामाची सद्दी बादशाहीला मारक



**१ अडीच वर्षांचा युद्धसंग्राम.**—स. १७३६ च्या दिपवाळीस बाजीराव बादशहाचे भेटीसाठीं उत्तरेस निघाला, तें वर्तमान ऐकून निजामाचें चित्त अत्यंत व्यग्र होऊं लागलें. जर का बाजीरावाचा आश्रय बादशहानें केला, तर उद्यां आपली दक्षिणची सुभेगिरी देखील ते काढून घेतील, मग आपणास थारा नाहीं, हीच मोठी चिंता त्यास उत्पन्न झाली आणि कसेंही करून त्या दोघांची भेट होऊं न द्यावी आणि उत्तरच्या व दक्षिणच्या फौजांमध्यें बाजीरावास ठेंचून काढण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करावा अशा उद्योगास निजाम लागला. त्यानें भराभर आपल्या सरदारांस निकडीचे हुकूम पाठवून फौजा सिद्ध केल्या आणि आपल्या हस्तकांकडून दिल्लीसही तशी खटपट चालविली. या गोष्टी पेशव्यास कळल्या तेव्हां त्यानें व शाहूनें आपल्या ठिकठिकाणच्या सरदारांस निकडीचे हुकूम पाठवून निजामास इकडेच पायबंद द्यावा आणि त्याच्या मुलखांत उपद्रव चालवावा अशी योजना केली. असे उभय पक्षांचे प्रयत्न चालल्यामुळें स. १७३७ च्या जानेवारीपासून अडीच वर्षें म्हणजे नादीरशहाची स्वारी आटपेपर्यंत सर्व देशभर युद्धाचा वणवा कमी अधिक प्रमाणांत उसळला होता. खरें म्हटलें तर या बनावाला **मोगल मराठ्यांचें अडीच वर्षांचें युद्ध** असें सार्थ नांव दिलें पाहिजे.

या प्रचंड युद्धांतील दोनच विशिष्ट प्रसंग, बाजीरावाची दिल्लीवर धाड व निजामाचा भोपाळवर कोंडमारा एवढे प्रस्तुत आपल्या परिचयाचे आहेत, पण यांशिवाय किती तरी लहान मोठे झगडे सर्व देशभर चालू असलेले उपलब्ध कागदांत दृष्टीस पडतात, त्यांची संगति जुळविण्याचें काम अद्यापि

व्हावयाचें आहे. आवजी कवडे, रघूजी भोसले, उदाजी चव्हाण, चंद्रसेन जाधव व त्याचा पुत्र, दाभाडे मंडळी, फत्तेसिंग भोसले, रामचंद्र हरि, व्यंकटराव घोरपडे, सुलतानजी व जानराव निंबाळकर, सरलष्कर सोमवंशी, प्रतिनिधि इत्यादि अनेक लहानमोठ्या सरदारांचा दक्षिणेंत ह्या दोन तीन वर्षांत धिंगाणा चाललेला दिसतो, त्याची योग्य जुळणी केल्यास लक्षांत येईल कीं ते सर्व आपल्यापरी वरील मुख्य युद्धांत संविभागी होते आणि त्यांस तशी चालना शाहू व पेशवे यांजकडून मिळाली होती. दक्षिणेंतील राजकारण चिमाजीअप्पा ठरवी आणि त्याचे हाताखालीं आतां नानासाहेबही धूर्तपणा शिकला. शाहूनें मिरजेकडे स्वतः स्वारी केली, व्यंकटरावानें गोव्यावर हल्ला केला, आवजी कवड्यानें वऱ्हाड-खानदेशांत धुमाकूळ माजविला आणि फत्तेसिंग व रघूजी भोसले यांनीं कर्नाटकावर जोराची झडप घातली इत्यादि प्रकार एका मुख्य सांखळीचे निरनिराळे दुवे असून ते जुळवून सांखळी बनविण्याचें काम मात्र करावयाचें आहे. निजाम उत्तरेंत गेल्याबरोबर कर्नाटक उघडें पडलें, तें काबीज करण्यासाठीं शाहूनें रघूजीस तिकडे रवाना केलें. थोड्या सूक्ष्म दृष्टीनें आपण या संग्रामाचा आढावा घेऊं. कालसूचींत बाजीरावाचे मुक्काम दाखविले आहेत, ते लक्षांत आणावे.

स. १७३६ दसऱ्यानंतर बाजीरावानें उत्तरेत प्रयाण केलें. मागोमाग निजामानें औरंगाबाद सोडून बऱ्हाणपुरास तळ दिला. तेथें त्याचा मुक्काम ता. ७ एप्रिल-पावेतों झाला. येथें बादशहाचे वकील निजामास बोलावण्याचें फर्मान घेऊन आलेले त्यास भेटले.

ता. १० मे, १७३७ निजाम नर्मदापार होऊन सिरोंजला दाखल. मु. २९ मेपावेतों. याच वेळीं बाजीराव उत्तरेंतून परत येतांना धामुणी ‡ येथें त्यानें पिलाजी जाधवास निजामाचे भेटीस पाठविलें. त्यांची भेट सिरोंज येथें ता. २८ मे रोजीं झाली.

२ जुलै, स. १७३७ ला निजाम दिल्लीस दाखल. दुसरे दिवशी त्याची व बादशहाची भेट. इकडे बाजीराव, सिंदे होळकर, पिलाजी जाधव पुण्यास येऊन पुढील विचारास लागले.

३ ऑगस्ट. आगरा व माळवा या दोन प्रांतांची सुभेगिरी बादशहानें निजामपुत्र गाजीउद्दीन यास दिली.

‡ सागरचे उत्तरेस २० मैल.

ऑक्टोबर-निजाम दिल्लीहून माळव्यावर निघाला.

१२ नोव्हेंबर, स. १७३७ निजामाचा मुक्काम धामुणी येथें. पुढील महिन्यांत भोपाळचा संग्राम.

**२ पुनः एकवार निजाम.**—स. १७३७ च्या उन्हाळ्यांत दिल्ली येथें बादशहास व त्याचे उमरावांस प्रचंड दहशत बसवून बाजीराव परत दक्षिणेंत निघाला. ही बाजीरावाची चढाई सर्वांसच दुःसह वाटूं लागली आणि कसेंही करून त्याचा पाडाव करण्याची योजना त्यांनीं ठरविली. दक्षिणेंत निजामाला जरी बाजीरावानें बरेंच नरम आणिलें होतें, तरी त्याचें बळ कायम होतें. स. १७३२ च्या रोहेरामेश्वरच्या भेटीपासून निजाम-बाजीरावाचा स्नेहभाव वरकरणीं तरी कायम होता. अंतस्थ धुसपूस व चीड उभयपक्षीं चालू असली तरी उघड वैर त्यांजमध्यें नव्हतें. ही वृत्ति स. १७३७ च्या दिल्लीवरील हल्ल्यानें साफ मावळली. दिल्लीस वजीर कमरुद्दीनखान होता तो निजामास अनुकूल होता. मीरबक्षी खानडौरान हाच काय तो आजपावेतों मराठ्यांशी बिघाड करूं नये अशा धोरणानें वागला. हें धोरण आतां बदललें. बादशहा व त्याचे हे उमराव यांनीं बाजीरावास कायमचा नेस्तनाबूद करण्याचें ठरवून निजामास त्यांनीं हें साहस स्वीकारण्यासाठीं मुद्दाम दक्षिणेंतून दिल्लीस बोलाविलें. त्यानें आपली सर्व तयारी पूर्ण करून उत्तरेंत प्रयाण केलें. ता. १० मे रोजीं सिरोंजेस पोंचला. त्याच समयीं बाजीराव परत येत असता सुमारें पाऊण महिना दोघांचा मुक्काम माळव्यांत भोपाळ सिरोंजच्या आसपास झाला. मात्र एकमेकांनीं अंतःकरणांतले भाव प्रगट केले नाहींत, कीं प्रत्यक्ष भेटी घेतल्या नाहींत.

औरंगजेब बादशहानें मराठे व राजपूत या दोघांचें शत्रुत्व संपादन करून ठेविलें, तेंच त्याचे वंशास पूर्णपणें भोवलें. बाजीरावानें महिना पंधरा दिवसांच्या अवधींत बादशहाची त्रेधा उडवून दिली, यामुळें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. मराठ्यांच्या या मगरमिठींतून जर कोणी बादशहास सोडविण्यास समर्थ असेल, तर तो एक निजामच होय, अशी सर्व उमरावांनीं बादशहाची खात्री करून त्यास आर्जवानें तिकडे बोलाविलें, आणि त्यास वजिरी पतकरण्याची गळ घातली. निजामासही हा उपक्रम विशेष पसंत पडला हें सांगणें नको. अशा संधीची तो वाटच पाहत होता. एक काळ असा होता कीं मुबारीझखानाचे प्रसंगांत बादशहानें आपल्या विरुद्ध वागूं नये म्हणून निजामानेंच मराठ्यांस उत्तरेंत जाण्याची भर दिली. रोहेरामेश्वरच्या भेटीचा मतलबच असा ठरला

कीं मराठे निजामांनीं उत्तर दक्षिणेंत एकमेकांस विरोध करूं नये. ही परिस्थिति गेल्या चार पांच वर्षांत साफ बदलून गेली. मराठे इतके प्रबळ झाले कीं आतां बादशाही टिकत नाहीं असा समय आला. निजाम मोठा धूर्त व चहूंकडचीं सूत्रें ओळखणारा होता. बादशहाचें भरपूर पाठबळ असेल तर आपण मराठ्यांस उखडून काढूं अशी धमक त्याला होती. दक्षिणेंत मराठ्यांना धाकांत ठेवण्यास त्यानें सय्यद जमालखान याची नेमणूक केली आणि आपल्या बेतांचा सुगावा मराठ्यांस लागूं नये म्हणून त्यानें वकिलांमार्फत पेशवा व शाहू यांस पत्रें लिहिलीं कीं, "आपले शिरीं बागीपणाचा म्हणजे बंडखोरीचा शक आहे, तो खावंदांजवळ फेडावा म्हणून आम्ही पातशहांचे भेटीस जातों. तुमचा आमचा भाऊपणा आहे त्यांत खता नाहीं. असें स्नेहवादें कितीही लिहिलें तरी चित्तांतील विचार भिन्न आहे. पंतप्रधान दिल्लीस जाऊन सार्वभौमाची भेट घेतात, मग आपली गत काय! दुसरा सुभा येईल. यास्तव तमाम उमरावांस व दिल्लीश्वरास पत्रें पाठविलीं कीं आपण दर्शनास येतों. सरकारांत खजाना आहे. आपण तेथें आलीयावर गनीमास मारावयास काय उशीर आहे! हें निजामाचें लिहून आल्यावरून सार्वभौमानें प्रधानपंताची भेट महकूफ करून नबाबांस आणभाक दिल्ही, त्यावरून हे जलदीनें उत्तरेस जात आहेत." § यांत निजामाचें कपट वर्तन उघड होतें. मुबारीझखानास मारून दक्षिणेंत स्वातंत्र्य धारण केलें त्या गुन्ह्याची क्षमा मागण्याकरितां आपण बादशहाकडे जातों असें मराठ्यांस सांगून अंतःकरणांत तो मराठ्यांचा पाडाव करण्याचा घाट रचीत होता. आपण मराठ्यांची कोणत्याही प्रकारें समजूत काढण्याचा प्रयत्न करणार नाहीं, त्यांसीं युद्ध करून बंदोबस्तांत ठेवूं अशी शपथ निजामानें बादशहाकडून घेववून पुढील उद्योगाची बळकटी करून घेतली आणि मग त्यानें उत्तरेंत प्रयाण केलें.

निजामाचे हे सर्व डाव बाजीराव चिमाजींनीं पूर्णपणें ओळखले होते. प्रत्यक्ष निजामाला कल्पना नसेल इतकी माहिती त्यांस भरपूर असून ते सावध होते. उत्तरेंत निघण्यापूर्वीच त्यास पायबंद द्यावा असें ठरवून त्यांनीं आवजी कवडे व रघूजी भोसले या दोघांस ती कामगिरी सांगितली. परंतु प्रत्यक्ष निजामावर ते चालून गेले नाहींत. त्याचा सरदार सय्यद जमालखान याच्याशीं या सरदारांच्या पुष्कळ लढाया झाल्या. ता. १५ एप्रिलचें पत्र. "नबाबाची दोन हजार

§ पे. द. १५. २५, २६

फौज व तीन तोफा खानदेशांत थालनेरावर आल्या. खानदेशप्रांतींचीं स्वामींचीं ठाणीं घ्यावीं हें तांब्राचे चित्तांत आहे. त्याचा सरदार जमालुद्दीन दहाबारा हजार फौजेनिशीं आवजी कवड्याचे मागें लागला आहे."

निजामाच्या हालचालींचीं संपूर्ण माहिती बाजीरावास चिमाजीनें व इतरांनीं वेळेवर दिली होती; पण शक्य तोंवर आपणांमध्यें पूर्वीचाच स्नेहभाव चालू आहे असा देखावा दोघांनींही परस्परांस दाखविला. पण नर्मदापार झाल्यावर निजामाला आपले उद्देश लपविणें शक्य नव्हतें. "सिरोंजेस आलियावर या प्रांतींचे तमाम जमीदार निजामास भेटले. मुलकांत फितवा केला. त्याची फौज पांच सहा हजार मराठे व दुसरे पंधरा हजार येकूण वीस बावीस हजार आहे. लोक सर्व नाखूष आहेत. स्वामींच्या आगमनामुळें निजाम तटस्थ होऊन बसला आहे. आपली फौज दहावीस कोस निघून गेल्यावर हे दोचौं हजारांनिशीं दिल्लीस जाणार. स्वामींच्या आगमनाचें वर्तमान ऐकोन परम आल्हाद जाला तो कोठवर लिहावा." असें माळव्यांतील वकिलानें बाजीरावास कळविलें. निजामाच्या आगमनानें तिकडील मराठ्यांस दहशत बसत होती, पण तितक्यांत बाजीरावही उत्तरेकडून माळव्यावर येऊं लागला तेणेंकरून मराठ्यांस धीर आला.

सुमारें एक महिना निजाम बाजीरावांचा मुक्काम आपापल्या फौजांसह एकमेकांच्या सन्निध होता. स्नेह असतां त्यांच्या गांठीभेटी होणें अवश्य होतें. वैरभाव असता तर याच वेळी त्यांचा संग्राम घडणें शक्य होतें. पुढें सहा महिन्यांनीं भोपाळवर त्यांचा मुकाबला झाला, तो याच वेळीं कां झाला नाहीं अशी शंका उद्भवते. निजाम आपल्यावर चढाई करणार ही जर बाजीरावाची खात्री होती, तर पुढें दिल्लीस जाऊन लष्करी तयारी भरपूर करण्याची संधि बाजीरावानें निजामास कां दिली? या वेळीं हलका असतांच त्यासीं गांठ घालणें एका अर्थानें सुलभ होतें. त्याऐवजीं बाजीरावानें पिलाजीरावास निजामाचे भेटीस पाठवून बाह्यतः गोडी दाखविली आणि वर्दळीस न येतां दक्षिणेंत प्रयाण केलें. बाजीरावाची तयारी तशी कमी नव्हती. पण या वेळीं निजामाशीं तशी चढाई न करणेंच त्यास श्रेयस्कर वाटलें. गेल्या आठ महिन्यांच्या मोहिमेंत बाजीरावाचे लोक सर्व थकले असून त्यांना विश्रांतीची जरूर होती. परत येतेवेळीं सरदारांना पुढील ठिकाठिकाणच्या कामगिऱ्या त्यानें अगोदरच ठरवून दिल्या होत्या. उन्हाळा भयंकर असून गनिमी युद्धाची एकदी मोहीम उष्ण

हवेंत मराठ्यांनीं पूर्वी कधीं अनुभविली नव्हती. मोगलांच्या बाजूस तोफखाना भरपूर असून त्याला धावपळीच्या हिकमतीनें जिंकण्याची तयारी अगोदर-पासून ठरवावी लागते. शिवाय निजामाकडून प्रत्यक्ष आगळीक अशी कांहीं घडली नव्हती. पर्जन्यापूर्वी स्वदेशीं जाण्याचा मराठ्यांचा रिवाज असल्यामुळें मुद्दाम थकलेल्या लोकांना महाराष्ट्राबाहेर पुनः युद्धोत्सुक बनविणें बाजीरावास शक्य वाटलें नाही. हटकून यश येण्याची खात्री असल्याशिवाय बाजीरावानें एकंदर हयातींत उगाच संग्राम अंगावर ओढून आणण्याचें साहस कधीं स्वीकारलें नाहीं.

तथापि उभयपक्षांची अंतःकरणें साशंक झालीं होतीं त्यास निश्चिति आणण्याकरितां बाजीरावानें बाबूराव मल्हार व पिलाजी जाधव यांस निजामाचे भेटीस पाठविलें. पिलाजीनें कळविलें, "कालीं ता. २८ मे रोजीं नबाबाची भेटी जाहली. बहुत आदर करून खुषी जाहले. वस्त्रें आपण दिल्हीं तीं गुजराणलीं. आपणास शिरपाव पाठवून देत आहेत. परवां कूच करून पुढें जाणार. वरकड कितेक वर्तमान भेटीनंतर निवेदन करीन. सेवेसीं येऊन पोंचेपर्यंत मुक्काम केला पाहिजे. भोपाळकर यार महंमदखानाच्या मुलकास तूर्त उपसर्ग न द्यावा. नबाबांबरोबर पुत्र चि० आपास दुराईसराईपावेतों पाठवितों." बाजीरावाकडून निजामास उपद्रव होऊं नये म्हणून त्यानें आपल्या पुत्रास त्याजबरोबर दिलें.¶ निजाम दिल्लीची वाट चालूं लागला. बाजीराव पुण्यास आला.

निजामाच्या आगमनानें दिल्लींत खुशाली निर्माण झाली. वजीर कमरुद्दीन-खानानें आपल्या सर्व जनानखान्यानिशीं पन्नास मैल सामोरे येऊन निजामाचा सत्कार केला. त्या वेळीं एवढ्या थाटाची स्वारी सर्वांची निघाली, आणि जनानखान्याच्या दागदागिन्यांचा शृंगार एवढा समृद्ध झाला, कीं त्या वेळच्या धामधुमींत सुद्धां सरदारांच्या या संपत्तीचें प्रदर्शन आश्चर्यकारक वाटतें. बादशहानें निजामास वाद्यें वाजवीत येण्याची परवानगी दिली; वाटेनें ठिकठिकाणीं त्यास बादशहानें पोशाख व सामान पाठवून सत्कार केला. निजामाच्या स्वारीचा हा थाट पाहण्यास लोकांची गर्दी इतकी झाली कीं मुंगीच्या पायांनीं चालण्याइतकीच गति हत्तींस होती. किल्ल्याच्या दिल्लीदरवाजाजवळ हत्तीवरून उतरून निजाम व वजीर पालखींत बसले;

¶ पे. द. १५.४२,४४,४५,४८,४९.

आणि नगारखान्याजवळ पालखींतून उतरून उभयतां हातांत हात घालून व जमिनीकडे दृष्टि लावून दिवाणीखासमध्यें बादशहास भेटले. निजामानें सत्का केला; आणि बादशहानें स्वतःचा झगा व चरकाब आपल्या हाताने निजामास देऊन, 'आसफजा' असा सर्वांत उच्च किताब दिला. तसेंच दिल्लींतील सर्वोत्कृष्ट मकान म्हणजे सादुल्लाखानाचा वाडा त्यास राहावयास देऊन भोजनासाठीं आपल्या मुदपाकखान्यांतून भरलेलीं ताटें पाठविण्याचा क्रम ठेविला. §

ता. १० ऑगस्ट रोजीं त्र्यंबकाजीराम लिहितो, 'दिल्लीचा मजकूर की निजामानी पातशहाशीं करार केला जे, आपणास पांच सुभे देणें आणि करोड रुपये देणें, म्हणजे आम्ही हरिभक्तांस रेवापार होऊं देणार नाहीं, आणि कदाचित् फार शेखी करतील तर दक्षिणची चौथही उठवून देऊं, ऐसी बहुत प्रकारें वल्गना केली ती पत्रीं कोठवर लिहावी. पातशहास चढी लावून बहुत भाषणें करून भेटी झालिया दिवसापासून एकान्तांत, लोकांत मोठासा उठाव केला आणि कुलअख्त्यार करून घेतला. दक्षिणेस पुत्र नासरजंग आहे, इकडे पुत्र गाजुद्दीन याचे नांवें अकबराबाद व माळवा दोन सुभे करार करून छ. १७ रबिलाखरीं ( ३ ऑगस्ट ) शिरोपाव दिल्हा. कुल अमिरांनीं मुबारकी दिल्ही. आतां राहिले तीन सुभे प्रयाग, गुजरात व अजमीर ते आपल्या भाऊबंदांच्या नांवें करून घेणार." ¶ या एकंदर कारस्थानीचा योग्य तोच अर्थ बाजीरावानें घेतला हें सांगणें नकोच.

मराठ्यांस माळव्यांतून कायमचे हाकलून देण्याची बादशहाची अट कबूल करून आक्टोबरांत निजाम तीस हजार स्वार, उत्कृष्ट तोफखाना व कारभाराचा सर्वाधिकार घेऊन दिल्लीहून निघाला. सरळ चंबळेवरून येणारा मार्ग अडचणीचा असल्यामुळें आगऱ्याचे खालीं यमुना उतरून दुआबांत जाऊन पुनः काल्पीजवळ यमुनेअलीकडे तो बुंदेलखंडांत दाखल झाला.

निजामानें दिल्लीस जाऊन काय उलाढाली केल्या त्यांची भरपूर माहिती पेशव्यास ताबडतोब कळत होती. बादशाही उमरावांचें सामर्थ्य बाजीरावानें पूर्ण जोखलें असल्यामुळें त्या सर्वांचा नक्षा कायमचा उतरून टाकण्याची तयारी त्यानें केली. जुलैंत तो पुण्यास दाखल झाला. चिमाजीआपानें वसईची

§ अर्व्हिन २.३००. ¶ पे. द. १५. ५३.

मोहीम जोरांत चालविली होती, पण वसईपेक्षां उत्तरेचा बनाव जास्त हातघाईवर आला. माळव्यांत तीस चाळीस वर्षांच्या प्रयत्नानें जमविलेलें आधान सर्वथा नाहींसें होऊन असंख्य सरदारांचा व सैनिकांचा पराक्रम वायां जाण्याचा प्रसंग आला. बाजीरावानें सर्वांशीं बोलून विचारविनिमय केला. शाहूची भेट स्वस्थपणें घेऊन पुढील उपक्रमाची योजना ठरविली. भाद्रपद वद्यात म्हणजे सेप्टेंबर स. १७३७ त 'पंतप्रधान मु० उंबरज सांनिध स्वामी' असा उल्लेख आढळतो. § त्यानंतर दसऱ्याम सरदार मंडळी पुण्यास जमली. 'मल्हारबा, राणबा, यशवंतराव, तुकोजी, जिवाजी त्रिवर्ग पवार, बाडे व उदाजी पवार ऐसे सारे सरदार जमा झाले. माळवे प्रांतीचे महाल समाईक होते ते सरकारांत घेतले.' माळवा स्वारीची ही पूर्वतयारी होय. 'कार्तिक शु० ३ (१५ ऑक्टो०) शनिवार प्रातःकाळीं पंतप्रधान सुमुहूर्तें मुलूखगिरीस निघाले.'

पुढील हकीकत सांगण्यापूर्वी दक्षिणेंत निजामपुत्र नासिरजंग यानें काय उद्योग केले ते प्रथम समजून घेतले पाहिजेत. ¶ स. १७३७ चे आरंभीं सय्यद जमालुद्दीन यास निजामानें खानदेशावर रवाना केलें, त्याचा व आवजी कवडे याचा झगडा जुंपला. आवजी कवड्याचे मदतीस अंताजी माणकेश्वर होता, त्यांचें एकत्र पटलें नाहीं, म्हणून पेशव्यानें अंताजीस उत्तरेंत कामगिरी दिली. नोव्हेंबरांत नासिरजंगानें सैन्याची जमवाजमव जोरांत सुरू केली. 'सुलतानजी निंबाळकर दीड हजार फौज घेऊन व जानोजी पाचशें स्वार घेऊन दाखल झाले. धीराजी पवारही येऊन त्यांस मिळाला. निजाम उल्मुल्कांनीं पत्रें आलीं कीं, त्वरेनें येणें. नासिरजंगाजवळ अवघी फौज दहा बारा हजार जमली. "त्यानीं तमाम मनसबदारांस बोलावून आणण्यास चोपदार व ढालाईत पाठविले आहेत. चंद्रसेन व्यथित सबब त्याचे पुत्रास पाठविणें. जमालुद्दीनखान बाहेर निघाले. प्रसंग विज्वर दिसतो. बिघाडाचा डौल कूल जाला आहे. नासरजंग नित्य दीडशें दोनशें स्वार नवीन ठेवितात." याप्रमाणें नासिरजंगानें खूप धडपड करून पंधरावीस हजार फौज जमविली, पण चिमाजी आपा तापीतीरावर वरणगांवनजीक ठासून बसला, त्यानें नासिरजंगास पुढें जाऊं दिलें नाहीं. सय्यदजमालुद्दीन व आवजी कवडे यांचा संग्राम बराच काळ चालला.

§ पे. द. ३० पृ. ३४८; पे द. २२.३६२; पे. द. १८.१२

¶ पे. द. ३०. १९४; पे. द. १५.४३, ४६, ५५–५९.

रघूजी भोसले वऱ्हाड नागपुरकडे होता, त्याच्याशीं डिसेंबरांत सुजायतखान व रघूजी भोसले यांसीं युद्धप्रसंग थुगांवापाशीं झाला. तीन प्रहर लढाई मोठी झाली. शेवटीं रघूजींनी पाय उतारा होऊन सुजायतखान व आणीक सरदार धरले. फौज तमाम लुटली. वर्तमान नासरजंगास आलें. ८ रमजानी (७ डिसेंबर) खलबत केलें. नबाबांनीं निकडीनें बोलावलें. सुजायतखानाची हे अवस्था. चिमाजी आपा तापीतीरीं येऊन उतरले. इकडे रघूजी भोसले पंधरा हजार फौज घेऊन पाठीवर येतात. दमाजी गायकवाड येतात. सर्व एक होऊन चाळीस हजार जमाव होणार. पुढें कूच केल्यानें हे औरंगाबादेस उपद्रव देतील, सिकस्त खादल्यानें बदनक्ष होईल, असे आम्ही इकडे गुंतलों. नबाबाकडे जाणें कसें होतें ! अशा विचारांत नासरजंग पडले. शहर सोडून फुलंब्रीवर आले "†

रघूजी भोसले लिहितो, " महाराजांचें आज्ञापत्र व बाजीरायांचें सामील व्हावयाविशीं आल्यावरून अगत्यवादें रायांकडे जावयाचे उद्देशें कूच केलें तों अलजपुरचा सुभा सुजायतखान फौजबंदीनें चालोन आडवा आला, त्यासी आम्हांसी युद्ध तुंबळ झालें. त्यास हतप्रभाव करून हस्तगत केलें. याउपरी मजल दरमजल रायांकडे जात असों. " सुजायतखान जखमी होऊन रघूजीकडे पाडाव आला सहा हत्ती, पांच हजार घोडे, पालख्या, जेजाला अवघें घेतलें. पांच लाख खंड घेऊन सोडलें मृत्यु पावला अशी खबर आहे, (२६ डिसेंबर, स. १७३७ ). यानंतर महाराजांच्या आज्ञेप्रमाणें रघूजी बाजीरावाचे साह्यास नर्मदेकडे निघाला, पण तोंपावेतों निजामाचा कारभार उरकला. §

बाजीरावाजवळ ऐशीं हजार फौज जमली. उभयतां बंधू पुण्यांतून स्वार झाले ते १२ नोव्हेंबरास नेमाडांत सांगवी येथें गेले, तेथून चिमाजी परत वऱ्हाड खानदेशच्या सरहद्दीवर वरणगांव येथें तापीतीरी आला आणि बाजीराव खर्गोण जवळ डिसेंबरआरंभीं नर्मदापार होऊन निजामाचे रोखानें भोपाळकडे गेला. या वेळी शाहूनें सरदारांस आज्ञा पाठविली, कीं " दक्षिणची फौज नबाबास सामील होऊं न द्यावी. नबाब भूपालगडचे आश्रयास गेला पंडित प्रधान चौगीर्द चौक्या देऊन बसले आहेत. नबाबांना दक्षिणची फौज टाकोटाक

† पे. द. ३०.२०७; का. सं. प. या २८.

§ पे. द. १५.८२; पे. द. २२.३६५; भा. व. श.

बोलावली आहे. तरी तुम्ही क्षणाचा उजूर न करितां चिमणाजी बल्लाळ यास सिताफीनें जाऊन सामील होणें. " ¶

**३ भोपाळवरील कोंडमारा.**— निजामाबरोबर पुत्र गाजीउद्दीन फौजेची व्यवस्था पाहत होता. बुंदेलखंडांतून येतांना दतिया, वोडसा, छत्रसालाचे पुत्र व नातू इत्यादि सर्वांस रगडून त्यानें आपल्याबरोबर घेतलें. सादतखानाचा भाचा मन्सूर अलीखान आपली फौज घेऊन सामील झाला. सवाई जयसिंग स्वतः आला नाहीं. त्यानें आपला पुत्र व कांहीं लष्कर पाठविलें. कोट्याचा राजा दुर्जनसाल येऊन मिळाला. पण ऐशीं हजार भरतीच्या या संख्येंत जिव्हाळयाचे लोक फार थोडे होते. हिंदु सारे द्विधा वृत्तीचे विजयी पक्षास माळ घालणारे होते. "शहाजापुरचा अमील मीरमानीखान निजामाचे मदतीस येत होता त्याजवर सिंदे-होळकरांनीं अकस्मात् हल्ला केला. एक प्रहर लढाई झाली. पंधराशें लोक मेले. मीरमानीखानास जिवंत पकडून ठार मारिलें. दोन लाख रुपये देत होता कीं मजला सोडणें. त्यानें मराठ्यांचा कमावीसदार मारला होता, त्याचा बदला घेतला." उभय कटकें भोपाळच्या उत्तर दक्षिणेस नजीक आलीं. छ १ रमजान म्हणजे ता. १३ डिसेंबर रोजीं युद्धास तोंड लागलें. २५ रमजान म्हणजे ७ जानेवारी, स. १७३८ रोजीं तह पुरा होऊन उभयतांची मिठी सुटली. नासिरजंगाची फौज येऊन सामील झाल्यावर मग आपण मराठ्यांवर चाल करूं अशी अपेक्षा निजामाची होती. बाजीरावास नर्मदा उतरूं द्यावयाची नाहीं हा तर त्याचा मुख्य पण होता, तो बाजीरावानें ओळखून निजामास अलीकडे येऊं न देतां आपणच माळव्यांत जाऊन त्यास अचूक गांठलें. सिंदे होळकर येऊन त्यास सामील झाले. आवजी कवड्यास बाजीरावानें बुंदेलखंडावर पुढें जाऊन ताव मारण्यास मोकळें सोडलें. †

बाजीराव एकदम चालून आल्याचें पाहून निजामाची तारांबळ उडाली. त्यानें आपलें जड सामान रायसीनचे किल्ल्यांत ठेवून बाजीरावाशीं मुकाबला करण्याचें ठरविलें. दिल्लीहून आणखी फौज व साहित्य येणार होतें तें वेळेवर आलें नाहीं. नासिरजंगानें मोडकेतोडके सिलेदार जमवून औरंगाबाद सोडून १५ डिसेंबरास बऱ्हाणपुरकडे प्रयाण केलें. फुलंब्रीस असतां तेथून आस्ते आस्ते तो पुढें निघणार, त्यापूर्वीच भोपाळचा संग्राम सुरू झाला होता. शुजायतखान

¶ रा.खं. ६.१०७. † पे. द. १५.५८, ६०; पे. द. २२.३६५

त्यास येऊन मिळणार तों त्याची वाट रघूजी भोसल्यानें लाविली. दमाजी गायकवाड शाहूच्या आज्ञेनें चिमाजीचे साह्यास निघाला. रघूजी भोसल्यानें औरंगाबाद लुटण्याची आवई घातली. अशा स्थितींत नासिरजंग पुढें जाणार तों चिमाजीनें पाठीमागून हल्ले करून त्याचा उच्छेद आरंभिला. इतक्यांत तह झाल्याचें वर्तमान येऊन सर्व कारभार संपला.

युद्धाचा निकाल मुख्यतः डावपेचाच्या कौशल्यावर अवलंबून असतो. या बाबतींत निजाम बाजीरावापुढें भारी हलका पडला. मराठ्यांनी जेव्हां त्यास चहूंकडून एकाएकीं घेरलें तेव्हां त्याची पहिली चढाई तर संपलीच, पण आता बचाव कसा करावयाचा हीच पंचाईत उत्पन्न झाली. धावपळीच्या युद्धात आपण मराठ्यांना पुरे पडणार नाहीं हें ओळखून एखाद्या मजबूद बंदिस्त स्थलाचा आश्रय केल्याशिवाय त्याला गत्यंतर राहिलें नाहीं. असें स्थल जवळ एकच म्हणजे भोपाळ. तेथील तट व तलाव यांचा आश्रय करून निजाम तोफांच्या साह्यावर मराठ्याच्या हल्ल्याची वाट पाहत बंदोबस्तानें राहिला. †

'खासा बाजीराव नबाबाचे रोखें जाऊन तीन कोसाचे अंतरें मुकाम केला. नबाब भूपाळचे तळयाचा आश्रय करून राहिले. इकडील फौजांनी दाणा वैरण बंद केली. भूपाळांत कोंडला. तीन शेर अन्न नबाबाचे लष्करात जालें. रात्रंदिवस रायाची फौज तीर गोळी बाण चालवितात यामुळें नबाब घोड्यावर बसून व होद्यावर जीन ठेवून सर्व दिवस राहतात.' दुसरा लेखक म्हणतो, 'पेशवा मुकाबल्यास येत आहेसें समजताच नबाब सलाबत खाऊन भोपाळ किल्ल्याच्या आश्रयास गेला, तळे पाठीशी, नाला पुढें देऊन राहिला. छ ३ रमजानी चालून घेतलें. नबाबांनी सवाईचे पुत्र व सभासिंग बुंदेले व जाट व रजवाड्यांच्या फौजा व तोफखाना ऐसा एकतोंडी झुंजाची जागा होती ती वाट बांधून उभे राहिले. आपण खासा पाठीवर उभा राहिला. राणोजी सिंदे, पिलाजी जाधव, सयाजी गुजर व किरकोळ पथकें राजपुताचे फौजेवर उठलीं. तोफांची एक रंजक खाऊन मराठे राऊत शत्रूशी जाऊन भिडले. राजपुतांचें दीडशें माणूस ठार झालें. पाच सातशें जखमी झालें. तोफांच्या माऱ्यापुढें व नाला आडवा आल्यामुळें मराठ्याना लगट करता

† भोपाळच्या संग्रामाचीं खुद्द बाजीरावानें लिहिलेलीं ७ पत्रे ब्र. ले. ३३-३७ चीं भरपूर आहेत तीं बाजीरावाची करामत उत्कृष्ट दाखवितात.

येईना, म्हणून दोन बाणांच्या टप्यावर राहून त्यांनी शत्रुसैन्यास वेढलें. मोठ्या सैन्यास पुरेशी सामुग्री किल्ल्यांत नव्हती. मराठ्यांनीं सर्व मार्ग रोखून धरले. धान्य महाग झालें. चौ दिवसांत रुपयाचे पीठ चार शेर जालें. हत्ती घोड्यांस तर वैरण नाहीं. एक दिवस झाडाच्या साली व लव्हाळे चारले. बुंदेले व राजपूत यांस वाटूं लागले नाहक निजामाची संगत करून फसलों. नबाबाचा इतबार त्यांस नाहीं व त्याचा नबाबास नाहीं. ' अशी उपासमार चालू असतांच मराठ्यांनी रात्रीच्या वेळी बाहेरून बाण व आगीचे गोळे नबाबाचे फौजांत फेकून त्यांस इतकें हैराण केलें की, रात्रंदिवस त्या ताटकळत उभ्या राहूं लागल्या. चिमाजीआपा लिहितो, 'रायाची पत्रें ४ रमजानचीं (१६ डिसेंबरचीं) आलीं. नबाब भूपाळगडी कोंडला आहे. दाणावैरण बंद. असा समय त्यास कधी घडला नाही. अतिसंकटी पडला आहे. त्याचे साहित्यास औरंगाबादची फौज येणार ती तिकडे गोवून पाडावी म्हणजे नबाबाचा पाडाव उत्तम होतो. † ३ रमजानीं एक युद्ध जालें. दुसरें कालही एक जालें. बरासा तमाशा नबाबांनी पाहिला. महाराजांचे प्रतापें नबाबावर सलाबत चढली. करोलचा मार देत आहों. मोगलांचा आरगानरगा § केला आहे. दाणा, गल्ला, वैरण काडी कूल बाद जाली आहे. बंगसाचीच गत यास जाली आहे. स्वामीच्या आशीर्वादें निजाम या ठिकाणीं बुडत आहे, अगर सुटका झाली तरी उत्तमच होईल. किल्लेबंद झाल्यामुळें त्याची अब्रू राहिली नाही.' ‡

" ता. १४ डिसेंबर रोजीं लढाई बरीच जाली, तोफखाना फोडून निमचाची. होळकराकडील लोक तीनशें माणसें, दोघे सरदार, काही जखमी, मेले. दोघेही कायम राहिले. मग पंतप्रधानांनीं नबाबाच्या लष्करापासून दोन कोसांवर मुक्काम केला. "

चार दिवस निजामाने वेढ्यांत कसेबसे काढले. तेवढ्यांत त्याचे राजपूत साथीदार बेदील होऊन निघून जाण्याच्या बेतांत आले. निजामाजवळ तोफा होत्या म्हणूनच त्याचा थोडाबहुत बचाव झाला, पण मराठे तोफांच्या माऱ्यांत न येतां दुरून वेढ्याचा ताण बसवूं लागले म्हणून ही लढाई तीन आठवडे पावेतों लांबली. निजामास दक्षिणेकडून किंवा उत्तरेकडून साह्य येण्याची आशा राहिली नाहीं तेव्हां तो घाबरा झाला. जनावरें फाडून खाण्याची वेळ आली, तेव्हां भोपाळांत राहणें अशक्य होऊन तो फौजेचा कंपू करून तोफांच्या

† पे. द. २०.१८. § संपूर्ण वेढा. ‡ का. सं. पद्य. २७.

संरक्षणानें बाहेर पडून उत्तरेकडे वाट चालूं लागला. पण वाट चालतांनाही मराठ्यांची नाकेबंदी सुटली नाहीं. एकदोन कोसांहून जास्त प्रवास सबंध दिवसांत होईना आतां निभाव नाहीसें पाहून आनंदराव सुमंतास पाठवून नबाबांनी बाजीरायांकडे तहाची याचना केली. बाजीरावानें सुमंताबरोबर बाबूराव मल्हार निजामाचे भेटीस पाठविले, त्यावर निजामानें कळविलें, पिलाजी जाधवरावांस व आणखी मातबर पाठविणें. येथीलही माहीतगार देऊन बोली चाली होईल. जयसिंगाचा वकील आयामल्ल यानें आपण मध्यस्थीस असावें असें सांगून पाठविलें. आयामल्लनें येऊन बाजीरावाची भेट घेतली. त्यांजबरोबर पिलाजी जाधव, बाबूराव मल्हार व बाजी भीवराव हे नबाबांचे भेटीस गेले. नबाबाचे तर्फेनें अब्दुलखैरखान, सय्यद लष्करखान व अन्वरखान हे बोलींत होते. "निजामाची बेअब्रू होऊं नये, अब्रू राखली तर सर्व मतलब नबाब मान्य करतील," या धोरणास अनुसरून तह कायम झाला. छ २६ रमजान म्हणजे ता. ७ जानेवारी, स. १७३८ रोजी तहाच्या यादीवर नबाबांनी दस्कत करून दिले.

नंतर बाजीरावाचे भेटीस निजामानें माळवा बुंदेलखंडचे सर्व राजे व सरदार पाठविले. बाजीरावानें दरबार भरवून त्यांचा करभार स्वीकारला. तह ठरल्याबरोबर बाजीरावानें नबाबास रसद पाठवून दिली. सायंकाळीं नबाबाचे सैन्यांत वीस शेर धारण झाली. दुराई सराईच्या तहांतील कलमें— १ माळवा प्रांत देणें. २ नर्मदा व चंबळ यांजमधील मुलूख देणें. ३ या दोहोंबद्दल बादशहाची सनद आणून देणें. ४ मराठ्यांच्या खर्चाचे ५० लाख रुपये बादशहापासून देवविणें ( अर्व्हिन ३०५ ). या प्रसंगीं निजामास सबंध बुडवावयाची संधि बाजीरावास प्राप्त झाली नाहीं नबाबाचा तोफखाना जबरदस्त होता, शिवाय रोहिले, बुंदेले, राजपूत रजवाडे यांची त्यास मदत होती. 'हा अर्थ व तुम्हीं कित्येक विचार लिहिला, तो चित्तांत आणून सौरस्याचा प्रसंग संपादिला जो नबाब चौथाई सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता त्यांनीं माळवे दरोबस्त ऐसें खास दस्तकानें लिहितां उच्चार केला, कीं या मागें कधींच गोष्ट न जाहली ते या प्रसंगीं झाली. पुत्राचे नांवें सुभेदारी करून समागमें आणिलें, त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतां नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला. परंतु काय करील, संकटाचा प्रसंग देखोन द्यावें लागलें. आप्पा, रा. स्वामींचें तपोबळ, वडिलांचें पुण्य समर्थ,

म्हणोनच ही गोष्ट घडोन आली. आज पातशाहींत नबाबासारखा दुसरा अमीर कोण आहे ! अतःपर नबाब दिल्लीस जातील व बंदोबस्त कर्तव्य तैसा केल्यावर होईल ते वर्तमान लिहून पाठवूं. करार झाला यांत अंतर न करावें, अशी नानरोटी नबाबानें दिली. ' स्वामीचे तपोबळ व वडिलांचे पुण्य, यांमुळे यश येतें, ही भावना आज कित्येकास देवभोळेपणाची वाटत असली तरी तत्कालीन लोकाना ती आवेश भरण्यास कारणीभूत होत असे.

येणेंप्रमाणें ही पुष्कळ वर्षाची मोठी मोहीम समाप्त झाली. नर्मदा आणि चंबळ या नद्यांच्या दरम्यानचा दरोबस्त मुलूख बहुतेक स्वराज्यादाखल मराठ्यांनी हस्तगत केला. बाजीरावाच्या पराक्रमाचें हें आत्यंतिक फल होय. बादशहाकडून या प्रांताची लेखी सनद बाजीरावाच्या हयातीत मिळाली नाही. ते काम नानासाहेब पेशव्यानें तडीस नेलें. स. १७३८ च्या जानेवारीत भोपाळची लढाई आटोपल्यावर बाजीराव कांही काळ तिकडेच बादशहापासून तह पुरा करून घेण्याकरिता जिंकिलेल्या प्रदेशात आपला अंमल बसवीत राहिला. ता. ६ फेब्रु० १७३८ रोजी यशवंतराव पवार लिहितो, " आम्ही पंतप्रधान स्वामींसमागमें कोटा प्रांतास आलों. कुली परगणा लूटून नेस्तनाबूद केला, तेव्हा कोटेकरानें खंडणी दहा लक्ष द्यावेसा करार केला. ऐवज हातास आलियावरी वोडसा दतियाकडे जाऊं. " पुढे ता. ९ मार्च, स. १७३८ रोजी भोपाळच्या संग्रामातील बहादुरीबद्दल बाजीरावानें योग्य रकमा बक्षीस दिल्या त्याची यादी पाहिल्यास त्या प्रसंगाची कल्पना येईल. § तिकडे मोगलाच्या पाठीवर फौजासह सरदार ठेवून स. १७३८ च्या जुलै महिन्यांत बाजीराव पुण्यास परत आला त्या वेळी चिमाजीआपाची वसईची मोहीम तयारीत होती. पुरंदरे लिहितो, " राजश्री स्वामी पत्रश्रवणें करून बहुत संतोषी जाहले. पंतप्रधान देशास येतात, बहुत उत्तम गोष्ट असें बोलले. " सिंदे होळकर व आवजी कवडे या प्रत्येकास २५ हजार रुपये बक्षीस वाटले. †

भोपाळच्या संग्रामातील यशाचा वांटा चिमाजीआपासही बऱ्याच अंशी दिला पाहिजे. उत्तरेच्या मार्गावर तापीनदीच्या काठीं चिमाजीआपा बंदोबस्तानें ठांसून बसला. औरंगाबादच्या फौजेस त्यानें अडकवून ठेविलें; रघूजी व दाभाडे यांच्या हालचालींवर नजर ठेवून त्यानें बाजीरावाचा शक्य तितका पाठपुरावा केला, म्हणूनच निजामास जेरीस आणणें शक्य झालें. बाजीराव व

§ पे. द. ३०.३७१ † पे. द. १७.७८

चिमाजीआपा यांचें बंधुप्रेम इतिहासांत वाखाणलें जातें तें युक्तच आहे. मोठीं कार्ये अशा पाठपुराव्याशिवाय सिद्धीस जात नसतात बाजीरावाजवळ तोफखाना नव्हता; पण शत्रूचा तोफखानाही मराठ्यांच्या गनिमी काव्यापुढें असमर्थ ठरला. तरी मोगलांच्या तोफांपुढे मराठे जेरीस येऊन कित्येकदां पराभवाच्या बेतांत आले होते अशा स्थितीत सिरोंजच्या उत्तरेस ६४ मैलावर दुराई सराई येथें ८ जानेवारी रोजी निजामानें विषण्णान्तःकरणानें तहावर सही केली, तेव्हां बाजीरावाचा जीव हलका झाला. अशा रीतीनें नामोहरम होऊन निजाम परत गेला तो एप्रिलांत दिल्लीस पोंचला. पालखेड व भोपाळ या दोन ठिकाणी निजाम व बाजीराव यांचे सामने झाले. दोन्ही प्रसंगीं निजाम बलवान असतां बाजीरावानें त्यास युक्तीनें हरविलें. यावरून युद्धकलेत व राजकारणांत बाजीराव निजामाहून वरचढ ठरला. कठिण प्रसंगीं धैर्यानें संकटांत उडी घालून यश मिळविणें, वादळाच्या घोड्यावर आरोहण करून दिगंत लौकिक मिळविणे हा थोर व्यक्तीचा गुण बाजीरावानें या भोपाळच्या स्वारीत उत्कृष्ट प्रगट केला.

**४ नादीरशहाची धाड** ( फेब्रुवारी–एप्रिल स. १७३९ ).—तह झाला म्हणजे युद्ध संपलें असें म्हणतां येणार नाहीं. कारण तह अमलांत आणण्यासही लढाईच्या इतकाच नेट लागत असतो. भोपाळच्या लढाईनें हिंदुमुसलमानांचा या झगड्याचा कायम निकाल लागला नाहीं. निजामाचा तर हा केवळ जुलमाचा रामराम होता. तो पुढे दिल्लीस गेला, परंतु तहाप्रमाणे माळवा वगैरे प्रांताच्या सनदा त्यानें बादशहाकडून बाजीरावास पाठविल्या नाहींत. मराठ्यांचे वकील निकड लावीत होते. 'बाबूराव मल्हारांनी पातशहाचें दर्शन घेतलें. हत्ती शिरपाव जाला. बादशहा व निजाम यांचा स्नेह शपथपूर्वक जाला, ¶' तरी त्याजविरुद्ध अंतस्थ कारस्थानें चालू होतीं. इतक्यांत इराणच्या नादीरशहाचा व दिल्लीच्या बादशहाचा अफगाण संबंधानें तंटा लागून नादीरशहा हिंदुस्थानवर स्वारी करणार अशी वदंता आली. कदाचित निजाम, सादतखान वगैरेंनी त्यास येण्याची भर दिली असावी. निदान त्याजबद्दल संतोष मानून त्यांनी स्वारीचा प्रतिकार करण्याची आगाऊ तजवीज केली नाहीं. आपल्या हातून मराठ्यांचा बंदोबस्त होत नाहीं; तर शेजारचा मुसलमान राजा आपण होऊन येत आहे, त्याचा फायदा घेऊन तरी मराठ्यांस

¶ पे. द. १५.५०

व इतर शत्रूंस ठिकाणी बसवावें, अशी या उमरावांची भावना असेल. नादीरशहा दक्षिणेंत चालून येणार म्हणून जी भूमका उठली होती त्याचें बीज हें आहे. पुढें अब्दालीच्या वेळेस तर हाच प्रयोग मोगलांनी केला.

**पूर्ववृत्त.**—तहमासकुलीखान ऊ॰ नादीरशहा स १६८८ त जन्मला. ता. २६.२.१७३६ रोजीं त्यास इराणची गादी मिळाली. तो जन्मतः तुर्क होता. अफगाणिस्तान दिल्लीच्या बादशहाच्या ताब्यांत असून, तेथील बंडखोरांचा नादीरशहास उपद्रव होऊं लागला, त्या निमित्तानें त्यानें वारंवार दिल्लीच्या बादशहाकडे तक्रारी केल्या, आणि बंडखोरांचा बंदोबस्त करण्याविषयीं त्यानें दोन तीन वेळा दिल्लीस वकील पाठविले असता, बादशहानें त्यांजकडे लक्ष दिलें नाहीं. तेव्हा अफगाणिस्तानावर स्वारी करून त्यानें ता. १२.३.१७३८ रोजीं कंदाहार काबीज केलें. काबूल येथें दिल्लीचे तर्फे नासीरखान कारभारावर होता, त्यानें वारंवार बादशहास लिहून मदत मागितली असता तिकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. ता. १०.५.१७३८ रोजीं नादीरशहा काबूलवर चालून आला. ता. १९ जून रोजीं तें शहर त्याच्या हातांत पडलें, तेव्हा पुनरपि त्यानें दिल्लीच्या बादशहाकडे पत्रें व वकील पाठविले. पण त्याची कोणी दाद घेतली नाहीं. हें पाहून नोव्हेंबरचे आरंभीं नादीरनें आपला मोर्चा हिंदुस्थानाकडे वळविला. पेशावर व अटक काबीज करून ता. ८ १.३९ रोजीं चिनाब उतरून शहा लाहोरावर आला. लाहोरचा सुभेदार झकारियाखान हुशार होता. पण त्याच्या विनंत्यांकडे दिल्लीतील अधिकाऱ्यांनी कांहींच लक्ष दिलें नव्हतें. नादीरनें त्याचा पराभव करून १२ जानेवारी रोजीं लाहोर काबीज केलें. नंतर ता. ५ फेब्रुवारी रोजीं तो सरहिंदला पोंचला.

इकडे दिल्लीस या बातम्या कळल्यावर बादशहानें लढाईची तयारी करून सर्व अमीरउमरावांसह फौजा घेऊन ता. १८ जानेवारी रोजीं नादीरशहावर चाल केली. सुमारें ८० मैलांवर कर्नाळ येथें प्रचंड छावणी देऊन बादशहा बंदोबस्तानें राहिला. त्याची फौज मोटी होती, तरी सर्व हुकमत एकाच हुशार सेनापतीकडे नसून हत्ती, बाण, तलवारी, भाले वगैरे पुरातन प्रकार नादीरशहाच्या सुसज्ज फौजेपुढें निरुपयोगी ठरले. सेनानायकाच्या कामांत तो स्वतः अद्वितीय कसबी होता. त्याजवळ तोफखाना व लांब पल्ल्याच्या बंदुका होत्या. ता. १३.२.१७३९ रोजीं दोन प्रहरनंतर बादशहानें कर्नाळच्या छावणींतून नादिरशहावर चाल केली, तींत बादशहाचा पूर्ण पराभव झाला. खानडौरान

जखमा लागून पडला व पुढें दोन दिवसांनी मरण पावला. सादतखान जखमी होऊन नादीरच्या कबजांत सांपडला. निजामानें मात्र या लढाईत यत्किंचित् भाग घेतला नाहीं. वास्तविक बादशहाकडे अत्यंत हुशार असा गृहस्थ निजामच होता; परंतु खानडौरान व सादतखान यांच्याशीं मत्सर असल्यामुळें तो अंगचोरपणानें स्वस्थ राहिला. लढाई तीन तास चालली. तीत सुमारे १०० अंमलदार व तीस हजार शिपाई कापले गेले. खानडौरानचे तीन मुलगे व भाऊ मुजफ्फरखान व यादगारखान असे अनेक मोठे सरदार मारले गेले.

लढाई आटोपल्यावर रात्री नादीरनें सादतखानास भेटीस आणून विचारिलें, 'तूं माझा देशबंधु आहेस, बादशहाकडून मोठी रक्कम कशी उपटावी तें सांग.' सादत म्हणाला, 'सर्व किल्ली निजामाचे हातात आहे, त्याला बोलवा.' दुसऱ्या दिवशीं १४-२-१७३९ रोजी नादीरशहानें निजामास बोलावून आणिलें, आणि विचारिलें, 'तुमच्यासारखे उमराव बादशहाजळ असताना भुरट्या मराठ्यानी दिल्लीवर येऊन खंडण्या घ्याव्या, याचा अर्थ काय?' निजामानें उत्तर दिलें, 'बादशहानी नव्या नव्या मंडळीस जवळ करून माझ्यासारख्यांची सल्ला तुच्छ मानली, तेव्हा नाइलाज होऊन मी दक्षिणचा पंथ पाहिला.' पुढें वाटाघाट होऊन असें ठरलें की ५० लाख रुपये खर्च घेऊन नादीरशहानें तेथूनच स्वदेशीं परत जावें. हा करार झाल्यावर निजामाबरोबरच नादीरनें दुसऱ्या दिवशीं महंमदशहास भोजनाचें आमंत्रण दिलें. ता. १५-२-३९ रोजी महंमदशहा नादीरचे भेटीस गेला. भोजनाहून परत आल्यावर खानडौरान मरण पावल्याची बातमी बादशहाला कळली. मरणापूर्वी त्यानें अशी सूचना केली की, 'या राक्षसाला कसेंही करून येथूनच पाठवून द्या. दिल्लीस जाऊं देऊं नका, त्यावर बक्षीगिरी बादशहानें निजामास दिली. ती जागा सादतखानास पाहिजे होती. बादशहानें ती निजामास दिल्याचें ऐकून सादतखानास फार वाईट वाटलें आणि पुढील भेटींत त्यानें नादिरशहास कळविलें, की '५० लाख घेऊन परत जाण्याचें कबूल केलेंत हें काय? दिल्लीस गेलांत, तर निदान २० कोटीस मरण नाहीं. बादशहाजवळ पराक्रमी पुरुष आहे कोण? येऊन जाऊन एक निजाम आहे. परंतु तोही पक्का कार्यसाधु पांडित्य करणारा आहे.' त्यानंतर चार पाच दिवसांत नादीर व बादशहा यांच्या कित्येक भेटी व मेजवान्या झाल्या. तेवढ्या अवधींत नादीरनें बादशहाची छावणी पूर्णपणें वेढून घेतली, तेव्हां आंतील लोकांचे अन्नावांचून भयंकर हाल होऊं लागले. 'निजामास

भेटीस बोलाविलें. छ १८ जिलकाद रोजीं ( १७ फेब्रु० ) आसफजा हत्तीवर बसोन गेले. प्रथम सादतखानापाशीं जाऊन बसले. मग तोहमासचे भेटीस गेले. बोलीचाली होऊन निरोप दिला. तीन वस्त्रें खिलत दिली. संध्याकाळीं परत आले. तहमास्पची बोली हेंच कीं पातशाही बेजाबीत जाली, सरदार कोणी कोणास न मानीत. पातशहा बेखिलाफ वर्तो लागले, बंदोबस्त तुटला, मराठ्यांनीं शोकी केली, हें ऐकोन आम्हीं इरादा केला जे, पहिल्यापासून इराणचे पातशहा हिंदुस्थानचे पातशाहीस कायम करीत आले यास्तव आम्ही आलों. केवळ पातशाही बुडविण्याचा इरादा धरीत नाहीं. तुमचे पातशाहीचा बंदोबस्त करून परत जाऊं. आसफजानें उत्तर दिल्हें, बेहत्तर पातशहास दिल्लीस नेऊन बसवावें. तुम्ही आम्ही जाऊन बंदोबस्त करावा. ' ‡

यानंतर नादिरशहानें ता. २२ फेब्रुवारी रोजीं निजामास भेटीस बोलावून अटकेत ठेविलें: आणि त्याजवळ बादशहापासून २० कोट रक्कम मागितली. निजाम बोलला, ' मोगल बादशाहीत अजून २० कोट कोणीं ऐकिलेही नाहींत, व पाहिलेही नाहींत. शहाजहान बादशहानें फार मोठा संचय केला होता, असें म्हणतात. परंतु तो सर्व संचय औरंगजेबानें दक्षिणच्या युद्धात खर्च केला. आज तिजोरीत ५० लाखमुद्रा शिल्लक नाहीत. '

त्यावर नादीरनें निजामाकडून बादशहास पत्र लिहून भेटीस बोलाविलें. शनिवार ता. २४.२.३९. रोजीं महंमदशहा भेटीस गेला असता नादीरनें त्यासही अडकवून ठेविलें: आणि लगेच महंमदशहाचा जनानखाना व वजीर कमरुद्दीनखान वगैरे सर्वास पकडून आणून बंदोबस्तात ठेवून बाकी सरदार व फौज होती त्यास लुटून करोडीक रुपयांचा माल घेतला. मराठ्यांचा वकील बाबूराव मल्हार बर्वे महंमदशहाच्या छावणीत होता, तो पळून जयपुरास गेला. त्यानें या प्रसंगाचें वर्णन मार्मिक दिलें आहे.

तो लिहितो, ' युद्ध जाल्यावरी दिल्लीचे फौजेनें धास्त घेतली. त्याचा जोरा पाहून निजामानो सख्याचा संदर्भ लावून आपण जाऊन भेटले. पातशहास धरून द्यावें आणि आपलें बरें करून घ्यावें हे दुष्टबुद्धि चित्तांत आणून पातशहासही नादीरशहाच्या डेऱ्यास घेऊन जाऊन भेट केली. फिरून आपल्या डेऱ्यास आले. दुसरे दिवशीं नादीरशहा महंमदशहाचे भेटीस आले.

‡ पे. द. ३०. २२६.

तेच समयीं महंमदशहास निजामुल्मुल्क व कमरुद्दीनखान यास कैद केलें. कुलकारखाने जप्त केले. § ता. २६ फेब्रुवारी रोजी नादिरशहानें सादतखानास बरोबर देऊन आपल्या एका सरदारास दिल्लीचा कबजा घेण्यास पुढें पाठविलें; आणि त्याजबरोबर महंमदशहाचेंही पत्र घेऊन दिलें. ता. २७ रोजी दिल्लीचा कबजा नादिरशहाकडे आला व त्याची द्वाही फिरली. नंतर दोघे बादशहा १-३-३९ रोजी कर्नाळहून निघून ७ मार्च रोजी दिल्लीस येऊन शालेमार बागेत उतरले दुसऱ्या दिवशीं महंमदशहाला आपल्या वाड्यात येण्यास परवानगी मिळाली. शुक्रवार ९ मार्च रोजी दिल्लीत प्रवेश केला. महंमदशहानें त्यास आपल्या वाड्यांत ठेवून घेतलें. सादतखान सदैव नादीरबरोबर असे. पहिल्याच रात्रीं त्यास नादीरनें निक्षून सांगितलें, कीं "२० कोटींची भरपाई ताबडतोब न कराल तर तुम्हांस देहदंड भोगावा लागेल." ते कठोर वचन ऐकून सादतनें रात्रीं विष घेऊन प्राणत्याग केला. दुसऱ्या दिवशीं ता. १० मार्च रोजीं नादीरशहानें दिल्लीस पातशाही पद धारण करून आपल्या नांवानें द्वाही फिरविली. तेव्हांपासून ता. १ मे पर्यंत त्याचा मुक्काम दिल्लीस होता. तेवढ्या अवधींत जे अनन्वित प्रकार त्यानें दिल्लीत केले, त्यांचें वर्णन मशहूर आहेच. कत्तल, लूट व जाळपोळ यांची दिल्लीत कमाल झाली. मोठमोठ्या धनिकांचे हाल करून पैसे उकळण्यात आले. वजीर कमरुद्दीनखान यास उन्हात उभे करून एक कोट नक्त, व शिवाय हत्ती, जवाहिर वगैरे त्याजकडून घेण्यात आलें. मंगळवार, ता. १ मे रोजी नादीरशहानें मोठा दरबार भरवून महंमदशहास तख्तावर बसविलें; आणि सुमारें एक अब्ज संपत्ति आणि सिंधुनदीच्या पश्चिमेकडील प्रदेश कबजांत घेऊन हा भयंकर प्राणी स्वदेशीं निघून गेला. बरोबर त्यानें येथून ३०० गवंडी, २०० लोहार, २०० सुतार, १०० पाथरवट आणि १३० हिशेबनीस, दिल्लीसारखें शहर इराणात बांधण्यासाठीं नेले. ही जी अपरंपार संपत्ति नादीरशहानें स्वदेशीं नेली ती काहीं त्याजवळ टिकली नाहीं. आठ वर्षांनीं त्याचा खून होऊन हिंदुस्थानातून आणलेली लूट चोरापोरांनीं जिकडे तिकडे लांबविली. या भयंकर व अविचारी बनावास जगाच्या इतिहासांत तोड मिळणार नाहीं. वासुदेव दीक्षित लिहितो, 'इंद्रप्रस्थांत पश्चिमेचा यवन येऊन बसला. शहरांत जनांचा संहार झाला हिंदूंचा द्वेष्टा महादुष्ट आहे.'

§ पे. द. १५.७५.

स. १७१० पासून राजपूत व मराठे यानीं संगनमत करून मोगल बादशाही-वर आघात चालविले, त्यामुळें नादीरशहाशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य बादशाहींत राहिलें नाहीं. राजपूत व मराठे यांची योग्य प्रकारें समजूत काढून त्यांस या प्रसंगीं दिल्लीदरबारनें आपल्या मदतीस आणलें असतें, तर नादीरशहाचा बंदोबस्त होऊन पुढील अनर्थ टळले असते. नादीरशहा निघून गेल्यावर, निजामास बादशहानें अमीरूल्-उमराव ही पदवी देऊन आपल्या जवळ ठेवून घेतलें. सुमारें दीड वर्षानंतर मुलगा नासिरजंग दक्षिणेंत बंड करूं लागल्याचें वर्तमान [illegible], वडील मुलगा गाजीउद्दीन यास दिल्लींत बादशहासन्निध ठेवून निजाम स. १७४० च्या ऑगस्टांत दिल्ली सोडून दक्षिणेंत आला, तो पुनः परत गेला नाहीं. ता. २३ जुलै, स. १७४१ रोजीं [illegible] संग्राम दौलताबादेजवळ होऊन नासिरजंग पराभव पावला तो प्रकार पुढील इतिहासाचा भाग आहे.

नादीरशहाच्या स्वारीचा परिणाम मराठ्याच्या उद्योगावर काय घडला हें मराठ्यांच्या वकिलानीं स. १७३९ त हकीकती लिहून पाठविल्या त्यांवरून कळून येतें. व्यंकाजीराम, विश्वासराव दादाजी, गोविंद नारायण, सदाशिव बल्लाळ, बाबूराव मल्हार, महादेवभट हिंगणे, ही मंडळी बाजीरावाचे तर्फेनें वकील म्हणून ठिकठिकाणीं होती. हे वकील विशेषतः हिंगणे व बाबूराव मल्हार वगैरे मोठ्या धूर्ततेनें वागले. त्यांची चाणाक्षता त्यांचे पत्रांत दिसून येते. जयसिंगानें आपल्या तर्फेनें कृपाराम यास फौज देऊन दिल्लीस ठेविलें होतें. पिलाजी जाधव माळव्यांतील बंदोबस्तास होता. आनंदराव सुमंत निजामाजवळ असे, तो कांहीं दिवस या वेळीं जयसिंगाकडे गेलेला होता. या सर्वांची त्या वेळचीं पत्रें वाचनीय आहेत. [1]

**१ बादशाही मंदिराचा जीर्णोद्धार.**—नादीरशहा आला, तेव्हां काय प्रकार घडले, बादशहाच्या सरदारांची त्रेधा कशी उडाली, कोण कोठें कसे पळाले, इत्यादि हकीकती वरील पत्रात कळून येतात, आणि त्यात जयसिंग व बाजीराव यांचे भेतही व्यक्त होतात. जयसिंगाचे मनांत बादशहाजवळ निजाम, सादतखान वगैरे हिंदूंचा द्वेष करणारे जे प्रबळ सरदार होते, त्यांचा परभारें पाडाव व्हावा असें होतें. 'पातशहांनी व खान दौरांनी राजेंद्रास (जयसिंहास) बोलाविलें,

[1] पहा, इ. स. ऐ. नचो ले. ४ यातील पत्रे महत्वाची आहेत; ब्र. च. ले. ४१, ४२ रा ख ६ ले. १३०, १३१, १३३, १३४ व १३७. इ. सं. ऐ. टि. २.६, पे. द. ३०. २२९.

तेव्हां हे अवघे राजे गेले नाहींत. त्यांची फत्ते होईल म्हणून दुश्चित्त होते. ईश्वरें यांचे मनोदयानुरूप केलें. फोज पातशहा मारिले. आतां हे तहमास्पकुली ( नादीरशहा ) व आपण एक होणार, म्हणून ( जयसिंगानें ) चित्तांत संतोष मानिला, विचार तो ऐसा झाला, तरी स्वामीनें ( बाजीरावानें ) हे गोष्टीचा विचार करून लिहावें, त्याप्रमाणें उभयता ( जयसिंग व नादीरशहा ) विचार करणें तो करतील.' असें व्यंकाजीरामाचें फेब्रुवारींत बाजीरावास लिहून आलें. 'राजेन्द्र साहित्यास गेले नाहीत, यामुळे चित्तांत शरमिंदगी आहे. तहमास्पकुलीखानाची फत्ते ऐकून चित्त प्रसन्न होते. मागती महंमदशहाची फत्ते झाली त्यावरून मागतीं चित्त दुःस्थित असे.' असें पुनः जयसिंगासंबंधानें बाजीरावाचा वकील लिहितो. दुसरा वकील धोंडो गोविंद स. १७३९ च्या मार्चांत बाजीरावास लिहितो, 'आता नवी सृष्टि जाहली, तहमास्पकुलीस निजामाचे नामर्दीनें मोठें यश आलें. आता राहिले राजे. त्यात मातबर सवाईजी. त्याचा विचार स्वामीस विदित आहेच. त्यानी तहमास्पकुलीस मुबारकीची अर्जदास्त ( अभिनंदनपर पत्रिका ) लिहिली. आपले सलुखा चे विचारात आहेत. इकडे स्वामीसही बोलावितात। जैसें बनेल तैसा प्रसंग संपादून घेतील. स्वामीचा प्रताप सर्वांस विदित आहे. स्वामीस माळव्यात यावें हे मसलती निमित्य. मोहरा प्रथम माळवा आहे. यावें अशी मसलत आहे. न यावें हेही मसलत आहे. यावें तेव्हा बहुत खबरदारीनें मातबर फौजेनें यावें. तहमास्पकुली कांही देव नाही, जे पृथ्वीस कापून काढील. तोही शहाणा आहे. जबरदस्तांशी सलूख करील. परंतु स्वामीनें पैरवी करून यावें. पोक्त विचार करावयाचा तो करून आज्ञापत्र लिहिलें पाहिजे. इकडे आपणही पाहतो, कोणी लाग लावाया योग्य असलिया लावूं. रा. बाबूरावजी हुजूर आहेत. तेही चुकणार नाहीत. आधीं जबरदस्ती, मग सलूख. पहिले भीडभाड उत्तम आहे. भ्रमाभ्रमीमध्यें काम होऊन येतें. आता सारे राजपूत व स्वामी एका जागा जालिया काही निकाल पडेल. समस्तास, बुंदेले वगैरे एका जागा करून मोठा भाव दाखविला पाहिजे. फलदाता श्री आहे.' 'राजाधिराज स्वामीचा मार्ग लक्षीत आहेत.' दुसऱ्या एका पत्रांत बाजीरावाचा वकील म्हणतो, 'सापडले ते धरून आणिले. सवाईजीनें पुशिलें, कीं तुम्ही कोणाचे चाकर आहा ? त्यांनीं सांगितलें, कीं निजामाचे बातमीचाकर आहों. तेव्हा कित्येक मारिले, कित्येकांचे नाककान कापून सोडिले. त्यावरून दिसोन येतें जे, सर्व खेळ निजामाचे आहेत,

निजामच जर फितूर आहे, तर नादीरशहा माघारा जात नाही, हिंदु राज्यांवर निघेल. निजामानें सादतखानानें मिळून नादीरशहा खानदौरास मारायास आणिला. येथील आबालवृद्ध विश्वतोमुखी खानदौरास धन्य धन्य म्हणताती. खानदौरा मरतांच महंमदशहा आणून भेटविला. सादतखान द्वाही फिरविण्यास दिल्लीस गेले. परंतु कपट सिद्धीस जात नाही. सादतखान तर खानेजंगांत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यु पावले. निजाम वांचले, पण मृत्यूहून विशेष झाले. खेचरावर बसून दरबारास जावें. दक्षिणेत अंमल उठला, स्वामींसच यश आलें, आतां निजाम विपत्तीनें मरणही पावेल. रायांचे मनीं राणाजीस दिल्लीत तख्तीं बसवावें.' यावरून नादीरशहास आणण्याचें कारस्थान निजामाचें असून तें त्यास कसें भोवलें तें दिसून येतें. बादशहा व बक्षी खानदौरान बाजीरावास अनुकूल होते. उदेपुरच्या राण्यास दिल्लीस तख्तावर बसवावें असा बाजीराव व हिंदु सत्ताधीशाचा विचार चाललेला होता. पण दिल्लीच्या तख्तावर मराठा राजा बसवावा अशी कल्पनाही कोणाचे मनांत नव्हती. तोच वकील पुढें आणखी लिहितो, ' मुख्य गोष्ट स्वामीचे आगमनावरी आहे. सेवक नित्य नित्य राणाजीस सांगतों कीं, रा. राऊ कूचदरकूच येतात. परंतु ऐसें सांगतां सांगतां दोन मास झाले. हिंदु राजे सर्व सवाई आदिकरून स्वामींचे स्वारीची प्रतीक्षा करितात. स्वामींचें पुष्टिबल होतांच जाट वगैरे फौज दिल्लीवर पाठवून सवाईजी आपणही जाणार, ऐसी तजवीज आहे.' त्यानंतर पुनः बाजीरावास वकील लिहितो, ' नवी सृष्टीचा प्रकार दिसतो. ईश्वर इच्छा नकळे. स्वामींहीं याउपरी इकडील यावयाचा प्रसंग न करावा. लक्ष प्रकारें माळव्यांत राहावें. मंडळींचे खेळ कसे होतात ते दृष्टीस पडतील, तशी वर्तणूक करणें लागेल. याउपरी शपथपूर्वक इकडे यावयाचा प्रसंग न करावा. तिकडे सावधपणें राहावें. उत्पातास कारण आहे.'

मराठ मंडळाची इच्छा बादशहास मदत करून नादीरशहास घालवून द्यावा अशी होती. शाहू-बाजीरावाचाही तोच बेत ठरला. त्या वेळी वसईचें कारस्थान रंगांत येऊन चिमाजीआपा व मोठमोठ्या फौजा वसई काबीज करण्यांत गुतल्यामुळें बाजीरावास जोरानें हिंदुस्थानांत जातां आलें नाहीं. मुसलमानांची लक्ष फौज जमा करून नादीरशहा दक्षिणेंत येणार अशी बातमी आली, तेव्हां वसईचें काम आटपतांच आपल्या सरदारांसह बाजीराव त्यांजवर निघाला. ' पातशहाची कुमक या समयीं केलियानें या राज्याचा लौकिक आहे,'

असें पिलाजी जाधव लिहितो. शाहूनें बाजीरावास आज्ञा केली की, 'तुम्ही ताबडतोब मजल दरमजल बादशहाचे कुमकेस जावें. पूर्वी आमचें वचन औरंगजेब पातशहांशीं गुंतलें आहे कीं, परचक्र आलें तर आम्ही तुमची कुमक करावी. होईल तेथपावेतों सर्वस्वें साह्य करावें.' † परशत्रूंपासून पातशाहीचें संरक्षण करणें हे चौथाईतलें तत्त्व शाहूनें पाळलें. बाबूराव मल्हाराचें ७ मार्च, स. १७३९ चें जयपुरचें पत्र महत्त्वाचें आहे. नादीरशहाच्या स्वारीनें दिल्लींत गडबड उडाली, त्यात बाबूराव मल्हार पळून जयपुरास आला, तेथून त्यानें हें पत्र लिहिलें. 'चकातियांची पातशाही बुडाली, इराणी जाली, दिल्लीचा बंदोबस्त जालियावरी, नादरशहा अजमिरावरी पिराच्या दर्शनास येणार आहेत. यास्तव सवाईजींनीं आपले व लोकांचे कबिले, उदेपुरास पाठवून सडे जाले आहेत. इकडील दक्षिणच्या फौजा मातबर जातील तेव्हा नादरशहाशी प्रसंग पडेल.' परंतु एप्रिलच्या आरंभी नादीरशहा परत गेल्याच्या बातमीचें बादशहाचें पत्र घेऊन, कासीद बऱ्हाणपुराजवळ जैनाबाद येथें २२.५.१७३९ रोजी बाजीरावास भेटलें, तेव्हा बेत फिरला.

नादीरशहाच्या प्रळयसमयीं मराठे वकिलांना आपलें निश्चित धोरण ठरविता आलें नाहीं. दिल्लीच्या पातशहास काढून नादीरशहा तें पद स्वतः स्वीकारता तर त्याला हुसकून देण्यास हिंदुस्थानचे सर्व सत्ताधीश एकत्र झाले असते. नादीरशहाला ही गोष्ट कळून चुकली म्हणून त्यानें दिल्लीच्या मुकुटाचा अभिलाष न धरता अपार संपत्ति मिळाली तेवढी घेऊन स्वदेशीं प्रयाण केलें. दरम्यान अल्पकाळ मराठे राजपुतांनीं हिंदूंचा चक्रवर्ती उभा करावा असें योजून उदेपूरच्या राण्याची स्थापना हस्तिनापुरास करावी असा बेत केला, परंतु नादीरशहानें मोगल पातशहास पुनः ठिकाणीं स्थापून त्याच्या आज्ञेंत वागण्याची सर्वांना ताकीद केली ती मान्य करणें मराठ्यांनाही अवघड वाटलें नाहीं. शाहूची निष्ठा दिल्लीचे मोगल पातशहावर पूर्ण होती, म्हणून त्यानेंही तशीच इच्छा बाजीरावास ता. ३१ मे, स.१७३९ च्या पत्रांत लिहून कळविली. सातान्याहून मल्हार तुकदेव पुरंदरे महादोबास लिहितो.

आशिर्वाद उपरी. महंमदशहाची पातशाही गेली होती ती ईश्वरें कायम राखिली. त्यास आपण राजकारण राखून अमीरुल्-उमरा यासारखे व्हावें. पोटास व फौजांस लागेल तें आम्ही पातशाही माल पैदा करून त्यांतून घेऊं.

† पे. द. ३०.२२२.

उरला पैका खजाना दाखल व्हावा, किंवा फौजांस जागिरा आलाहिदा मागाव्या आणि सर्वांस राजी करोन पातशाही बंदोबस्त करून द्यावा, हा लौकिक मोठा, कैसा म्हणाल तरी जीर्णोद्धार देवालयाचा केल्यास नवीन लिंगाचे स्थापनेपेक्षां अधिकोत्तर आहे. महंमदशहाचे पातशाहीचा बंदोबस्त केल्यास लौकिक मोठा आहे. मोडून टाकिल्यांत लौकिक नाही. दुसरी गोष्ट हजारों चोरपोर त्यातील आणि पातशाही मोडल्याचा दोष आपल्यावर. दुसरें, राजश्री छत्रपति स्वामीही पातशाही इच्छित नाही. जीर्णोद्धार केल्यास संतोष मानितील, म्हणून राजश्री बाबूराव मल्हार यांनीं लिहिले आहे. दुसरें यांनी लिहिलें आहे जे हा विचार चित्तास उत्तम भासेल तरी गाजुद्दीखानाकडील सतारकुलीखान यांसीं गाजुद्दीखानांही दक्षिणच्या बंदोबस्तास रवाना करावें. आम्ही व ते दुसरा पदार्थ नाही. समाधान करूं म्हणजे दक्षिण निर्व्याकुल होईल. महंमद-शहाककडेही राजकारण स्वामीस त्यानी हातीं धरावे आणि बदोबस्त करून द्यावा येविशी चालना करूं. यामध्यें जैसी आज्ञा होईल तैसी वर्तणूक करूं. नादीरशहा गेला तेव्हां चहूंकडे वळवळ करून कब्जा करून दाखवावा उचित नाहीं, म्हणून लिहिलें आहे. याचा विचार काय लिहून पाठवावा तें लिहिलें पाहिजे. कळावें हे विनंती." †

बाजीरावानें आवजी कवडे यास रघूजीवर वऱ्हाडांत पाठविलें. परंतु त्याचा फेब्रुवारी १७३९ त रघूजीनें उमरावतीजवळ खरपूस समाचार घेतला. पेशव्यांच्या फौजेची टोळी आवजी कवडे याचे हाताखाली वऱ्हाडांत लूट करीत होती, तिचा पराजय भोसल्यांनी केला, त्यासंबंधी आवजी कवडे ता. २९.४.१७३९ रोजीं लिहितो, "भोसल्यांचा काल अनुकूल यास्तव न घडतां प्रसंग ईश्वरें घडविला." ¶ चिमाजीस बाजीराव लिहितो, "आवजी कवडे मोडल्याचें वर्तमान महाराजांनी ऐकून संतोष मानिला. दरबारच्या या गोष्टी चित्तांत आणीन म्हटल्यास समय नाहीं. रघूजीस काडीइतकें वैषम्य न दाखवितां गय खाऊन मातबर काम करावें आणि कागदीं पत्रीं रघूजीस दुखवूं नये, लगामी लावून घ्यावें म्हणजे कृतोपकार मानील, आवजीची वस्तभाव सर्व देईल म्हणून लिहिलें तें अवगत जालें. चाकराचाकरांत होऊन

† सातारा ऐ. ले. २ ले०२६८

¶ पे. द. ३०.२३१; पे द. २०.१९; पे. द. १५.७७.

गेलें त्यांत त्याचा अन्याय काय आहे ! आम्ही वैषम्य कशास दाखवावें ! रघूजी प्राक्तनवान बरा धाडसी आहे. नादीरशहाचा मनसबा कर्तव्य, त्यास गम खाऊन रघूजीचें समाधान करून लगामीं लावून घेऊं. ”

रघूजीनें हुकमाची अमान्यता केली. परवानगीशिवाय स्वतंत्रपणें स्वाऱ्या करून मराठमंडळास तो जुमानीनासा झाला, याजबद्दल त्यास शासन करण्याचा विचार बाजीरावानें शाहूशीं ठरवून स. १७३९ त त्याजवर चालून जाण्याचा बेत केला. इतक्यांत नादीरशहा दिल्लीवर चालून आला, आणि लवकरच तो मोठ्या फौजेनिशीं दक्षिणेत येणार अशी बातमी आली. 'हिंदु लोकांस संकट थोर प्राप्त झालें आहे.' अद्याप वसई आली नाहीं. आवजी कवडे रघुजी भोसल्याचे फौजेनें लुटला. ऐशास तमाम मराठी फौजा एक होऊन चमेलीपार व्हावें, त्यास अलीकडे येऊं न द्यावें असा विचार आहे.' हिंदुमुसलमानांनीं एक होऊन नादीरशहावर चालून जावें असा बाजीरावानें बेत ठरविला, आणि नासिरजंगास आपल्या मदतीस बोलाविलें. अशी तयारी करीत असता नादीरशहा परत गेल्याची बातमी आली. नादीरशहानें परत जाण्यापूर्वी शाहू, बाजीराव वगैरे सर्वांस पत्रें पाठविलीं, कीं 'महंमदशहास आम्ही तख्तावर स्थापिलें आहे. आम्ही त्यास भाऊ समजतों. इत:पर सर्वांनीं याची आज्ञा पाळावी. न पाळल्यास आम्ही पुन्हा येऊन सर्वांचे पारिपत्य करूं.' बाजीरावानें लगेच बादशहास नम्रतेचें पत्र लिहून १०१ मोहोरांचा नजराणा पाठविला. बादशहानें उलट पूर्वीचे करार सर्व पाळण्याचे फमान बाजीरावास पाठवून खिलत वगैरे दिली तें फर्मान पुढें दिलें आहे. हीं कामें आटोपून स. १७३९ च्या जुलैंत बाजीराव साताऱ्यास आला.

६ **नादीरशहाचें फर्मान.**—छ २७ मोहोरम स. ११५२ म्हणजे ता. २५ एप्रिल, स. १७३९ रोजीं नादीरशहानें राजपूत संस्थानिक, शाहू व बाजीराव इत्यादिकांस पत्रें पाठविलीं, त्यांचा मजकूर—“ इस्लाम धर्माचे अनुरागी, बादशाही कृपेचे उमेदवार, सद्भाग्यवंत, प्रसन्नमुख असे बाजीरावसाहेब यांनीं जाणावें कीं, सांप्रत परमेश्वराच्या मदतीनें दिल्ली हें राजधानीचें ठाणें झालें आहे. आणि आमच्या साम्राज्याचा तो उगवता व वाढता तारा आहे. सर्वांच्या आशा पूर्ण करणारे अतिमान्य आणि थोर, ज्यांचा जन्म तुर्की मातोश्रीपासून झालेला आहे आणि ज्यांचे पूर्वज गुर्जानीज जातींतले होते आणि स्वर्गाप्रमाणें ज्यांची थोरवी आहे असे बादशहा महंमदशहा यास आमचे

धर्मबंधु म्हणून आणि जणूं काहीं आमचे फर्जंदच म्हणून हिंदुस्थानचें राज्य आणि राज्यमुकुट बहाल करण्यात आला आहे आणि ज्या अर्थी तुमची सुरत उमदी आहे आणि तुम्ही त्या शूर जातीचे पुढारी आहां आणि दौलतीच्या वैभवानें आपलें वैभव राखीत आहां, त्या अर्थी बादशहाची सेवा त्यांचे सर्व हक्क ध्यानात ठेवून तुम्ही इमानें इतबारें बजावली पाहिजे. परंतु आतांपावेतों तुम्ही जशी करावी तशी सेवा केल्याचें आढळून आलें नाहीं. परंतु जें झालें तें झालें. सांप्रतच्या प्रसंगीं आमच्या उभय दौलतीमध्ये प्रेम, सलोखा स्थापित झाल्यामुळे महंमदशहा यांच्या दौलतीचा संबंध ईश्वराने आमच्या दौलतीशीं जुळून आणिला आहे. अशाकरिता कीं, आम्ही सदरील गुर्जानीज दौलतीचे शत्रु आणि दावेदार यांस पादाक्रान्त करावे. यासाठीं एकाद्या शूर, धीर पुरुषाची नेमणूक करणे अवश्य आहे म्हणून तुम्हास कळावें कीं, परमथोर, उमदे, अनुभवी, इस्लामचे आज्ञासेवक शाहूराजे यांस आम्ही त्या जागीं नेमिलें आहे. तुम्ही आपली शादमानी हमेशा कलमी करून शाही हुकुमाचे ताबीन चालावें. राजे शाहू यांजकडे जे शाही हुकूम येतील ते तुम्ही आनंदाने, बिनतक्रार अमलात आणावे. परमेश्वराच्या कृपेनें जे जे कोणी दौलतीचे आज्ञाधारक राहातील त्यांना त्यांना बक्षिसें व देणग्या देऊन त्यांच्या सेवेचा मुजरा केला जाईल. परंतु जर कोणी दौलतीशीं दुष्मनी करील तर धर्माचे विजयी सेवक अशा दुष्मनाचा पाडाव करतील आणि त्याजवर मोठी फौज पाठवून जरूर ते शासन केल्याविना राहणार नाहींत. या प्रकरणीं तुम्ही खबरदारीनें असावे आणि आपल्या अधिकाराप्रमाणे वर्तावें. ता० २७ मोहोरम ११५२. ‡

‡ हे फर्मान मुळांत मला मिळालें नाहीं. पारसनीसाकडून किंकेड यास मिळाले त्याचे इंग्रजी भाषांतर त्यांनी आपल्या इतिहासात छापलेले आहे, त्यावरून प्रो० पोतदार यांनी वरील तर्जुमा मला मराठींत करून दिला. बाजीरावास हे फर्मान पाठविल्याचा उल्लेख पे. द. भा. २२ ले. ३९९ व पे. द. भा. १५ पृ. ८३ वर आहे

# १२

# वसईचा दिग्विजय

## कालसूची

| | | |
|---|---|---|
| १७१९ | ऑगस्ट ५ | कल्याण भिवंडी काबीज. |
| १७२२ | | गंगाजी नाईक अणजूरकर बाजीरावास भेटला. |
| १७२३ | नोव्हें० १५ | पिलाजी जाधवानें वसई प्रांत लुटला. |
| १७२४ | जाने० १० | बाजीराव-पोर्तुगीझ तह. |
| १७२८ | मे | पिलाजीनें दमणप्रांताचे गांव मारिले. |
| ,, | | सुभेदार रामचंद्र महादेव चासकर मृ०, बंधु कृष्णरावाकडे कोंकणचा कारभार. |
| १७२९ | | मालाडचा अंताजी रघुनाथ कावळे युद्धांत सामील. |
| १७३० | | कांबें येथें मराठ्यांनी पोर्तु० चा पराभव केला. |
| १७३२ | फेब्रु० १० | बाजीराव-पोर्तुगीझ तह. |
| १७३४ | | पोर्तु० कडून ठाण्याच्या कोटाची सुरुवात. |
| १७३७ | उन्हाळा | बाजीरावानें पोर्तु० वर मोहीम सुरू केली. |
| ,, | मार्च २७ | चिमाजीआपानें ठाण्याचा कोट काबीज केला; लगेच पुढें दुसरीं अनेक ठिकाणें मराठ्यांनीं घेतलीं. |
| ,, | जुलै १ | पहिली मोहीम आटपून चिमाजी पुण्यास परत. |
| ,, | नोव्हें० २७ | ठाण्याचा सेनानी पीड्रो ड मेल्चा लढाईत मृ. |
| १७३८ | डिसें०—मे | १७३९ वसईवर दुसरी मोहीम. |
| ,, | डिसें० २९ | तारापुरचा संग्राम सुरू. |
| १७३९ | जाने० ९ | माहीम काबीज: पुढें लगेच दुसरीं स्थळें घेतलीं. |
| ,, | ,, २४ | तारापुर संग्रामांत बाजी भीवराव मृ. |

| | | | |
|---|---|---|---|
| १७३९ | जाने० | १२ | व्यंकटराव घोरपड्याच्या गोव्यावर हल्ला. |
| ,, | ,, | १५ | व्यंकटराव घोरपड्यानें मडगांव काबीज केलें. |
| ,, | एप्रिल | २७ | गोव्याचा तह व्यंकटराव व पोर्तुगीजांमध्यें. |
| ,, | मे | १ | वसईवर निकराचा हल्ला. |
| ,, | ,, | ५ | मराठे-पोर्तु० तह. |
| ,, | ,, | १२ | वसई मराठ्यांचे कबजांत आली. |
| १७३९ | जून | | इंचबर्डनें चिमाजीस भेटून ठाण्याचा तह केला. |
| ,, | मे | १२—जुलै | कॅ. गोर्डनची साताऱ्यास वकिलात. |
| १७४० | जाने. | १४ | इंचबर्ड-बाजीराव भेट गोदावरीवर. |
| ,, | सेप्टें | ७ | इंग्रज-बाजीराव तह. |
| १७४० | सेप्टें० | | चौलचें ठाणें मराठ्यांनीं घेतलें. |

# १२

# वसईचा दिग्विजय†



**१ व्यक्ति-स्थल-निदर्शन.**—पोर्तुगीझांना मराठी कागदांत फिरंगी हें अभिधान दिलेलें आढळतें. त्यांचा वृत्तान्त ब्रिटिश रियासतींत दिलेला संदर्भासाठीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. पश्चिम किनाऱ्यावर त्यांनीं जो धर्मच्छल चालविला त्याचें निवारण करणें मराठी राज्याचें पूर्वीपासून स्वीकारलेलें ब्रीद होतें. शिवाजीचा संकल्प पेशव्यांनीं पुढें चालविला. बाळाजी विश्वनाथानें स्वराज्याच्या सनदा मिळवितांच कोंकण पट्टीवर मराठ्यांचा अंमल सुरू झाला. उत्तर कोंकणच्या साष्टी प्रांतावर पोर्तुगीझांचा ताबा असून त्यांतील हिंदुजनतेवर जुलूम झाल्यामुळें पेशव्यांकडे गाऱ्हाणीं आलीं. पेशव्यांचें अधिष्ठान कोंकणांत. बाजीरावाची दहशत बाह्य प्रदेशांत बसूं लागली, तेव्हां त्यानें या बाबतींत लक्ष घालून पोर्तुगीझांवर युद्ध पुकारलें आणि स. १७३९ त त्यांचें मुख्य स्थल वसई होतें तें काबीज करून धर्मसंस्थापनेचा उद्देश सिद्धीस नेला. या युद्धांत स्वराष्ट्राभिमान, शौर्य, संघशक्ति इत्यादि मराठ्यांचे गुण उत्कटत्वानें प्रकट झाल्यामुळें त्यांच्या एकंदर इतिहासांत या वसईच्या युद्धास अनुपम महत्त्व प्राप्त झालें. त्याचें वर्णन आतां कर्तव्य आहे.

---

† आधार—साष्टीची बखर, का. सं. व गजानन नाईककृत; रा. खं. ४ पे. ब.; रा. खं. ६. १०१–१०२; का. स. प. या., ऐ. प., शकावल्या ३, ब्र. च. व ले. ३७–१२०; रा. खं. ३ ले. २७, १६७–१६९; ऐ. ले. सं. १–१; डॉ. डाकुन्हाकृत ऑरिजिन ऑफ बाबे; फॉरेस्टचे निवडक कागद; एँडर्सनकृत इंग्लिश-इन्-वेस्टर्न इंडिया; इ. सं. पे. द. मा. पृ. १९६; पे. द. भा. १६ व ३४; पिसुर्लेंकरकृत पोर्तुगीझ व मराठे भा. ४, ५ व वसईतील मराठे इ०

पोर्तुगीझ राज्याचे दोन मुख्य भाग होते, एक दक्षिणेकडील खुद्द गोवा राजधानीचा व दुसरा उत्तरेकडील मुंबईपासून दमणपर्यंतचा, याचें मुख्य ठिकाण वसईस होतें. हा प्रांत सधन व बंदिस्त असून त्यास लागून मराठ्यांचें वास्तव्य कल्याण येथें होतांच उभयतांमध्यें वैरभाव उत्पन्न झाला, त्याचें वर्णन करण्यापूर्वी पोर्तुगीझांचे अधिकारी कोण, केव्हां झाले तें लक्षात ठेवणें जरूर आहे.

## गोवा येथील मुख्य जनरल.

( १ ) साल्डाना ड गामा, ता. १५.१०.१७२५-२३.१.१७३२.

( २ ) पीड्रो मास्करीना कांट ड सांडो मिल ता. २६.४.१७३२-१७४१;

## दरम्यान वसईच्या कारभारावर आलेले अधिकारी.

( १ ) लुई बोतेलो, एप्रिल स. १७३३ पासून,

( २ ) अंटोनियो कार्डिम, ता. ४ जून स. १७३७ पासून,

( ३ ) पीड्रो ड मेलो, एप्रिल स. १७३८ पासून; ता. २७ नोव्हें० स. १७३८ रोजीं ठाण्याचे हल्लयात मारला गेला, तेव्हां वसईचा कॅप्टिन पेरीरा पिंटो काम पाहूं लागला. नंतर

( ४ ) जनरल सिल्व्हेरा मेनिझीस गोव्याहून नेमून आला, त्यानें २८ डिसेंबर, स. १७३८ रोजीं अधिकार स्वीकारिला, तो ता. ४ एप्रिल, स. १७३९ रोजी मारला गेला. पश्चात् कॅप्टिन डिसोजा पेरीरा कारभारावर आला, त्यानें वसईचा किल्ला मराठ्यांचे हवालीं केला.

या युद्धास वसईच्या संग्रामानें महत्त्व आलें असलें, तरी त्यांत अनेक निकराचे प्रसंग घडून आले, आणि ते कैक वर्षे चालू होते. खरें म्हटलें तर स. १७१९ पासून म्हणजे कल्याण प्रांत पेशव्यांकडे आल्यापासूनच मराठे-पोर्तुगीझांचा वैरभाव सुरू झाला आणि तो स. १७४१ त संपला. परंतु स. १७३७ पावेतों त्याची तीव्रता अल्प प्रमाणावर असून, मधून मधून सलुखाचें बोलणें चालू होतें. स. १७३७ च्या मार्चात मराठे लोकांनीं अचानक छापा घालून ठाण्याचा किल्ला काबीज केला, तेव्हा उभय पक्षांचें युद्ध निकरानें सुरू झालें, तें सतत दोन वर्षे चाललें. या कालांत स. १७३७ व १७३९ त दोनदां मराठ्यांनीं निकराचे हल्ले चढवून पोर्तुगीझांचा उत्तर कोंकणांतील जवळ जवळ सर्वच प्रदेश हस्तगत केला आणि त्यांची सत्ता मुळासकट उखडून काढली.

**२ भौगोलिक अनुसंधान.**—प्रादेशिक स्पष्टता केल्याशिवाय या युद्धांतील दोनही पक्षांच्या हालचाली व त्यांचें महत्त्व ध्यानात येणार नाहीं. ठाणें जिल्ह्याच्या पश्चिम किनाऱ्याचा नकाशा जवळ घेऊन या मोहिमेचा अभ्यास केला पाहिजे. शिवाय आणखी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं पूर्वीचे जलमार्ग व पादपथ आगगाड्या व पूल वगैरेनीं आता सर्वस्वी बदलून गेले आहेत. हल्लीच्या रियासतींत नवीन पूरण घातल्यानें बेटें व खाड्या यांचें पूर्व स्वरूप सर्वथा पालटलें आहे. सबब चौलपासून दमण पर्यंतच्या जेवढ्या भूप्रदेशांत युद्ध चाललें, त्यांतील त्या वेळचीं बेटें, खाड्या, किल्ले, माऱ्याच्या जागा व हमरस्ते दृष्टिसमोर असल्याशिवाय मोहिमेचा अभ्यास संगतवार करतां येत नाहीं. अलीबागचा कुलाबा किल्ला व त्यापुढील खांदेरी व उंदेरी बेटें सोडून, उत्तरेकडे येऊं लागलें म्हणजे, मुंबईच्या जवळ अनेक लहान मोठीं बेटें लागतात. पहिलें मोठें बेट मुंबई. त्याच्या थेट पूर्वेस करंजें. करंजाचे उत्तरेस प्रथम लहानसें घारापुरी बेट लागतें, तें सोडून पुढें जातां हल्लीचें ट्रांबे म्हणजे तुरंबें बेट आहे. मुंबईस लागून उत्तरेस साष्टी बेट आहे त्याचें दक्षिण टोक म्हणजे वांद्रें. वांद्र्यावरून ईशान्येस जी खाडी ठाण्यापर्यंत गेली आहे ती पुढें ठाण्याजवळ वसईहून आलेल्या फाट्यास मिळते. वांद्र्यावरून ईशान्येस गेलेल्या खाडीचें तोंड म्हणजेच मुंबई बंदर. ठाण्याची खाडी व वसईच्या खाडीचा फाटा यामधील भाग हेंच साष्टी बेट. सासष्ट गांव बेटांत असल्यावरून ह्यास साष्टी हें नांव पडलें. हें बेट दक्षिणेस चिंचोळें असून उत्तरेस रुंद व वसईच्या खाडीनें मर्यादित झालें आहे. ठाण्याजवळून वसईच्या खाडीचा एक फाटा कल्याणवर जातो तीच कल्याणची खाडी.

ठाणें हें त्या वेळचें साष्टींतलें मुख्य ठिकाण खाडीच्या तोंडाशीं आहे. कल्याणची खाडी भिवंडीवर जाते; त्याच्या पलीकडे काबे म्हणून ठिकाण आहे. तुरंब्याच्या पूर्वेस पनवेल खाडीच्या तोंडाशीं बेलापूर येथे नाक्यावर किल्ला होता. ठाण्याजवळ खाडीच्या पलीकडे अणजूर, कळवें वगैरे गांव पुढील युद्धांत प्रसिद्धि पावले. ठाण्याजवळ खाडी उथळ असून ओहोटसमयीं पायींच साष्टी बेटांत शिरतां येत असे. वांद्र्यापुढें पार्ल्याच्या पूर्वेस मरोळचें ठाणें त्या वेळीं मजबूद होतें. अंधेरीपासून वसईपावेतोंच्या पश्चिम किनाऱ्यानें लहान मोठीं अनेक बेटें आहेत. गोरेगांवच्या पश्चिमेस वेसाव्याचा किल्ला होता. त्याचे पुढें

मालाड. मालाडचे इनामदार सरदेसाई अंताजी रघुनाथ व रामचंद्र रघुनाथ या दोघा बंधूंनीं पोर्तुगीजांना आळा घालण्याबद्दल बाजीराव व चिमाजी आपाकडे अतिशय खटपट केली. बोरिवलीच्या पश्चिमेस व वसईच्या तोंडाशीं समोर एक लांब चिंचोळें बेट असून त्यांत धारावी हें तटबंदीचें स्थळ होतें. खाडीच्या उत्तर टोकावर वसई आहे. खाडीपासून पलीकडे वसई तालुका व त्याचे पुढें माहीम, डहाणू व उंबरगांव हे हल्लींचे तालुके अनुक्रमें लागतात. वसईच्या उत्तरेस किनाऱ्यावर आगाशी हें गांव असून, त्याचे शेजारी अरनाळा हा जलदुर्ग आहे. त्यापुढें किनाऱ्यानेंच उत्तरेस गेल्यावर माहीम व केळवें हीं दोन ठिकाणें व त्यांच्या पूर्वेस आंत तांदुळवाडी व ईशान्येस मनोर व अशेरीगड हे किल्ले त्या वेळीं मजबूद होते. आणखी किनाऱ्यानें उत्तरेस गेल्यावर शिरगांव, तारापूर व चिंचणी हीं बंदरें लागतात. त्यांचे पुढें डहाणू व उंबरगांव हा दोन बंदरें आहेत. उंबरगांव खाडीचे उत्तरभागीं नारगोल व खतलवाड हे गांव वसईच्या युद्धांत ध्यानांत ठेवणें जरूर आहे. त्याचेपुढें दमण बंदर हें अद्यापि पोर्तुगीझांचे ताब्यांत आहे. वसईच्या पूर्वभागीं कामणदुर्ग व त्याचे नजीकच राजावल, गोखरवे, आचोळे, चिंचोटी, टकमक, मांडवी या गांवांचा उल्लेख ठिकठिकाणीं येतो. वसईजवळच खाडीवर दक्षिण बाजूस घोडबंदर म्हणून ठिकाण आहे. त्यावेळच्या हकीकती वाचतांना मुख्यतः वरील स्थळें प्रसंगानु-रोधानें येतात आणि या बहुतेक ठिकाणीं मराठे व पोर्तुगीझ यांजमध्यें साडेपंचवीस महिनेपावेतों निकराचे संग्राम घडून आले.

या युद्धांत अनेक लढाया होऊन सगळा प्रांत मराठ्यांनी जिंकला. त्या सर्वांत माहीम, तारापूर व वसई येथील संग्राम अत्यंत घनघोर झाले. मराठ्यांचे अनेक लहान मोठे सरदार युद्धांत भाग घेत असून त्यांनीं व त्यांच्या हाताखालील शिपायांनीं केलेल्या मर्दुमकी वाचल्या म्हणजे मराठ्यांच्या शौर्याचें व धाडसाचें कौतुक करावें तितकें थोडकेंच होईल. सर्व स्वारी नेटानें सिद्धीस नेण्याचें श्रेय चिमाजीआपास असून, ' निदान माझें धड तरी तोफेच्या गोळ्यानें वसईच्या किल्ल्यांत उडवून द्या, ' हे त्याचे निर्वाणीचे शब्द आख्यायिकेंत सांगतात तेच वस्तुस्थितीचे खरे निदर्शक आहेत. एक ठाण्यावर व एक वसईत असे पोर्तुगीझांचे दोन मोठे सेनापति या युद्धांत मारले गेले.

**२ पूर्वसंबंध.**—पुढील हकीकत सांगण्यापूर्वी प्रथम थोडें मागें जाऊन उभयपक्षांची सामान्य परिस्थिति त्या प्रदेशांत कशी होती हें सांगितलें पाहिजे.

र्तुगीझ लोक बहुधा समुद्रकिनाऱ्यानें सत्ता गाजवीत, आंतील डोंगराळ
देशांत संचार करण्याची हाव त्यांनीं ठेविली नाहीं. कोंकणचा हा प्रदेश
दुस्थानच्या इतर भागांप्रमाणें मोगल बादशहाच्या मालकींत मोडत
ता. स. १७१९ त स्वराज्याच्या सनदा बादशहानें शाहूच्या नांवें करून
ल्या, तेव्हां शिवाजीच्या वेळच्या स्वराज्यावर शाहूचा हक्क निर्माण झाला.
ल्लीहून बाळाजी विश्वनाथ परत येतांच शाहूनें रामचंद्र महादेव जोशी
ासकर यास पाठवून कल्याण भिवंडीचें ठाणें ता. ५ ऑगस्ट स. १७१९ §
जीं काबीज करून पंतप्रधानाचे हवालीं केलें. त्याचे संरक्षणासाठीं या जोशांची
मणूक तेथें कायम करण्यांत आली ती पर्यायानें अद्यापपावेतों टिकली आहे.
जोशी सावकारी करून शाहू व पेशवे यांच्या उपयोगी पडलेले असल्यामुळें
ांजवर उभयतांचा विशेष लोभ होता. रामचंद्रपंताची बहीण काशीबाई इचें
ग्न बाजीरावाशीं झाल्यानें पूर्वीचा घरोबा वृद्धिंगत झाला. 'महादजीपंत पिते
त्र बागलाण, जुन्नर, कल्याण या प्रांतांचा कारभार करीत. बाजीरावानें
ीरंगपट्टणची स्वारी केली तिचे खर्चास दोन लाख रुपये यांनीं कर्ज दिले.'
ढें महादजीपंत काशीस निघून गेला आणि रामचंद्रपंत कारभार चालवूं लागला.

या कोंकण प्रांतांत पोर्तुगीझ, आंगरे, इंग्रज, जंजिरेकर सीदी अशा अनेक
त्तांचे हितसंबंध असून, त्या सर्वांना कबजांत ठेवणें व त्यांजवर आपली
त्ता बसविणें हें शाहूचें व त्याच्या पेशव्यांचें आद्य कर्तव्य बनलें, त्यांतूनच
ढील रणसंग्राम उपस्थित झाले, त्यांची मीमांसा आपणास ठरवावयाची
ाहे. आंगरे व इंग्रजांचें युद्ध होऊन त्यांत पुढें पोर्तुगीझ इंग्रजांचे साह्यास
ाले तेव्हां बाजीरावानें महादाजीपंत जोशी यास पोर्तुगीझांकडे पाठवून
ानेवारी स. १७२२ त स्वतंत्र तह ठराविला, तेणेंकरून इंग्रज नरम पडले
प्रकार पूर्वी सांगण्यांत आला आहे. तथापि मराठे-पोर्तुगीझांची कायम
त्री जुळणें शक्य नव्हतें. ता. १५ नोव्हेंबर, स. १७२३ रोजीं पिलाजी
ाधवानें वसई प्रांतावर अचानक स्वारी करून मोठी लूट नेली, † तेणेंकरून
भयतांमध्यें थोडाफार बेबनाव झाला, तरी बाजीरावाचें लक्ष निजामाकडे
सल्यामुळें त्यानें पोर्तुगीझांशीं मिटतें घेऊन ता. १० जानेवारी, स. १७२४
जीं पूर्वीचा तह पुनः कायम करून घेतला. तथापि तहांत ठरल्याप्रमाणें

§ पे. द. ३०.३३९ † पे. द. ४०.५

पोर्तुगीझांनी आपला वकील शाहूमहाराजाकडे पाठविला नाही त्यामुळें उभयतांची चुरस कायम राहिली. पुढें स. १७२८ त निजामाचा बंदोबस्त होईपर्यंत बाजीरावानें पोर्तुगीझांना दुखविलें नाहीं.

स. १७२८ च्या मार्चांत निजामाचा व्यवहार उलगडला आणि लगेच मे महिन्यांत पिलाजी जाधवानें पोर्तुगीझांच्या दमण प्रांतातले दोन गांव मारले, त्याचा सूड म्हणून पोर्तुगीझांनी ऑगस्टांत कल्याण प्रांतावर हल्ला केला. परंतु ही चुरस निकरावर येण्यास दुसरीं कित्येक महत्त्वाचीं कारणें घडत गेलीं. कल्याणजवळ अणजूर म्हणून प्रसिद्ध गांव असून तेथें पाठारे क्षत्रिय कुटुंबांचें महत्त्व होतें, त्याचा प्रमुख निंबाजी नाईक यास सहा पुत्र झाले. त्यांतील वडील गंगाजी नाईक हाच खरें म्हटलें तर पुढील युद्धाचा उत्पादक होय. त्यानें † स. १७२२ त बाजीरावाची भेट घेतली आणि तेव्हांपासून नाना तऱ्हेची खटपट करून साष्टीतील पुढारी लोकांस मराठ्यांचे बाजूस वळविले आणि पोर्तुगीझांचा पाडाव करण्यासाठीं ठिकठिकाणच्या मान्याच्या जागा व गुप्त वाटा रामचंद्र महादेव व इतर प्रमुख मराठे यांस दाखवून दिल्या. पुढें स. १७२९ त मालाडचा जमीनदार अंताजी रघुनाथ कावळे या खटपटींत सामील झाल्यानें तिला जोर आला. कावळे व बाजीराव यांचा पत्रव्यवहार उपलब्ध आहे. स. १७२८ त रामचंद्र महादेव मृत्यु पावला ¶ आणि त्याचें काम बंधु कृष्णराव महादेवाकडे आलें मात्र हा कृष्णराव रामचंद्रपंताइतका चाणाक्ष नव्हता.

हिंदुधर्माचें उच्चाटन करणें हा पोर्तुगीझांनीं आपल्या कर्तव्याचा मुख्य भाग मानून त्यास अनुकूल असे कडक कायदे त्यांनी बनविले आणि त्यांची बजावणी साष्टी प्रांतांत सुरू केल्यामुळें तिकडच्या लोकांनी पेशव्यांचा आश्रय मागितला, हें पुढील युद्धाचें आद्य कारण होय.

साष्टीतील जुलमाची कहाणी शाहूचे कानीं पडल्यावर त्यानें स्वारीची वाटाघाट करून कल्याणचा सुभेदार कृष्णाजी महादेव यास साष्टीवर चालून जाण्याचा हुकूम केला आणि त्याचे मदतीस पिलाजी जाधवास रवाना केलें. अंताजी रघुनाथ कावळे मालाडचा देसाई व गंगाजी नाईक अणजूरकर वगैरे साष्टीतील लोकांनी चांगला पुढाकार घेऊन सर्वांनीं मिळून स. १७३० त निकराचे हल्ले करून वसईजवळच्या कित्येक टेकड्या काबीज केल्या. मे महिन्यात कांबे येथें मराठ्यांनीं पोर्तुगीझांशी सामना करून त्यांचा एवढा

† ना. रो. ५, साष्टी ब० ¶ साष्टी ब. पे. द. ३०.६७

पराभव केला कीं बहुतेक साष्टी प्रांत वसई सुद्धां याच वेळी मराठ्यांचे कबजांत जाणार, तों पोर्तुगीझांनी इंग्रजांचें आर्जव करून त्याचें साह्य मागितलें. त्यांनीं आयत्या वेळी ७०० सैनिक मराठ्यांवर पाठवून पोर्तुगीझाचा बचाव केला, तेव्हां कृष्णराव महादेव व अंताजी रघुनाथ यानी पोर्तुगीझाकडे तहाचें बोलणें करून युद्ध थांबविलें.

मराठ्यांच्या प्रगतीस मुख्य अडथळा या वेळींच नव्हे तर पुढेही अनेकवार इंग्रजांकडूनच झालेला आहे. पोर्तुगीझांनीं आपल्या वरिष्ठांस लिहून कळविलें की " मराठ्यांनी मोगलास जर्जर करून सोडले आहे, अशा स्थितीत प्रत्यक्ष परमेश्वरानेंच आम्हांस मदत केली नाही, तर मराठ्याकडून आमच्या वसई प्रांतास धोका आल्याशिवाय राहणार नाहीं. ते मुख्य दोन अटी आम्हावर लादूं पाहतात, एक पोर्तुगीझ हद्दीत हिंदु लोकांस देवळें बाधण्याची परवानगी, दुसरी वसई प्रांताच्या प्रत्येक गांवाची खंडणी. " मात्र या दोन अटी तूर्त बाजीरावाने सोडून देऊन इंग्रज गव्हर्नर रॉबर्ट कोव्हन याचेमार्फत ता १० फेब्रुवारी, स. १७३२ रोजी पोर्तुगीझाशी तह ठरवून घेतला. दाभाडे प्रकरण व उत्तर हिंदच्या भानगडी अंगावर असल्यामुळें पोर्तुगीझाशी स्नेह राखणे बाजीरावास अवश्य वाटले. शिवाय जंजिऱ्याचे सीदीवर मोहीम करण्याची निकड जास्त होती. त्या मोहिमेत सुद्धां इंग्रजांनीं मराठ्यांचा घात कसा केला, ते पूर्वी सांगितले आहे.

तथापि मराठे व पोर्तुगीझ यांचा कलह आज नाही उद्या जुंपणार ही गोष्ट उभयपक्षांस स्पष्ट दिसत होती. त्यामाटीच स.१७३४ त ठाणे येथे मजबूद कोट त्वरेने बांधण्याचा उद्योग पोर्तुगीझांनी चालू केला. स. १७३४ अखेर संभाजी व मानाजी आंगरे यांजमध्यें कलह वाढला, त्यांत बाजीरावानें मानाजीचा पक्ष घेतला, यास्तव प्रत्यक्ष कुलाबा अगर नजीकचा चौलचा कोट आपल्या ताब्यात घेण्याची निकड त्यास उत्पन्न झाली. मानाजी रेवदंडियांत फिरंगीयांकडे जागा मागोन राहिले. फिरंगीयांनीं दगाबाजी करोन असा नामक मशिदीवर भांडी चढवून निशाण लाविलें आणि राजकोटावर मार करूं लागले, ते प्रसंगी मानाजी आंगरे रेवदंडियांतून बाहेर येऊन फिरंग्यासी लढूं लागले. बाजीरावानें खंडोजी माणकर व शंकराजी केशव यांस मानाजीचे मदतीस पाठविलें, आणि ता० २० जानेवारी, स. १७३५ रोजी गोव्यास पत्र लिहून " दोस्तीच्या राहे असा कज्जा करणें युक्त नाही, इतक्या उपर कज्जा केल्यास

आम्हांसही त्याची पैरवी करणें लागेल." अशा प्रकारें पोर्तुगीझांना धाक घातला. वासुदेव जोशी बाजीरावास लिहितो, "फिरंग्यांनीं लबाडी केली, पत्र पाठविलें त्याचें उत्तर मगरूरपणें लिहिलें याकरितां त्यांला ठेचगा द्यावा म्हणून लिहिलें येविशीं सविस्तर पूर्वी लिहिलें आहे." अशा प्रकारें उभयतांचें वैमनस्य वाढून स. १७३६ त सिदी साताचा निकाल लागल्यावर पेशव्यानें फिरंग्यांची मोहीम अंगावर घेतली. †

अशा प्रकारें दोन्ही पक्ष साशंक बनले असतां १७३२ चा तह कायम टिकणें शक्य नव्हतें. आज ना उद्यां मराठे आपल्यावर हल्ला करणार हें जाणून पोर्तुगीझांनीं स्वसंरक्षणाची तयारी चालविली. साष्टी बेटाच्या तोंडाशीं ठाण्यास मोठा कोट बांधण्यास त्यांनीं स. १७३४ त सुरुवात केली. काम जलद चालावें म्हणून हिंदु प्रजेवर वेठीची सक्ति करण्यांत आली व त्यांच्यावर जादा कर बसाविण्यांत आले. या छळानें त्रासून जाऊन भराभर साष्टींतील लोक मराठ्यांस सामील होऊं लागले. अगोदरच समग्र कोंकणावर आपला अंमल असावा अशी पेशव्यांना मूळपासून मोठी उत्कंठा असून त्यास पोर्तुगीझांच्या छळानें जास्त उत्तेजन मिळालें. याबाबत मालाडच्या अंताजी रघुनाथाचा पेशव्याशीं झालेला पत्रव्यवहार अभ्यसनीय आहे. §

**४ स. १७३७ ची मोहीम.**—१७३४ पासून ठाण्याचा कोट पोर्तुगीझ बांधीत होते, तें काम त्यांनीं नेटानें पुरें करण्याचा उद्योग आरंभिला. सबब कोट पुरा होण्यापूर्वीच साष्टीवर हल्ला करून तें बेट जिंकून घ्यावें असा बेत बाजीरावानें योजिला; आणि स. १७३७ च्या उन्हाळयांत बापूजी श्रीपत, वासुदेव जोशी, अणजूरकर नाईक वगैरेंच्या सल्ल्यानें मोहीम सुरू केली. युद्धाची तयारी करण्यास शंकराजी फडके यास हुकूम केला आणि कल्याण येथें भवानीच्या गोंधळाच्या निमित्तानें लोक जमवून निरनिराळीं कामें वांटून देण्यांत आलीं. शंकराजीपंत व गंगाजी नाईक अणजूरकर प्रभृति लोकांनीं वसईवर हल्ला चढवावा व आपाच्या हुकमतीखालीं असलेल्या सैन्यानें ठाण्यावर चाल करून साष्टी काबीज करावी अशी योजना आखण्यांत आली. सर्व तयारी

† ऐ. सं. सा. ले. १९८; पे. द. १६. १४, ३१; पे. द. ३३. ४५७, ४५९; पे. द. ३४.७; ब्र. पृ. ६९; Marathas and Bassein Pp. 51–54.

§ रा. खं. ६ ले. १०१ १०२, पे. द. १६ व ३४ व पुणतांबेकर पुरंदरेकृत उत्तर कोंकणांतील शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांची माहिती, परिशिष्टें वगैरे पहावे.

होतांच चिमाजी ता. २४ मार्चला पुण्याहून निघाला, तो २६ तारखेस बदलापुरास पोहचतो तों त्यास ठाण्याच्या बाजूनें आलेले तोफांचे आवाज ऐकूं आले. रात्रीचा गुप्त छापा घालून खाडीच्या तोंडावर असलेला बुरूज आपाच्या आघाडीच्या टोळीनें काबीज करून खुणेदाखल केलेल्या तोफांचे हे आवाज होते. टाकोटाक आपा निघाला व कळव्यास पोहोचला. आपा सैन्यांत दाखल होतांच सर्व सैन्य खाडी ओलांडून पलीकडे बेटांत घुसलें. ठाणें गावांत मराठे शिरल्याची बातमी पसरतांच पोर्तुगीझांची गाळण उडाली. फक्त ठाण्याचा किल्ला लढविण्याकरतां एक तुकडी ठेवून गव्हर्नर व त्याचे अधिकारी बायकामुलांसह करंजास निघून गेले. मराठी सैन्याच्या ओघापुढें या मूठभर लोकांचा काय पाड लागणार ? भयग्रस्त होऊन दुसऱ्या दिवशीं तेही किल्ल्यांतील सामानसुमान तेथेंच टाकून चालते झाले.

अशा रीतीनें साष्टींतील मुख्य ठाणें मराठ्यांच्या हातांत आलें व त्यांचें मुख्य सैन्यही पळून गेलें. आतां फक्त बेटांत व आसपास पोर्तुगीझांच्या चौक्या किंवा गढ्या होत्या त्या हस्तगत करण्याच्या राहिल्या. मरोळ, मालाड, तुरंबें इत्यादि एकामागून एक ठाणीं भराभर घेऊन आपाच्या सैन्यानें सर्व बेट व्यापलें. फक्त वांदरें आणि वेसावे या दोन गढ्या मात्र शरण न येतां लढूं लागल्या.

करंजाकडून ठाण्याच्या बंदराकडे शत्रु आल्यास त्यास अटकाव व्हावा म्हणून ठाण्याच्या पूर्वेस ३ मैल असलेलें पारसिकचें ठाणें हस्तगत करणें आवश्यक होतें. ही कामगिरी नारायण जोशाकडे देण्यांत आली. त्यानें ३ एप्रिलला पारसिक घेतलें आणि दक्षिणेकडे जाऊन बेलापूरवर हल्ला चढविला. बेलापूरचें ठाणें २८ एप्रिलला पडलें आणि त्याचप्रमाणें मे महिन्यांत वसईच्या जवळील धारावी व जूनमध्यें कल्याण जवळील सांताक्रुझ ही ठाणीं मराठ्यांच्या हातांत आलीं.

ठाण्यावरील हल्ला कल्पनेबाहेर यशस्वी झाला. याच युक्तीनें वसई घेण्याचें ठरलें होतें. माहुलीच्या रानांत शंकराजीपंताच्या नेतृत्वाखालीं लोक जमा होऊन त्यांनीं वसईकडे कूच केलें. ता० २६ मार्चच्या रात्रीं ही तुकडी राजावळीच्या उतारावर दाखल होते तों दिसून आलें कीं पोर्तुगीझांना कांहीं तरी कुणकुण लागून त्यांनीं या उतारावर विशेष बंदोबस्त राखिला होता. शंकराजीपंतानें उताराखालीं दीडशें लोकांची टोळी रवाना करून तिला

चौकी मारण्याचा हुकूम दिला. या लोकांनी आपलें काम बजाविलें, पण मारामारीची एकच दंगल उडाल्यामुळें किल्ल्यांतील लोकांना चाहूल लागली. किल्लेदारानें चोहोंकडे पाहाऱ्याचा बंदोबस्त वाढविल्यामुळे मराठ्यांस किल्यांत शिरकाव करून घेण्याची संधि मिळणें आतां अशक्यप्राय झालें. शंकराजीपंत पापडी मार्गिकपुऱ्यावरून वसईच्या कोटाच्या बाहेर येऊन पोहोचला. पण या भक्कम कोटावर हल्ला करण्याच्या तयारीनें तो आला नसल्यानें त्याच्याजवळ जरूर ती सामुग्री नव्हती. त्यानें आपली हकीकत आपांस कळवून त्यांच्याकडून वेढ्यास लागणाऱ्या सामुग्रीची मागणी केली आणि मध्यंतरीच्या काळांत वसईच्या भोवतालचीं लहान ठाणीं घेण्याचें ठरविलें. ता. १ एप्रिलला जीवधन काबीज झालें, ८ एप्रिलला टकमक, १३ एप्रिलला आरनाळा, १ मेला मांडवी, २ मेला तांदुळवाडी, १९ मेला मनोर अशीं ठाणी मराठ्यांच्या हातांत भराभर आली. पाऊसकाळ आला तेव्हां शंकराजीपंत, मोरोजी शिंदे व गंगाजी नाईक यास वसईवर; खंडोजी माणकर, रामजीपंत यास ठाण्यास; नारायण जोशी यास बेलापुरास; विठ्ठलपंतास मनोर येथें; याप्रमाणें बंदोबस्तास मंडळी ठेवून चिमाजी ता. १ जुलै, १७३७ रोजी पुण्यास परत आला.§

१७३७ च्या पावसाळ्यात वसई काबीज करण्याचा शंकराजीपंत व गंगाजी नाईक यांनी उद्योग केला. बाजी भीवराव व रामचंद्र हरि पुण्याहून आले. परंतु तो प्रयत्न सिद्धीस गेला नाही. त्यानंतर सुमारें दीड वर्षपावेतों कोंकणच्या कार्यभागाकडे आपास विशेष लक्ष पुरवितां आलें नाही. १७३७ च्या अखेरीस पोर्तुगीझांस गोव्याहून व युरोपांतून मदत आल्यामुळें त्यांनी मराठ्यांविरुद्ध चढाई सुरू केली. माहिमला शंकराजीपंताचा भाऊ महादजीपंत वेढा देऊन बसला होता त्याच्यावर पोर्तुगीझांनी चालून जाऊन वेढा मारून काढला. महादजीपंत व त्याच्याबरोबरील कित्येक प्रमुख सरदार मारले गेले. या प्रसंगाचें वर्णन वासुदेव जोशी व रघुनाथ हरि यांनीं चिमाजीस लिहून कळविलें तें असें.— " रामचंद्र हरि व महादजी केशव यांनी माहिमास मोर्चे लाविले होते. गनीम इंग्रज, फिरंगी व हबशी ऐसे एकत्र होऊन दोन तीन दिवसांत शंभर गलबतें भरून, दाक्षिणेकडे केळवे आंग मोकळें होतें, तिकडून गनीम कोटामध्यें जात. त्यास केळव्याकडील तर्फेस सात आठशें माणूस घेऊन ता. १० रोजीं

§ साष्टीची बखर, पे. द. १६ व ३४ व दिघे यांचा Campaign of Salsette and Bassein हा लेख.

रामचंद्रपंत चालोन आले. गनिमाचे पंचवीस तीस माणूस मारिले. इकडील एक राऊत पडला, एक दोन घोडी जखमी झालीं. त्याउपरी काल गनिमानें संधि पाहून दीड दोन हजार माणूस मोर्च्यावर चालून घेतलें. एकच वेळेस तिहीं मोर्च्यावर हल्ला केला. कोटावरून तोफांचा मारा जबरदस्त झाला. मोर्चे जळावयास लागले. लोकांस बाहेर निघून हत्यार करावयास जागा नाही. तेव्हां रामचंद्रपंत, अमरसिंग शिर्के वगैरे दहा पंधरा राउतांनीं घोडी घालून गनिमाचे दहा पंधरा माणूस मारिले. रामचंद्रपंतानी खुद्द दोघे ठार केले आणि गनीम फिरविला. समयीं रामचंद्रपंताचे उजवे हातास गोळी लागली. हातची तलवार सुटून गुडघ्यास लागली. ऐसे होतांच मशारनिल्हे फिरले त्याबरोबर गनिमानें मोर्चे काबीज केले. आमचे लोकाचा धीर सुटोन निघाले. महादाजी केशव व धोंडोपंत, वाघोजी खानविलकर, राजबाराव बुरुडकर, चितो शिवदेव, जनार्दन हरि व गणेश हरि दि।। महादाजी केशव वगैरे लोक मोर्चात होते त्यांस निघावयास फुरसत न होऊन तेथंच झुंजोन कामास आले. अजमासे दोनशें माणूस कामास आलें व जखमी शंभरापर्यंत. लोकांनीं धीर सोडला आहे, गनीम हावभरू झाला आहे, ऐसे असोन अवघ्यांस दिलदिलासा देऊन, मोर्चे कायम करून गनिमास बरा नतीजा द्यावा हे उमेद धरून राहिलों आहों, अरनाळा व बहादुरपुरा येथील खबरदारी शंकराजी केशवास, धारावी ठाण्याची खंडोजी माणकरास, अशेरीची दत्ताजी मोरेश्वरास, बेलापुरची नारायण जोशी यास, कल्याण भिवंडीची बखाजी ताकपीर यास, येणेंप्रमाणें खबरदारी घेण्यास सत्वर लिहून पाठविणें. जागोजाग आपल्या लोकानी दहशत खादली आहे, त्यास स्वामीकडून उपराळा जाल्याविना लोकांस अवसान चढोन गनिमास नतीजा पोहोचत नाहीं. तरी स्वामींनी सहस्र कामें टाकून जरूर जाणोन राऊत पाठवून येथील स्थलांचा उपराळा होय ते गोष्ट केली पाहिजे. अगत्य नासिक प्रांतें यावें, मुलकाचा सत्यानाश दमण प्रांतीं करावा, एखादे जागां गनीम गांठून कापून काढावा म्हणजे आपली सलाबत वाढेल.”

वासुदेव जोशाचें हें पत्र जाऊन उपराळा होण्यापूर्वी फिरंग्यांनीं माहिमचा वेढा तर मारून काढलाच होता. तसेंच पुढें जाऊन त्यांनीं अशेरीचा वेढा उठविला. मराठे भराभर मांडवी, मनोर, केळवे, शिरगांव ठाणीं टाकून वसईकडे हटले. फिरंग्याच्या आगीची मराठ्यांनीं जणूं काय धास्ती खाल्ली. सैन्यांतून लोक रोज उठून जाऊं लागले आणि वर्षभर केलेले श्रम वायां

जातात कीं काय असें वाटूं लागलें. पण इतक्यांत निजामावरील मोहीम संपवून चिमाजी आपा कोंकणांत उतरला. त्याच्या आगमनानें मोहिमेचा नूर बदलून गेला. लोकांस मोठा जोम आला. छाती करून ठिकठिकाणीं मराठ्यांनीं गळ्या बांधण्यास सुरुवात केली. पण प्रकृति बरीच खालावल्यामुळें आपास पुण्यास परत जावें लागलें.

**५ दुसरी मोहीम** ( डिसें० १७३८-जून १७३९ ).—उत्तरेकडे निजामाचें आक्रमण उद्भवलें नसतें तर वसईचा पाडाव स. १७३८ च्या आरंभींच झाला असता याविषयीं संशय वाटत नाहीं. पण बाजीरावाला आपले जिव्हाळ्याचे साथीदार घेऊन निजामाला तोंड देण्यास भोपाळकडे जावें लागलें, त्यामुळें कोंकणांतला उद्योग लांबणीवर पडला. अंताजी रघुनाथ, अणजूर वगैरे कित्येकांनीं थोडेबहुत उद्योग चालू ठेविले. संभाजी व मानाजी या आंगरे बंधूंत बेबनाव झाल्यामुळें तिकडूनही वसईच्या कामास वैगुण्य आलें.§ तरी मोर्चे वगैरे कायम असून संग्रामही निरनिराळ्या ठिकाणीं निकराचे चालू होते.

ठाण्याचा किल्ला मराठ्यांकडून हिसकून घेण्याचा वसईचा जनरल पीड्रो ड मेल यानें आणखी एक प्रयत्न निकराचा केला. वसईकडे नवीन जहाजें व मदत आली होती ती घेऊन ड मेलनें ठाण्यावर चाल केली हा गृहस्थ शौर्य, धाडस व दीर्घकालीन अनुभव यांनीं युक्त असून त्याजपुढें मराठ्यांचा टिकाव लागणें दुर्घट वाटत होतें. पण ठाण्याचा किल्ला या वेळीं सर्व प्रकारें मजबूद बनून मराठ्यांनीं संग्रामास सज्ज केलेला होता. ता. २७ नोव्हेंबर, स. १७३८ रोजी ड मेल मचव्यांत बसून कोटाची पाहणी करीत असतां वरून धाडकन गोळा येऊन तात्काळ मृत्यु पावला. सेनापतीच्या मृत्यूनें फिरंग्यांचा धीर खचला. मोठ्या तयारीनें आलेली स्वारी परत माघारा वसईस गेली.

स. १७३८ सालचा काळ पेशव्यांना सर्वथा अनुकूल होता. कोणतेंही बाह्य प्रकरण द्विधावृत्ति उत्पन्न करणारें अंगावर नसल्यामुळें एकट्या वसईच्या स्वारीवर पूर्ण सामर्थ्य खर्चण्याची त्यांस सवड झाली. नादीरशहा येण्याची आवई उठली त्यासाठीं बाजीराव खानदेशाकडे गेला आणि स. १७३८ च्या डिसेंबरांत चिमाजी कोंकणांत उतरला. सिंदे, होळकर, बाजी भीवराव रेठरेकर, तुकोजी व जिवाजी पवार, पिलाजी जाधव इत्यादि सर्व मोठे सरदार जमा

§ पहा पे. द. १६. २४

झाले. उभयपक्षांकडून सर्व नाक्यांच्या ठिकाणीं आवेशाचे झगडे चालू झाले. सर्वांना खात्री पटली कीं आतां शेवटचाच सोक्षमोक्ष होणार. त्यांतल्या त्यांत धारावी, माहीम, तारापूर व वसई येथील संग्रामांत मराठ्यांनीं अजब्र कर्तृत्व व शौर्य प्रगट केलें. बेट धारावी तर वसईच्या प्रवेशाचें द्वार तें ता. ६ मार्च रोजीं मराठ्यांनीं काबीज केलें, तेव्हांच वसईवर चढाई करणें शक्य झालें. स. १७३९ च्या या मोहिमेंत मुख्य प्रसंग झाले ते असे.—

ता. ९ जानेवारी-माहीम काबीज, लगेच ता. १० जानेवारी केळवें व शिरगांव;
ता. २४ ,, – तारापुर का०; ता. ३ फेब्रुवारी अशेरी किल्ला हस्तगत;
ता. ५ फेब्रुवारी बादलापारडी; ता. ७ ,, वेसावें काबीज.

ता. ११ फेब्रुवारी मढ काबीज; ता. १० मार्च उरण काबीज. वांद्रयाचा कोट मराठ्यांचे हातीं पडूं नये म्हणून तो पोर्तुगीझांनीं आपणच जमीनदोस्त केला. वसईवरचे मुख्य प्रसंग मोर्चे वगैरे प्रकार फेब्रुवारी ते एप्रिल पावेतों तीन महिने चालून युद्धाचा निकाल लागला.

नोव्हेंबरपासून जूनपावेतों चिमाजी सारखा ठिकठिकाणीं हिंडत होता. शिवाय गोव्याकडून पोर्तुगीझांस चांगला पायबंद बसावा म्हणून स. १७३८ च्या पावसाळयानंतर व्यंकटराव घोरपडे यास गोव्यावर रवाना केलें. तें काम त्यानें चांगलें यशस्वी केल्यामुळेंच वसईकडील उद्योग सुकर झाला. तो मुख्य भाग सांगण्यापूर्वी माहीम व तारापुर येथें जे मर्दुमीचे प्रसंग घडले त्यांचें वर्णन देणें अवश्य आहे. पुढें प्रसिद्धीस आलेल्या अनेक सरदारांस ही वसईची मोहीम म्हणजे अनुभवाची उत्कृष्ट शाळाच बनली ही गोष्ट तत्कालीन कागदांत चांगली दिसून येते.

**तारापुरचा हल्ला**.—ता. २९ डिसेंबर, स. १७३८ नंतर संग्राम सर्वत्र सुरू झाला. अल्पावकाशांत माहीम, केळवें, शिरगांव, तारापुर, डाहाणू, नारगोळ, खतलवाड व अशेरी हीं ठिकाणें मराठ्यांनीं काबीज केलीं. तारापुरचा संग्राम फार शिताफीचा झाला. त्याचें वर्णन चिमाजीनें ब्रह्मेन्द्रस्वामीस लिहिलें तें असें.—' चार पांच सुरुंग मल्हाररावाकडून तयार झाले. तसेच हुजरातच्या सुरुंगांचे तीन फांटे एकाचे एक कुसाखालीं नेले. तसेंच यशवंतराव पवार यांजकडील एक तयार झाला. राणबाकडील तयार झाला नाहीं. सारे लष्करचे लहान थोर माणूस रात्रीचेच खाडींतून उतरोन मोर्च्यांचे पाठीमागें जमा करून बसविले होते. सुरुंग एकामागें एक अंतर करून उडाले. सरकारच्या

मुरुंगांचें खिंडारें मोटें पडलें, उजव्या हाताकडे दुसरी थोडी बहुत खिंडारें पडली. त्याच्या उजवीकडे हबशांच्या लोकांनीं कोटासच शिडी टेंकून वरते चढले. पुढें धारकरी होता तो वर चढल्यावर, बरी गोळी लागून खालीं भुइंवर पडला. त्याचेमागें दुसरा चढला, तोही पडला. फिरोन लोकांनीं लगट करून वरती चढले. मारामारीची शर्थ केली. हुजरातचें निशाणाजवळ बाजी भीवराव व रामचंद्र हरि होते ते व सारे नामांकित लोक तितके बरे वजेनें चालोन गेले. गुतेकर व बाळोजी चंद्रराव होते. उजवेकडे मल्हाररावाचीं व राणोजी भोसल्याचीं निशाणें होतीं. त्यांनीही शर्थ करावयाची तैसी केली. खंदक सात आठ हात खोल व सात आठ हात रुंद होता. तो खंदक उतरोन कोटावरी चढावयाची बहुता प्रकारची अडचण होती. शेवटपावेतों फिरंगीयांनीं हिंमत सोडिली नाहीं. तोफाचा व बरकंदाजांचा मार सिमेपरता. खाडीमध्यें माडी आहे तेथें आम्ही होतों. मल्हाररावाचे पायास करट झाल्यामुळें तेही एकटे आम्हांपाशीं होते. मारें झुंज नजरेस पडलें. आमच्या व मल्हाररावाच्या लोकामध्यें आगरे यांचेही लोक होते. राणोजी भोसले यांनीं बरे बजेनें बाकोन घेतले. बाजी भीवराव यांनीही सीमेपरतें निशाण चालविलें. त्यांचे मर्दुमीची सीमा लिहावी ऐसें नाहीं. हुजरातच्या मोर्च्याच्या डाव्या हातें गोविंद हरि होते. त्यांचे डावे हातीं बाडे होते. त्याचे पलीकडे यशवंतराव होते. त्यापलीकडे तुकोजी पवार, शेवटी राणबा. सारांश, माणूसही सीमेपरते जायां झाले. स्वामीचा पुण्यप्रताप थोर, तेणेंकरून जागा फत्ते झाली असे.' या युद्धांत बाजी भीवराव ता. २४.१.३९ रोजीं तोंडात गोळी लागून पडला, त्यासंबंधानें सांत्वनाचीं पत्रें बाजीरावानें व इतरांनी त्याच्या आईस लिहिलेलीं वाचण्यालायक आहेत.

एक लेखक लिहितो, "बाजीभीवराव आपली बाजूच एक होती. होणारास उपाय काय! त्याचा पुत्र बापू बरा शहाणा आहे, त्यावरी लोभ करणें. बंधु चिमणाजी भीमरावही बरे खटपटे, शहाणे, मर्द व सुशील आहेत. बाजीराव तों कार्यकर्ते मनुष्य होते. कामावरी खर्च जाहले. ज्या गोष्टीनें यांचा लौकिक उत्तम दिसे तेंच केलें जाईल."† येणेंप्रमाणें १७३९ च्या जानेवारी महिन्यांत माहीम, तारापुर, डाहाणू व शिरगांव हीं स्थळें हस्तगत झाली.

**६ वसईचा पाडाव व तह** (ता. १३ मे, १७३९).—इतर ठिकाणी लढाया चालू असतांच चिमाजी आपानें वसईवर हल्ला चढविला. माघ शु. १०

† पे. द. १६.१३६.

पासून वैशाख शु. १५ पावेतों तीन महिने वसईचा संग्राम चालून शेवटीं अत्यंत दीर्घ प्रयासानें ता. १३ मे, १७३९ रोजीं किल्ला मराठ्यांचे कबजांत आला. दुसरीं ठिकाणें काबीज होतांच तिकडील मराठ्यांची फौज वसईच्या हल्ल्याचे मदतीस आली. फेब्रुवारी-मार्चांत बांदरा, वेसावें व धारावी, ही स्थळें खंडोजी माणकर वगैरेंनी हस्तगत केलीं. संग्रामाच्या अनेक हकीकती उपलब्ध आहेत. साष्टीची व इतर बखरी यांतही हकीकती आहेत. परंतु सर्वांत चिमाजी आपाचीं पत्रें सरस व प्रत्यक्ष माहितीचीं वाचण्यालायक आहेत, त्यांतील एकच पुढें देतों. ‡

"त्यांत बुदले भरून छ ३ सफरीं (१.५.१७३९) कुल अवघी सिद्धता करून, लोकांस सुरुंग उडतांच हल्ला करण्याविशीं ताकीद केली. छ. ४ रोजी सुरुंगास बत्या दिल्या. राजश्री राणबाकडील पांच सुरुंग उडाले, त्यांत चार उडाले, एक उडावयाचा होता, तोंच लोकांनीं तातड करून हल्ला केला. तों पांचवा सुरुंग उडाला. तेणेंकरून लोक बहुत करून दगडानीं दडपले. तैसेंच हल्लेस हशमाचे लोक चढले होते तेही उडाले व फिरंगी याने हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, बरखंदाजी रंजगिरी येणेंप्रमाणें अतिशय मार दिला. यामुळें ते दिवशीं लोक चकमोहरे जाले. काम कारेगार जालें नाही. दुसरे दिवशीं दोन सुरुंग उडता राहिले होते त्यांचा शोध करून, बत्या ठीक करून साऱ्या लोकांची निवड करून, हल्लेविशीं ताकीद केली; आणि सुरुंगास बत्ती दिली. त्यानें निम्मे बुरूज उडाला. लोकांनीं जीवित्वाकडे दृष्टि न देता चालोन गेले. फिरंगी यांणीं आतून मेढा घालून बळ धरिलें होतें. हल्ला करितांच हुक्के व गरनाळा, दारूची मडकी, राळ, माशांचें तेल, बरखंदाजी ऐसा सीमेपरता मार दिला. परंतु लोकांनीं, मेला तो मेला, जळाला तो जळाला, त्याजवर दृष्टि न देतां ज्या जागीं गेले त्या जागांच कायम राहून फिरंगी यांसही मार दिला. त्यांनीं तों जे जे जागां खिंडारें पडलीं होतीं त्या जागां, दारूचीं मडकीं व राळ टाकून होमच मांडिले, तैसेंच लोकांनीं सोसून कायम राहिले. फिरंगी यांनीं तों हिमतीची व मर्दुमीची सीमा केली. तथापि बाहेरील मार बहुत जाला. आंतील चांगलेंच माणूस रेणोळ व ढोणे व मोठे मोठे फिरंगी मेले.

‡ खं. ३ ले. २७ व ब्र. च. ले. ५२, पिसुर्लेकर कृत पो. व म. भाग ४ चे अखेरीस, व का. स. प. या. ले. ३१.

त्यामुळें व बाहेरील मारामुळें बेओसान होऊन, कौल मागावयास माणूस पाठविलें, त्याजवरून कौल देऊन त्यांजकडील तिघे भले माणूस आणिले. त्यांजपाशीं करार करून तहनामा देऊन आंत पाठविले. हत्यार व कबिले सामान मुद्दां सोडावें ऐसा करार केला. सहा दिवसांची मुदत दिली. जागजागीं गलबतें आणावयास माणसें पाठविलीं आहेत व जमाही झाली आहेत. सत्वर जाऊन किल्ल्यावर निशाण चढेल ऐसें विस्तारें वृत्त लिहिलें. श्रवणें बहुत आनंद झाला. त्याचा विस्तार लिहितां विस्तार आहे. वसई ( म्हणजे तेथें ) एक्या तोंडानें झुंजावें. कोट बिलंद, गच्ची रुंद, मोर्चा अथवा सुरुंग चालवीन म्हटल्यास पाणी लागतें. फिरंगीयांसारखे झुंजणार, असें असोन अप्रतिम तूर्तद करून उघडे सुरुंग चालविले. त्यांनींही प्रत्योपकार यथाविधि केला, तथापि स्वामीचें पुण्य व पराक्रम अप्रतिम. तन्मूलें त्यांजवर सलाबत बसून ईश्वरावर तवकल केली. दक्षिणची फौज म्हणजे मऊ लागलें वेजरब घेणार. कठिण लागलें म्हणजे फिरोन पाहणें नाहीं. ऐसी पूर्वापार या राज्यांतील तऱ्हा. ऐसें कर्म सरदारांस जालें नाहीं, पुढेंही होणें नाहीं. स्वामी केवळ ईश्वरी अवतार, तन्मूलें या फौजेस या हिमती जाहल्या. ज्या प्रकारें वानरांकरवीं लंका घेवविली, त्या प्रकारें हे गोष्ट जाली. दक्षिणी फौजेस उपाय करून व छातीचा कोट करून झुंजावें, हे हिंमत पूर्वी कोणी ऐकिलीही नव्हती. आम्ही मानवी लोक, नानाविध मनाचे प्रकार, निश्चय होत नाहीं. सारांश, एतदर्थी पर्याय मनांत आणितां चित्तांत अंत येत नाहीं. सर्व गोष्टी ईश्वरावतारासारख्या आहेत. जे सेवक हे पराक्रम पाहत असतील, त्यांचे जन्म धन्य आहेत. जे कामास आले त्यांनीं तों हा लोक व परलोक साधिला. ज्यापासून ईश्वराची सेवा जितकी घडावयाची असते, त्याप्रमाणें घडते. सारांश, हे तर्दूद, हे मर्दुमी, या समयांत हे हिंमत, हे गोष्ट मनींही कल्पवत नाहीं. हीं कर्में ईश्वरासमान आहेत. सेवेशीं श्रुत होय. ही विनंति.'

**तहाचीं कलमें.**—वसईचा किल्ला खाली करून देतों, असें कबूल करून, पांढरें निशाण घेऊन पोर्तुगीझांचे वकील चिमाजीकडे ता. ५ मे, स. १७३९ रोजीं आले; आणि तहाच्या शर्ती ठरून शनिवार ता. १२ मे रोजीं पोर्तुगीझांनीं किल्ला खालीं केला, तेव्हां मराठ्यांनीं आंत प्रवेश केला. § तहाच्या शर्ती बारा ठरल्या त्यांचा मतलब येणेंप्रमाणें—

§ पे. द. १६.१७४.

१. पोर्तुगीज फौज व बुणगे यांस सर्व हत्यारांसह, बॅन्ड वाजवीत व निशाण उभारून, सुरक्षितपणें किल्ल्याबाहेर मराठ्यांनीं जाऊं द्यावें.

२. वसई येथें राहत असलेलीं क्रिस्ती, हिंदी किंवा मुसलमानी कुटुंबें किंवा लोक वसई सोडून जाण्यास इच्छितील, त्या सर्वांस आपापली मालमत्ता घेऊन चिमाजीआपानें सुरक्षित जाऊं द्यावें.

३. वसईच्या बंदरांत जहाजें असतील त्यांसही आपापला दारूगोळा व तोफखाना घेऊन सुरक्षितपणें बंदरांतून जाऊं द्यावें.

४. कलम २ प्रमाणें लोकांस निघून जाण्यास गलबतांची वगैरे जरूर लागल्यास तीं गलबतें मराठ्यांनीं पुरवावीं, आणि हे लोक आपापल्या स्थळीं पोंचेपावेतों रस्त्यांत आंगरे वगैरेंकडून त्यांस त्रास न होईल अशी तजवीज चिमाजीआपानें ठेवावी.

५. क्रिस्ती पाद्र्यांसही आपापली मालमत्ता घेऊन सुरक्षित जाऊं द्यावें.

६. पोर्तुगीझ लोकांचा दारूगोळा व दाणागोटा वसईत आहे तो सर्व बरोबर घेऊन जाण्याची त्यांस मोकळीक असावी. ( हें कलम चिमाजीनें कबूल केलें नाहीं. सर्व सामान त्यानें किंमत देऊन विकत घेतलें ).

७. जे क्रिस्ती लोक आपखुषीनें वसईच्या हद्दींत राहतील त्यांस आपलें धर्माचरण करण्यास मराठ्यांनीं हरकत करूं नये, किंवा त्यांच्या जिंदगीचा अपहार करूं नये. हें कलम मुसलमान व हिंदूंसही लागू असावें.

८. एकमेकांनीं पकडलेले कैदी ज्याचे त्यास परत करावे.

९. किल्ला खाली करून निघून जाते वेळीं पोर्तुगीझांस कोणताही त्रास होऊं नये म्हणून चिमाजीनें आपली फौज दूर अंतरावर मद्रापुरास न्यावी, पोर्तुगीझ लोक जहाजांत बसून तोफेच्या टप्प्याच्या बाहेर जाईपावेतों मराठी फौजेनें किल्ल्यांत प्रवेश करूं नये.

१०. वसईतील कोणताही माल किंवा सामान योग्य किंमत दिल्याशिवाय मराठ्यांनीं घेऊं नये.

११. वसई शहरांत तीन क्रिस्ती देवळें आहेत, तीं तशींच राहूं द्यावीं, त्यांतील मूर्तींस व दागिन्यांस मराठ्यांनीं धक्का लावूं नये.

१२. या तहावर सही झाल्यानंतर त्याप्रमाणें वर्तन राहण्यासाठीं चिमाजीनें आपला एक अंमलदार पोर्तुगीझ जहाजावर ठेवून घ्यावा, आणि पोर्तुगीझांचा एक अंमलदार मराठ्यांचे ताब्यांत राहवा.' लगेच चिमाजीनें तहावर सही

करून दिली. मराठ्यांनी तो तंतोतंत पाळिला. हा तह प्राच्य युद्धनीतीचा स्मरणीय मासला होय.

**७ गोव्याची गळचेपी** (स. १७३९).—गोव्याजवळच्या कांही प्रदेशास देखील साष्टी हेंच नांव आहे. पेशव्यांनीं वसईवर मोहीम चालविली तेव्हां गोव्याहून पोर्तुगीझांची मदत येऊं नये म्हणून त्यांनी व्यंकटराव घोरपडे यास व कोल्हापुर छत्रपतीचा सरदार दादाजीराव भावे नरगुंदकर यास गोव्याचा साष्टीप्रांत काबीज करण्यास रवाना केलें. व्यंकटराव घोरपडे स. १७३७ त वसईचे स्वारींत कामगिरीवर असून त्याला स्वारीचीं तंत्रें चांगली अवगत होतीं. कर्नाटकीय प्रदेश कृष्णेच्या दक्षिणेकडचा कोल्हापुरकर संभाजीच्या कक्षेंतला असल्यामुळें त्याजकडून गोव्याचे मोहिमेंत अडथळा येऊं नये म्हणून त्याचा सरदार दादाजी भावे याची नेमणूक संभाजीचे अनुमतीनें करण्यांत आली. या दोघांनी तिकडचा कार्यभाग चांगला सिद्धीस नेला. ता. १२ जानेवारी, स. १७३९ रोजी व्यंकटरावानें दिघीच्या घांटानें गोव्यावर उतरून अल्पावकाशात पोर्तुगीझांस जेर केलें. वाडीकर सावंत व पोर्तुगीझ यांचा बेबनाव होता, यास्तव पेशव्याच्या विनंतीवरून सावंतांनीं व्यंकटरावाचें साह्य केलें, म्हणूनच पोर्तुगीझ लगोलग टेकीस आले. व्यंकटरावाची फौज सात हजार स्वार व तितकेंच पायदळ एवढी असून सयाजी गुजर, मानाजी पायगुडे वगैरे सरदार हाताखालीं होते. १५ जानेवारीस त्यानें मडगावचें ठाणें काबीज केलें, आणि लवकरच रायतूर व मार्मागोवा हीं दोन स्थळें खेरीज करून सर्व साष्टीप्रात त्याचे हातीं आला. फोंड्याचा किल्ला मर्दनगड ता. १९ फेब्रुवारीस त्याचे हातीं पडला. ता. २२ फेब्रुवारी रोजी वाडकरांनीं बारदेशात शिरून मारगिरी चालविली, तेव्हां आतां गोवा बेट देखील सर्व प्रदेश मराठे जिंकणार असा रंग दिसतांच गव्हर्नरानें तहाचें बोलणें लाविलें. व्यंकटरावाचा निर्धारच होता कीं पोर्तुगीझ लोकांस या प्रदेशांतून साफ काढून लावायाचें. याच संधीस नादीरशहानें दिल्ली हस्तगत केल्याची बातमी बाजीरावास आली, त्यामुळें त्यानें व्यंकटरावास निक्षून आज्ञा पाठविली कीं गोव्याचें युद्ध मिटवून तुम्ही तावडतोब परत या.

पोर्तुगीझांनीं तहाची मागणी करतांच व्यंकटरावानें त्यांस कळविलें, "आम्हांस तुमचें सर्व राज्य काबीज करण्याची आज्ञा आहे. वसई काबीज करून पेशवे स्वतः गोव्यावर चालून येणार." हें ऐकतांच गोव्याचे अधिकारी मोठ्या

फिकिरींत पडले; त्यांनीं मराठ्यांचे लष्करांत फितूर पेरण्याचाही प्रयत्न केला. पण कांहींच इलाज न चालल्यामुळें ता. २७ एप्रिल, स. १७३९ रोजीं तहाच्या अटी त्यांनी मान्य करून पुढील अरिष्ट टाळिलें. तहाचा मुख्य आशय असा. साष्टी व बारदेश या दोन प्रांतांच्या वसुलापैकीं शेंकडा चाळीस अंश दरसाल पोर्तुगीझांनीं मराठ्यांस देत जावा; आणि युद्धखर्चाबद्दल सात लाख रुपये दंड द्यावा. एवंच उत्तर कोंकणचा भाग चिमाजी आपानें जिंकला, तसा व्यंकटरावानें गोव्याकडील त्यांची सत्ता बहुतेक बुडविली. त्या संबंधाचें खालील वर्णन उपलब्ध आहे. "फिरंग्यांच्या वकिलांनी दहा दिवसपर्यंत लष्करांत येऊन उदंड रदबदल केली. तह जाला जे, साष्टी बारदेशमध्यें दरसदे ४० आम्हांस व ६० फिरंग्यांस. कांही ठाणीं आमचीं, कांही त्यांचीं हिंदुधर्म चालवावा. फिरंगी म्हणजे पापात्मे. त्यांचा नाश होणें अपूर्व नाहीं गोव्याकडे शह जबरदस्त बसला आहे." तुबाजी अनंत लिहितो, "व्यंकटरावांही साष्टीबारदेश प्रांतांत आठ नऊ टाणीं घेतलीं. बरा नतीजा फिरंग्यांस दिला. सर्व स्वामींच्या पुण्याचा महिमा. व्यंकटरावही नामवंत मनुष्य. त्यांचाही लौकिक गोवें प्रांतात जाहला. आतां गोवें घ्यावयास अवकाश लागत नाहीं." §

या समग्र युद्धात पोर्तुगीझांचा सुमारें पाऊणशें मैल लांबीचा प्रदेश मराठ्यांनीं मिळविला. या टापूंत ३४० गांव होते. शिवाय आठ शहरें, वीस किल्ले, दोन तटबंदीचे डोंगर आणि वसई व ठाणें ही दोन मोठी ठिकाणें, इतकीं मराठ्यांचे हातीं पडलीं. पोर्तुगीझांचा पंचवीस लाख रुपयांचा दारूगोळा व जहाजें वगैरे सामान, लहान मोठ्या ५९३ तोफा, इतकें फुकट जाऊन, आणखी २३ लाख रुपये लढाईचा खर्च त्यांस आला. साष्टी बेट समृद्ध होतें; त्यांत धान्याची व मिठाची उपज मोठी असून, अनेक खाड्यांनी जहाजाच्या हालचाली सुलभ होऊन त्या योगानें थोड्या खर्चात देशसंरक्षण करतां येत होतें. साष्टीच्या दक्षिणेस लागूनच मुंबई बेट असल्यामुळें इंग्रजांचें तर त्यावर सदैव लक्ष असे. या वेळीं मुद्दां मराठ्यांच्या सामर्थ्यापुढें आपले कांही चालणार नाहीं ही जाणीव असल्यामुळेंच इंग्रज गप्प बसले. वसईचा वेढा चालू असता ता. १० मार्च, १७३९ रोजीं मानाजी आंगऱ्यानें करंजा बेटास वेढा घालून तें काबीज केलें. पुढें रेवदंडा व कोरलई यांसही वेढा घालून तीं स्थळें काबीज करण्याचा प्रयत्न केला. चौलचें संरक्षण करणें पोर्तुगीझांस उत्तरोत्तर अवघड वाटून स. १७४० च्या सेप्टेंबरांत

§ पु. द. १.१३५-१३८; पे. द. १६. १४७ व १५०.

नानासाहेब पेशव्याशीं कॅ. इंचबर्डच्या मार्फत तह होऊन चौल मराठ्यांच्या ताब्यांत आलें. तेव्हांपासून पुढें या किनाऱ्यावर दमण हें एकच पोर्तुगीझांचें ठाणें शिल्लक राहिलें. दोन शतकें उत्तर कोंकणांत बद्धमूल झालेली सत्ता पेशव्यांनीं उखडून लाविली.

८ **आनुषंगिक संदर्शन.**—मराठे-पोर्तुगीझ युद्धाबाबत इंग्रजांचें वर्तन लक्षांत ठेवण्याजोगें आहे. साष्टी व वसई काबीज करण्यासाठीं मराठ्यांनीं हल्ले सुरू केले, तेव्हां पोर्तुगीझांनीं इंग्रजांच्या नाना प्रकारें विनवण्या करून त्यांची मदत मागितली. परंतु मराठ्यांच्या भीतीनें स्वतःच्या हितावर नजर देऊन कोणत्याही प्रकारचें साह्य पोर्तुगीझांना उघड उघड रीतीनें करणें इंग्रजांना इष्ट नव्हतें. त्यांचे व ठाणेकर फिरंग्यांचे संबंध सलोख्याचे नव्हते, पण बलिष्ठ मराठ्यांच्या पेक्षां कमजोर पोर्तुगीझ आपले शेजारी बरे असें इंग्रजांना वाटणें साहजिकच होतें. इंग्रजांकडे पोर्तुगीझांनी मदतीची मागणी केली त्यांत त्यांनीं हाच मुद्दा विशेष प्रामुख्यानें मांडला 'आज मराठ्यांनी साष्टी घेतली, उद्यां ते तुमची मुंबई घेण्यास चुकणार नाहींत, तरी वेळींच आम्हाला तुम्हीं साह्य करावे. त्यांतच तुमचें खरें हित आहे व त्यानेंच पुढें तुमची होणारी हानि टळेल,' असा त्यांनी युक्तिवाद सुरू केला. इकडे मराठ्यांचेही वकील मुंबईस बसले होते, त्यांनीं इंग्रजांकडे तोफा, दारूगोळयाची मागणी सुरू केली व ही मागणी पुरी न झाल्यास पेण, पनवेल, ठाणें या बाजूनें मुंबईस जाणारी धान्यसामुग्री व लाकूडफाटें बंद करण्याचा धाक घातला. इंग्रजांकडून अंतस्थ रीतीनें जी मदत पोर्तुगीझांना थोडीफार मिळत होती ती ताबडतोब बंद झाली पाहिजे असा त्यांनीं आग्रह धरला. आजप्रमाणें त्या वेळींही मुंबईचें अन्नपोषण जवळच्या मुलखांतून जी सामुग्री येई तिच्यावर अवलंबून असे. त्यामुळें इंग्रजांना मोठा पेच उत्पन्न झाला. तरी पण त्यांनीं हा प्रसंग मोठ्या धूर्ततेनें पार पाडून नेला. मराठे नाखूष होऊं नयेत म्हणून त्यांनीं त्यांना कळविलें कीं, 'आम्ही व्यापारी आहोंत, आम्हाला युद्धें, लढाया करण्याची परवानगी नाहीं.' पोर्तुगीझांचा मराठ्यांपुढें टिकाव लागणार नाहीं अशी जवळ जवळ खात्री असल्यामुळें त्यांनीं त्यांस प्रत्यक्ष मदत नाकारली; आणि त्याऐवजीं मुंबई बेटाच्या संरक्षणाकडेच जास्त लक्ष पुरविलें. पोर्तुगीझांची परिस्थिति जेव्हां दिवसेंदिवस बिकट होत चालली तेव्हां त्यांनीं इंग्रजांकडे पुनः मदतीची याचना चालविली. आपण एका धर्माचे लोक आहोंत, युरोपांत

आपल्या राष्ट्रांत सलूख आहे याची त्यांनीं इंग्रजांना आठवण करून दिली. तेव्हां रोखीच्या बोलीनें किंवा सोनें चांदीचें तारण घेऊन इंग्रजांनीं फिरंग्यांना धान्य व दारूगोळा पुरविण्याचें कबूल केलें.

इंग्रजांनीं पोर्तुगीझांस दारूगोळा पुरविल्याचा उल्लेख २०.२.३९ च्या पत्रांत आहे. ता. २४ मार्च, १७३९ रोजीं वसईच्या अधिकाऱ्यानें इंग्रजांस पत्र लिहून कळविलें कीं, 'आम्ही अतिशय संकटांत आहों, खर्चास नाहीं, गोव्याहून मदत येऊं शकत नाहीं. देवळांतील चांदी सोनेंही आटवून संपलें. तर कसेंही करून आम्हांस एक लाख रुपये कर्ज द्या, आणण्याकरितां मनुष्य पाठविला आहे.' परंतु इंग्रजांनीं रक्कम दिली नाहीं. रक्कम देण्यास आम्हास अधिकार नाहीं, असा जबाब कळविला, परंतु पैसा व दारूगोळा देण्याविषयीं पोर्तुगीझांकडून अत्यंत निकडीच्या मागण्या येऊं लागल्या, तेव्हां इंग्रजांनीं गहाण जिन्नस घेऊन ता. १७.४.३९ रोजीं पंधरा हजार रुपये कर्ज दिलें; आणि कांहीं कारागीर वगैरे लोक पाठविण्याचें कबूल केलें. त्यानंतर २८.४.३९ चें पत्र आलें त्यांत वसईच्या बचावाची आशा सुटली, असें लिहिलेलें आहे.

ता. १३.५.३९ रोजीं तह ठरून वसईचा किल्ला हातांत आला. मराठ्यांनीं आपुली कबुलात तंतोतंत पाळून शत्रूंस मोठ्या सन्मानानें वागविलें, असे प्रत्यक्ष पोर्तुगीझांचे उद्गार आहेत. सुमारें आठशें पोर्तुगीझ लष्कर वसई किल्ला खालीं करून दिल्यावर पावसाळ्यांत मुंबईस येऊन राहिलें, तें ऑक्टोबरअखेर तेथें होतें. दरम्यान त्यांच्या व इंग्रजांच्या पुष्कळ तक्रारी झाल्या. त्यांच्या खर्चासाठीं दरमहा चार हजार रुपये मुंबईचे इंग्रज कर्ज म्हणून देत असत. गलबतांची वगैरे दुरुस्ती व्हावयाची होती. चौदा हजार रुपये दिल्यावर जास्त कर्ज इंग्रज देईनात; तेव्हां ही पोर्तुगीझ फौज अन्नाशिवाय मरूं लागली. शेवटी ते कसेबसे मुंबई सोडून गेले.

पोर्तुगीझ मंदिरांत सांपडलेल्या घंटा उंची व मधुरनादपूर्ण असल्यामुळे त्यांजवर मराठ्यांची उडी पडली. "देवालयांत बांधावयास घंटा थोर दोन प्रत्येकीं वजन पक्का दोन मण ऐशाचें प्रयोजन आहे. फिरंगणांतून आणल्या असतील तर शोध करावा. नाहीं तर वसईस लिहून विकत मिळतात कीं नाहीं त्याचा शोध आणावा," अशीं पत्रें आढळतात.

"नवीन प्रदेश जिंकला, त्याचा बंदोबस्त करण्यास दहा हजार माणूस लागेल. माणूस पाईचें असलें पाहिजे." असें एक लेखक सांगतो.†

कितीही संकटें आलीं तरी त्यास न जुमानतां व पिच्छा न सोडतां, उद्योग केला म्हणजे यशःप्राप्ति झाल्याशिवाय राहत नाहीं, याचें उदाहरण वसईचा पाडाव होय. यात्र गुणांवर इंग्रजांनी आपली राज्यवृद्धि केली आहे. मराठ्यांचे अंगी इतकी चिकाटी नाही, असा पोर्तुगीझ इंग्रजांचा समज होता. पूर्वी अनेक वेळां थोड्याशा लष्करानें मराठ्यांस पळवून लाविल्याचा अनुभव असल्यामुळें पोर्तुगीझांनीं फारशी क्षिति बाळगली नाहीं. पण त्याचा भ्रम चिमाजीआपानें घालविला, ही गोष्ट पोर्तुगीझांनींच नमूद करून ठेविली आहे. चौल म्ह० रेवदंडा व मरोळ हीं दोनही ठिकाणें सोडून देऊन तेथील फौज गोव्यास आणावी, असा व्हाइसरॉयनें निश्चय केला. मराठ्यांना हीं ठिकाणे विकून पैसा मिळवावा अशीही त्यांची इच्छा होती. हीं ठिकाणें सीदीला किंवा डच सरकारला द्यावीं असें त्यांच्या मनांत प्रथम होतें. परंतु सीदीकडून त्यांचें संरक्षण होऊं शकणार नाहीं असें वाटून ती इंग्रजांना देण्याचें ठरविलें होतें; परंतु इंग्रजांचा व्यापार या वेळीं निकृष्ट स्थितींत असून मुंबईचेंच संरक्षण कसें होतें याची चिंता मराठ्यांच्या अलीकडील चढाईनें इंग्रजांस उत्पन्न झाली. म्हणून नारोराम शेणवी याचे मार्फत शाहूचे दरबारीं चौल बंदरासंबंधाने पोर्तुगीझांनी खटपट चालविली. इतक्यांत मानाजी आंगऱ्यानें चौलास वेढा घातला आणि तें त्याच्या हातीं पडण्याच्या बेतात आलें असे पाहून, पोर्तुगीझांनीं इंग्रजांस मुंबईस कळविलें कीं, चौल कोणाचे स्वाधीन करावयाचें व कसें, याचा निकाल तुम्हींच करा. त्यावरून आपण होऊन चौल बाजीराव किंवा चिमाजीआपा यांचे स्वाधीन करावें, असा इंग्रजांनीं ठराव केला. कारण बाजीरावाची इभ्रत या वेळी मोठी वाढली असून त्याचेच तंत्रानें शाहू सर्वस्वीं वागत होता. म्हणून चौलसंबंधानें शाहूशीं वाटाघाट करण्यांत हांशील नाहीं, आंगऱ्यांशीं अगर सीदीशीं वाटाघाट केली तर बाजीरावास राग येईल. सबब आपण होऊन चौल बाजीरावास द्यावें, म्हणजे आपल्याबद्दल त्याच्या मनांतला वहीम दूर होऊन, मुंबईचें संरक्षण होईल, असा ठराव ता. २५.११.१७३९ रोजी मुंबईच्या कौन्सिलनें केला. या वेळीं इंग्रजानीं पोर्तुगीझांस कळविलें, कीं शाहू व बाजीराव यांजमध्यें फूट पडण्याचा संभव नाही; आणि बाजीराव आतां सगळा किनारा काबीज केल्याशिवाय

† पे. द. ३४.२०८, २१६.

राहणार नाहीं. चौल व मरोळ हीं दोन तटबंदी स्थळें आम्हांस पचणार नाहीत. म्हणून दमण व त्याचे जवळचा थोडा प्रदेश पोर्तुगीझांनीं आपल्याकडेस ठेवून बाकीचा सर्व किनारा मराठ्यांचे स्वाधीन करावा.

९ **इंचबर्ड व गोर्डन, वकिलात** ( जून १७३९ ).—कोकणांतील व इतर ठिकाणच्या मोहिमांनीं बाजीरावाची इभ्रत व दरारा देशभर वाढलेला पाहून, त्याच्याशी दोस्ती ठेवण्यास इंग्रज किती आतुर असत हें स. १७३४ त कॅप्टिन सॅडी यास त्यांनीं पुण्यास पाठविलें त्या वेळच्या पत्रावरून दिसून येतें. पुढें साष्टी व वसई येथें मराठे-पोर्तुगीझांचें युद्ध चालू असतां मुंबईकर इंग्रजांस मोठी दहशत पडली होती. वसई पडल्यानें तर इंग्रजांची धास्ती द्विगुणित झाली. या वेळचें इंग्रजांचें दुटप्पी वर्तन चिमाजीआपाच्या चांगलेंच निदर्शनास आलें होतें; आणि मागें पुढें पेशवे आपणास त्रास देतील अशी भीति वाटून आपण होऊनच बाजीराव व चिमाजीशीं गोडी करून त्यांचा लोभ संपादन करावा, आणि आपल्याबद्दलचा त्यांच्या मनांतील कितु काढून टाकावा, अशी इंग्रजांस इच्छा होऊन त्यांनी कॅ. जेम्स् इंचबर्ड यास स. १७३९ च्या जून महिन्यांत वसई येथें चिमाजीकडे पाठविलें. सर्व गोष्टी गोडीनें बोलून त्याच्या मनांतील संशय दूर करावा आणि व्यापारवृद्धीची योजना करावी, अशी या वकिलास मुख्याची ताकीद होती. मराठे कर्ज मागतील तर आम्हांस धन्याचा हुकूम नाहीं, खंडणी मागतील तर आमचा व्यापार अगदीं बसला आहे, अशा उत्तरें वकिलानें देण्याविषयी त्यास पढवणूक मिळाली होती. त्याप्रमाणें इंचबर्ड जाऊन चिमाजीस वसई येथें भेटला. तेथें सामान्य दोस्तीचा तह करण्याची बरीच वाटाघाट झाली. ‘ इंग्रजांनी पोर्तुगीझास दारूगोळा पुरविला, मग आम्हांस कां पुरवीत नाहींत ? ’ असें चिमाजीनें विचारिलें, त्यावर दारूगोळा देण्याजोगा शिल्लक नाही असें वकिलानें चिमाजीस सांगितलें. तुम्ही परभारें शाहूस जाऊन भेटतां, आम्ही व शाहू यांजमध्यें फूट पाडतां, याजबदल चिमाजीनें इंग्रजांचा पुष्कळ निषेध केला. याप्रमाणें बरीच बोलाचाली होऊन तहाच्या १५ शर्ती ठरवून इंचबर्डनें मुंबईस कळविल्या; परंतु त्यांचें पुढें काय झालें तें कळत नाहीं. ग्रँट् डफ् म्हणतो, जुलै १७३९ त असा तह उभयतांत घडून आला. §

§ ए. टि. २.३७ ग. हॉर्न.

**गोर्डनची वकिलात** ( १२ मे – १४.७.१७३९ ).—मुंबईच्या शेजारीं मराठ्यांचें ठाणें बसलेलें पाहून इंग्रजांस मोठी चिंता उत्पन्न झाली. कुलाब्यास आंगरे व ठाण्यास बाजीरावासारखा पराक्रमी पेशवा, या दोघांच्यामध्यें आपला चुराडा सहज उडणार, याचा कांहीं तरी प्रतिकार अगोदरच करावा, या उद्देशानें मुंबईच्या कौन्सिलनें गोर्डन नांवाचा आपला एक वकील साताऱ्यास शाहूमहाराजांकडे पाठविला; आणि त्याच दिवशीं त्यांचा दुसरा वकील इंचबर्ड चिमाजीकडे वसईस गेला. गोर्डनबरोबर छत्रपतीस व दरबारी मंडळीस देण्याकरितां पत्रें व नजराणे दिलेले होते. बरोबर भिकाजीपंत नांवाचा एक दुभाष्या होता. गोर्डन यास खालील बाबतींचा तपास करण्याचा हुकूम होता.

( १ ) शाहूचा राज्यकारभार कसा चालला आहे ? कोणाच्या तंत्रानें कारभार चालतो ? दरबारांत लोक व पक्ष कोण कसे आहेत ?

( २ ) बाजीरावाचे शत्रु साताऱ्यास कोण आहेत ? ते शत्रु वजनदार आहेत असें दिसल्यास त्यांस थोडेंसें बाजीरावाविरुद्ध चिथवून द्यावें. कारण पोर्तुगीझांचा उच्छेद झाला, तसा आमचाही होण्याचा संभव आहे. म्हणून बाजीरावाचें प्रस्थ वाढूं देणें मराठी राज्यास अपायकारक आहे, अशी समजूत तेथें पसरून द्यावी. मात्र बाजीरावाचें वजन एवढें मोठें आहे कीं, विशेष अंगावर येईल अशा थरास खटपट येऊं देऊं नये. उलट आम्ही इकडून बाजीरावास सलुखाचें व वसई काबीज केल्याबद्दल अभिनंदनाचें पत्र पाठवीत आहोंच.

( ३ ) इंग्रजांसंबंधाने सातारा दरबारनें निर्धास्त असावें, अशी त्यांची खात्री करून, व्यापारी मतलबाचा तह घडवून आणण्याची खटपट करावी.

कॅप्टिन गोर्डन ता. १२ मे, १७३९ रोजीं मुंबई सोडून निघाला. ता. ८ जून रोजीं त्याची व शाहूची भेट होऊन ता. ३० जून रोजीं तो परत फिरला आणि १४ जुलैस मुंबईस दाखल झाला. नंतर त्यानें आपल्या प्रवासाची व कामगिरीची हकीकत ता. २१ जुलै, रोजीं कौन्सिलास लेखी सादर केली. तिच्यांत खालील तात्पर्यार्थ आहे. गोर्डन लिहितो, ' १२ मे रोजीं आम्ही मुंबई बंदर सोडून ता. १३ रोजीं दंडाराजपुरीस पोचलों. तेथें सीदीकडून आमचा सत्कार झाला. ता. १४ रोजीं गलबतांत बसून सीदीचे वकिलास बरोबर घेऊन श्रीपतरावाकडे जाण्यास निघालों. रस्त्यांत ता. १५ रोजीं मराठ्यांनीं आम्हांस अटक केली; आणि बाजीरावाचा किंवा चिमाजीचा परवाना ते मागूं लागले.

परंतु आमच्याजवळचीं पत्रें पाहून त्यांनीं आम्हांस सोडलें आणि त्यांचाच पहारा घेऊन आम्ही पुढें निघालों. पुढें ठिकठिकाणीं आंगऱ्यांच्या चौक्या लागल्या. ता. १९ रोजीं संभाजी आंगऱ्याचे लोक आम्हांस पकडणार होते, परंतु थोडक्यांत निभावलें. ता. २० रोजीं पारघाटानें महाबळेश्वरचा डोंगर चढलों. चढण्यास फार कठिण. ता. २२ रोजीं चांगला सपाट देश लागला. ता. २३ रोजीं साताऱ्याचे जवळ आलों. बाहेर धर्मशाळेंत मुक्काम केला.‡ ता. २५ रोजीं श्रीपतरावाचा कारभारी अंताजीपंत याची भेट घेतली. त्यानें आम्हांस पोषाख दिला, मीं त्यांस आंगठी दिली. शाहूमहाराज साताऱ्याहून पांच मुक्कामावर आहेत असें कळलें. तेथें जाण्यास निघालों. ता. २९ रोजीं मुक्काम रहिमतपुर. ता. ३१ रोजीं अमरापुरास आलों. ता. १ जून, १७३९ रोजीं Adjure Bunall येथें शाहूच्या मुक्कामावर आलों. ता. २ रोजीं श्रीपतरावाची भेट व्हावयाची पण झाली नाहीं. ती ता. ३ रोजीं झाली. श्रीपतरावानें मुंबईच्या तटबंदीची व बंदोबस्ताची कच्ची हकीकत विचारून घेतली. 'आम्ही कां आलों, बाजीरावाच्या भीतीनें आलों कीं काय?' असें श्रीपतरावानें विचारलें. 'नवीन गव्हर्नर आल्यानें स्नेह जोडण्याकरितां आलों, असें मीं सांगितलें. ता. ७ रोजीं महादाजीपंत पुरंदरे यानें बाजीरावाकडून आलेलीं पत्रें शाहूस दाखवून आमच्या भेटीची गोष्ट काढिली. त्या वेळीं विचार चालला, कीं 'इंग्रजांशीं स्नेह करावा कीं नाहीं?' त्याजबद्दल बाजीरावास वैषम्य वाटेल कीं काय?'

ता. ८ रोजीं आमची व शाहूची भेट झाली. शाहू त्या वेळीं तंबूंत राहत असून लढाईवर होता. भेटीची जागा अगदीं घाणेरडी होती. भेट चांगली झाली. परंतु श्रीपतराव व अंताजीपंत यांचेमार्फत भेटीस आलों ही चूक केली असें मग वाटलें. विरूबाई आम्हांस भेटली नाहीं. तिचीं पत्रें व नजराणे तिला पाठवून दिले. नंतर नारोरामची भेट घेतली. त्यानें आम्हांस बाजीरावाचा मुलगा नानासाहेब याची भेट घेण्यास सांगितलें. इतक्यांत बाजीरावाकडचीं पत्रें आलीं कीं नादीरशहा दक्षिणेंत मराठ्यांवर चालून येतो अशी वदंता आहे. तेव्हां शाहू राजा डोक्यावरचें पागोटें काढून म्हणाला, 'वसई काबीज करण्यांत माझे बावीस हजार शूर लोक पडले, त्यांचा मोबदला वसई देईल

‡ आज शनिवार २४ नोव्हेंबर रोजीं नानासाहेबाची व गोर्डनची भेट झाली. कुशल प्रश्न जाइले. बोली पुढें होईल. पु. द. १. १३३.

काय ? ' नंतर आम्ही नानासाहेबांची गांठ घेतली. ' भेटीस येण्याचें कारण काय ? ' असें नानानें विचारिलें. आमचें उत्तर त्यास समर्पक वाटलें नाहीं. आम्ही शाहूचे भेटीस परभारें आलों हें त्यास आवडलें नाहीं. ता. १० जून रोजीं यशवंतराव महादेव पोतनीस, जिवाजी खंडेराव चिटणीस व फत्तेसिंग भोसले याच्या भेटी घेतल्या. ता. १८ जून रोजीं नादीरशहा परत गेल्याची खबर आली. मराठ्यांस भिऊन तो पळून गेला याबद्दल शाहूनें दरबार भरवून बक्षिसें वांटलीं. ता. १९ रोजीं व्यंकटराव घोरपडे गोव्याचे स्वारीहून परत आला. शाहूची व त्याची भेट झाली. पोर्तुगीझांनीं त्यास दंड भरून तह करून घेतला असें कळतें. मराठे दिल्लीवर चाल करून जाणार अशी खबर शाहूस आली.

आम्हास परत जाण्यास रजा द्या, म्हणून वारंवार विनंति केल्यावर ता. २५ जूनला शाहूनें पुनः आमची भेट घेऊन आम्हांस निरोप दिला. आपले दोस्त मुंबईचे गव्हर्नर याना सांगा, ' मोठ्या बदकांच्या आठ माद्या, दोन टर्की, बसऱ्याचीं खबुतरें, आणि दुसरे कांहीं चमत्कारिक पक्षी असे आम्हांस पाठवून द्या. ' माझ्याजवळ तरवार होती ती शाहूमहाराजांस फार आवडली म्हणून मीं ती त्यांस दिली. याप्रमाणे शाहूची रजा घेऊन ता. २६ रोजीं सर्व मोठमोठ्या अंमलदारांच्या व बाळाजी बाजीरावाच्या निरोपाच्या भेटी घेतल्या. ता. २७ रोजीं आमच्या बरोबरच्या एका गृहस्थास शाहूमहाराजांनीं बोलावून, आणखी कांहीं वस्तु आमच्याजवळ नजर देण्याजोगा आहेत किंवा काय, याचा तपास केला. त्याजवळ महाराज म्हणाले, ' तुम्ही सालस लोक आहां. व्यापाराशिवाय तुमचा दुसरा हेतु नाहीं. धर्मसंबंधात तुम्ही कोणास जाच करीत नाहीं. सबब वसईकडील नवीन जिंकिलेल्या प्रदेशांत आम्हांस इंग्रजांचा उपयोग चांगला होईल. परंतु हा सर्व व्यवहार आम्हीं बाजीरावावर सोपविला आहे; आम्ही त्यांत पडत नाहीं. पण तुम्हांस जर असे शांत भावानें दिवस काढावयाचे म्हणतां, तर आमचे नोकर जे आंगरे त्यांच्याशीं कलह करण्याचें तुम्हांस प्रयोजन काय ? ' हें बोलणें, गोर्डन म्हणतो, मला कळल्यावर मी पुनः त्या इसमास महाराजांकडे पाठवून सांगितलें कीं, ' आंगऱ्यांशीं भांडण उपस्थित करण्याची आमची बिलकूल इच्छा नाहीं. केवळ आमच्या व्यापाराच्या संरक्षणासाठीं आम्हांस एवढी मोठी फौज बाळगावी लागत आहे. पोर्तुगीझ तरी आमचे स्नेही व शेजारी म्हणून त्यांस मदत करणें आम्हांस भाग पडलें.

आतां आपणांस जय मिळालाच आहे, तेव्हां आपल्याशीही आम्ही स्नेह-भावानेंच वागणार!'

गव्हर्नराच्या पत्रांचे जबाब महाराजांकडून ता. ३० जून रोजीं माझ्या हातीं पडले आणि आम्ही परत निघालों, ते प्रथम पुण्यास आलों. पुण्याकडील प्रदेश मला फारच सुपीक दिसला. पुण्यास तोफा व गोळे करण्याचा कारखाना आहे तो पाहिला. हे सामान ते चांगलें करितात असें कळलें. तेरा इंची गोळ्यांचा सांचा होता. लोखंड सुद्धां येथें तयार करितात. बाजीरावाकडून कोष्टी लोकांना चांगलें उत्तेजन मिळतें; आणि नानाप्रकारचें उंची कापड येथून मुंबई वगैरे ठिकाणीं बाहेर जाऊन विकतें. प्रदेश चांगला लोकवस्तीनें गजबजलेला असून इतर प्रांतांच्या मानानें येथें रयतेवरील सारा माफक आहे. ता. १३ जुलै रोजीं आम्ही ठाण्यास पोंचलों. तेथील मराठ्यांच्या अधिकाऱ्यानें आमची बरदास्त चांगली ठेविली. ता. १४ रोजीं आम्ही मुंबईस पोंचलों.

गोर्डन म्हणतो, " एकंदर माहितीवरून मला असें कळलें, की ठाणें, साष्टी, वसई वगैरे ठिकाणें काबीज केल्याबद्दल शाहूमहाराजांना मोठा आनंद झाला. वसई सर करण्यास महाराजांची परवानगी घेतलेली नव्हती. पोर्तुगीझ लोकास समूळ काढून लावणें महाराजांस पसंत नव्हतें. परंतु बाजीराव कोणासच जुमानीत नसल्यामुळें बाहेरून त्याच्याशी गोडी दाखविणें महाराजांस भाग पडतें. बाजीरावाचे अंतस्थ हेतु काय आहेत ते मला कळले. पण लोकांचा सामान्य समज आहे, की मुंबईवर बाजीरावाचा डोळा नाहीं. नवीन जिंकलेल्या प्रदेशाच्या सुधारणेसाठीं इंग्रजाची त्यास जरूर आहे. एकंदरींत मराठ्याच्या दरबारात इंग्रजांसंबंधानें कोणाची द्वेषबुद्धि असलेली आढळून आली नाहीं. पुष्कळांचा समज असा आहे, की छत्रपतीपासून आपण स्वतंत्र व्हावें असा बाजीरावाचा रोख दिसतो. मोगलांच्या राज्यांतून पुष्कळसा पैसा मिळवून मोठी फौज तयार करावी अशी बाजीरावाची निकड चालू आहे. अंतोबा नाईक भिडे नांवाचा एक पुण्याचा प्रसिद्ध व्यापारी बाजीरावाच्या मर्जीतला असून त्याची इच्छा आपला एक मुनीम मुंबईस ठेवावा अशी आहे.

" मला असें आढळून आलें कीं, लोक लढाईस गेल्यामुळें पुष्कळ शहरें ओस पडलीं आहेत; आणि कित्येक टिकाणीं मोठमोठ्या फौजा तयार आहेत. शाहूमहाराजांजवळच स्वतःची अशी वीस हजार फौज असून शिवाय कारागीर, दुकानदार वगैरे पुष्कळच आहेत. बाजीरावाची फौज चाळीस हजार आहे;

पण तिजपैकीं गोव्याचे बाजूस किती व या बाजूस किती याचा अंदाज मला लागला नाहीं. मराठे सरदार मोठमोठ्या फौजा तेव्हांच तयार करूं शकतात. बाजीरावाचे बेत बाहेर कोणासही कळत नाहींत. हुकूम होईल त्याप्रमाणें लोक निमूटपणें वागतात. सारांश, सर्व सत्ता बाजीरावाच्या हातांत आहे. परभारें शाहूमहाराजांकडे आपण खटपट केली तर ती बाजीरावास आवडणार नाहीं. नुसत्या आलेकम सलामीचा व्यवहार परभारें करण्यास हरकत नाहीं. शाहूमहाराजांची दरम्यानगिरी नसेल तर सातही प्रधानांस बाजूस ठेवून आपला हुकूम अमलांत आणण्याचें सामर्थ्य आज बाजीरावास आहे. येथून नेलेल्या सर्व जिनसा मीं वांटून दिल्या. तेथून मला नजर मिळालेल्या जिनसांची किंमत सुमारें दोनशें चाळीस रुपये आहे." उघड आहे, इंग्रजांचे वकिलास पाहुणा म्हणून बोलावलेलें नव्हतें; आणि त्या वेळीं इंग्रज कांहीं राज्यकर्ते नसून केवळ व्यापारी होते. इंग्रजांशीं स्नेह ठेवावा अशीं पत्रें शाहूनें बाजीरावास गोर्डनजवळ दिलीं होतीं. गोर्डनच्या भेटीनंतर दहा महिन्यांनीं बाजीराव मरण पावला. त्यामुळें इंग्रजांची धास्ती कांहीं कमी झाली असली पाहिजे.

**१० इंचबर्ड-बाजीराव भेट** (ता. १० जाने., स. १७४०).—वसईचा संग्राम तह होऊन मिटला, तरी कित्येक तक्रारी मागें राहिल्या. चौल व कोरलई ही स्थळें अलीबागच्या सन्निध असलेली पोर्तुगीझांचे कबजांत होतीं, तीं मराठ्यांना पाहिजे होतीं. शिवाय गोव्याचे बाजूचीं कित्येक ठाणीं मराठ्यांचे कबजांत होतीं तीं पोर्तुगीझांना सोडवायचीं होतीं. ही कामगिरी त्यांनी मुंबईच्या गव्हर्नरामार्फत चालू केली. सातारच्या छत्रपतीकडे परभारें बोलणें करून आपला उद्देश सिद्धीस न्यावा अशी पोर्तुगीझांची इच्छा होती, पण गव्हर्नर स्टीफन लॉ यानें त्यांस कळविलें, सर्व सत्ता बाजीराव पेशव्याचे हातीं असल्यामुळें शाहूकडे शिष्टाई करण्यापासून कांहीं उपयोग होणार नाहीं, याचा अनुभव पूर्वीच आम्हांस येऊन चुकला आहे. तुमची कबुली असेल तर आम्ही बाजीरावाकडेच शिष्टाई करून निकाल करून घेऊं. त्यावर पोर्तुगीझांनी मुंबईच्या गव्हर्नरास बाजीरावाकडे बोलणें करण्यास सांगितले. तदनुसार गव्हर्नरनें कॅ. इंचबर्ड यास मुंबईहून बाजीरावाचे भेटीस पुण्यास पाठविलें. पण बाजीरावाचा मुक्काम स्वारींत गोदावरीचे बाजूस होता. पुण्याहून शंभर कोस प्रवास करून इंचबर्ड बाजीरावाचे भेटीस गेला. ता. १४ जानेवारी, स. १७४० रोजीं त्यांची भेट होऊन बोलणें झालें त्यात बाजीरावानें खालील कलमे इंचबर्ड यास कळविलीं—

१ साष्टी बारदेशांत ठाणीं व अंमल आहे तो इकडून दूर करावा;

२ रेवदंड्याचा कोट (म्ह. चौल) व कोरलईचा कोट फिरंग्यानें मराठ्यांस द्यावे;

३ दवणेचा कोट फिरंग्यांकडे असों द्यावा.

४ वसई, दवण, ठाणें, साष्टी, बेलापुर वगैरे आमचे मुलकांत फिरंग्यांनीं उपसर्ग न करावा, त्याचे वजा साष्टी बारदेशास इकडून उपसर्ग न करावा.

५ फोंडे प्रांत व जांबावली पंचमहालच्या कामकाजास इकडील साहित्य करावें. आमचा प्रात ते प्रांती होईल त्याचे वाटेस त्यांनीं नव जावें.

६ आंगरे याजपाशीं आम्ही कजिया करूं तेव्हां इंग्रज फिरंग्यांनी आपले आरमारानशीं आमचें साहित्य करावें.

७ साष्टी बारदेशांत महाराष्ट्र धर्म ज्यांचा ते करतील, त्यास फिरंगीयानें चालवावें. देखील गोव्यांत महाराष्ट्र धर्म चालवावा.

८ दर्यात आमचे तारूंतरांडियांस फिरंग्यांनी हरकत न करावी; त्यांचे तारूंतरांडियांस आम्ही हरकत करणार नाहीं.

हीं कलमें पुढें नानासाहेबानें ता. ७ सेप्टेंबर, स. १७४०चा तह करून कायम केलीं. मात्र त्या तहांत महाराष्ट्रधर्मविषयक वरील ७ वें कलम गाळण्यांत आलें. वरील ६ वें कलम म्हणजे तुळाजी आंगऱ्याचे संहाराचा उपक्रम होय. कलम ५ हें वारणेच्या तहाविरुद्ध कोल्हापुरकर संभाजीला आळा घालण्याच्या उद्देशानें घातलेलें दिसतें. त्यांतच कर्नाटकात मराठी सत्ता वाढविण्याचा इरादा व्यक्त होतो.

वरील ७ सेप्टेंबर, स. १७४० च्या तहाअन्वयें रेवदंडा म्हणजे चौल व कोरलई हे दोन कोट नोव्हेंबरांत पेशव्याचे कबजांत आले.

वसईच्या युद्धांत अनेक लहान मोठे स्मरणीय प्रकार घडले ते अस्सल कागदांतूनच वाचले पाहिजेत. युद्धांत युरोपियनांस जिंकल्यामुळें मराठ्यांचा वचक सर्व देशांत बसून त्यांची सत्ता स्थिर झाली. इतर सत्ताधीश व जनता मराठ्यांना व मुख्यतः बाजीराव-चिमाजींना सन्मनानें वागवून त्यांच्या आज्ञा पाळूं लागले. इंग्रजांना दहशत बसली, म्हणूनच प्लासीच्या किंवा घेरियाच्या युद्धानें मराठी सत्तेचा एकदम नाश झाला नाहीं. वसई जिंकल्याबद्दल सर्व मराठमंडळास पुढें मराठी राज्याच्या अंतापर्यंत अप्रतिम अभिमान वाटत असे. राघोबाच्या कारवाईत साष्टी बेट इंग्रजांकडे गेलें पण खुद्द वसईचें ठाणें

गेलेलें परत मिळालें, म्हणूनच दुसऱ्या बाजीरावानें आपल्या मालकीच्या वसईत बसून इंग्रजांचा आश्रय केला. व्यंकटराव घोरपडे गोव्याचा तह पुरा करून व चिमाजी वसईचा पुरा करून जूनअखेर साताऱ्यास शाहूचे दर्शनास गेले, त्या वेळी शाहूनें त्यांचा अंतःकरणपूर्वक गौरव केला, त्याचप्रमाणें लहान मोठ्या सरदारांकडून त्यांजवर अभिनंदनांचा वर्षाव झाला तो कल्पनेनेंच ओळखला पाहिजे. एक गृहस्थ चिमाजीस लिहितो, ' वसई फत्ते झाल्याचें पत्र स्वहस्ताक्षरें पाठविलें तें पावोन परमानंद झाला तो पत्रीं कोठवर लिहावा ! आपल्या-पुण्यास व प्रतापास जोडा नाही. ऐसें महत्कृत्य अभूतपूर्व व अन्यास अगम्य आहे. आपल्या मस्तकीं देवब्राह्मणांचा आशीर्वाद परिपूर्ण आहे म्हणोन अशीं महत्कृत्यें घडोन येतात. " दुसरा एक गृहस्थ लिहितो.—

' यंदा पाऊस सर्वत्र बहुत जाला; रयत आनंदमय जाली. दुसरी गोष्ट तोहमासकुलीखान माघारा गेल्यामुळें सावकारांस व रयतीस उमेद आली. आपण वसई फत्ते केली. ऐशा तीन गोष्टी बहुत उत्तम जाल्या. यावेगळें गोव्याकडील कामकाज होऊन चार टक्के हातास लागले. तस्मात् स्वामी उभययतां पूर्णब्रह्म अवतार या कलियुगामधें आहेत. ऐशी कार्यें मनुष्यापासून व्हावीं ऐसें नाही. रायांच्या प्रतापे तोहमासकुलीखान गेला, आपल्या प्रतापें वसईचें व गोव्याचे कार्य जालें. तपस्वी आहेत त्यांस मात्र स्वामींची स्वरूपे कळली. इतरांस श्रीकृष्ण मनुष्य दिसत होता, फक्त विदुर, अक्रूर व भीष्म यासच तो पूर्णब्रह्म दिसे. तैसे स्वामी योग्यांस दिसतात. " ¶

केलें हेंच पुष्कळ असे समाधान मानणें मात्र प्राप्त आहे. मराठ्यांनी मनांत आणलें असतें तर या वेळीं पोर्तुगीझ सत्ता पश्चिम किनाऱ्यावरून साफ उखडून देणें त्यांस अशक्य नव्हतें. पण सर्वांनीं गुण्यागोविंदानें एकत्र नांदावे, आपण जगावें तसेंच दुसऱ्यांस जगवावें ही प्राच्यांची उदात्त नीति हिंदूंच्या मनांत सदैव जागृत होती हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

¶ पे. द. १६. १७२, १७७

## १३

# अविशिष्ट बाबती

## कालसूची

| | |
|---|---|
| १७०९ | परसोजी भोसले मृ० पुत्र कान्होजी रुजू. |
| १७१७ जाने० २४ | कान्होजीस वऱ्हाड खानदेशचा मुकासा. |
| १७२७ मे १८ | भोसले बंधूंचा तह शाहूने ठरवून दिला. |
| १७२८ | कान्होजीची बंडखोरी. |
| १७३० | शाहूने कान्होजीस पकडून साताऱ्यावर कैदेंत ठेविलें. |
| १७३५ फेब्रु० ४—एप्रि० ३ | बाजीरावाने कुलाब्यास जाऊन आंगऱ्याची व्यवस्था ठरवून दिली. |
| १७३५ | शाहूनें रघूजीस नरम केलें. |
| १७३७—१७४० | शाहूची मिरजेवर स्वारी. |
| १७३९ ऑक्टो० ३ | मिरज काबीज. |
| १७३९ नोव्हें० ८ | आथणीचें ठाणें काबीज. |
| १७३९ डिसें० १२ | बाजीरावानें नासिरजंगावर स्वारी केली. |
| १७४० फेब्रु० २७ | नासिरजंगाचा पराभव ; बाजीरावाशीं तह. |
| ,, मार्च १२ | नासिरजंग बाजीराव भेट औरंगाबादेस. |
| १७४० एप्रिल | चिमाजीनें संभाजी व मानाजी आंगरे यांचा कलह तोडला. |
| ,, सेप्टें० ७ | चौल व कोरलाई हस्तगत. |
| १७४२ जाने० १२ | संभाजी आंगरे मृ. |

# १३

# अविशिष्ट बाबती

१ कान्होजी भोसले बंडावा, रघूजी
३ आंगरे बंधूंचा कलह
४ बाजीरावानें ठरविलेली व्यवस्था
६ गोदावरीचें युद्ध, नासिरजंग
२ शाहूची मिरज स्वारी, प्रयोजन–लभ्यांश
५ संभाजीचा मृत्यु–मानाजी आंगरे

**१ कान्होजी भोसले बंडावा, रघूजी.**—बादशाही कैदेंतून सुटून शाहू दक्षिणेंत आला, तेव्हां त्यास पहिली मोठी मदत परसोजी भोसल्याची मिळाली. ती मदत मिळाली नसती तर शाहूचा जम बहुधा इकडे बसला नसता. अर्थात् परसोजीचें घराणें शाहूच्या कृपेनें उदयास येऊन मराठशाहीच्या इतिहासांत त्याचा कार्यभाग मोठा बनला. पेशव्यांचे विरुद्ध वागणाऱ्या सरदारांत हे नागपुरकर भोसले अग्रगण्य होत. पुढील संदर्भासाठीं या घराण्याची आरंभींची माहिती येथेंच संक्षेपानें देणें जरूर आहे.

परसोजी भोसले शिवाजीचे तालमींत तयार झालेला असून, वऱ्हाड व गोंडवण प्रांतांत त्यानें मराठ्यांचा अंमल बसविल्यामुळें राजारामानें स. १६९९ त त्यास सेना–साहेबसुभा हा किताब देऊन वऱ्हाडांत ठेविलें. तिकडे त्यानें वणी तालुक्यांत भाम येथें आपलें मुख्य लष्करी ठाणें केलें. नागपुरास येण्यापूर्वी भाम हेंच त्याचें मुख्य ठिकाण होतें. स. १७०७ त परसोजी शाहूस मिळाल्यानें त्या घराण्यावर शाहूची मर्जी अखेरपर्यंत विशेष होती. परसोजी ता. ६.१०.१७१० पूर्वी कृष्णा वेण्यासंगमीं मरण पावल्यावर त्याचा अधिकार कान्होजीस मिळाला, तो त्यानें २० वर्षे म्हणजे १७२९ पावेतों चालविला. कान्होजीनें वऱ्हाडांत अंमल बसवून गोंडवण व कटक या प्रांतांवर स्वाऱ्या केल्या, आणि अनेक प्रकरणांत शाहूस मदत केली. या घराण्याचा उत्कर्ष होण्यास सर्वस्वी शाहू कारण होता, पेशव्यांचें त्यांत बिलकूल अंग नव्हतें; म्हणून या भोसल्यांनीं पेशव्यांस जुमानिलें नाहीं. ही उभयतांतील चुरस मराठशाहींत बहुत काळ कायम होती. बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला तेव्हां त्याजबरोबर संताजी व राणोजी

शाहूच्या हुकुमानें गेले होते. तेथें लढाईत संताजी मारला गेला, तेव्हा बादशहानें नुकसानभरपाई देऊन राणोजीस 'सवाई संताजी' हा किताब दिला. कान्होजीस प्रथम मुलगा नव्हता, म्हणून चुलत बंधु बिंबाजी याचा मुलगा रघूजी यास त्यानें जवळ ठेवून वाढविलें. पुढें

**वंशावळ, नागपुर भोसले**

मुधोजी
- बापूजी
  - बिंबाजी, संताजी, राणोजी
    - ३ रघूजी (बिंबाजीचा पुत्र)
- १ परसोजी
- साबाजी=रामाऊ
  - २ कान्होजी
    - रायाजी

कान्होजीस औरसपुत्र झाला, तेव्हा रघूजीवरील त्याचें लक्ष कमी झालें. नंतर रघूजीनें साताऱ्यास येऊन रामाजी नारायण कोल्हटकराचे शिफारसीनें शाहूची मर्जी संपादिली. एका प्रसंगीं शाहू शिकारीस गेला असता रघूजीनें तलवारीनें वाघाला ठार मारून शाहूचा जीव वांचविला, तेव्हांपासून शाहूचा लोभ त्याजवर विशेषच जडला.

स्वराज्याबाहेरील प्रदेशावर चौथाई सरदेशमुखीचे हक्क वसूल करण्याचीं क्षेत्रें शाहूनें दक्षिणेत येतांच निरनिराळया सरदारांस वांटून देण्याचा उपक्रम सुरू केला, त्याची बजावणी बाळाजी विश्वनाथानें अमलात आणिली. या हक्काना मुकासा म्हणत. वऱ्हाड, खानदेश, नेमाड, हंड्या, माळवा, भागानगर या प्रदेशाचा मुकासा ता. २४ जानेवारी, स. १७१७ रोजी कान्होजीस दिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. यापूर्वीच शाहूनें चांदा देवगडचें गोंडांचें राज्य कबजात घेतलें होतें. या गोंडाना जिंकण्याचा प्रयत्न औरंगजेबानें पन्नास वर्षे केला, तो सिद्धीस गेला नाही. बहुधा शाहू बादशहाच्या कैदेंत असल्यापासूनच या गोंड राजांशीं शाहूचें सख्य होते. शाहूचा ताबा पुरवला पण मोगलांचा शह नको, अशी या गोंडांची भावना होती. गोंडांचे युद्धांत हैबतराव निंबाळकर मारला गेल्याचा उल्लेख पूर्वी आला आहे.† हें गोंडांचें प्रकरण सांभाळण्याचें काम शाहूनें कान्होजी भोसल्यास सांगितलें, त्यांना जिंकून भोसल्यांनीं आपलें वास्तव्य नागपुरास केलें.

बाजीराव पेशवाईवर येईपर्यंत कान्होजीवर नियंत्रण नव्हतें. तो स्वेच्छाचारी बनला. पुढें बागलाण, खानदेश, माळवा या प्रांतांत बाजीरावानें मुलूखगिरी

† बा. वि. पृ. ९९

सुरू केली तेव्हां एकमेकांच्या क्षेत्रांस उपसर्ग लागून कान्होजीशीं त्याचा विरोध उत्पन्न झाला, तो शाहूला साताऱ्यांतून मिटवितां आला नाही. चांदाचें निमे राज्य कान्होजीनें जिकलें होतें ते एक लाख रुपये नजराणा व दहा हजार सरदेशमुखी घेऊन चांदेकरास परत द्यावें असा हुकूम शाहूनें ता. ११ मे, १७२२ रोजीं सोडला, आणि कान्होजी हुकूम मानणार नाही म्हणून तें काम बाजीरावास सांगितलें. कान्होजी निजामाकडे फितुरी करतो असा संशय शाहूस आला. शाहूनें त्याची कानउघडणी केली तेव्हां अल्पकाळ तो आज्ञेंत वागूं लागला. मुबारीझखान व निजाम यांचें युद्ध झालें त्या प्रसंगांत तो शाहूच्या आज्ञेबाहेर वागला नाहीं. पण नंतर लवकरच त्याचें निजामाशी संगनमत चालू झाल्यामुळें स्वतः शाहूनें स. १७२५ त त्याजवर स्वारी केली. कांहीं थोड्या चकमकी झाल्यावर शाहूनें त्यास भेटीस आणून समजूत केली, आणि बाजीरावाबरोबर कर्नाटक स्वारींत पाठविलें.

दरम्यान कान्होजी व रघूजी या चुलते पुतण्यांचा कलह जुंपला. पूर्वी मसूरचे मुक्कामीं बाळाजी पंडित प्रधान यांचे विद्यमानें शाहूनें स. १७१३ चे सुमारास कान्होजीस सरंजाम करून दिल्हा होता, त्यापैकीं पुढें शाहूनें दोन भाग कान्होजीस देऊन तिसरा भाग राणोजी व रघूजी या दोघास ठरवून दिला, त्यानें कान्होजीचें समाधान झालें नाही. आपल्या सरंजामाचा निकाल करून द्या, असा लकडा कान्होजीनें शाहूकडे जोरानें लाविला होता. तेव्हां पराभव संवत्सराचे मार्गशीर्षांत म्हणजे नोव्हेंबर १७२६ त त्याच सरंजामाचे तीन हिस्से कान्होजीस व चौथा हिस्सा राणोजी व रघूजी या दोघांस शाहूनें विभागून दिले; आणि पुढ लवकरच कान्होजीस दर्शनास बोलावून त्रिवर्गाची गोडी करून, राणोजी व रघूजी यांनी कान्होजीबरोबर राहून स्वामिकार्य निष्ठेनें करावे असें शाहूनें ता. १८.५.१७२७ रोजीं लेखी ठरवून दिलें.

इकडे बाजीरावानें माळव्याचा उद्योग चालविला, तेव्हा त्यास वऱ्हाडांतून भोसल्यांचे पाठबळाची जरूर लागली. परंतु कान्होजी त्याच्याशीं फटकून वागत असल्यामुळें राणोजी ऊर्फ सवाई संताजी यास वश करून त्याजबरोबर ता. ७.१०.१७२८ रोजीं बाजीरावानें करार केला, कीं राणोजीनें फौज घेऊन चिमणाजी आपास माळव्यांत सामील व्हावें; आणि तसें केल्यास उभयतांनीं एकमेकांचे मुकाशांत उपद्रव करूं नये. पेशव्यांच्या मोकासबाबी वऱ्हाडांत व भोसल्यांच्या दक्षिणेंत पेशव्यांचे हद्दींत असत. हा राणोजीनें बाजीरावाशीं

केलेला करार कान्होजीस बिलकूल आवडला नाहीं. त्याजला भेटून तंटा मिटवावा म्हणून बाजीरावानें आपले दोन सरदार कान्होजीकडे पाठविले असतां, त्यांजबरोबरच कान्होजीनें कलह केला, तेव्हां ही तक्रार बाजीरावानें शाहूकडे नेली. पालखेडावर बाजीरावाची चढाई झालेली पाहून कान्होजी महाराजांशीं बंडखोरी करून राज्यांतून निघून गेला. शाहूनें त्याचा सरंजाम काढून पुत्र रायाजीस दिला. कान्होजीची समजूत घालण्यांत शाहूनें शिकस्त केली. सं. १७२९ चे आरंभीं पिलाजी जाधवास कान्होजीचे भेटीस पाठवून त्यास देवगडावर चालून जाण्याची आज्ञा केली. पण कान्होजीकडून तें काम झालें नाहीं, तेव्हां बाजीरावानें देवगडास जाऊन स्वतःच तिकडील कार्यभाग लगोलग सिद्धीस नेला. त्यावरून कान्होजी नाराज होऊन निजामास भेटला. पण निजामाकडेही त्याची पत राहिली नव्हती. 'मोगलाईत याल तर भीक मागाल' असें त्यास सुमंतानें बजावलें. बापूजी सोनाजी दिघे भोसल्यांचा पिढीजाद हितचिंतक हयात होता त्यास शाहूनें बोलावून कान्होजीचे समजुतीस पाठविलें. पण हाही प्रयत्न पूर्वीसारखाच निष्फळ झाला, तेव्हां शाहूनें रघूजीस त्याजवर पाठवून स. १७३० त पकडून आणून साताऱ्च्या किल्ल्यावर बंदोबस्तांत ठेविलें. तेथेंच बंदींत असतां तो पुढें सात वर्षांनीं मरण पावला. स. १७३६ त तो कैदेंतून पळून गेला, पण पुनः रघूजीनेंच त्यास पकडून परत आणिलें. अशी या कर्तबगार पुरुषाची कहाणी मराठ्यांच्या सामान्य स्वभावाची निदर्शक आहे. †

वास्तविक सेनापति दाभाड्याप्रमाणें कान्होजीचा परिणाम विकोपास गेला नाहीं हे भाग्य. रघूजीनें त्यास युक्तीनें पकडलें म्हणून हा परिणाम टळला. रघूजी जास्त धूर्त होता, म्हणून पेशव्याशीं फटकून वागूनही त्यानें आपलें स्वतंत्र बस्तान नागपुरास थाटलें. "राणोजीनें आपलें कुल काम रघूजीचे गळा घातलें. कान्होजींनी शाहूमहाराजांची मर्जी बिघडवून चित्तींचे उतरले. वऱ्हाड प्रांतीं बदफैली व जुलूम करून महाराजांशीं बंडखोरी करूं लागले.

† वरील बनावाचे आधार प्रचुर व विखुरलेले आहेत. त्यांचा एकत्र निर्देश असा. नागपुर इ०, ऐ० प० ९ व पृ. ४२०, पे. द. २० ले. १ A व B व ३–५; २० ले. १७; पे. द. ३० ले. ३०, ३४४, १७, १७ A व पृ. २७५; इ. सं. पे. द. पृ. १४ व १८५; शा. रो. ४१, १५७, २३, २४, २७, १६३, १११, ४१; तह व करारमदार पृ. २२०; पे. द. २०.१०; पे. द. १३.२८,३८, ४५; पे. द. १०.७३ असे आणखी पुष्कळच आहेत.

सबब त्यांचे पारिपत्यास रघूजीस पाठविलें. काबीज करून सातान्यास घेऊन आले. तेथेंच कान्होजी कैदेंत वारले. रघूजीस सेनासाहेब सुभा पद दिलें." कान्होजी व रघूजी यांचे युद्धाचा हा प्रकार स. १७३४ त अगर त्यापूर्वी कांहीं काळ झालेला दिसतो. रघूजीनें कान्होजीच्या दोघां मुसलमान सरदारांस लढाईत पकडून कैदेंत ठेविलें हें शाहूस मंजूर झालें नाहीं. त्यानें ता. २३ जून, १७३४ रोजीं रघूजीस आज्ञापत्र पाठवून त्या सरदारांस सातान्यास आणविलें. तसेंच कान्होजीचा कबिला ज्या ठिकाणीं होता, त्यास रघूजीनें मोर्चे लाविले, त्याबद्दल शाहूनें रघूजीस मनाई हुकूम पाठविले. कान्होजीवर जरी शाहूची इतराजी झाली, तरी त्याचे माणसांवर व साथीदारांवर दुसऱ्यानें सूड घ्यावा ही गोष्ट शाहूस कधींच संमत नसे. काय शिक्षा करणें ती आपण करूं, इतरांनी तो अधिकार आपल्या हातांत घेण्याचें कारण नाहीं, ही शाहूची भावना अनेक प्रसंगीं व्यक्त झाली आहे. शाहूचा मृदु स्वभाव यांत दिसून येतो. रघूजी सुद्धां लवकरच धन्याचे हुकूम धाब्यावर बसवूं लागला, त्याबद्दल शाहूनें स. १७३५ पासून अनेक वेळां त्याची कानउघाडणी केलेली आढळते. वर सांगितलेला बापूजी सोनाजी दिघे हा गृहस्थ भोसल्यांचे पदरीं पुष्कळ वर्षे जबाबदारीनें कामें करीत होता हेंही अनेक कागदांवरून दिसून येतें.

कान्होजीचा पराक्रम मावळल्यावर रघूजीला पुढें येण्यास वाव मिळाला. कान्होजी व रघूजी दोघेही शूर व पराक्रमी, पण कान्होजी हेकट तर रघूजी धूर्त व सावध. पेशव्यांशीं किंवा छत्रपतीशी वंचना करण्याची बुद्धि दोघांतही होती, पण रघूजीला प्रसंग ओळखून माघार घेण्याची हातोटी होती ती कान्होजीला नव्हती, म्हणून कान्होजी फसला आणि रघूजी अत्यंत यशस्वी झाला. पूर्व हिंदुस्थान व समग्र गोंडवन रघूजीनें जिंकून नागपुरचें राज्य त्यानें बळकट बनविलें. मात्र मराठशाहीचे मुख्य उद्देश बाजूस ठेवून मध्यवर्ती सत्तेशीं फटकून वागण्याची वृत्ति त्यानें कायम ठेविल्यामुळें त्याचें राज्य तर दुर्बल बनलेंच, पण त्याची बाधा एकंदर मराठी राज्यास झाली. रघूजीच्या पश्चात् ही वृत्ति विशेष स्पष्ट दिसूं लागली.

शाहूनें रघूजीचा वारंवार निषेध केलेला आढळतो. 'तुम्हांस ऐवजाविषयीं वरचेवर आज्ञापत्रें पाठविलीं असतां, तुम्हीं निकाल करून पाठविला नाहीं. डोळे-झांकी करून दिवस घालविल्यानें परिणाम लागतो असें नाहीं. यास्तव हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी सालगुदस्त व सालमजकूरचे ऐवजाचा निर्वाह करून

सितापीनें पाठविणें. ही गोष्ट तुम्हांपासून होत नाहीं तर स्वामी विचार करणें तो करितील, मग तुम्हांस विचार भारी पडेल. हें जाणून वर्तणूक करणें.' (ता. १२.१.१७३५). 'तुम्हांस दर्शनास येणें म्हणून दोन चार आज्ञापत्रें सादर केलीं असतां यावयाचा विचार केला नाहीं, यावरून अपूर्व वाटतें. हुजूर यावया अनमान करिता हे गोष्टी कार्याची नाहीं. तुम्हास कित्येक प्रयोजन प्रसंगाची आज्ञा कर्तव्य आहे. तरी जे क्षणीं पत्र पावेल, ते क्षणीं स्वार होऊन टाकोटाक स्वामिसंनिध येणें.' (ता. १२.९.१७३५). यावरून प्रत्यक्ष शाहूमहाराजांसही रघूजी किती जुमानीत होता हें दिसून येतें.‡

तो स्वतः कर्तृत्ववान व फौजबंद होता. कर्नाटकांत व बंगाल्यांत स्वाऱ्या करून त्यानें जवळ द्रव्यसंचय चांगला केला. कोन्हेरराम व भास्करराम वगैरे शाहूनें त्याजकडे नेमून दिलेली अनेक मंडळी चागली हुशार होती. शिवाय त्याचा प्रदेश वऱ्हाड नागपुर प्रात मध्यवर्ती महाराष्ट्रापासून एका बाजूस होता. त्यामुळें रघूजीस जेरीस आणणें पेशव्यास अवघड गेलें. बाबूजी नाईक, गायकवाड, प्रतिनिधि व ताराबाई अशीं कित्येक माणसें पेशव्याचे विरुद्ध असत, त्याजशीं रघूजीचें नेहमीं संधान असे. शाहूच्या राणीचें रघूजीस पाठबळ होतें त्याचा उपयोग तो प्रसंगानुसार करी. त्याचे वृत्त यथावकाश पुढें कळून येईल.

**२ शाहूची मिरजस्वारी** (स. १७३७-३९).—बादशहाच्या कैदेंतून आल्यापासून पहिल्या चार दोन वर्षांपलीकडे शाहूनें रणभूमीवर स्वतः पाय ठेवला नाहीं; सर्व मोठमोठीं कामें पराक्रमी सेवकांकडून पार पाडलीं म्हणून लोक त्यास अवतारी पुरुष समजूं लागले. स्वतः महाराज स्वारीस जात नाहींत याची चर्चा दरबारांत होत असलेली त्याच्या कानावर होती. स्वतः स्वारी करणें झाल्यास ती बादशहासारख्या बरोबरीच्या शत्रूवर करावी, लहान बंडखोराचा समाचार सेवक घेतच आहेत अशी त्याची समजूत घालण्यांत येई. पण पेशव्यांच्या पराक्रमापुढें महाराजांचें तेज लोपून ते निःसत्त्व बनत चालले हा देखावा उघड दिसत होता, तो नाहींसा करण्याची इच्छा मधून मधून शाहूला होई. असें होतां होतां त्यानें स. १७३७ त स्वतः स्वारीवर जाण्याचें ठरविलें. उदाजी चव्हाण त्रास देत असे त्याचा बंदोबस्त करावा, आणि अगदीं शेजारी मिरजेचें प्राचीन व महत्त्वाचें ठाणें औरंगजेबाच्या वेळेपासून मोगलांचेंच

‡ शा. रो. १६४, १६५.

कबजात होते ते जिंकून स्वराज्यात आणावें हे त्याचे मुख्य उद्देश होते. प्रथम त्यानें सातारा सोडून उंबरजेवर मोठी छावणी बनविली आणि दोन अडीच वर्षे या तळावरून शाहू व सरदार बाहेर संचार करीत राहिले. मूळ बेत स. १७३६ त ठरला, पुढील साली उंबरजेवर छावणी बनली. तेथून स. १७३९ त स्वतः मिरजेवर जाऊन ते स्थळ कबजात आल्याबरोबर शाहू साताऱ्यास परत आला.

शके १६५८ मब्बासल्लासीन मया व आलफ या वर्षी जाऊन दोन वर्षे छावणी उंबजेवर झाली नंतर चार सहा महिने मिरजेवर गेले असे उल्लेख आहेत. 'स्वारीत बाळाजी बाजीराव शाहूबरोबर मिरजेस होता,' (जून १७३९). 'बाळाजी बाजीरावाचें पत्र मिरजेहून आलें,' मिरजेच्या मुक्कामी वैशाख व ज्येष्ठ मासी जाऊन 'राजश्री स्वामी मिरजेचे मुक्कामीहून श्रीपंढरीचे यात्रेस गेले. राणोजी शिंदेही गेले. तेथून तुळजापुरास गेले.' ही बहुधा स. १७३९ ची आषाढी एकादशी ता. ५ जुलै असावी. श्रावण मासांत गोरोजी गुरव राजश्री स्वामीपाशी मिरजेचे मुक्कामी फिर्यादीस गेला.' 'मिरजेचा मोगल कौलास आला. आश्विन शु. १२ स (ता. ३ ऑक्टोबर रोजी) निशाणें चढली. कार्तिक शु० १५ म्ह० ४ नोव्हेंबर रविवारीं सायंकाळी रा. बाळाजीपंत-नाना मिरजेहून राजश्रीपासून पुण्यास आले. राजश्री बाळाजी बाजीराव शिरोळ मुक्कामाहून राजश्रीचा निरोप घेऊन फाल्गुन शु. ९ रविवारी २४ फेब्रुवारीस पुण्यास आले.' अशा या उताऱ्यांवरून स. १७४० चे फाल्गुनांत शाहूमहाराजांची स्वारी मिरजेहून साताऱ्यास परत आली असें दिसतें. §

शाहूचें आगमन महाराष्ट्रांत झाल्यापासून उदाजी चव्हाणाचा उच्छेद सारखा त्याला भोवत होता. त्यास आळवून उद्योगास लावण्याचे प्रयत्न शिकस्तीचे झाले, पण ते सर्व विफल ठरले. उदाजीचें संधान केव्हां शाहूकडे, केव्हां संभाजीकडे तर केव्हां निजामाकडे असें सारखें चालू राहिलें. कोणत्याही एका पक्षास तो कायमचा चिकटून राहिला नाही. संभाजीचा प्रधान केशव त्रिंबक याचा व उदाजीचा पत्रव्यवहार होता. स. १७३१–३२ त यशवंत महादेव पोतनीस यास शाहूनें उदाजीवर पाठविलें. पोतनिसानें त्याचा मोड करून दंड घेऊन अल्पकाळ शाहूचे नोकरीतही आणिलें. बाजीरावानें शाहूस

§ पु. रं. रो. ख ६ पृ. ९, ११, १४, १८, २६ व १२७; शा. रो. ३४२, ७०, ७२. शा. ब. पृ ५९.

कळविलें, 'उदाजीचें राजकारण निजामाकडे लागलें आहे, त्यास चव्हाण मातबर सरदार राज्यांतून जाऊं द्यावेसे नाहीं. तरी त्यांचे मतलब पुरे करून ते राज्यांत राहतीलसें करावें.' ही सूचना शाहूनें मान्य केल्याचें दिसत नाहीं. त्यास जागीर देण्यासंबंधानें एकमत होईना. पुरंदरे लिहितो, 'महाराजांस राज्यभारासंबंधीं विनंती केल्यास परिणामास किती जाईल हें स्वामींस विदित आहेच.'‡ यावरून दिसतें कीं उदाजीस एकवार चांगला नरम करावा या हेतूनें मुद्दाम मिरजेकडील स्वारी शाहूनें काढिली.

शाहूच्या या स्वारीची हकीकत त्या वेळच्या त्याच्या ऐश्वर्याची व मानसिक भावनेची निदर्शक आहे. शाहूच्या सरदारांस हिंदुस्थानभर विजय मिळत गेले आणि त्याच्या भाग्यशालित्वाची छाप देशांत बसली हा प्रकार शाहूच्या या स्वारीवरून दृग्गोचार होतो. स्वारीचें वर्णन मजेदार आहे तें असें.

'कूच करणें तें दोन तीन कोसांचें करावें ऐसें केलें, आणि सुमुहूर्तें डेरे दाखल झाले. पागा हुजरात सर्व तयारी करून उतरले. तोफखाना तयारी होऊन काढिला; व सर्व सरदारांस आपले तालुके व मसलतीचे बंदोबस्त राखून पांच, चार, दोन, हजार फौजेनिशीं ज्याचे त्याप्रमाणें बरोबर यावें, असें नेमून दिल्याप्रमाणें येऊन उतरले. त्यास मिसलीस राहण्याचे व स्वारी चालण्याचे निबंध नेमून दिले. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोसले यास आघाडीस नेमिलें. प्रतिनिधि व मुख्यप्रधान व अमात्य, सचिव, मंत्री यांची उजवे बाजूस मिसल नेमिली; पंडितराव, सुमंत व न्यायाधीश, यांस डावे बाजूस नेमून दिलें. चिटणीस, पोतनीस वगैरे कारकून मंडळी जामदारखान्यालगत उजवे बाजूस नेमिले. फडणीस व दप्तरकोठी वगैरे डावे बाजूस नेमिले. सोयरे लोक, मानकरी व फत्तेसिंग भोसले उजवे बाजूस नेमिले. पिछाडीस आपाजी सोमवंशी सरलष्कर व त्यांचे निसबतीचे सरंजामी हे नेमिले. हुजूरपागा डेऱ्यापुढें व शागीर्दपेशा लोक वगैरे जिकडील तिकडे मिसली नेमून दिल्या. सर्वांनीं स्वारींत आपापले मिसलींत चालावें, गलबला कांहीं एक होऊं नये. पादशाही स्वारींत महाराज होते त्याअन्वयें सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व सरदार यांनीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारचे पाठीमागें जनानखाना, त्यामागें चाळीस पंनास अंबाऱ्या चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला व निशाणें, व त्यापाशीं गारद व करोळ व पागा चालावी. सर्वांपुढें बिनीवाले सेनाधुरंधर यांनीं

‡ पे. द. ११.२८.

चालावें. निशाणांमागें आघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीब, नानाप्रकारचीं रणवाद्यें, त्यामागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांणीं चालावें. त्यामागें नगारखाना, शहाजानें, त्यामागें वाजंत्री व धाडी व त्यामागें चोपदार भालदार चालावे. वाटेनें सक्के व पखाला यांनीं पुढें शिडकाव करीत असावा. याप्रमाणें दोन तीन कोस चालून डेरेपर्यंत कोरबंदीचे लोक ( म्ह० सलामीचे स्वार ) यांचे मुजरे घेत जावें. याप्रमाणें मजला करून उंब्रज मुक्कामी आले. पुढें कर्नाटक प्रातीं जावयाचे, त्यास तिकडे सरदार रवाना केले आणि उंब्रजेवर छावणी केली. प्रधान व सरदारसहवर्तमान शिकारीस जावें. श्रीपतराव प्रतिनिधींनीं आज्ञेप्रमाणें उदाजी चव्हाणावर जाऊन त्यास जरब दिली, व चव्हाणास घेऊन महाराजांपाशीं आले. दुसरे वर्षी तोफखाना व सामान देऊन, मिरजेचें ठाणें मोगलांकडे होतें तें घ्यावें म्हणोन त्यांस रवाना केलें. बहिरोपंत पिंगळयांचे चिरंजीव आपाजीराव पेशवाई काढली म्हणोन उद्विग्नता वागवीत होते, त्यांची परीक्षा पाहणें जाणून संताजी डुबल यास बरोबर देऊन तीस हजार फौजेसहित रवाना केलें. त्यांनीं जाऊन किल्ल्यास शह दिला. परंतु किल्ला लांबणींत आणि बांधणींत मजबूद, इलाज न चाले. यामुळें प्रतिनिधीस आज्ञा केली कीं उद्यां हल्ला चढवून किल्ला घ्यावा. दुसरे दिवशी हल्ला केला. ईशान्येकडील बुरूज तोफा लावून ढळला. निशाण लावून किल्ला घेतला. शंपन्नास मेले, पांच पन्नास जखमी झाले. ते जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारागिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन ता. ३ ऑक्टोबर, स. १७३९ रोजीं दिला. यावरी महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली. धूळगांवचा बाळोजी बिन शिवाजी साळुंके ( ऊ. डुबल ) पटवर्धनांचे पदरीं होता, त्याजकडे मिरजेचें ठाणें देऊन किल्याचा व प्रांताचा बंदोबस्त करवून स्वारी परत आली. हा डुबल सकवारबाईचा आप्त व प्रतिनिधींचा पक्षपाती असल्यामुळें त्याजकडे हा महत्त्वाचा किल्ला ठेवणें धोक्याचें वाटून पुढें भाऊसाहेबानें सांगोल्याचे स्वारींत तो डुबलकडून काढून शिवाजी बल्लाळ जोशी याजकडे दिला. या शिवाजी बल्लाळाची मुलगी रमाबाई पुढें माधवरावास केली. ह्यानंतर स. १७६० त नानासाहेबानें मिरज किल्ला पटवर्धनांस दिला. तो अद्यापि त्यांचे ताब्यांत राहून पूर्वेतिहासाची साक्ष देत आहे.

शाहूनें समारंभानें स्वारी बाहेर काढून दोन वर्षेपावेतों उंब्रजवर तळ दिला आणि तेथून अनेक सरदार ठिकठिकाणीं वेळोवेळीं रवाना केले; आणि

मधून मधून आपणही फिरत राहिला. त्यातील काहींच्या हकीकती प्रसंगोपात उपलब्ध आहेत. 'चंद्रसेन जाधव उदाजी चव्हाणास बरोबर घेऊन बीडाकडे आले आहेत. विरापा वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलखात धूम मांडिली आहे म्हणोन लिहिलें, त्यास गनीमांस नतीजा देण्याकरितां स्वामींनी चिरंजीव फत्तेसिंग भोसले, राजश्री रघोजी भोसले व रा. शंभुसिंग जाधवराव व आपाजी सोमवंशी सरलष्कर यांनी फौजेनिशीं आज्ञा देऊन रवाना केले आहेत. चतुर्वर्ग सत्वरीच त्या प्रांतां येतील. तरी तुम्ही चिरंजीवास सामील होऊन स्वामिसेवा करून दाखविणें,' म्हणून ता. २५ जानेवारी, १७३९ चें पत्र शाहूनें हैबतराव वाडगर अमीरुलमराव यास लिहिलें. त्यानंतर युद्धप्रसंग होऊन वीरापा धरिला, फौज मोडून तारागण केले, याबद्दल शाहूस संतोष होऊन त्याने ता. २४ मार्च, १७३९ रोजीं अनेक लहान मोठ्या सरदारांस प्रशंसापर पत्रें लिहिलीं. दोन वर्षे छावणी उंब्रज व मिरजेवर होती. नंतर श्रीचाफळी जाऊन श्रीचे दर्शन करून, पुजा ब्राह्मणभोजन करून सातारी आले. शहरचे देवाच्या पूजा करविल्या. शहरात गुढ्या उभ्या केल्या. रस्त्यात सडे रांगोळ्या घालून, सर्व नगर अलंकृत केले. सर्व लोक पुढे सामोरा नजरा घेऊन आले. रस्त्यांत घरोघरी स्त्रिया आरत्या घेऊन उभ्या राहिल्या. समारंभेकरून वाड्यांत प्रवेश केला.' स्वारीत असतांही पुणें, जेजुरी, शंभु महादेव, प्रतापगड, इत्यादि ठिकाणी प्रसंगानुसार शाहूचे जाणें होत असे.

मिरजेवरील स्वारीत उदाजी चव्हाण गनिमाची कुमक करूं लागला, म्हणून शाहूनें त्याजवर प्रतिनिधीस रवाना केलें. त्याबरोबर चव्हाण पळून मोगलाईत गेला. ता. ८ नोव्हेंबर, स. १७३९ रोजीं प्रतिनिधीनें चव्हाणाचें आथणीचें ठाणे काबीज करून मध्यरात्री त्यावर महाराजांचे निशाण चढविलें. तदुत्तर मधून मधून चव्हाण शाहूला त्रास देतच राहिला. स. १७४८ त त्रिंबकराव सोमवंशी यास शाहूने आज्ञा केली की चव्हाणाचा निःपात होय ते गोष्ट करणें. शाहूच्या पश्चात् नानासाहेबानें स. १७५१ त उदाजीस मोगलाईतून युक्तीनें जवळ आणून डिग्रज येथे सरंजाम देऊन ठेविलें. हा सरंजाम अद्यापि त्या घराण्याकडे सांगली संस्थानचे सत्तेखालीं चालत आहे. तथापि उदाजीचा उच्छृंखळपणा त्याचे हयातीत बंद पडला नाहीं. स. १७५२-५३ त नानासाहेबानें त्याजवर स्वाऱ्या केल्या. ' मिरज प्रांतीं एका खेड्यावर उदाजीनें रोखा केला. गावकऱ्यानी मानला नाहीं. उदाजीनें गांवावर स्वारी केली, त्या

प्रसंगी उदाजीचे घोडीस गोळी लागून उधळली. रिकिबीत पाय अडकून डोकें फुटून मेले, (ता. २४ नोव्हेंबर, स. १७६२). पुत्र विठोजी डिग्रजेस व प्रीतिराव करवीरी शिवाजीमहाराजांपाशीं राहिले.'

**प्रयोजन व लभ्यांश**—वरील वर्णनांत शाहूच्या या स्वारीचें प्रयोजन, व्यवस्था व लभ्यांश हे प्रकार संकलित अर्थानें सांगितलेले यथार्थ असून त्यांस पेशवे दप्तरांतील कागदांचा दुजोरा मिळतो. पुढील पत्रांत स्वारीचे प्रयोजन आढळतें "राजश्री स्वामी व संभाजी राजे यांच्या भेटी मार्गशीर्ष व० ७ इंदुवारीं ता. १३ डिसेंबर, १७३६ला पालीचे मुक्कामीं झाल्या. तेथून सातारियास आले. समागमें कबिला व मातुश्री आईसाहेब होती. राजश्री स्वामींनीं बहुत आदर केला. हत्ती घोडे नक्त कापड ऐसें पन्नास साठ हजारांचें वित्त पावतें केलें. **दक्षिण प्रांते अंमल बसवून द्यावा** ऐसें मान्य करून पंत प्रतिनिधि फौजेसहवर्तमान द्यावेंसे केले. समाधानपूर्वक बोली करून निरोप दिल्हा." दक्षिणप्रांतें अंमल बसवायचा म्हणजे संभाजीस मुख्य उपसर्ग इचलकरंजीकर घोरपड्यांचा होत होता तो बंद करणें. व्यंकटराव घोरपडे, बाजीरावाचा मेहुणा, संभाजीच्या प्रदेशावर स्वाऱ्या करी. बाजीरावानें रामचंद्रहरीस व्यंकटरावाचे मदतीस पाठविलें, त्यास परत बोलवून घ्यावा अशी शाहूची आज्ञा झाली असतांही तिचा अंमल पुष्कळ काळ झाला नाहीं. नारोराम चिमाजीआपास सांगतो, "तुम्ही घोरपड्याचे साहित्याविषयीं तजवीज करून मदत पाठवाल तर तो विचार राजश्री स्वामीस मान्य नाहीं." ‡ कापशीकर सेनापति घोरपडे हा संभाजीचा दुसरा उच्छेदक, त्याला खुद्द शाहूचा आश्रय होता. उदाजी चव्हाण व चंद्रसेन जाधव हे तर घटकेंत शाहूकडे, घटकेंत संभाजीकडे तर घटकेंत निजामाकडे असे बंडखोरीनें भटकत राहून साधेल तितका स्वतःचा लाग साधीत आणि प्रत्यक्ष हुकमत कोणाचीच मानीत नसत. साबाजी नाईक निंबाळकर याचें ठाणें दहिगाव जिंकून घेणें ही शाहूची इच्छा होती. § "सुप्रवृत्तीनें ठाणें रिकामें न करीत तर निर्भीडपणें पारिपत्य करून ठाणें स्वामीस द्यावें म्हणजे धणी संतोषी होतील. भूपाळगड उदाजी चव्हाणाकडे होता तो यमाजीपंतांनीं घेतला, खेत्रोजी गायकवाड वगैरे चौघे बंधु धरून शाहूकडे आणिले." जानोजी निंबाळकर निजामाचा सरदार, पण बाजीरावाशीं गोडी

‡ पे. द. ११-३१, ३४. § पे. द. ११. ४२, ४६, ४७, ४८.

राखून शाहूला उपद्रव करी. या सर्व आपसांतल्या भानगडींचें निरसन करण्यासाठीं शाहूनें ही स्वारी मुद्दाम स्वतःच्या देखरेखीखालीं चालू केली.

कदाचित् पेशव्यांचे हितसंबंध वरील कित्येक सरदारांकडे परभारें गुंतले असल्यामुळें त्यांच्या अंगावर स्वारी टाकल्यास ते उभय छत्रपतींचे मतलब बिघडवून स्वतःचें कार्य साधून घेतील तो प्रकार न घडावा म्हणून शाहूनें संभाजीशीं संगनमत आगाऊ ठरवून मग स्वारी चालू केली. पेशवे उगाच नसतीं लफडीं उत्पन्न करतात, तर आपण नमुनेदार स्वारी करून दाखवितों असाही शाहूचा हेतु असावा. हे सर्व आंतले धागेदोरे नानासाहेब हा बाजीराव चिमाजींस कळवीत होता. मीरजस्वारीचीं ही दोन अडीच वर्षे बाजीरावाच्या आत्यंतिक व्यग्रतेचीं व तारांबळीचीं होतीं हें त्या वेळच्या इतर घडामोडींवरून सहज लक्षांत येईल. स. १७३७ सालीं उन्हाळयांत दिल्लीवरचा हल्ला, त्या सालअखेर भोपाळवरचा निजामाचा संग्राम, इकडे त्याच वेळीं वसईची मोहीम सारखी चालू व त्या पुढील स. १७३९ सालीं नादीरशहाचें आगमन व वसईचा पाडाव अशा प्रचंड प्रकरणांत फौजा व सरदार गुंतले असतां खुद्द शाहूनें आपल्याही अंगचा प्रभाव व ऐश्वर्य मराठमंडळास प्रगट करून उत्तरेच्या विजयाचें लोण दक्षिणेस पोंचविलें, इतकेंच नव्हे तर याच मिरज स्वारींतून रघूजी व फत्तेसिंग भोसले यांच्या पुढील कर्नाटक स्वारीचा उद्भव झाला हेंही ओघानें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. †

**३ आंगरे बंधूंचा कलह, बीज.**—पश्चिम किनारा ही मराठी राज्याची महत्त्वाची हद्द असून तिची योग्य निगा ठेवण्यांत राज्याचें हित होतें. कान्होजीच्या पश्चात् त्याच्या पुत्रांत कलह माजल्यामुळें राज्यास अपाय होऊं लागला, तो बंद करण्याचे प्रयत्न पेशव्यांनीं यथाशक्य केले. त्यांत आंगऱ्यांचे कुटुंबाचा नाश झाला. हा सर्व इतिहास अनेक दृष्टींनीं संस्मरणीय व अभ्यसनीय असूनही त्याचा भरपूर निर्देश रियासतींत करण्याची सोय नाहीं. याचें साधनसाहित्यही विपुल असून येथें या प्रकरणाचा फक्त तत्त्वार्थ तेवढा सांगावयाचा आहे.

† या स्वारीचे कागद मुख्यत: पे. द. भाग ११, १७, २२ व ३० यांत ठिकठिकाणीं विखुरलेले असून पुष्कळांच्या तारखाही प्रत्यंतर पुराव्यानें दुरुस्त कराव्या लागतात. भाग ११ ले. ३५–५४, भाग १७ ले. ३८–९६ व भाग २२ ले. ३७६–३८८ पहावे. त्रै. २२.२ यात डुबलांचे कागद अभ्यसनीय आहेत.

शाहूची सीदीवरील मोहीम चालू असतांच संभाजी व मानाजी या आंगरे बंधूंचें भांडण आवेशांत आल्यामुळें पुढें या मोहिमेंत आंगऱ्यांचे हातून फारशी कामगिरी झाली नाहीं. कान्होजी आंगरे यास तीन बायका मथुराबाई, लक्ष्मीबाई व गहिनाबाई. त्यांपैकीं मथुराबाई व लक्ष्मीबाई, उपलब्ध पत्रव्यवहारावरून कर्तृत्ववान व घराण्याच्या लौकिकास जपणाऱ्या दिसतात. सेखोजी व संभाजी हे सख्खे भाऊ मथुराबाइचे पोटीं, मानाजी व तुळाजी हे लक्ष्मीबाईचे पोटीं आणि येसजी ऊ. आप्पासाहेब व धोंडजी हे गहिनाबाईचे पोटीं झाले. § या भावांमधील कलहानें घराण्याची पुष्कळ वाताहत झाली. सेखोजीच्या पश्चात् संभाजी कारभार पाहूं लागला, तेव्हां त्याचें व मानाजीचें वाकडें आलें. शाहूच्या दरबारांत नारो राम शेणवी वगैरे कित्येक मंडळी संभाजीला अनुकूल होती, तर इकडे मानाजीला पेशव्यांचा पाठिंबा होता. स. १७३४ च्या आरंभीं तुळाजीस बरोबर घेऊन संभाजी सीदीच्या हातून अंजनवेल काबीज करण्यासाठीं चालून गेला. जाण्यापूर्वी संभाजीनें धोंडजीला कुलाब्याचा कारभार सांगून मानाजीला आरमाराचा अधिकार दिला.परंतु परत आल्यावर संभाजीस या दोघांचा कारभार पसंत पडला नाहीं. मानाजीनें कपट करून फिरंगी लोक कुलाब्यांत आणिले, आणि तुळाजीस दिवाणगिरी देऊन रात्रीं कुलाब्यास येऊन येसाजीचे डोळे काढिले.¶ पेशव्यांच्या व ब्रह्मेंद्राच्या शिकवणीनें मानाजी आपल्या विरुद्ध हीं कारस्थानें करितो, आणि इंग्रज व पोर्तुगीझ यांस आपल्या बाजूस वळविण्याचा उद्योग मानाजीनें चालविला, या गोष्टी संभाजीस कळून तो चिडून गेला. नागांवचा पारसनीस महादाजी राम यास मानाजीनें मुंबईस इंग्रजांकडे पाठविलें; आणि संभाजी आपला जीव घेईल या भीतीनें मानाजी

**कान्होजी आंगरे यांस पुत्र सहा**

१ मथुराबाईचे सेखोजी व संभाजी
२ लक्ष्मीबाईचे मानाजी व तुळाजी
३ गहिनाबाईचे येसाजी व धोंडजी

§ खं. २ पृ. १०१ ऐ. टि. २.२१. व १.५. २ इ. स. आंगऱ्यांची हकीकत. ३–५६८ चेऊची बखर, खं. ८ ले. १४५–१५७. आंगरे घराण्याची वंशावळ पुढील पानावर आहे ती पाहावी. रा. ढबूकृत कुलाबकर आंगरे; पे. द. भा. ३, १६, ३३ व ३४.

¶ का. सं. या. ले. ११९ यांत डोळे काढल्याचा उल्लेख येसाजी करीत नाहीं. पे. ब. खंड ४ पृ. ४१.

पळून रेवदंड्यास पोर्तुगीज हद्दीत जाऊन राहिला. अशी दोघां भावांची बरेच दिवस झटापट चालू होती. संभाजीचा स्वभाव उतावळा व रागीट असल्यामुळें तो पुष्कळांस अप्रिय झाला. इंग्रजांनी या गृहकलहाचा फायदा घेऊन संभाजीची उचलबांगडी करण्याचा घाट घातला. अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें हबशाच्या हातून काबीज करण्याचा संभाजीचा उद्योग जोरांत चालू असतां इंग्रजांनी हबशास मदत केली; तेव्हां संभाजीचा उद्योग फसला, आणि तो मानाजीवर जास्तच चिडून गेला. ता. २७ नोव्हेंबर स. १७३४ रोजीं मानाजी लिहितो. 'संभाजी बाबांचे अविवेकावरून आम्ही दौलत, संकट जाणून सोडून रेवदंड्यांत चौलास आलों, पोर्तुगीज कप्तान याहीं बहुत सन्मान केला; व बहुतसें साहित्यांत आहेत. साबाजी प्रभु येऊन भेटल्यानें संतोष झाला. या समयीं आपण उभयता पुत्रासह येऊन पावावें. मनसोब्याचे विचार दृढ होत जातील. अगोदर निराश्रित समजून वरघांटीं जावयाचा विचार आमचा होता. परंतु साबाजी प्रभु आल्यावर आमचे आज्ञेवरून कित्येक विचार स्वहितावह निघाले, त्यावरून स्थिरता धरून, सातान्यास रा. स्वामीचे सेवेशीं, रा. जिवाजी बाबा व गोविंदराव चिटणीस व यशवंतराव पोतनीस आदिकरून सामादिकास व रा. बाजीराव पंडित प्रधान व आपा दाजी यांस पत्रें लिहून पाठविलीं आहेत. या समयीं इंग्रज व स्यामळ अनुकूळ करून घ्यावे लागतात. या समयीं इंग्रजांचा वैरकाल आजीकालचा नाहीं, तो स्नेहांत आणावयाचा विचार, महादाजी बाबा, आपल्या खेरीज होणार नाहीं. तीर्थरूप कैलासवासी यांचे समयीं तुम्ही अगत्यवाद धरून कित्येक कार्यभाग करीत आलेत, तो विचार आम्ही चित्तांत आणून आपला आदर धरिला आहे. साबाजी प्रभु व कृष्णाजी प्रभु व आपणाखेरीज अधिकोत्तर कोणी कारभारास आहे ऐसें नाहीं. हें आमचें सत्यवचन आहे. ह्याजवरी विश्वास ठेवून तुम्ही निघून याल हा भरंवसा मानून, पालवाचे खाडांतून महागिरी पाठविली आहे तरी, सहकुटुंब तेथें कांहीं गुंता न ठेवितां, निघून यावें.'§

**४ बाजीरावानें ठरविलेली व्यवस्था.**—असें हें आंगरे बंधूंचें भांडण उत्तरोत्तर विकोपास गेलें. मानाजीनें बाजीरावास तात्रडतोब आपल्या मदतीस बोलाविलें. दीड दिवसात बाजीराव पुण्याहून पालीस आला. ता. ४ फेब्रुवारीपासून ३ एप्रिल १७३५ पर्यंत तब्बल दोन महिने बाजीरावाचा

§ ता. ३० मे, स. १९०५ च्या केसरींत हें पत्र आहे.

मुक्काम कोंकणांत कुलाब्याजवळ होता. संभाजी व मानाजी यांचे स्वभाव व कर्तबगारी बाजीराव पूर्णपणें ओळखून होता. सीदी, इंग्रज व पोर्तुगीज हे आंगऱ्यांचा पाडाव करण्यास टपले होते. मराठ्यांचें राज्य उत्तरेप्रमाणें पश्चिम किनाऱ्यावरही निष्कंटक करणें हा मुख्य उद्देश शाहू व बाजीराव यांचा असून दरबारांत या सर्व वस्तुस्थितीचा पूर्ण खल करून त्यांनी संभाजी व मानाजी यांचा कलह मिटविण्यासाठीं त्या दोघांस दोन विभक्त क्षेत्रें वांटून देण्याची योजना ठरविली. बाजीरावानें कोंकणांत येतांच खांदेरी व कोथळा हे किल्ले काबीज केले, नंतर मानाजीस 'वजारतमाब' असा नवीन किताब देऊन त्याची स्थापना कुलाब्यास केली आणि संभाजीनें 'सरखेल' हा किताब घेऊन सुवर्णदुर्गास राहवें असें ठरवून, या दोन भावांचा तंटा तात्पुरता तोडिला. येणेंप्रमाणें बाजीरावानें आंगऱ्यांच्या एकंदर दौलतीचे दोन भाग करून त्याच्या घरांत कायमचें वितुष्ट पाडून ठेविलें, असा त्यावर आरोप आहे. हा प्रकार पुढील भानगडीच्या संबंधानें ध्यानांत ठेविला पाहिजे. §

बाजीरावाची ही व्यवस्था मोडून संभाजीलाच सर्व दौलत द्यावी, अशी खटपट प्रतिनिधि शाहूपाशी करीत होता, हें खालील पत्रावरून व्यक्त होते. †

पुरवणी ती. रा. आपा स्वामीचे सेवेशी. विनंती उपरी. प्रतिनिधि विचार करीत आहेत कीं राजश्री स्वामींस उत्तेजन द्यावें. राजश्री प्रधानपंतास हुजूर आणवावे. कान्होजी आंगरे याची बायको लक्ष्मीबाईस आणवावें. मानाजी आंगरे यास माकूल करून सांगावें, आणि संभाजी आंगरे याचीं स्थळें जी घेतलीं आहेत तीं त्यांचीं त्यांस देवावी. संभाजी आंगरे यास जमावानशी अंजनवेलीस आणावें. आपण त्यासा जावें. समागमें राजश्री फत्तेसिंगबावास न्यावे. दोनही स्थळें हस्तगत करून राजश्रीस द्यावीं. आपण यश घ्यावें. संभाजी आंगरे याचा गेला मामला त्यांस देवावा. त्याजकडून कांही आपलें काम करून घ्यावें. ऐसा विचार करीत आहेत. कळावें म्हणून लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.'

बाजीरावानें केलेल्या व्यवस्थेनें संभाजी-मानाजींचें ऐक्य झालें नाही, उलट त्यांजमध्यें कायमचें वाकडें आलें. पेशव्यांनी एकाचाच पक्ष उचलिला, न्याय

§ खं. २ पृ. ७१ व ब्र. च ले. १३०.

† हे पत्र स. १७३६–३८ चे दरम्यानचें नानासाहेबानें चिमाजीस लिहिलेलें रा. वासुदेव विष्णु जोशी, सातारा याजकडून मिळालें.

केला नाही, याचा संभाजीस राग आला. त्यानें बाजीरावाची नानाप्रकारें आर्जवें केली, शपथा घेतल्या, आपण चुकलो तर अन्याय पोटांत घालून आम्हास मार्गास लावा, असें वारंवार विनविलें. ता. ११ जून, स. १७३६ चें संभाजीचें बाजीरावास गेलेलें पत्र वाचण्यालायक आहे, त्यावरून बाजीरावानें आंगऱ्याचे घरांत दुही माजविली ही संभाजीची समजूत व्यक्त होते. स्वभावास औषध नाही म्हणतात तसा प्रकार येथें झाला. बाजीरावानें कसाही निकाल केला असता तरी दोघांतून एक नाराज होणें अपरिहार्य होतें. त्यातल्या त्यात मानाजी जास्त अनुकूल व संभाजी दुर्दम्य ही गोष्ट ओळखून राज्यहिताच्या मुख्य उद्देशास पोषक अशी व्यवस्था बाजीरावानें केली यांत त्याला दोष देण्यासारखें कांही नाही. मराठी राज्य सुरळीत चालण्यास योग्य अशी व्यवस्था त्यानें आपल्या दृष्टीनें केली.

यानंतर पुनः स. १७३६ च्या जून २३ पासून जुलै १२ पावेतो बाजीराव थोडा वेळ कोंकणात साष्टी प्रांतात तातडीनें गेला होता. परंतु त्या प्रसंगाचा संबंध आंगऱ्याशी आलेला दिसत नाही. त्या वेळी संभाजीची समजूत न होऊन तो उघडपणे पेशव्याचे विरुद्ध पक्षास सामील होऊन नाना प्रकारची कारस्थानें रचूं लागला. बावडेकर अमात्याला आपणाकडे वळविण्यासाठी संभाजीनें एक पत्र ता. २९ ऑगस्ट, १७३६ चें लिहिलें, त्यावरून संभाजीचा भाव व्यक्त होतो. आंगरे हा बलाढ्य सरदार मुख्य सरकारशीं फटकून वागत असलेला पेशव्याना दुःसह वाटत होता. आंगऱ्याच्या घराण्याचे दोन भाग केल्यानें त्याची शक्ति अर्थात् कमी झाली. संभाजी बाणेदार असल्यामुळे त्यास आपली पूर्वीची सत्ता व मुलूख कमी झालेला खपला नाही. पेशव्यानें मानाजीस हाताशी धरून संभाजीस दुर्बल बनविलें.

आंगऱ्याचे व्यवहार इतर सरदाराप्रमाणे केवळ कारभाऱ्याच्या मर्जीनें चालत. हे कारभारी पुष्कळदा स्वार्थ साधण्याचे नादांत राज्याचें अहित करीत. रघुनाथ हरि या गृहस्थाचें महत्त्व आंगऱ्याचे घरांत मोठें होतें, आणि पुष्कळदां पेशवे सीदी व इंग्रज यांजकडे धन्याचे तर्फेनें शिष्टाईस जाऊन भलतीच कुलंगडी उपस्थित करीत असे त्याजबद्दल उद्गार काढलेले आढळतात. सेखोजी मेल्याबरोबर शाहूनें पिलाजी जाधवाबरोबर संभाजीला सरखेलीचीं वस्त्रें पाठवून दिलीं. ‘ लक्ष्मीबाईचे मतें संभाजी छंदी आहे, गोष्टी विलयास

जातील.' संभाजी आगरे दुर्व्रात्यपणास आले त्यांचे पारिपत्य करावे हे राजश्री स्वामींचे चित्ती आहे.' संभाजीनेंही आपल्यापरी बाजीरावाची मनधरणी केली पण वचनाप्रमाणे कृति मात्र घडली नाही. संभाजी व मानाजी याच्या कलहाचे कागद पेशवे दप्तराच्या भागांत विपुल आहेत ते जिज्ञासूंनी पहावे.‡

मानाजीपेक्षां संभाजीचें कर्तृत्व जास्त होतें, आणि वारसाही त्याचाच होता म्हणून उभयतांचे भांडणांत आंगऱ्यांची शक्ति खालावत गेली. संभाजीचे पश्चात मानाजी व तुळाजी यांचा कलह चालला, त्यांत शेवटी ही आरमारी सत्ता इंग्रजांनी नाहींशी केली.

नंतर बाजीरावाने ठरविलेली व्यवस्था रद्द करून संभाजीला कुलाबा येथें स्थापण्याकरिता आंगऱ्यांचा वकील साबाजी तुकाजी प्रभु म्हणून होता तो साताऱ्यास शाहूकडे गेला. संभाजीचा कारभार अव्यवस्थित असल्यामुळें त्याच्या हातून कुलाब्याचें संरक्षण व्हावयाचें नाही अशी समजूत शाहूची होती. दरबारांत दोन पक्ष होते. गोविंदराव चिटणीस शाहूजवळ होता त्यानें प्रतिनिधीच्या व्यवस्थेस पुष्टि दिली. पण शाहूने बाजीरावाच्या ठरावासच मान्यता दिली. शाहूशी वाटाघाट करून साबाजी तुकाजी कुलाब्यास परत गेला. आंगऱ्याचा पारसनीस महादजी राम नागांवकर व त्याचे मुलगे विठ्ठल महादेव व त्रिंबक महादेव याचा व साबाजी प्रभूचा उल्लेख वर मानाजीच्या पत्रांत आलाच आहे. त्रिंबक महादेव व साबाजी तुकाजी यांनी संभाजीस साताऱ्यास आणिले. तेथें सुवर्णदुर्ग व त्यापलीकडील मुलूख व सरखेलपदाची वस्त्रे शाहूनें संभाजीस दिली, आणि मानाजीस वजारतमाब हा किताब देऊन कुलाब्यास ठेविलें. कुलाबा आपणास मिळावा, मानाजीस मिळूं नये, अशी संभाजीने पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाही. पुढे मानाजी 'वजारात-माब' या पदाची वस्त्रें घ्यावयास साताऱ्यास गेला. तोही स्वभावानें करारी व धाडशी असल्याचा साताऱ्यास शाहूला चांगलाच प्रत्यय आला. तरी ठरल्याप्रमाणे मानाजीस वस्त्रें शाहूकडून मिळालीं. त्या प्रसंगी मानाजीनें साबाजी प्रभु, त्रिंबक महादेव, गोविंदराव चिटणीस इत्यादि मंडळीस गांव इनाम दिले. बाजीरावानेंही बराच मुलूख व राजमाची वगैरे किल्ले आपणाकडे घेतले. याप्रमाणे मानाजीस

‡ पे. द. ३३.९९, १००, १०१, ४१२, ४२०, ४३७, ४५३, ४५४, ४६० इ० शेवटील कागद मानाजीची विस्तृत कैफीयत होय

कुलाब्याचा कारभार स. १७३५ त मिळाला तो त्याजकडे स. १७५८ त त्याचे मृत्युपर्यंत चालला.

**५ संभाजीचा मृत्यु व मानाजी.**— मानाजी नेहमीं पेशव्यांचे पक्षांत असून संभाजी व तुळाजी त्याचे विरुद्ध असत. बाजीरावास मृत्यु आकस्मिक आला, त्या प्रसंगीं आंगरे घराण्याच्या हालचाली काय होत्या हें पुढील संदर्भासाठीं येथेंच सांगितलें पाहिजे. चिमाजी आपा ब्रह्मेन्द्रस्वामीस लिहितो, 'तारीख २३ माहेरम, चैत्र वद्य १० ( ता. १० एप्रिल, स. १७४० ) मुक्काम किल्ले कोरीगड. † औरंगाबादेहून पारनेर नजीक आलों. तेथे राजश्री संभाजी राजे सरखेल एकाएकीं अलीबागेंत उतरोन हिराकोट घेतला, सागरगड घेतला, चौलचा कोट घेतला, अलीबागेंत कुलाब्याचें पाणी बंद केलें, ये समयीं येऊन आपलें रक्षण करावें, ऐसे मानाजीचें पत्र नानाजवळ आलें. पत्र येताच नानांनी चारपांचशें राऊत, वासुदेव जोशी व विठ्ठल शिवदेव व अंताजी नारायण या समागमें देऊन रवाना केले. आम्हांस मानाजीचें पत्र होतें तें आम्हांकडे पाठविलें. पण मार्गी पावलें. तेच दिवशीं लांब मजल करून घोडनदीवर मुक्काम केला. तेथूनच मानाजीस आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें. दुसरे दिवशीं विसा कोसांची मजल करून लोहगांवास आलों. मानाजीचे कुमकेविषयीं इंग्रजासही पत्रें पाठविलीं. तेच दिवशीं पुण्याहून चिरंजीव नानास रात्रीं बोलावून आणून त्यासमागमें सारी फौज देऊन रवानगी केली. तेथून पाचवे रोजीं कुलाब्यास जाऊन पोंचले. मीही पुण्यास जाऊन तीन दिवस तेथें राहून, मातुश्रीचें दर्शन व आज्ञा घेऊन स्वार होऊन काल येथें आलों. नाना तेथें पावले, तेच दिवशीं संभाजीकडील चौकी बाहेर उभी हिराकोटाजवळ आश्रयास होती, ते मारिली. पंचवीस तीस माणूस कापून काढिलें. तुळाजी आंगऱ्या जखमी धरून आणिला आहे. इंग्रजानींही अगोदर कुलाब्यास येऊन पाणी सामान जें पाहिजे तें कुलाब्यास पोंचविलें, आणि सांप्रत तो आरमारानशीं कुलाब्याजवळ आहे, तेथून तोफांचा मार दिला. त्यामुळें अलीबागेंतून सरोन हिराकोटचे उत्तरेस आश्रयानें मोर्चे बांधून राहिले आहेत. नाना सागरगडाखालून खाडीचे कडेनें गेले, तेथें पंचवीस माणूस संभाजीकडील आलें होतें, त्यांत सरदार होता तो व पांच सात माणूस जिवें मारिले, व वरकड पळाले. सा सात जण धरून आणिले. जर संभाजी लवकर

† पुण्याचे पश्चिमेस मुळशीजवळ.

निकाल काढून जीव वाचवून निघोन गेला, तर उत्तमच झालें. जर धीर धरून मोर्चेबंद करून राहिला, तर मोर्चे लावून, पारिपत्याचा विचार करणें तैसा, स्वामीच्या आशीर्वादाचे बळें करीतच आहो. इंग्रजांस मार्ग देऊन जाऊं द्या म्हणून संभाजीनें सांगून पाठविलें होतें, परंतु इंग्रजानें मान्य केलें नाहीं. आम्ही औरंगाबाद प्रांतीं आहों, ये प्रांतीं ध्यान नाही, ऐसा समय पाहून संभाजी आले होते. मानाजीची स्थापना आम्हीं केली; परंतु त्यांस स्मरण न राही ऐसें झालें. कित्येक प्रकारें वावगी वर्तणूक आम्हांशी केली. त्याचा विस्तार लिहिल्यानें चित्तात येणार नाहीं. जे समयीं आपले पाय पाहूं तेव्हां विदित करूं. फिरंग्यांची उरण जागा, ते आपणच बळावली. पैक्याविषयीं वारंवार लिहिले, परंतु ते गोष्ट चित्तात न ये. आज पाचा वर्षांत एक पैसा आमचा देणें तो दिला नाही. बहुतच अमर्यादा मांडिली, यास्तव त्याचेही डोळे उघडावे याकरिता तजविजेनें पाल व मीरगड § दोनही जागे संभाजीच्या हातास जात होते, ते जागे घेऊन आपलीं निशाणें चढविलीं. उरण बळाविलें होतें तेही घेतलें. आजच फत्ते झाल्याचें पत्र उरणाहून आलें. साराश, त्याचे डोळे उघडिले आणि सर्व प्रकारें संभाजीचे हातोन ( मानाजीचा ) जीवही ये समयीं वांचविला असे. उद्या परवा घाट उतरोनही कुलाब्यापावेतों जाणार आहें. तेथे न पावना अगोदरच संभाजीचा निकाल लागला तर उत्तम आहे. होईल वृत ते लिहून पाठवूं."

या पत्राचे उलट संभाजीचें ह्मणणें त्याच्या एका पत्रांत उपलब्ध असून ते पत्रही वरच्या नंतर दोनच दिवसांनीं ह्मणजे १२ एप्रिलास अलीबागेहून संभाजीनें ब्रह्मेंद्रस्वामीसच लिहिलेलें आहे. "आरमारसहवर्तमान साकरियाचे खाडीत शिरोन अलीबाग, हिराकोट, थळचा कोट, राजकोट, सागरगड, हे जागे स्वामीच्या कृपेनें फत्ते जाहले. पालीस निशाण पाठविलें होतें; परंतु रा. बाजीराव प्रधान याचा जमाव येऊन त्यांचें निशाण चढलें. राऊत व जमाव पालीखालीं आला आहे. मानाजीच्या कुमकेस अलीबागेस येऊन आम्हांबरोबरी घसघस करणार. इंग्रजही आला आहे. हा समय अडचणीचा आहे. आह्मी येथून निघत नाहीं. राजश्री स्वामी येऊन सनाथ केलें तरी बरें. आपणास जें सुचेल व उचित दिसेल तसें करावें. राजश्री स्वामीजवळ आपण स्वामा जाऊन रा. चिमाजी आपास कागद व इंग्रजास कागद व मानाजीस कागद देववावे.

§ पेणच्या पूर्वेस.

हें काम अगत्य करावें.'' ब्रह्मेंद्रस्वामीच्या मार्फत शाहूकडे संधान लावून चिमाजीस परत बोलवावें अशी संभाजीची ही खटपट होती. परंतु राजकीय कारभारांत ब्रह्मेंद्रस्वामीस फारसें कोणी मोजीत नव्हते. संभाजी व मानाजी यांचें अत्यंत वाकडें असून दोघेही स्वामीस पत्रें लिहीत आणि दोघांशी स्वामी संधान ठेवी. मानाजी पेशव्यांच्या आज्ञेत वागत नाही असा बोभाटा येतांच स्वामीनें त्यास पत्र लिहून धमकाविलें. त्यावर 'आपण पेशव्यांचे विरुद्ध बिलकुल वागत नाहीं, सर्वस्वी त्यांचे आज्ञेत चालतो. असें असतां हा प्रवाद कां उत्पन्न झाला समजत नाहीं,' असें मानाजीनें स्वामीस लिहिलें.‡ आंग्रेबंधूंचा हा कलह चालू असतांच बाजीराव ता. २८ एप्रिल रोजीं मरण पावला.

बाजीरावाच्या मृत्यूची बातमी कुलाब्यास नानासाहेबास समजतांच त्यानें आगऱ्यांचें भांडण कसें तरी मिटवून लगेच पुण्यास प्रयाण केलें. त्यानंतर संभाजी आंगरे ता. १२ जानेवारी, स. १७४२ रोजीं मरण पावला. तुळाजीनें ब्रह्मेंद्रस्वामीस कळविलें, "ती० रा० सरखेल यांचे शरीरीं अनारोग्यता तीन मासपर्यंत होऊन पौष बहुल तृतीया भौमवारीं संध्याकाळचे तास दिवसास त्याहीं कैलासवास केला. गिरजाबाईनीं अग्निप्रवेश केला. दुसऱ्या दोघी स्त्रिया, रक्षाचार व दासी मिळून दहा असामी समागमें गेल्या." विजयदुर्गाजवळ गिऱ्यें (घेरिया) येथें संभाजीची समाधि आहे.

कोकणांतील व्यवहारांशीं व व्यक्तींशीं आणि पेशवे वगैरे अनेक दरबारी मंडळींशीं ब्रह्मेंद्रस्वामीचा संबंध तीस चाळीस वर्षे अत्यंत निकट असल्यामुळें, त्याच्या पत्रांत आगऱ्याची हकीकत पुष्कळ मिळते.

आगऱ्याचे घरांतील तंटा पेशवे किंवा शाहू यांस मिटवितां आला नाहीं. बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून आंगऱ्यांचा डोईजडपणा राज्यचालकांस नडत होता, आणि साधेल तितकें आंगऱ्यांस दुर्बल करावयाचें हा पेशव्याचा अंतस्थ डाव होता. तीनही पेशव्यांचे वर्तनांत हा डाव उघड होतो. दाभाडे, आंगरे, नागपुरकर भोसले वगैरे प्रबल सरदारांची स्वतंत्र वागण्याची इच्छा व अरेरावीचें वर्तन कारभार चालविणारास पदोपदीं नडत होतें. सर्व मराठे सरदारांच्या ठिकाणीं ही फुटीची प्रवृत्ति थोड्याबहुत अंशानें नेहमींच कायम होती, आणि त्या प्रवृत्तीस दाबून टाकण्याचा प्रयत्न पेशवे करीत, तें राज्यहितासाठीं जरूरच होतें. मात्र असा प्रयत्न करितांना, सरदारांस कायम ठेवून

‡ खं. ३.२८४, ३१०, ३४७.

त्याची सुव्यवस्था लावून देण्याची इच्छा खरोखर पेशव्यांचे मनांतून कितपत होती हें निश्चित सांगणें कठिण आहे. मराठ्यांचा इतिहास बहुतेक अशा फुटीच्या प्रकरणांनींच भरलेला आहे. पेशव्यांचे ठिकाणीं दुसरा कोणी असता तरी त्यासही सरदारास नरम करण्याचा उद्योग करावाच लागता. तथापि मानाजीला हाताशी धरल्यावर, त्याचेंही मन पेशव्यांशी अनुरक्त राहिलें नाहीं, यावरून पेशव्यांचे वर्तन आगऱ्यांस आतून जाचत होतें असें दिसतें. शाहूनें मात्र आपल्या हयातीत सर्वांस ममतेनें व समदृष्टीनें वागवून सर्वांचा शक्य तितका राज्याच्या कामी उपयोग करून घेतला. तितकी उदार वृत्ति पेशव्याची नव्हती, राज्यचालकांस ती बहुधा शक्य होत नाही, हा अनुभव सर्वत्रच आहे.

६ **गोदावरीचें युद्ध, नासिरजंग** (डिसें–फेब्रु, १७४०).—नादीरशहा स्वदेशीं निघून गेल्यावर बाजीरावानें बादशहास पत्र लिहून वस्त्रें व १०१ मोहोरांचा नजराणा पाठविला, ¶ त्यावर बादशहाचें उत्तरही आलें कीं, पूर्वी कबूल केलेले सर्व करार यथायोग्य पाळण्यात येतील, जागीर व मनसब देण्यांत येईल; बाजीरावानें मात्र कराराप्रमाणें बादशहाची नोकरी करून दाखवावी, ( ता. १७.२.१७४० ). तथापि निजामानें हे करार अंमलांत आणण्याची टाळाटाळ चालविली. इकडे [illegible] या एक दोन वर्षांत बुंदेलखंडांतील सर्व राजपूत राजाशीं तह व ठराव करून आपला अंमल मजबूद केला, त्या कामीं गोविंदपंत बुंदेल्याची त्यास चांगली मदत झाली. हळूहळू निजामास जेरीस आणून पूर्वीचे करार पुरे करून घेण्याचा बाजीरावाचा उद्योग चालू होता.

स. १७३९ त चिमाजीआपा वसई काबीज करून व कोंकणांतील प्रदेशाची व्यवस्था लावून पुण्यास आला, त्याचे अगोदर २९ जुलैस बाजीरावही खानदेशांतून पुण्यास आला होता. नानासाहेब शाहूचे स्वारींत मिरजेस होता, तोही यथावकाश पुण्यास आला. दरम्यान मस्तानीचें प्रकरण विकोपास गेलें, त्याचा वृत्तान्त अन्यत्र सांगितला आहे. बाजीरावाचा हाच पुण्याचा शेवटचा पावसाळा होय. इतक्यांत नासिरजंगाशीं दोन महिने पावेतों पेशव्याचा अल्प झगडा झाला त्याचा निर्देश करणे जरूर आहे.

¶ पे. द. २२. १४३.

या वेळीं निजाम उल्मुल्क दिल्लीस असून त्याचा पुत्र नासिरजंग औरंगाबादेस मोठ्या फौजा जमवून बसला होता. भोपाळवर निजामाचा कोंडमारा होत असता त्याचे साह्यास जाण्यासाठीं ज्या फौजा जमविण्यात आल्या, त्या कायम असून वऱ्हाड खानदेशच्या भागात रघूजी भोसले, आवजी कवडे वगैरे सरदार मुलूखगिरीवर होते त्याच्या व नासिरजंगच्या लहान मोठ्या चकमकी वर्ष दीडवर्ष पावेतों चालू होत्या. स. १७३८ च्या आरंभी चिमाजी आपानें नासिरजंगास उत्तरेंत जाऊं दिलें नाही, त्या वेळीच पेशवे व नासिरजंग विशेष वर्दळीस आले होते. पण पुढें निजाम बाजीराव याचा तह होऊन भोपाळचा प्रसंग संपला तों नादीरशहाची धास्ती सुरू झाली, त्यामुळें कदाचित् या फौजास दिल्लीकडे जावें लागेल यास्तव नासिरजंगानें त्यांस रजा दिली नाही. स. १७३९ च्या आरंभी नादीरशहा दिल्लींत व मराठे वसईवर असल्यानें सर्व वातावरण साशंकच होतें. फौजा एकदा जमल्या की त्यांस कांही तरी कामगिरी पाहिजेच, नाही तर त्या धन्यालाच खाण्यास उठतात. तसाच प्रकार नासिरजंगाचा झाला. गेल्या दोन वर्षात रघूजी भोसल्यानें वऱ्हाड मध्यप्रातात अंमल बसवून तेथची निजामाची सत्ता बहुतेक संपुष्टात आणिली. 'देवगड, चांदे वगैरे संस्थानें व वऱ्हाडचे महाल व भूम परिंडें वगैरे बालेघाटचे महाल याचा मामला केला. सेवा करून ऊर्जित करून घ्यावें येविशीं विनंती लिहिली,' असें एक गृहस्थ पेशव्यास लिहितो. § नासिरजंगानें तर लढाईचीच तयारी केली. मराठ्यांचा वकील श्यामजी गोविंद लिहितो, 'नासरजंग नांदेडास आले. तमाम सरदारांस जागीर व खर्चास दिल्हे. याप्रमाणें समस्तही कलमजारी करून आपणही फौज ठेवीत आहेत. हस्तिनापुराहून सुमंत येथें आले आहेत. महाराजाकडे यास पाठवून त्यांचा स्नेह संपादावा, आणि रघूजी व फत्तेसिंग भोसले याचें साह्य घेऊन पंतप्रधानाशीं पुरता बिघाड करावा ऐसें चित्तांत आणिलें आहे. श्रीमंतांनीं जसी मोहकूब करून पहिले कराराप्रमाणें वर्तले तरी उत्तम, नाही तर कटाक्ष. श्रीमंत बऱ्हाणपुरावर असून आवजी कवडे वऱ्हाडांत आले आहेत, याप्रमाणें गडबड दिसते. पाहवें कोण्या थरास जाईल. श्रीमंतांनीं सावध असावें,' (१२.५.१७३९). यावरून निजाम व नासिरजंग यांनी [illegible] पुनः पूर्वीचा डाव शाहू व पेशवे

§ पे. द. १७.९५

याच्यांत फूट पाडण्याचा आरंभिला, हें स्पष्ट होतें. पुढें या मराठे वकिलावर नासिरजंगानें तोहमत आणून त्याचा छळ चालविला. †

आवजी कवड्यामारखाच तुबाजी अनंत कावनईकर हा दुसरा बाजीरावाचा हस्तक नासिरजंगाचे हद्दींतील स्थलें हस्तगत करण्यास त्यानें पाठविलेला होता. बाजीरावाचें लक्ष नादीरशहाकडे असतां त्यानें तुबाजीपंतास मुद्दाम आवरून धरिलें. बाजीराव त्यास कळवितो, 'या स्थलांचें कार्य केलीया नासिरजंगचे चित्तांत पुरताच वसवास निर्माण होईल, म्हणून तूर्त किल्लेदारांसी ठीक करून ठेवावे. किल्लेदार आपले चाकरच ऐसेच करून आम्ही विचारात आणून कार्य करूं तेव्हा होय, ऐसें अनुसंधान ठीक करून ठेवावें. नासरजंग आपल्या लगामी लागला तर उत्तमच जालें, स्थलें आपलीच आहेत. तो लगामी न लागे आणि आपलें कार्य न होय, तेव्हा त्यासच टिकाणी लावला म्हणजे सारींच स्थळें आपले पदरीं पडतील. नुसत्या तिहींचाच मजकूर काय आहे?' § हीं स्थळें कोणती त्याचा निश्चय होत नाहीं. अकोलें, कोतूल, धांदरफळ, नेवासें, टोके, अशीं कित्येक स्थलें पालखेडच्या तहात बाजीरावास देण्याचें ठरलें असतां तीं यावेळपावेतों त्यास मिळालीं नाहींत, म्हणून तीं आतां हस्तगत करून नासिरजंगाचा उच्छेद कायमचा बंद करण्याचा बाजीरावानें विचार ठरविला. पालखेड प्रकरणांत बाजीरावास जागीर देण्याचें ठरलें असतां ती मिळाली नाहीं म्हणून बाजीरावानें नासिरजंगावर चढाई केली असें डफ, किंकेड, शकावलीकार म्हणतात, त्याचें बीज वरप्रमाणें दिसून येतें. तथापि जागिरीचा किंवा स्थलांचा प्रश्न वास्तविक अगदीं गौण होता. छत्रपति व पेशवा याच्यात पूर्वी जो खेळ निजामानें चालविला तोच पर्यायानें पुनः त्याच्या पुत्रानें सुरू केला. आनंदराव सुमंतास काढून द्यावें असा करार असता त्यासच निजामानें अद्यापपर्यंत आपल्याजवळ ठेविलें, इतकेंच नव्हे तर भोपाळच्या प्रसंगानंतर जो तह झाला त्याच्या वाटाघाटींत व पुढें नादीरशहाचे स्वारींत दिल्लीस हा सुमंत निजामाजवळ राहून परभारें वाटेल त्या उलाढाली करीत होता, ‡ त्यामुळें

† पे. द. १५. ७०, ८१. § पे. द. १५. ७४. पे. द. ३०.२३३, २४७.

‡ "आनंदराऊ जे मला करायास आले, परंतु मनुष्याचे परीक्षक नव्हते. स्वकार्य साधावयाकरितां धण्याच्या कानांस धका देतील ऐसें भासतें." असें कृष्णाजी राम १७३६ त लिहितो. पहा पे. द. ३३.४४७

बाजीरावानें निजामास लावलेली पाचर ढिली पडे, तो प्रकार कायमचा बंद पाडणें बाजीरावास जरूर वाटलें, आणि वसईच्या प्रसंगाची निवृत्ति झाल्यावर त्यानें आतां या निजामपुत्राची खोड मोडण्याची तयारी केली. एका अर्थानें ही पालखेडच्याच प्रसंगाची पुनरावृत्ति होय. माळव्याच्या सनदा निजामाकडून मिळाल्या नाहींत त्यासाठीं बाजीरावानें त्याच्या प्रदेशावर चाल केली असें दिसतें.

बहुधा ही सर्व कारवाई सुमंताचीच असली पाहिजे. निजामाशीं कित्येक गोष्टी ठरवून सुमंत दिल्लीहून नासिरजंगाकडे आला, त्यानेंच नासिरजंगाचे कान भरून त्यास बाजीरावावर चढाई करण्यास भर दिली. अशा कामांत शाहूची तर द्विधा वृत्तिच असे. चार चौघांनीं बाजीरावाच्या उद्दामपणाबद्दल त्याचें मन साशंक बनविलें कीं दरबारांत असे घरसोडीचे प्रकार नेहमीं चालत. अशा स्थितींत लष्करी सामर्थ्यानें निजाम काय, शाहू काय किंवा अन्य कोणी काय, सर्वांसच दहशत बसविण्याचा बाजीरावाचा वर्तनक्रम होता, तोच त्यानें याप्रसंगीं स्वीकारला. ता. १२ डिसेंबर रोजीं बाजीरावानें नासिरजंगावर चढाई सुरू केली. थोड्या दिवसांनीं चिमाजीआपा त्यास नगराजवळ येऊन मिळाला. नासिरजंग औरंगाबादेहून चालून पुढें गोदीवरीकडे आला.

ता. ७ फेब्रुवारीस पेशवा कळवितो, "नासिरजंगाचा विचार सुलतानजीस सामील करून शहागडाकडे जावेसा दिसतो. परंतु महाराजांनीं त्याचेविशीं काळजी चित्तांत आणूं नये. परवा तिसगावाजवळ येऊन राहिला. मल्हारबा राणबा तोंडावर आहेत. तोफा चालावयास त्यास अडचण पडेल असा गांठून महाराजाचे पुण्यप्रतापें जरबेंत आणीतच आहों. सहा सुभे दक्षिण मोकळी व्हावी ऐसा समय आहे." ¶ पुढें कांहीं काळ उभयपक्षाची रेटारेटी होऊन बाजीरावानें नासिरजंगास औरंगाबादेपर्यंत पिटीत नेलें. निरुपाय होऊन त्यानें हंड्या व खरगोण हे दोन जिल्हे बाजीरावास देऊन त्याची समजूत केली. आणि एकमेकानी एकमेकांच्या मुलखांत स्वाऱ्या करूं नये असें कबूल केलें. ता. २७ फेब्रुवारी, स. १७४० रोजीं मुंगी पैठण येथें वरील तह ठरला. त्यानंतर पिंपळगावजवळ वरखेड येथें बाजीराव व नासिरजंग यांची भेट ता. ३ मार्च रोजीं झाली. नंतर बाजीराव व चिमाजी उत्तरेकडे कांहीं मजल गेले, आणि चिमाजी परत फिरला. चिमाजीनें परत येतांना ता. १२ मार्च, रोजीं औरंगाबाद येथें नासिरजंगाची भेट घेतली, आणि दोन महिन्याची ही मोहीम संपली.

¶ पु. द. १ ले १३८–१४४ यांत लढाईचे तपशील आहेत.

ता. १२ मार्च, स. १७४० रोजीं चिमाजी आपा नानासाहेबास लिहितो, "येथील सल्ला जाल्याचीं पत्रें फत्तेसिंग व रघूजी भोसले यांस आम्ही पाठविलीं, त्याउपर ते बेदर प्रांतीं गेले. आम्ही मोगलास जरबेंत आणून सल्ला केला, यावरून बाजीराव प्राक्तनवान, चित्तावर धरतात ते करतात असें राजश्री स्वामी बोलले, तें वृत्त माहादोबानीं तुम्हांस लिहिलें ते कळलें. आम्हांस [illegible] पांच लाख रुपये प्राप्त नसता त्यांचे चित्तीं तसें आले. असो. सल्लाबतीची गोष्ट उत्तम आहे." ‡ रघूजी व फत्तेसिंग पुढें मोठ्या कर्नाटक स्वारीस गेले तो वृत्तान्त पुढें येईल.

बाजीरावास नवीन परगणे नर्मदेच्या कांठी मिळाले ते ताब्यांत घेण्यासाठीं तो तिकडे गेला. कांहीं दिवस चिमाजी आपा त्याजबरोबर होता. मस्तानी संबंधानें उभयताचें बरेंच वितुष्ट आलें असावें. "राऊस्वामी १९ जिल्हेजी (७ मार्च) गेले त्या दिवसापासून आज पावेतों त्याचें पत्र नाहीं. जेथपर्यंत आमचा यत्न चाले तो केला, परंतु ईश्वराचे चित्तास नये. त्याचे प्राक्तनीं असेल तें सुखरूप होऊ. पुण्यास गेल्यावर तिची रवानगी त्यांजकडे करावी," असें चिमाजी लिहितो. ता. २३ मार्च रोजीं बाजीरावानें बऱ्हाणपुराहून मातुश्रीस लिहिलें. "चि० रघुनाथ व जनार्दन समागमें सुखरूप आहेत. आपास उष्णकाळामध्यें बाहेर जाऊं न द्यावें."† या पुढें बाजीराव खरगोण परगण्यांत गेला, तेथून नर्मदेच्या कांठीं रावेरखेडी येथें असतां ता. २८ एप्रिल रोजीं मृत्यु पावला, ती हकीकत पुढें येईल. हीच बाजीरावाची शेवटची स्वारी होय.

‡ पे. द. १५.८६, ८५. † पे. द. ९. ३३, ३७.

# १४

# परिसमाप्ति

## कालसूची

**पेशव्यांचे सर्व कौटुंबिक तपशील बाळाजी विश्वनाथ पृ० १३ वर पहावे.**

| | | | |
|---|---|---|---|
| १७०० | ऑगस्ट | १८ | ( भाद्र० शु० १५ ) बाजीराव जन्म. |
| १७२१ | डिसें० | ६ | नानासाहेब जन्म. |
| ,, | जाने० | ११ | नानासाहेब लग्न गोपिकाबाईशी, मस्तानी दक्षिणेत प्रथम दाखल. |
| १७३० | ऑगस्ट | ३ | भाऊसाहेब जन्म. |
| १७३४ | | | समशेरबहाद्दर जन्म. |
| ,, | ऑगस्ट | १ | रघुनाथराव जन्म. |
| १७३९ | नोव्हें० | | मस्तानीवर चौकी पहारा. |
| ,, | ,, | २८ | मस्तानी पहाऱ्यातून पळून बाजीरावाकडे गेली. |
| १७४० | जाने० | २६ | मस्तानीस कैद; मृत्यु बाजीरावाचे निधनवृत्तानें. |
| ,, | एप्रिल | २८ | ( वैशाख शु० १३ ) बाजीराव मृत्यु. मस्तानी सहगमन. |
| ,, | डिसें० | १७ | चिमाजी आपा मृ. |

# १४

# परिसमाप्ति



१ **कौटुंबिक.**—बाजीरावाचा जन्म भाद्रपद शु० १५ शके १६२२, ता. १८ ऑगस्ट, स. १७०० चा असून मृत्यु सोमवार वैशाख शु० १३, छ १२ सफर, ता. २८ एप्रिल, स. १७४० या दिवशीं नर्मदा कांठीं रावेरखेडी † येथे झाला. त्याचें लग्न महादजी कृष्ण जोशी यांची कन्या काशीबाईशीं झालें, त्याची मिति किंवा स्थल उपलब्ध नाही. इला बाळाजी ऊर्फ नानासाहेब, रामचंद्र, रघुनाथ व जनार्दन असे चार मुलगे झाल्याचा उल्लेख आहे. नानासाहेबाचा जन्म मार्गशीर्ष व० १३ सह १४ शके १६४३ बुधवार ता. ६ डिसेंबर, स. १७२१ रोजीं नाणे मावळांत वडगावजवळ साते गांवीं झाला. रामचंद्र स. १७२३ त जन्मला व स. १७३३ त दहा वर्षांचे वयांत मृत्यु पावला. त्यावर आणखी एक पुत्र ता. ३ मार्च, स. १७३३ त झाल्याचा उल्लेख आहे, पण तो जगला नाही. आणखी मुलें झालीं असावीं. या सर्वांत नानासाहेब व रघुनाथराव हे दोघेच पुढें प्रसिद्धीस आले. रघुनाथरावाचा जन्म माहुलीस श. १६४६ आनंद संवत्सर, श्रावण शुद्ध त्रयोदशी, ता. १ ऑगस्ट, १७३४ रोजीं झाला. त्याची

† खाडव्यावरून इंदूरकडे जाणाऱ्या रेल्वेच्या मनावद स्टेशनवरून १३ मैलावर रावेरखेडी नर्मदा दक्षिणतटाकीं आहे.

मुंज माघ शुद्ध द्वितीया शके १६६१, ४ फेब्रुवारी, १७४० रोजीं नानासाहेबानें लाविली; आणि लगेच तीन दिवसांनीं सदाशिवराव भाऊचें लग्न उमाबाईशीं ता. ७ फेब्रुवारी १७४० रोजीं झालें. बाजीराव या समारंभास हजर नव्हता. चिमाजी आपाचें लग्न रखमाबाई त्रिंबकराव पेठ्याची बहीण इच्याशीं स. १७१६ त झालें, † तिच्या पोटीं सदाशिवरावाचा जन्म ३ ऑगस्ट १७३० रोजीं पुण्यास झाला. मुलाच्या जन्मानंतर रखमाबाई महिन्याच्या आतच म्हणजे ३१ ऑगस्टला वारली. चिमाजीचें दुसरें लग्न ता. ९ डिसेंबर १७३१ रोजीं पुण्यास झालें. या दुसऱ्या बायकोचें नाव अन्नपूर्णाबाई. मस्तानीपासून बाजीरावास संतति झाली तिचा उल्लेख पुढें स्वतंत्र आहे. नानासाहेबाचें लग्न ता. ११ जानेवारी, १७३० रोजीं भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या गोपिकाबाई इच्याशीं झालें. तेव्हां त्याच्या वयास नुकतीं आठ वर्षे पुरीं झालीं होतीं.

चिमाजी आपास अन्नपूर्णाबाईपासून बयाबाई नांवाची मुलगी झाली, ती एक महिन्याची असतांच आईबाप वारले. सदाशिवरावाची मुंज २० मार्च, १७३६ रोजीं झाली. वसईच्या स्वारीहून आल्यावर चिमाजी आप्पा बहुतेक आजारीच झाला. साताऱ्यास शाहूचे भेटीस जाववेना ते अंतर्भेदी पत्र दुसरीकडे दिलें आहे. † प्रकृतिस्वास्थासाठीं अनुष्ठानें, जपजाप्य चालू होतीं मातुश्री तर नेहमींच काळजींत असे. ' [illegible] हैराण केलें. शरिरास फारच पीडा होत आहे. अद्यापही उतार नाहीं, यामुळें पत्र लिहिण्यास चार दिवस अंतर पडलें. स्वामीच्या आशीर्वादें शरीर आरोग्य होईल, ' असे १० सप्टेंबर १७३९ च्या पत्रांत चिमाजी ब्रह्मेंद्रस्वामीस लिहितो. स. १७४० च्या ऑक्टोबरांत त्याची प्रकृति फारच बिघडली, म्हणून तो स्वारीतून पुण्यास परत आला. परंतु दिवसेंदिवस त्याचा वाग्वा जास्त होऊन ता. १७ डिसेंबर १७४० रोजीं तो पुण्यास मरण पावला. तेव्हां अन्नपूर्णाबाई सती गेली. त्याची उत्तरक्रिया व बाईचें सहगमन यांचा खर्च फक्त रु. ११७५ झाल्याचा उल्लेख आहे. बायाबाईचें लग्न गंगाधर नाईक ओंकार याजबरोबर ता. १४ एप्रिल, १७४५ रोजीं झालें. त्या वेळीं तिचें वय साडेचार वर्षांचें होतें. ती १८ एप्रिल,

† ब्र. १०, ११४. † पे. द. १७.०८

१७४१ रोजी वारली.¹ चिमाजीचें शरीर आजन्म कष्ट सोसून झिजलेलें होतें आणि त्याचा आजार बहुधा क्षयाचा असावा. पेशव्यांच्या घरांतील पुरुषांचे अल्पायुष्य पाहता त्या कुटुंबांत क्षयाची व्यथा असावी असा बळकट संभव वाटतो.

बाजीरावाच्या कीर्तीमुळें चिमाजी आप्पाचें नाव पुष्कळसें लोपून गेलें आहे. योग्यतेच्या मानानें पाहिलें तर चिमाजी बाजीरावाहून कमी नव्हता. उलट, काही काही बाबतींत तो बाजीरावाहून जास्त होता असेंच वाटतें. बाजीरावाच्या दोषांवर पांघरूण घालून चिमाजीनें मोठ्या प्रेमानें व आस्थेनें त्याचा चागला पाठपुरावा केला. आपलाच हेका चालविण्याचा प्रयत्न त्यानें कधी केला नाही. त्याचा स्वभाव विचारी, मनमिळाऊ व धोरणी होता. दुसऱ्याचें मन न दुखवितां युक्तीनें व निश्चयानें काम करून घेण्याची हातोटी त्यास होती. प्रत्यक्ष बाजीरावावरही त्याचा दाब असून या दाबामुळें राष्ट्राचे काम बरेंचसें चागलें झालें. मस्तानीच्या वगैरे बाबतीत चिमाजीच्या धाकामुळें बाजीराव बराचसा मर्यादेंत राहिला. शाहू व सरदारही बाजीरावाकडे एखाद्या बाबतीसंबंधानें परभारें बोलणें न करता चिमाजीच्या तंत्रानें कार्यभाग करून घेत. कुटुंबांतील व बाहेरच्या मंडळीचे बरे वाईट व्यवहार चिमाजी परभारें उलगडीत असे; जरूर तेव्हाच बाजीरावास विचारी. बाजीरावाची मुलें तर बहुधा चिमाजीजवळ असत. नानासाहेबास लहानपणचें शिक्षण चिमाजीकडून मिळालें. कित्येक स्वाऱ्यात तो चिमाजीबरोबर हजर असे. राज्यकारभारात पुढें दिसून आलेलें त्याचें धोरण त्यानें चिमाजीपासून उचललें असावें असें दिसतें. कुटुंबातील लग्नकार्य, घरातील लढे, आप्तसोयऱ्यांचा परामर्ष, तीर्थयात्रा, दानधर्म इत्यादि गृहकार्यांचे प्रकार बहुधा चिमाजी उलगडीत असे. शाहू महाराजाचें मन तर चिमाजीनें व विशेषतः नानासाहेबानें आपल्या अंकित करून घेतलें होतें. रघुनाथरावाची मुंज व सदाशिवाचें लग्न ही कार्ये पुण्यास स. १७४० च्या फेब्रुवारीत एकत्र झाली, तेव्हा बाजीराव स्वारीत असून शाहू छत्रपति

¹ बयाबाईची एक आख्यायिका आहे कीं ओंकार हे मूळचे ओक. पाच वर्षाची मुलगी सासरी गेल्यावर जवळच्यांनीं वरील आडनावावरून तिला चिडविले. बिचारी रडत बसली. आजीने आणून पोटाशीं धरून विचारलें, 'बाळ का रडतेस?' तिनें ओक नावानें चिडवितात असें सांगितलें. लगेच राधाबाईनें हुकूम काढून घराण्याचें ओक नाव बदलून त्याचे ओंकार केलें. तेच हल्ली पुण्याचे सरदार ओंकार होत.

त्यासाठीं मुद्दाम साताऱ्याहून पुण्यास आला तो चिमाजी व नानासाहेब यांच्या आग्रहावरून आला. कित्येकदां बाजीरावाशी सरदारांचे खटके उडत, त्यांची समजूत चिमाजी करी. बाजीराव बाहेर स्वारींत व राजकारणांत निमग्न असल्यामुळें तळावरचे बैठे व्यवहार चिमाजीला पाहावे लागत. चिमाजीच्या शौर्याची कसोटी वसईच्या युद्धात लागलीच आहे. हबशावरील मोहीम बाजीरावानें अर्धवट टाकली ती चिमाजीनें सिदी सातास ठार मारून यशस्वी केली. गिरिधर बहादूर व दयाबहादूर यांस चीत करून माळवा प्रांत काबीज करण्याचें श्रेय चिमाजीस आहे. गुजरातचे व्यवहार तर बहुतेक त्यानेंच उलगडले. स. १७३७ त फिरंग्यावरील मोहीम अपूर्ण राहिली होती ती चिमाजीनें स. १७३९ त पुरी केली. दोघेही अल्पायुषी वारले. बाजीराव-चिमाजीसारखे पुरुष अल्पायुषी व्हावेत हें मराठशाहीचें मोठें दुर्दैव होय. दुहीमुळें जितके मराठशाहीचें नुकसान झालें, तितकेंच बहुधा बाजीराव, चिमाजी, नानासाहेब, विश्वासराव, माधवराव आणि सदाशिवराव अशा पराक्रमी पुरुषांच्या अकालीं मृत्यूनें झालें हें स्पष्ट दिसतें. सदाशिवरावाच्या अंगी बापाची तडफ चागलीच उतरली होती.

बाजीरावाची स्त्री काशीबाई ही पतिनिष्ठ, गरीब व शात स्वभावाची दिसते. स. १७४२ त रामेश्वरची व १७४६ त काशीची यात्रा केल्यावर ती ता. २७ नोव्हेंबर, १७५८ रोजीं वारली. तिला घरांत ताई म्हणत. तिची सासू राधाबाइ शहाणी व प्रसंग पडल्यास राज्यकारस्थानेंही तडीस नेण्यांत कुशल होती, तशा प्रकारची कर्तबगारी काशीबाईत दिसत नाही. कदाचित् सासू घरांत दीर्घकाळ मुख्य असल्यामुळें काशीबाईला स्वयंप्रकाश दाखविण्यास अवसर मिळाला नाही. पण ती प्रकृतीनें बरीचशी अधू होती या कारणानें बाजीरावाचें लक्ष मस्तानीकडे अधिक वेधलें असल्याचा संभव आहे. स. १७३९ त तिला बराच आजार झाला, त्यासाठी दाया आणल्या, वैद्य आणले, उपचार केले, असे उल्लेख आहेत. पाय दुखत असत यावरून संधिवाताचा विकार असावा. 'आम्हांस ठेवले आहा, त्याप्रमाणें कुशल आहों,' असे तिचे उपरोधिक उद्गार तिचे एका पत्रांत आहेत. 'नाथपंथी फकीर यास काशीबाईचें औषध करावयाबद्दल रुपये दहा' खर्च पडले आहेत. 'काशीबाई वहिनीचा पाय बरा असल्यास त्यांनाही समुद्रस्नानास पाठविणे' असें १७३७ त चिमाजी लिहितो. 'नबाबाचे सरकारांत भरमणा म्हणून वैद्य काशीबाईचा पाय निश्चयपूर्वक बरा करीन

म्हणतो, त्याचा उपचार केला. काशीबाई स्वभावानें मनमिळाऊ होती. कदाचित् अशा सहनशील स्वभावामुळेंच मस्तानीपुढें नवऱ्याशीं तिचा निभाव लागला. राधाबाई व गोपिकाबाई जाज्वल्य दिसतात. 'श्रीमंत विषयलंपट झाले, यामुळें चिमाजी आपांशीं अंतर पडून निघून नर्मदा तीरास गेले; महादाजी अंबाजी व नानासाहेब राजश्रीजवळ गेले,' या शकावलींतील उल्लेखावरून बाजीरावाच्या कौटुंबिक स्थितीवर कांहीं प्रकाश पडतो. §

**२ मस्तानीची कथा.**—मस्तानी ही बाजीरावाची मुसलमान रक्षा. बुंदेलखंडांत बाजीरावास मिळालेली जागीर पुढें बांदा संस्थान या नांवानें मस्तानीच्या वंशाकडे चालली. तिचें सर्वच चरित्र चमत्कृतिजन्य असून त्यामुळें बाजीरावाच्या चरित्राला ही एक शृंगारवीरकरुणादि रसोद्भव प्राप्त झाला आहे. . . . . . . . . . . . . गुणसंपन्न अशी ही कंचनी बाजीरावाला केव्हां कशी प्राप्त झाली याचा निश्चित थांग लागत नाही. बुंदेलखंडावर बाजीरावाची स्वारी स. १७२९ च्या उन्हाळयांत झाली, छत्रसालास मदत करून त्यानें बंगशाचा पाडाव केला, त्या प्रसंगात ती त्याला छत्रसालाकडून प्राप्त झाली हा प्रवाद संभवनीय दिसतो. पुण्यास ता. ११.१.१७३० रोजीं नानासाहेबाचें लग्न झालें त्या समयीं 'मस्तान कलावंत' हिला व तिच्या साजिंद्यांना पोषाख दिल्याचा खर्च दाखल आहे, ¶ त्यावरून वरील संभवास दुजोरा मिळतो. म्हणजे दहा वर्षे तिचा सहवास बाजीरावास घडला, मग ती प्रत्यक्ष छत्रसालाच्या रक्षेची कन्या असो अगर बाजीरावाचा सत्कार करण्यासाठीं त्यानें ती बाहेरून मिळवून त्याला अर्पण केलेली असो. ‡

समशेर बहादूर पुत्र बाजीरावास झाला, त्याचे वंशास बुंदेलखंडात मिळालेली जागीर देण्यांत आली, यावरून वरील तर्कास पुष्टि मिळते. पेशवे दप्तरांतलें एक पत्र छापलेलें आहे, त्याचा लेखक बाजीरावास लिहितो, 'साहेबांपाशीं मस्तान आहे येणेंकरून आम्हांस समाधान आहे. पण आपण थोर, आमचा परामर्श करावा, पोर हिरोन घेतली असा लौकिक न कीजे.

§ पे. द. ९. ५, ६, १९, ७७; १८. १५८; २२. १४६; ३०. २७८, ३२३.

¶ पे. द. ३०.३६३.

‡ भा. व. ऐ चर्चा पृ. ७ वर पुढील श्लोक आहे:—

मस्तानि नामें भुवनैकरम्या। अन्यानरा दृष्टिसही अगम्या।
स्वस्त्रीसही किंबहुना सुनम्या। वेश्या असे शाजतखान गम्या॥

आमची फिकीर आपणास आहे.' पत्रावर लेखकाचें नांव नाही. पण बहुधा तो कोणी तरी सुस्वरूप मुली तयार करणारा धंदेवाईक असावा. नृत्यगानादि कला लहानपणापासून मुलींस शिकवून त्या धनिकांस देण्याचा रिवाज त्या वेळी प्रचलित होता. दक्षिणेपेक्षां अशा मुलींची पैदास उत्तरेंत विशेष होत असे. कदाचित् मराठ्यांच्या फौजाबरोबर असे सौदागर फिरत असतील. या गृहस्थाकडून छत्रसालानें तिला घेऊन बाजीरावास दिली असणें शक्य आहे. थोर पाहुण्यांचा सत्कार अशा रितीनें त्या वेळी करीत. ती मुसलमान बीजाची एवढ्यावरूनच मुसलमान गणली गेली. बाजीरावाकडे आली तेव्हां तिचें वय १४.१५ असेल. पुढें ती पुण्यास अखेरपर्यंत ब्राह्मणी घरात ब्राह्मण नवऱ्याजवळ निष्ठेनें राहिली. भाषा, पेहराव, अन्नादिव्यवहार तिनें ब्राह्मणांचे स्वीकारले. पेशव्याचे वाड्यात वार्षिक गणपति उत्सवात तिचें नृत्यगायन होई. तेव्हा मोठा समाज जमे. म्हणजे संस्कृतीनें ती हिंदु बनली होती. दहा वर्षे बाजीरावास तिचा सहवास घडला.

तारीखी-महमदशाहींत विधान आहे कीं 'मस्तानी कंचनी असून ती अश्वारोहणांत विशेष कुशल होतीं. बाजीरावाप्रमाणेच तलवार, भाला घेऊन ती त्याजबरोबर भरधाव घोडदौड करी. त्या तीव्र वेगात उभयताच्या रिकीबी यत्किंचित्-मागेपुढें होत नसत. मोहिमांत ती बाजीरावाबरोबर हजर असे.' ¶ या कसबानें व आपल्या मोहक लावण्यानें बाजीरावाचें चित्त तिनें आकर्षून घेतलें. शनिवार वाड्यात तिच्याकरिता बाजीरावानें स्वतंत्र जागा बांधिली, तिचें नांव मस्तानीमहाल आणि त्या बाजूच्या दरवाजास 'मस्तानी दरवाजा' असें नाव होते.

साताऱ्यास बाजीराव छत्रपतीच्या भेटीस गेला असता एकदा मस्तानीस त्यानें आपल्या बरोबर घेतलें. त्याबद्दल शाहूनें बाजीरावाचा निषेध केला. साताऱ्यास जोशी व अनगळ पेशव्यांचे सावकार होते, त्यांनीही बाजीरावाची कानउघाडणी केली. पुढें पुण्यास आल्यावर बाजीरावाचा हा प्रकार पाहून राधाबाई, चिमाजी आपा, नानासाहेब इत्यादि मंडळीस चीड आली, आणि

¶ तारीखी-महंमदशाही भाग १ पृ. ४१३; "She was a Kanchani (a dancing girl) possessing fine horsemanship and skill in handling the sword and the spear. She always accompanied Bajirao in his campaigns and rode stirrup to stirrup with him."

हे त्याचें वेड कसें सोडवावें या संबधानें त्यांच्या मसलती स. १७३९ त जोरानें चालू झाल्या. बाजीरावास जास्त निकरानें सांगितल्यास तो कदाचित् वैताग करील, जिवास वगैरे अपाय करील, अशीही या जवळच्या मंडळीस भीति पडली. स. १७३९ च्या नोव्हेंबरच्या सुमारास चिमाजी आप्पा, पुरंदरे वगैरे वजनदार लोकांनी बाजीरावाचा चांगला निषेध केला. त्यावरून रुसून बाजीराव देवदर्शनाकरितां म्हणून करकुंभास व तेथून पाटसास जाऊन राहिला. इकडे चिमाजी आपानें मस्तानीला वाड्यांतील एका खोलींत अडकवून बाहेर चौकी पहारा बसविला. तेथून युक्तीनें आपली सुटका करून ती २४ नोव्हेंबर रोजी पळून पाटसास बाजीरावाकडे गेली. 'मस्तानी येथून गेली. मोठा संदेह आम्हाविशी होता तो वारला' असें नानासाहेब लिहितो. मागोमाग पुरंदरे, मोरशेट काका वगैरे मंडळी पाटसास गेली, आणि त्यांनी बाजीरावाकडून तिला पुण्यास परत पाठविलें. त्यानंतर बाजीराव नासिरजंगावरील मोहिमेंत असतां चिमाजीचे सांगीवरून स. १७४० च्या ता. २६ जानेवारीस पर्वतीच्या बागेत नानासाहेबानें मस्तानीला युक्तीनें आणून कैद केलें. तेथें ती दोनतीन महिने तरी प्रतिबंधात होती.

इकडे बाजीराव निजामावर चालून गेला. 'मस्तानीच्या पायीं नासिरजंगाचा मनसुबा बुडाला, राजाची मर्जी गेली.' असें नानासाहेब लिहितो. स. १७४० च्या एप्रिलात बाजीराव मरण पावला तेव्हा मस्तानी सती गेली असें सांगतात. पुढें तिचें नांव आढळत नाहीं. पाबळ, केंदुर हीं गावें मस्तानीला इनाम दिलेली होती. शिरूर नजीक पाबळ येथें मस्तानीची कबर गावानजीकच आहे. †

मस्तानीला मृत्यु कसा आला यासंबंधी निश्चित माहिती अद्याप मिळत नाही. तिला सोडून बाजीरावाकडे पाठवावी असा विचार चालू असताच बाजीरावाच्या निधनाची बातमी आली, ती ऐकतांच तिचा प्राण गेला. मग तिनें मुद्दाम प्राणघात करून घेतला कीं काय हे समजण्यास मार्ग नाही. पुणे ग्याझेटिअरमध्ये विधान आहे की, मस्तानीचा मृत्यु शनिवार वाड्यात झाला, तेथून तिला तिच्या इनामाचे गांव पाबळ येथें नेऊन पुरलें. कित्येकांचे मतें ती

† The Poona Gazetteer says, "Mastani died at the Shaniwar Palace one of whose gates is still called after her and was buried at Pabal which with the neighbouring villages of Kendur and Loni was granted to her."

पुण्यांतून निघून बाजीरावाकडे जात असतां पाबळ येथें तिला त्याच्या मृत्यूची बातमी कळली आणि तिनें लगेच प्राण सोडला. याचाच अर्थ तिने सहगमन केलें असा लोकवार्तेत उतरला. एकंदरींत मस्तानीचें सर्वच चरित्र मनोवेधक व बाजीरावाच्या पराक्रमाला साजे इतके अद्भुत आहे.

बाजीरावापासून मस्तानीस मुलगा झाला त्याचे नांव समशेर बहादूर. हा पानपतावर पडला त्या वेळीं त्याचें वय २७ वर्षांचें होतें. त्यावरून त्याचा जन्म १७३४ त झाला हें उघड आहे.§ त्याचें पहिलें लग्न नासिक जिल्ह्यातील पेंटचा जागीरदार लक्षधीरराव याची मुलगी लालकुवर इच्याशीं जाहले. ही बायको लवकरच वारली. त्यानंतरचें लग्न ता. १८ ऑक्टोबर, स. १७५३ रोजी निंबगिरीकराची मेहेरबाई इच्याशी झालें. समशेर बहादूर हा पुढे पेशव्याचे फौजेंत खासा सरदार असे. पेशव्यांच्या घरांतील इतर मुलांबरोबर त्याचे शिक्षण होऊन मराठी भाषा व मोडी अक्षर $ त्यास सुंदर येऊं लागलें. सदाशिवराव भाऊच्या हाताखालीं वागून तो हुशार बनला. पेशव्यांच्या अनेक मोहिमांत हजर राहून त्यानें मराठी राज्याची सेवा उत्कृष्ट बजाविली. विश्वासराव वगैरे बरोबर पानिपतावर समशेर बहादूरही ऐन तारुण्यात खपला, येणेंकरून राज्याची मोठी हानि झाली यांत संशय नाही. त्यांतल्या त्यात समशेर बहादूराच्या द्वारा हिंदुमुसलमानाचें ऐक्य, निदान रहस्य, अनपेक्षितपणें घडून येत होतें तें बिघडले असें वाटल्याशिवाय राहत नाही.

समशेर बहादूरास विवाहित स्त्रीखेरीज रामबाई व फुलबाई या दोन रक्षा होत्या. मेहरबाईच्या पोटीं त्यास एक पुत्र झाला त्याचें नांव अलीबहादूर; यासच कृष्णसिंग असे दुसरें नाव होतें. त्याचा जन्म १७५८ त झाला. तोही बापासारखाच पराक्रमी निघाला. महादजी सिंदे उत्तर हिंदुस्थानांत अडचणींत आला, तेव्हा त्यास साह्य देण्यासाठी नाना फडणिसानें अलीबहादूरास फौज देऊन तिकडे पाठविलें. त्यानें बुंदेलखंडांत पराक्रम करून पाऊण कोटीचा मुलूख काबीज केला. नाना फडणिसाच्या परवानगीनें त्यानें सागरच्या ईशान्येस बादा येथें आपलें वास्तव्य केलें; आणि पुण्याहून लोक नेऊन अटरा कारखाने स्थापिले. गोरे नावाचा एक इसम त्यानें तेथें आपल्या दिवाणगिरीवर

§ ऐ. वर्ष ६ पृ. १०७ वर मृत्युसमयीं समशेर बहादूराचें वय २८ होतें असें म्हटलें आहे. तसे असल्यास जन्म स. १७३३ चा ठरतो.

$ हस्ताक्षर पहा पे. द. भा. १८ चे आरंभी.

गेला, त्या घराण्याचे वंशज हल्लीं बांदा येथें आहेत. अशा रीतीनें बांद्याची जागीर नाना फडणिसाचे वेळेस स. १७८८ त उत्पन्न झाली. कलिंजर किल्ला घेत असतां अलीबहादर स. १८०२ साली मारला गेला. त्याची स्त्री बादशहा बेगम लहानपणींच वारली. दुलज बेगम व बक्षी बेगम अशा आणखी दोन बायका त्यास असून दुलज बेगमचा मुलगा समशेर बहादर व बक्षी बेगमचा झुल्फिकार अली. रहिमत बिबी नावाची अलीबहादरची रक्षा होती. अलीबहादराचा मुलगा समशेर बहादर दुसरा याजला इंग्रज सरकारनें चार लाखांचा तनखा देऊन बांद्याची जागीर स. १८०४ त खालसा केली. हा समशेर बहादर स. १८२३ त मरण पावला. पुढें त्याचा भाऊ झुल्फिकारअली बांद्याचा नबाब झाला तोही त्याच सालीं वारला. त्याचा मुलगा अलीबहादूर नबाबगिरीवर असतां सत्तावन सालचें बंड झालें, त्या गडबडींत बांद्याचा उत्कृष्ट शृंगारलेला वाडा व जडजवाहीर जळून गेलें. त्यानंतर इंग्रजांनी बांदा शहर आपल्या ताब्यांत घेऊन नबाबास ३६००० रुपयांची नेमणूक देऊन आपल्या नजरेखालीं इंदुरास ठेविलें. तेथें त्याचे वंशज आहेत. बांदा येथें नबाबाची मशीद आहे, ती या नबाबांच्या वैभवाची साक्ष देते. अलीबहादर स. १८७३ च्या ऑगष्टांत मरण पावला तेव्हां त्याच्या कुटुंबाची नेमणूक १२०० रुपयांवर आणण्यांत आली. या घराण्यास पेशव्यांचा अद्यापि मोठा अभिमान वाटतो. ‡

बाजीराव मस्तानी †
|
समशेर बहादर
१७३४–६१
|
अलीबहादर
१७५८–१८०२
|
- समशेर बहादर १७८४-१८२३
- झुल्फिकारअली मृ. १८२३
  - अलीबहादर मृ. १८७३

जगाच्या व्यवहारांत चांगल्याबरोबर वाईटाचाहि प्रादुर्भाव सतत होत असतो. बाजीरावाचा पराक्रम राष्ट्राला लाभला, त्याबरोबर समाजाला अनिष्ट वाटणारे कित्येक आचार मद्यमांसादि सेवनाचे त्याला प्राप्त झाले. राष्ट्राचा सुप्रसिद्ध पुढारी म्हणून या बाबतींत त्याच्या जीवनाची चर्चा लोकांत फैलावली,

† Pogson's Bundellas.

‡ भा. व. २–मस्तानीचा वंश; वि. ज्ञा. वि. सरकारी कामगाराच्या रोजनिशींतील उतारे इ.

पण दुसऱ्याही अनेक सैनिकांनी तसले आचार स्वीकारले असतील यात संशय नाही. दोन भिन्न समाजाचे साहचर्य सुरू होतांना असे प्रकार अपरिहार्य बनतात. अलीकडील इंग्रजी अंमलात जो प्रकार घडला, तसाच मराठ्याच्या औत्तरीय विजयांत निर्माण झाला. बाजीरावानें शिपाईगिरी पत्करिली, निजामास पायबंद घालण्याचे जोखीम घेऊन माळवा बुंदेलखंडांत निशाण रोवले, राजपुतांशी मैत्री जोडली, दिल्लीचे व इतर उमराव यांच्याशी सलगी जोडून त्यांचे विचार काढून घेतले. नाना प्रकारच्या माणसांना हाताशी बाळगायचे, त्याची मर्जी संभाळायची, त्यांच्याशी निकट सहवास करायचा, हजारो मैलांचा प्रवास करतांना मिळेल तें खावें प्यावे, प्रसंग पडेल तसे वागावें, अठरा पगड लोकांची संगति करावी, याचे नांव शिपाईगिरी. हातभर पंचा नेसणाऱ्या कोंकणच्या ब्राह्मणांनी व नाशिकच्या पंड्यांनी मुलुखगिरीचे काम अंगावर घेताच पूर्वीचा संकुचित धर्म व सोवळेओवळे नष्ट होऊन बाहेरचे विस्तृत जीवन मराठ्याचे अंगात शिरलें. तिकडचे वेश, शृंगार, नाचरंग इत्यादि प्रकार त्यास परिचित होऊन सामान्य आचाराचा त्याचा तोल थोडासा सुटला तर नवल नाही. तो नसता सुटता तरच नवल. इतिहास लेखकांनी राज्यवृद्धीचे हे सामाजिक परिणाम विसरून चालणार नाही.

कांही असो, बाजीरावास मद्यमांस सेवनाची गोडी लागून उत्तरोत्तर त्या गोष्टीचा बभ्रा बाहेर वाढत गेला. घरांत कुजबूज सुरू झाली. मातुश्रीला, बायकांना, सेवकांना भटाभिक्षुकांना ही जाणीव पदोपदी वाटूं लागली. मस्तानीच्या संसर्गानें बाजीरावाला हे विचार सुचले असा समज पसरला. खरें पाहता यात प्रत्यक्ष मस्तानीचा भाग किती हे समजणें शक्य नाही. पण पेशवेदप्तरातून जे विपुल कागद प्रसिद्ध झाले आहेत आणि जे खुद्द चिमाजी, नानासाहेब, पुरंदरे अशांच्या हातचे निःसंशय ओळखता येतात, त्यांवरून बाजीरावाचे ते आचार सत्य ठरतात. नानासाहेब महादोबा पुरंदऱ्यास लिहितो- 'तीर्थरूप राऊ उद्यां अगर परवा येतील. त्यास आता काही बरे वाटते, परंतु भ्रम गेला नाही. ईश्वरेच्छेनें 'कारभाराचा मजकूर लिहूं म्हटलें तर कारभार होत नाहीं. रामचंद्रबावा बोलावतात तेव्हा मात्र येत असतात. बापूजी नायकाचा कारभार ठीक जाहला नाही. ' § चिमाजीआपा लिहितो. 'राऊ घोड्यावर बसून चालत होते. असावध होते. पाटील भेटीस आला त्यास बोलले. कोबड्याचें

§ पु. द. १. १२९, १३२.

प्रयोजन आहे, घेऊन येणें. काय बोलतो हा अर्थ चित्तांत नाही. मस्तानीजवळून हे विचार निर्माण जाहले. पीडा जाईल तेव्हां पुण्यच प्राप्त होईल. यांच्या लष्कराभोंवते राऊत चौकीस ठेवणें कार्याचें नाही. लटका लौकिक होईल.'

तथापि स. १७३९ सालच्या पावसाळयापूर्वी या गोष्टीकडे लक्ष देण्यास घरच्या व इतर प्रमुख माणसांस अवकाश मिळाला नाहीं. गेल्या पाच चार वर्षांत मोटमोठ्या स्वाऱ्या चहूंकडे चालू असल्यामुळें पुण्यास सर्वांच्या एकत्र भेटी निरातीनें होण्याचा योगच आला नाहीं. स. १७३७-३८ त बादशहा व निजाम नरम आले, पुढे नादीरशहा आलेला परत गेला, इकडे वसईचा पाडाव होऊन मराठ्यांचा लौकिक वाढला आणि स. १७३९ सालच्या पावसाळयांत बाजीरावाचें कुटुंब व आप्त व सरदार एकंदर वस्तुस्थितीचा आढावा घेण्यासाठी एकत्र जमले. घरात राधाबाईनें सदाशिवरावाचें लग्न व रघुनाथरावाची मुंज ही कार्ये यथावकाश सिद्धीस नेण्याचा विचार चालविला.

अर्थात् अशा प्रसंगी पुष्कळाच्या अंतःकरणांतील धुसपूस चवाठ्यावर येणें अपरिहार्य होतें. बाजीरावानें हे भलतेच आचार सोडून देऊन प्रायश्चित घ्यावें, गंगोदकानें स्नान करून उघड पापक्षालन करावें, न केल्यास पेशव्याचे घराशी अन्नोदक व्यवहार करूं नये अशी चर्चा बाहेर सुरू झाली. मुख्यतः लग्न मुंजीच्या कार्यावरून प्रकरण चिडलें असे दिसतें. अशी एक आख्यायिका ऐकण्यात आहे की पुण्यास ब्रह्मवृंदांची सभा भरली, तींत बाजीरावावर बहिष्कार घालण्याचा ठराव झाला. त्या सभेस कोणी दोघे औत्तरीय संन्यासी हजर होते, त्यांनी सभेला एक सूचक प्रश्न टाकिला तो असा: धर्मसंरक्षणाच्या नावाखाली तुम्ही सर्व येथें बाजीरावावर बहिष्कार घालीत आहां, तर आमचें तुम्हास असें विचारणें आहे की, याच बाजीरावानें उत्तरेंत स्वाऱ्या करून काशी पावेतों आपल्या या धर्मसंरक्षणाचा उद्योग केला आहे, म्हणूनच मुसलमान लोक दबून आहेत. असें हें बिकट व शूर कृत्य करणारा दुसरा कोण पुढें येतो तो दाखवा: आणि तसा दुसरा कोणी नसेल, तर बाजीरावाच्या दोषाकडे दुर्लक्ष करून त्यास आपण साभाळून घेतलें पाहिजे. या भाषणानंतर बहिष्काराचा विचार रद्द झाला. § तथापि मुख्य शल्य कायमच राहिलें.

मस्तानीच्या या प्रकरणासंबंधानें पंनास एक अस्सल पत्रें पुष्कळशी चिमाजी आपा, नानासाहेब यांचीं व इतर प्रमुखाचीं आज प्रसिद्ध असून

§ ही आख्यायिका मला श्रीमंत बाबा सा० (इचलकरंजी) याजकडून मिळाली.

त्यांत वरील प्रश्नाची नानाविध चर्चा भरपूर आहे. शिवाय इतर लेखकांचें या विषयाचें आविष्करणही कांहीं थोडें नाहीं. बखरी, शकावल्या, गोष्टी अशा स्वरूपाचें वाङ्मय पुष्कळ बनलें आहे तें अभ्यासकांनी पाहून निर्णय ठरवावा. येथें त्याचा सारांश मात्र संक्षेपानें सांगतां येईल. अलीकडे पारसनीसांनीं भारतवर्ष व इतिहास संग्रह यांच्या द्वारा मस्तानी संबंधाची चर्चा पुष्कळ केली ती व कांहीं अस्सल पत्रें छापलीं तीं सर्व जमेस धरणें अवश्य आहे. धर्म, समाज, राजकारण ज्यांत इतकें निगडित झालें आहे असा हा विषय महत्त्वाचा बनला त्याची इतिहासाला दखल घेणें भाग आहे.

प्रचलित कागदांवरून या प्रश्नाला नोव्हें. स. १७३९ पासून भर चढला असें दिसतें; आणि त्याची समाप्ति पुढील एप्रिलांत बाजीरावाच्या मृत्यूनें झाली. पेशव्यांच्या कर्तबगारीनें परमोच्च बिंदु गांठला, त्याला नैगुण्य म्हणूनच की काय हें प्रकरण अनावर झालें. प्रायश्चित घेण्यास बाजीरावाची कबुली होती, पण व्यसन कायमचें सुटेल कीं नाहीं याची खात्री त्याला देतां येईना. मस्तानीस सोडून देण्यास तर त्याची मुळीच तयारी नव्हती, उलट मस्तानी दूर करणें म्हणजे आपले प्राण हिरावून घेणें असाच आशय त्यानें प्रगट केला. चिमाजी आपा व जवळचे अनेक हितचिंतक यांनी बाजीरावास भेटून व्यसनें सोडण्याचा, मस्तानीस दूर करण्याचा पुष्कळ बोध केला, पण त्याचा परिणाम बाजीरावाचे मनावर अगदीं झाला नाहीं. त्याची वृत्ति वैतागल्यासारखी होऊन तो पुण्याच्या बाहेर गेला. त्या वेळीं नासिरजंगावर स्वारी करण्याची निकड होती. डिसेंबरपासून मार्चपर्यंत या स्वारीची कामगिरी त्यानें व्यथित अंतःकरणानेंच सिद्धीस नेली. पूर्वी ठरलेलीं तीं दोन लग्नमुंजीचीं कार्यें पुण्यास फेब्रुवारीच्या ४ व ७ तारखेस पार पडलीं, त्यांस बाजीराव हजर नव्हता. शाहू महाराज नानासाहेबाच्या आग्रहावरून मुद्दाम समारंभास हजर राहिले. त्यानंतर स. १७४० च्या ता. २६ मार्च रोजीं जनार्दनपंताची मुंज पुण्यास झाली तिलाही बाजीराव हजर नव्हता. पुत्राच्या मुंजीला मातुश्री काशीबाई हजर असलीच पाहिजे. मुंजीनंतर लगेच काशीबाई व जनार्दनपंत यांची रवानगी बाजीरावाकडे झाली. ता. २८ एप्रिल रोजीं बाजीराव नर्मदाकाठीं मृत्यु पावला त्या वेळीं हीं दोघें तेथें पोंचलीं असें रोजनिशीच्या लेखावरून दिसतें. मस्तानी मात्र तेथें पोंचली नाहीं. ती पुण्यास कैदेंत होती, तिला सोडून

बाजीरावाकडे पोंचवावी असा विचार चालू होता. काशीबाई बरोबरच तिची रवानगी कां झाली नाहीं कळत नाही.

मस्तानीच्या प्रकरणांत चिमाजी, राधाबाई व नानासाहेब या तिघाचा एक विचार व बाजीरावाचा त्यांस विरोध असा हा चार सहा महिन्यांचा लढा पुणे सातारा यांचे दरम्यान घुमत राहिला.

राधाबाईनें चिमाजीस लिहिलें, " चिरंजीव राव यांजपाशी बहुत युक्तीच्या विचारें जो विचार करणें तो करून येणे. चालीवर नजर देऊन जे कर्तव्य ते करावें. " यावर चिमाजीनें उत्तरीं कळविलें, " रायांशीं चार गोष्टी नम्रतेनें बोलणें तैशा बोललों. सांप्रत पहिल्यापेक्षा बोलूनचालून भोजन करून सुखरूप आहेत. देवाची दया आहे तर, दिवसंदिवस संतोषीच होत जातील. चित्तात मात्र वेध आहे तो कळलाच आहे. सविस्तर नानाही सांगतील. "

आज देखील जर दोनशें वर्षांच्या अवधीत जुन्यानव्याचा लढा तीव्र स्वरूपात विद्यमान असलेला आपण पाहतों, तर नवीन विचारांची सुरुवातही ज्या काळात नव्हती, त्यांत चिमाजी राधाबाईसारख्यांच्या मनांत प्रागतिक विचार आले नाहींत याबद्दल त्यांस दोष देण्यात हाशील नाही. त्याजवर दोष येतो तो इतकाच की मनुष्यस्वभावाची योग्य पारख त्यांस झाली नाहीं आणि मस्तानीस टाकून देण्याचा भलताच आग्रह त्यांनी बाजीरावास केला. व्यवहार म्हणजे तडजोड हा न्याय कोणत्याही काळांत जाणत्या माणसांनीं सांभाळला पाहिजे. बाजीरावानें मस्तानीसह दूर राहवें, घरात राहून इतराच्या मनोभावना दुखावूं नयेत अशी व्यवस्था घडवून आणणें शक्य होतें. पण एवढा पराक्रमी बाजीराव, मराठी राज्याचा वास्तविक चालक व संरक्षक ज्याने पुण्यास वाडा बांधून स्वतःची राजधानी सजविली, त्यालाच तूं आपल्या घरांतून चालता हो, तुझें येथें कांही नाहीं हें तरी कोण कसें सांगणार ! बाकी तो अलीकडे स्वतः होऊनच बाहेर राहून लोकापवाद टाळीत होता. समाजाला न खपणारें वर्तन करणारा पुरुष केव्हांही आपण होऊनच दूर राहतो, समाजांत मिसळत नाही, तसाच या वर्षं सहा महिन्यांत बाजीरावाचा वर्तनक्रम होता. मस्तानीस घेऊन तो बाजूस राहूं लागला. त्याजकडे इतरांचा प्रवेश बहुतेक बंद पडला. चिमाजीनें मात्र आगाऊ वर्दी देऊन त्याच्या भेटीस जावें असा प्रकार अल्पकाळ चालला. साताऱ्यास महाराजांचे भेटीस गेला असतां मस्तानीच्या संगतींत दंग होऊन

असभ्य प्रकार केल्याचे प्रवाद सुरू झाले ते या वेळच्या अल्पावधीचेच होत. मात्र मुळांतला गैर प्रकार अगदी क्षुल्लक असून लोकचर्चेत त्याला भलतेंच विकृत स्वरूप प्राप्त झालें. टवाळखोर मंडळी सर्व काळी सर्वत्र असणारच. त्याच्या उक्तीस इतिहासानें जपूनच महत्त्व दिलें पाहिजे.

बाजीराव मस्तानीला सोडून देण्यास कबूल नाही तर तिला आपणच जबरदस्तीनें दूर करावी, शक्य तर तिला जगांतूनच नाहीशी करावी असा विचार कांही मंडळींचा अल्पकाळ चालला. तिला व बाजीरावालाही या गोष्टी कळल्या. दोघांचेही जीव कासावीस झाले असल्यास नवल नाही. नानासाहेबानें तिच्याशीं प्रेमभाव दाखवून तिनें आपण होऊनच बाजीरावास सोडून निराळें राहवें असा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस जाणें शक्य नव्हते. त्यांनी शाहूमहाराजांना हलकेच सर्व हकीकत कळवून तिला दूर करण्याची परवानगी विचारली. कसें झालें तरी बाजीराव शाहूचा मुख्य पेशवा, त्याला दुखविणें म्हणजे एकाअर्थी राज्याचें नुकसान करून प्रत्यक्ष महाराजांना दुखविण्यासारखें होतें. शाहूचे चिटणिसाचा जबाब आला तो असा,– ‘महाराजाची मर्जी पाहतां ते वस्तु त्यांजबराबर न ठेवावी, ठेवून घ्यावी, चौकी बसवावी, ऐसी नाहीं. राऊ यांस खट्टे न करावे. त्यांचे समाधान राखावें. दुर्व्यसनाचा मजकूर त्या वस्तूवर नाही. त्यांच्याच चित्तास पश्चात्ताप होऊन टाकतील तेव्हांच जाईल. तिला अटकाव करून सल्ला तोडूं नये ऐसी मर्जी महाराजाची आहे.’ (ता. २१ जाने० स. १७४०). महाराजांचा हा जबाब दूरविचाराचा व योग्य नव्हता असें कोण म्हणेल! मस्तानीच्या जिवास अपाय झाला नाही याचें श्रेय महाराजांस दिलें पाहिजे.

दरम्यान बाजीरावाचें व मस्तानीचें दळणवळण अंतस्थपणें चालू असून एकमेकांचे नोकर जात येत होते. उभय पक्षांचे हेर व पहारे आपापल्या कामावर असून काय खटपटी आंत चालल्या आहेत याची माहिती दोघांसही होती. एका अर्थानें दोघेही भयभीत झालेलीं होतीं. खरें म्हटलें तर आश्चर्य वाटतें तें हें कीं क्षणमात्रांत आपल्या तेजानें प्रत्यक्ष बादशहाच्या छातींत धडकी भरविणारा आणि निजामासारख्यास आपल्या पायांशीं नमविणारा हा हजारों अश्वसैनिकांचा अद्वितीय सेनानी स्वकीयांपुढें केवळ गोगलगाय बनून निःस्तब्ध राहिला, शेपन्नास स्वारांनिशीं एकदम वाड्यावर हल्ला करून

मस्तानीला धाडसानें सोडवून नेण्यास धजला नाही, हा प्रकार आपण पाहतों. पण त्याच्या चरित्राच्या दृष्टीनें हेंही त्याचें शहाणपणच म्हणावें लागलें. बंधुपुत्र मातुश्रींना त्यानें दुखविलें नाही आणि स्वतःच निमूटपणें यातना सहन केल्या यामुळें त्याच्या चरित्रास उठावा मिळतो.

स. १७३९ च्या अखेरीस जरी हें प्रकरण विकोपास पोंचलें तरी त्याचा उगम समशेर बहादराच्या जन्मापासूनच सुरू झाला असावा. याचा व रघुनाथरावाचा जन्म जवळ जवळ समकालीन. ब्राह्मणांच्या सोवळ्या घरात उभयमातांचा व्यवहार बहुधा गुण्यागोविंदानें चालला. काशीबाई तर बरीच आजारी राहत असल्यामुळें आपलें वैगुण्य ओळखून वागली. दोघीही समंजस व एकमेकींस सांभाळून घेणाऱ्या दिसतात. धर्माच्या दृष्टीनें मात्र एक हिंदु व एक मुसलमान हा भेद नष्ट होणें शक्य नव्हते. रघुनाथरावाचे हिंदु संस्कार होताना समशेर बहादरास कदाचित् हेवा वाटून त्याच्या थोड्या बहुत तक्रारी मातापितराकडे आल्या असल्यास नवल नाही. त्याची मुंज कशी झाली असेल कोणास ठाऊक! रघुनाथाप्रमाणें याचीही मुंज करावी, यास शुद्ध करून घ्यावें, अशी इच्छा बाजीरावास झाल्याची आख्यायिका आहे. अशा वेतानी त्याच्या कौटुंबिक सौख्यास व्यत्यय आला असेल. हे सर्व मानसिक आघात बाजीरावानें शांतपणें सोसले यातही त्याचें नैतिक शौर्यच प्रगट होते. मनःस्थिति अशी अस्वस्थ असतांच त्यानें नासिरजंगावर चाल करून गोदावरी पार त्याला हाकलून दिल्यावर त्याची भेट घेऊन सख्य जोडलें. याच वेळीं चिमाजीआपाची व बाजीरावाचीं मस्तानी संबंधीं भरपूर बोलणीं झालीं, ती चिमाजीनें पुण्यास कळविलीं. तो लिहितो. "चाले तों यत्न केला, परंतु ईश्वराचे चित्तास नये त्यास आमचा उपाय काय! त्यांचे प्राक्तनीं असेल तें सुखरूप होऊ; आपण निमित्त घ्यावें ऐसें नाहीं. आम्ही पुण्यास गेल्यावर तिची रवानगी त्याजकडे करावी, आपलें निमित्य वारावें, त्यांचें प्राक्तन व ते ऐसा विचार केला आहे. त्यांचे शरीरीं समाधान नाहीं, यास्तव स्वारीस न जातां घरास यावयाचा विचार करावा म्हणोन त्यांस लिहोन पाठविलें आहे. त्यांचे विचारास येईल तसेंच करतील, त्यांस आमचे लिहिण्याचें पथ्य आहे असें नाहीं." या लेखांत बाजीरावाची मनःस्थिति चांगली व्यक्त होते. वरील पत्र ता. २९ मार्चचें असून नंतर चिमाजीआप्पा पुण्यास आला आणि बाजीराव नवीन मिळालेल्या खर्गोणच्या

जागिरीची व्यवस्था पाहण्यास गेला असतां खर्गोणजवळच नर्मदातीरीं २८ एप्रिल रोजीं मरण पावला.

बाजीरावास मरण थोडेंसें एकाएकी आलें हें खरें, आणि प्रत्यक्ष दुखणें काय झालें याचा अंदाज बरोबर बांधतां येत नाहीं, म्हणूनच संशयास जागा होती. परंतु मरणापूर्वींच्या त्याच्या हालचाली पाहिल्या म्हणजे संशयनिवृत्ति होते. एक तर एखादा अविचार, जानेवारींत लग्न मुंजीच्या प्रसंगीं जेव्हां मस्तानीला पुनः अटक झाली, तेव्हाच त्यास करतां आला असता त्यासाठीं दोन चार महिने वाट पाहून नर्मदेकडे जाण्याचें त्यास कारण नव्हतें. अत्यंत व्यग्रचित्त होऊन मनावरचा ताबा सुटल्याशिवाय कोणीही भलत्या साहसास प्रवृत्त होत नाही. पण गोदावरीचें युद्ध बाजीरावानें त्या व्यग्र स्थितीतच नेहमींच्या धडाडीनें यशस्वी केलें यावरून त्याचा मनस्ताप भलत्याच कोटीस पोंचला होता असें म्हणवत नाही. दुसरें असें कीं नासिरजंगाकडून मिळविलेल्या या जागिरीची व्यवस्था लावण्यासाठीं तो खर्गोण प्रांतांत गेला यावरून त्याचे नेहमींचे व्यवसाय सरळ व पूर्वक्रमास अनुसरून चालले होते असेंच म्हणावें लागतें. म्हणून मृत्यूला कारण मानसिक अत्याचार ही कल्पनाच सोडून दिली पाहिजे. मृत्यु चार दिवसांच्या दुखण्यानें आला, ज्वर होता, यावरून दूषित ताप हें त्याचें कारण मानावे लागतें. आपलें आयुष्य संपलें अशी कल्पना त्यास आली असेल असें वाटत नाही.

मस्तानीचा मृत्यु मात्र उलट पक्षीं मुद्दाम ओढून आणलेला दिसतो. बाजी-रावाच्या मृत्यूचे वर्तमान ऐकतांच तिचा प्राण गेला. नुसत्या धक्क्यानें असा प्रकार कदाचित् होऊं शकेल, परंतु त्याच्या जिवंतपणीं जर उघड्यावर आपले असे भलतेच हाल होऊं शकले तर त्याच्या पश्चात् आपणास आतां कोण त्राता राहिला, असे विचार मनात येऊन तिला जिणें दुःसह वाटून मुद्दाम तिनें अपघाती प्रयोग करून घेतला असणें संभवनीय आहे. कांहीं असलें तरी दोघेही दुनियेंत नांव करून गेलीं एवढें खरें.

वरील हकीकतीवरून या आख्यानास अवास्तव महत्त्व प्राप्त झालें असें वाटूं नये. नेहमींच्या व्यवहारांतले इतिहासानें लक्ष देण्याजोगे हे प्रसंग आहेत. त्यांत समाज, राजकारण, निर्व्याज प्रेम असे नानाविध भाव समाविष्ट होतात. या बनावास ट्रॅजेडी म्हणजे शोकानुभव म्हणावें की नाही हा विचार ज्याचा

त्यानें ठरवावा. परंतु मराठ्यांच्या इतिहासांत बाजीराव मस्तानीची कथा एक प्रकारें अद्वितीय रस उत्पन्न करणारी बनली आहे यांत संशय नाहीं. ‡

**३ योग्यतेचा अंदाज.**—बाजीरावास ता. १७ एप्रिल, स. १७२० रोजी पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं आणि बरोबर वीस वर्षांनीं ता. २८ एप्रिल, स. १७४० रोजी देहावसान झालें. वयाच्या विसाव्या वर्षीं राज्याचा भार अंगावर आल्यापासून सालोसाल त्यानें कोणत्या स्वाऱ्या केल्या, कोणते विजय मिळवले, केवढे रणसंग्राम यशस्वी करून राज्याभिवृद्धि केली, त्याचें तपशीलवार वर्णन मागें येऊन गेलें आहे. ठिकठिकाणी प्रसंगानुरोधानें दरएक विषयाची गुणदोषचर्चाही केली असल्यामुळें बाजीरावाच्या योग्यतेसंबंधानें निराळें वर्णन करण्याची जरूर राहत नाही. वीस वर्षांत एवढा पराक्रम केल्याची उदाहरणें दुर्मीळच म्हटलीं पाहिजेत. ह्याला पेशवाई देऊंनये असें पुष्कळ जाणत्यांचें मत असतां शाहूनें केवळ अंतःस्फूर्तीनें त्याच्यावर अशा अल्पवयांत राज्याचा भार टाकिला हें एक प्रकारेंच धाडसच होतें. पण हें धाडस बाजीरावानें यशस्वी करून दाखविलें, यांत शाहूची योजकता व बाजीरावाचें कर्तृत्व हे दोनही गुण व्यक्त होतात. अर्थात् शिवाजीच्या खालोखाल मराठ्याच्या इतिहासांत बाजीरावाची योग्यता समजतात तें सर्वथा युक्तच होय. अंतसमयीं शिवाजीचें वय पन्नासी उलटून गेलें होतें, तर बाजीरावाचें चाळिशी उलटण्यास तीन महिने वीस दिवस कमीच होते. दोघांचाही अंत उद्वेगकर बनला. पुत्राच्या दुर्वर्तनानें शिवाजी अत्यंत निरुत्साही व व्यथित झाला, तर बाजीरावास भर उमेदींत राज्याचा पसारा सोडून अकस्मात् प्रयाण करावें लागलें. मोठ्या माणसांना मृत्युही कठोरच येतात.

बाळाजी विश्वनाथापासून माधवरावाच्या मृत्युपर्यंतचा पेशवाईचा काळ एका विशिष्ट उद्योगसातत्याचा निदर्शक आहे. या काळांत ज्या थोर कर्तबगार पुरुषांनीं मराठी राष्ट्राचें धुरीणत्व पत्करून त्यास वैभवास चढविलें,

‡ पे. द. ९.३०.३७; १८.१२; ३०.२५०, ३३४,३६३; २२.१४६; पु. द. १२९, १३२, १३३; पंतप्रधान श. पृ. ७; त्रै. वर्ष ६ ले. १० पृ. १०६; पु. रो. पृ. ३०; इ. स. ऐ. टि. २.७; ऐ. चर्चा ३; सातारा ऐ. लेखमाला २.२७५; भा. व. ऐ. चर्चा पृ. ७ शिवाय पे. ब , पारसनीसकृत बुं. प्र. व भा. व. ऐ. चर्चा; का. सं. प. या. ले. ४९६ पृ. ४९९, बुंदेलखंड प्र. पासरनीस पृ ८४–८६; असें वाङमय ठिकठिकाणीं विखुरलेलें पुष्कळ आहे.

त्याच्या अंगीं कितीही दोष व्यक्तिशः दिसले तरी हिंदी राष्ट्राचें भवितव्य बदलण्याचा जो उपक्रम शिवाजी महाराजांनीं केला त्याची सांगता पहिल्या चार पेशव्यांनीं केली हें उघड असून, हाच मतलब दुसरीकडे दिलेल्या सर रिचर्ड टेंपल यांच्या लेखांत उतरला आहे. शिवाजी महाराजांनीं ठरवून दिलेला राजनीतीचा मार्ग पेशवाईच्या काळात पुष्कळसा बदलला गेला, कित्येक अनिष्ट प्रकारही कारभारात शिरले, हें खरें असलें तरी त्यामुळें पेशव्यांच्या कर्तृत्वास कमीपणा येत नाहीं. जगाचा प्रत्येक व्यवहार क्षणोक्षणीं बदलणारा असतो, परिस्थिति पालटते, तसे राज्यकारभारातही फेरफार करावे लागतात, किंवा निसर्गतःच होत जातात. शिवाजीनें सरंजाम असा कोणासही तोडून दिला नाहीं, मोगल ‥ ‥…. निर्भेळ स्वातंत्र्य हिसकून घेतलें, व त्याच्या उलट पेशव्यांनीं जागीरदार निर्माण केले, मोगलांचे अंकित म्हणवून घेतलें, हे प्रकार अनिष्ट मानले तरी बादशाही सनदांच्या जोरावरच ‘ सारी दक्षिण सोडवायची, सोनपतपानपतपर्यंत सारा मुलूख ताराज करायचा, देवाब्राह्मणाचें धर्मस्वातंत्र्य पूर्वी नष्ट झालेलें पुनः सर्व देशभर स्थापायचें, ’ हे उद्योग पुष्कळसे एकट्या बाजीरावानें सिद्धीस नेले; त्याच्या पुत्रांनीं मराठ्यांचे झेंडे चिनाबवर रोविले, ते त्याला आयुष्य असतें तर त्यानेच तेथपावेतों पोंचविले असते यात संशय नाहीं. सर्व देशभर मराठी राज्याचा विस्तार अल्पावकाशात झाला, याचें श्रेय या जागीरदारीसच दिलें पाहिजे. माधवरावानंतर जागीरदारास नियंत्रण घालणारा चालक उरला नाहीं, म्हणून राज्यनाश झाला, तरी त्याच साधनानें राज्यविस्तार झाला हेंही नाकबूल करतां येणार नाहीं.

शिपाईगिरी व राजकारण या दोनही बाबतींत बाजीराव पूर्ण तरबेज असून त्याच्या जोडीस बंधु चिमाजी आपा किंबहुना अनेक बाबतींत कांकणभर जास्त असा असल्यामुळें उभयताकडून अल्पावकाशांत अपूर्व कामगिरी झाली. या दोघां बंधूंच्या सामर्थ्यानें एकदम मोठी मजल गांठली गेली. समरांगणावर शत्रूस हटकून कबजांत आणण्याचें कसब एकट्या बाजीरावानेंच प्रगट केलें. त्याजवळ तोफा नव्हत्या आणि निजाम वगैरे मोगल सेनानींजवळ जय्यत तोफखाना हाताशीं असतांही केवळ गनिमी काव्याच्या हिकमतीवर बाजीरावानें त्यांस हरएक संग्रामांत नामोहरम केलें. त्यांतून पुढील अंदाज अगोदर बांधून आपल्या हातून प्रसंग निभावणार नाहीं असें दिसतांच युक्तीनें तात्पुरती

माघार घेऊन पुनः योग्य प्रसंग साधून शत्रूवर मात करणें हें कसब एकट्या बाजीरावाचें होय. भोपाळचा संग्राम निजामाबरोबर खेळून बाजीरावानें यशस्वी करून दाखविला हें त्याच्या चतुरतेचें उत्कृष्ट उदाहरण होय. वेळेवर माघार घेण्याचें बाजीरावाचें कसब पुढें सदाशिवराव व रघुनाथराव यांचे ठिकाणीं नसल्यामुळें त्यांस पुष्कळदां अपयश आलेलें आपण पहातों. पानिपतानंतर माधवराव कारभारावर आला, त्याचे अंगीं बाजीरावाचें सामर्थ्य पुनः अवतारलें. माधवराव व रामशास्त्र्यासारखा त्याच्या सहायकांची प्रभावळ जास्तच तेजस्वी बनली. मिळून पहिल्या चार पेशव्यांचें राज्यनैपुण्य मराठी राष्ट्राचा कायमचा मोलवान ठेवा बनलें आहे.

वीस वर्षांचा तरुण मुलगा राज्यकारभार अंगावर घेऊन तो अल्पावकाशांत यशस्वी करून दाखवितो अशीं उदाहरणें जगाच्या इतिहासात देखील फारशी मिळणार नाहींत. जें काहीं हातीं घ्यावें तें सिद्धीस जावें, अपयश असें कधीं ठाऊक नाहीं, अशी बाजीरावाची प्रशंसा त्या वेळीच शत्रुमित्रानीं मुक्तकंठानें केलेली आढळते. त्याचीं पहिलीं आठ वर्षे परिस्थिति अजमावून स्वतःचे सहायक बनाविण्यांत गेलीं; आणि त्यापुढच्या बारा वर्षांत त्याचे विजय एकामागून एक भराभर झळकूं लागले. निजामासारख्या अनुभवी व सामर्थ्यवान प्रतिस्पर्ध्याला त्यानें केवळ गनिमी काव्याच्या जोरावर आळा घातला हेंच बाजीरावाचें सर्वांत मोठें कृत्य होय. निजामाला किंवा मोगल बादशहाला नाहींसे करणें हें मुळीं शाहूचें उद्दिष्टच नव्हतें. मराठ्यांचें हें उदात्त धोरण आपल्या राष्ट्राला काळिमा आणणारें नसून उलट त्याचा महिमा वाढविणारें आहे. आम्ही जगावें, तुम्हीही आमच्यासारखेंच जगावें, जीव तेथून सर्वांचा सारखाच, मात्र तुम्ही आमच्या वाटेस जाऊं नये, आम्ही तुमच्या वाटेस जाणार नाहीं, हा जो परजीवनोपकारक देखावा मराठ्यांचे इतिहासात दिसतो तो खरोखरच उच्च कोटीचा नाहीं काय! तयमुरलंगासारखे शिराचे मनोरे उभारून किंवा काशी-विश्वेश्वरासारखीं मंदिरें पाडून नादीरशाही किंवा गुलामकादरी गाजवून जो लौकिक मुसलमानांनीं मिळविला, त्याची प्रतिष्ठा इतिहास कितीशी मानतो! तसल्या प्रकारची हानिकारक प्रतिष्ठा बाजीरावानें पैदा केली नाहीं याबद्दल त्याची आपण नांवाजणी करावयाची कीं दोष द्यायचा याचा विचार उच्च व थोर पुरुषांनीं स्वीकारलेल्या नीतितत्त्वांनीच केला पाहिजे. सदाशिवराव भाऊनें मोगल राजवाड्याच्या छताची थोडी चांदी काढली त्याचा डंका जगभर

वाजला, तसलें अपकृत्य बाजीरावाचे वांट्यास आलें नाहीं यांत आपण आनंद मानला पाहिजे. परापहाराचें तत्त्व शाहूनें कधी स्वीकारिलें नाहीं आणि बाजीराव कितीही शूर झाला तरी शाहूच्या आज्ञेचें उल्लंघन करणें त्यास शक्य नव्हतें. दोनशें वर्षानंतरच्या आजच्या राजकारणांत हिंदुमुसलमानांच्या दुहीनें निजामाचें अस्तित्व महाराष्ट्रास अपायकारक वाटत असेल तर त्या दृष्टीनें पाठीमागच्या इतिहासाचा निर्णय ठरविणें केव्हांही रास्त नाहीं. शाहू पुष्कळदां बाजीरावाचा निषेध करी, त्याला आवरण्याकरितां दुसऱ्या एखाद्या सरदारास हाताशी घेऊन बाजीरावास दाबी, अशा स्थितीत धन्यास नाराज न करितां राज्योद्योग यशस्वी करणें हें बिकट कार्य बाजीरावानें कसें केलें त्याची डभईच्या प्रसंगासारखी अनेक सुप्रसिद्ध उदाहरणे मागें सांगितली आहेत.

चारसहा महिन्यांच्या अल्पावधींत गिरिधर बहादूर, दयाबहादूर, महंमद-खान बंगश, सरबुलंदखान अशा बादशाही वीरांना बाजीरावानें नामोहरम करून मराठी राज्याची भली मोठी वृद्धि केली, हें त्याचें कृत्य इतिहासांत सदैव झळकणारें आहे. खान डौरान व जयसिंग यांना त्यानें राजकारणी डावात गुंतवून घेतलें, खुद्द पातशहास धाक घातला, पण उच्छेद केला नाही, नादीरशहाने बादशाहीचा विध्वंस केला असतां त्याजला हाकून देण्याची सिद्धता बाजीराव करीत असतांच महंमदशहास पुनः पदापन्न करून तो निघून स्वदेशी गेला म्हणून त्या प्रकरणांत पडण्याचें प्रयोजन बाजीरावास उरलें नाहीं. बादशाहीची जी दुर्दशा स्वधर्मी नादीरशहानें केली ती स. १७३७ त बाजीरावास शक्य होती, पण विधर्मी असूनही त्यानें आपला हात आवरला हें विशेष. हे सगळे प्रयोग त्या पेशव्याचा अखंड कीर्तीचे द्योतक आहेत. कोल्हापुरच्या संभाजीला ठिकाणावर आणलें, राज्यद्रोह करणाऱ्या दाभाड्याला व तदनुषंगानें इतर राज्यघाती सरदाराना अवश्य असलेला धडा शिकविला, कान्होजी भोसल्याचे उपद्व्याप बंद पाडले, फत्तेसिंग व रघूजी भोसले यांच्या कर्तबगारीचा राज्यहितसंवर्धनांत उपयोग करून घेतला, सिंदे होळकर पवार असले प्रतिष्ठित सरदार निर्माण करून लोकसंग्रहाची शिकवण महाराष्ट्रास दिली असे या पेशव्याच्या कर्तृत्वाचे दाखले वीस वर्षाच्या अल्पकाळांत समाविष्ट झालेले दिसतात. आवजी कवडे, पिलाजी जाधव मानाजी आंगरे अशांसारखे स्वकीय व चंद्रसेन, उदाजी चव्हाण, जानोजी निंबाळकर असले परकीय सेनानायक बाजीरावाच्या भजनीं लागले, ते त्याच्या अंगीं तसले गुण होते

म्हणूनच ! या सर्व गोष्टी प्रकरणवार पूर्वी वर्णिलेल्या लक्षांत घेतल्या असतां 'बाजीरावाचें मनोधारण सर्वांनीं करावें' अशी सार्वत्रिक आज्ञा शाहूनें कां सोडली त्याचे रहस्य कळून येतें. त्याचें मस्तानीवरील प्रेम व अल्पायुष्यांतील तडकाफडकी मरण हे प्रकार देखील मनास चटका लावून त्याच्या कीर्तींत भर टाकतात. शूरांतला शूर व सुंदरांतला सुंदर असा हा प्रेमकथेला शोभणारा, सत्यसृष्टींतला नायक सर्वांतःकरण वेधून घेतो. † त्याच्या वर्तनाची व स्वभावाची खोंच, त्याच्या आवडीनिवडी, खासगी वर्तनांतील झांक इत्यादि प्रकार समजण्यास पुरंदऱ्यांचा पत्रव्यवहार बहुमोल आहे. पु. द. भा. १ ले. १३२–१४६ वाचकांनीं अवश्य वाचावे. त्यांतील अंश येथें देण्यास सवड नाही.

बाजीरावाची योग्यता स्वकीयांना अप्रतिम वाटली तर नवल नाही, पण एका मार्मिक इंग्रज लेखकानें दिलेला अभिप्राय मोलवान मानला पाहिजे. सर रिचर्ड टेंपल लिहितो,—

(१) "बाजीरावाच्या हातीं राज्यसूत्रें आलीं, तेव्हां त्याला नानाविध अडचणींशीं झगडावें लागलें. वडिलांनीं केलेला उपक्रम पुढें चालवून त्याला मराठी राज्याची वृद्धि व व्यवस्था करावयाची होती. निरनिराळे सरदार एकमेकांशी विरोध करीत त्यांच्यांत ऐक्य निर्माण करणें, मुसलमानांच्या ताब्यांतला प्रदेश सोडवणें आणि हिंदूंची संघटना बनवणें ही महत्त्वाची कामें त्याला सिद्धीस न्यावयाची होतीं. ऐन वेळेवर ही कामें उरकण्यास बाजीराव पुढें आला. ब्राह्मणांचे विशिष्ट गुण त्याच्या ठिकाणीं भरपूर उतरले होते. तो स्वरूपानें भव्य व रुबाबदार, वर्तनानें प्रेमळ, भाषणानें आकर्षक, बुद्धीनें कल्पक व तरतरीत आणि संकटांत युक्तिबाज असल्यामुळें त्याला लगोलग यश येत गेलें. सुंदर भाषणें करण्याची कला त्यास चांगली साधल्यामुळें समरांगणावरील विजयानंतर तो आपल्या लोकांस आणखी विजय मिळविण्याचा हुरूप आणी; पराभव झाला असला तर त्यांच्या मनोवृत्तींस पुनः चेव उत्पन्न करी. कामाचा उरक व हिशेब या दोन बाबतींत तो बापाहून कमी असला तरी बापाचे सर्व बेत व उद्योग त्यानें जवळ राहून पूर्ण हस्तगत केले होते. पण अंगच्या वरील गुणांपलीकडे त्यानें बाह्य गुणहि पूर्णपणें मिळविले होते. अश्वारोहणाच्या कलेंत मराठ्यांचा हात धरणार कोणी नाहीं, पण त्या

† Bravest of the brave, fairest of the fair, Bajirao died like a most fascinating figure in a romance of love." Kincaid.

कसब्रात बाजीराव तर अत्यंत वरचढ होता. युद्धसंग्रामांत तो सर्वांपुढें निर्भयपणें ठासून उभा राहत असे. सभोंवार बंदुकीच्या गोळ्यांचा मारा होत असतां तो कधीं कचरला नाहीं. कष्ट करण्याची सवय त्याला भरपूर होती. सामान्य शिपायाप्रमाणें प्रत्येक काम तो स्वतः करी आणि त्याच्याच सारखें सामान्य अन्न खाण्यात आनंद मानी. त्याचे स्वार लांब लांब मजला मारीत तेव्हां घोड्यावरच पिशवींत भाजलेले चणे घेऊन ते खातखात दौड करीत, तशाच प्रकारचे फाके मारीत बाजीरावहि प्रवास करी. त्याचा स्वराष्ट्राभिमान जबरदस्त असून त्यापुढें कोणतीहि अडचण तो जुमानीत नसे. ब्राह्मणाचें सोवळेंओवळें व जातीचा कर्मठपणा मात्र बाजीरावाचे अंगीं बिलकूल उतरला नव्हता. त्याची पहिली ब्राह्मण बायको असतां त्यानें आणखी मुसलमान बायको केली, तिला मुलगा झाला, त्याला त्यानें आईच्याच धर्मात वाढविलें. त्यानें मराठी सत्तेचा विस्तार सर्व हिंदुस्थानभर आरबी समुद्रापासून तों थेट बंगाल समुद्रापावतों केला. मात्र त्याला धनोत्पादन करता आलें नाहीं. त्याचा सारा जन्म जसा उन्हातान्हांत उघड्या हवेंत गेला, तसाच त्याचा मृत्युहि उघड्या आकाशाखाली तंबूच्या आवरणांत झाला. 'लढवय्या पेशवा' अशी त्याची वाहवा महाराष्ट्रात अद्यापि होत असते. तो हिंदूंचा मोठा पुरस्कर्ता असून त्यास मृत्युहि एकाएकीं अल्पायुष्यांतच आला. उघड्या हवेचा जन्मभर झालेला ताण त्यास सहन झाला नाहीं." ¶

बाजीराव आणि निजाम या दोन व्यक्ती अठराव्या शतकाच्या प्रथमार्धाचा इतिहास बनवीत होत्या असें सामान्य विधान करण्यांत येतें; आणि निजामाचा कायमचा बंदोबस्त बाजीराव करूं शकला नाहीं, म्हणून निजाम हा अलौकिक मुत्सद्दी होऊन गेला असेंही कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु तत्कालीन प्रकरणें चांगलीं तपासून पाहिल्यास निजामास एवढें मोठें महत्त्व देता येणार नाहीं. उद्योग, निर्व्यसनता वगैरे बाबतींत तो औरंगजेबाची तालीम शिकलेला असला तरी त्याची धरसोड व त्रेधा पाहिली म्हणजे, तो त्या बादशहाचे पासंगासही टिकत नाहीं. औरंगजेबाचे पश्चात् कोणताही निश्चित पक्ष धरून तो वागला नाहीं. घटकेंत सय्यदांस खुष कर, पुनः लगेच त्यांचे विरुद्ध शस्त्र धर, असे त्याचे खेळ चाळीस वर्षे चालले, आणि एकाही डावांत त्यास यश आलें नाहीं. वचनें व करार झुगारून देऊन वेळ पडेल तशी पाठ फिरवणारा तो केवळ

¶ Oriental Experiences, p. 390.

स्वार्थसाधु होता. सादतखानानें नादीरशहाजवळ त्याचें वर्णन 'पांडित्यपूर्ण कार्यसाधु ' § असें केलें आहे. तेंच यथार्थ ठरतें. बाजीरावापुढें त्यास नेहमींच हार खावी लागली. बादशाही दरबारांत त्यास आपलें वजन बसवितां आलें नाहीं. दुर्बळ बादशहास आपल्या अकलेनें तारण्याऐवजी किंवा बुडत्या बादशाहीस सावरण्याऐवजी, त्यानें दक्षिणेंत स्वतंत्र पंथ पाहिला. असा स्वतंत्र पंथ काढणारा पहिला बादशाही उमराव निजाम होय. त्याचेंच अनुकरण पुढे नादीरशहा येऊन गेल्यावर इतरांनीं केलें. माळवा व गुजरात हें प्रांत सुद्धां घशात टाकण्याची त्याची तयारी होती, परंतु मराठ्यांनी ते त्यास पचूं दिले नाहीत. नादीरशहाचे स्वारींत त्याचें वर्तन अगदीं भेकडपणाचें झालें. मनुष्याचा थोरपणा त्याच्या प्रामाणिकपणावरून अथवा स्वार्थत्यागावरून अजमावयाचा असतो. निजामात अशा सत्याचा किंवा स्वार्थत्यागाचा लवलेश नव्हता. त्याने बादशाहीची यत्किंचित् सेवा केलेली नाहीं. धूर्ततेनें वागून त्यानें लहानसें राज्य स्थापिलें, तें पानपतच्या अरिष्टामुळें मराठ्यांचें तावडींतून सुटलें. पण अशीं राज्यें बंगाल, अयोध्या वगैरे प्रांतिक अंमलदारांनी सुद्धां स्थापिलीं. स्वजाति, स्वराष्ट्र, स्वधर्म, इत्यादि बाबतींत मराठ्यांचे अंगीं जो अभिमान होता, तसला निजामाचे अंगीं बिलकूल नव्हता. म्हणून मराठ्यांचा उज्ज्वल उद्योग व निजामाचा कपटाचा उपद्व्याप यांत केवढें तरी अंतर दिसून येतें. त्यास नाहीसा करणें हें शाहूनें आपलें कर्तव्य मानलें नाहीं. म्हणूनच तो बाजीरावाच्या तावडींतून निभावला.

**४ लेखसंभार.**—पण आज आपण बाजीरावाच्या कर्तृत्वाचा स्वतंत्र अभिप्राय बनविण्यापेक्षा तत्कालीन लेखांचे महत्त्व जास्त मानलें पाहिजे. तशा लेखांचा सारांश पुढें देण्याचा विचार आहे. तत्पूर्वी बाजीरावकालीन ऐतिहासिक वाङ्मयाची सामान्य ओळख वाचकांस असणें जरूर आहे. या बहुविध व विस्तृत वाङ्मयांत जे चरित्र प्रत्ययास येतें त्यांत समस्त नवरसांचा उद्भव व्हावा अशीं कथानकें भरपूर आढळतात. काव्यनाटकादि रचनेची आवड असणाऱ्यांना ती कथानकें आपल्या प्रभावी लेखणीनें रंगवितां येतील. त्यासाठीं जरूर ते संदर्भ ठिकठिकाणीं दर्शविले आहेत. मात्र तत्कालीन लेखांत बाजीराव शाहू व इतर मंडळी अशा सर्वांच्या वर्णनाची एकत्र मिसळण आहे हें विसरून चालणार नाहीं.

§ A cheat and a philosopher, Irvine 2-356.

शाहू बाजीरावांच्या अमदानीचे कागद आतां विपुल प्रसिद्ध झाले असून ते उत्कृष्ट बोलके आहेत. मात्र प्रसिद्धिकरणांत अनेक दोष राहून गेलेले आढळतील. पुष्कळांच्या दाखल केलेल्या तारखा चुकल्या आहेत, पुष्कळ एका प्रकरणांतले असता भलत्याच प्रकरणांत दाखल झाले आहेत. पण ते नीट वाचून मनांत ठसले म्हणजे शाहूचा उदार, पापभीरु व परोपकारी स्वभाव, दुसऱ्याचें बरें करण्याची त्याची प्रवृत्ति, बाजीराव चिमाजीचे अजब पराक्रम व राजासंवर्धनाची हाव, कामाचा उरक, रयतेचें संगोपन, सरदार व लष्कर यांस शिस्तींत वागविण्याची हातोटी, हे प्रकार लक्षात भरून शाहू व पेशवे यांच्या उद्योगाबद्दल कौतुक वाटूं लागतें. अल्पावकाशांत त्यांनी केवढें प्रचंड कार्य सिद्धीस नेलें हें मनांत येऊन त्याजबद्दल अभिमान व आदर वाटूं लागतो. जगांत निर्दोष असें काही नाहीं, आणि दोषच काढूं म्हटल्यास निर्दोष असें कांही आढळणारही नाहीं, हें तत्त्व ध्यानांत ठेवून वरील कागद वाचल्यास तत्कालीन स्थितीचा अंदाज बरोबर बांधतां येतो. हल्लींच्या सारखे नियम, कायदे, घटना इत्यादि बंधनें मराठशाहीच्या कारभारात उत्पन्न झाली नव्हती, आणि या आधुनिक दृष्टीनें तत्कालीन व्यवहार पाहूं लागल्यास ते मनांत भरणारही नाहीत. म्हणूनच शाहूचा दरबार म्हणजे मराठी राज्याचें एक विस्तीर्ण कुटुंब आहे असें निदर्शनास येतें. या कुटुंबाचा मुख्य मालक छत्रपति व चालक पेशवे. अर्थात् सामान्य कुटुंबातील गुणदोष या मराठमंडळाच्या कारभारातही सहज नजरेस येतात.

बाजीरावकालीन लेख पत्राचा अंदाज सुमारें साडेतीन हजार पावेतो केलेला आहे.‡ पैकी पेशवे दप्तरातली १९०० व राजवाडे खंड, ब्रह्मेन्द्रस्वामी का. सं. व इतरत्र मिळून १६०० यांत खुद्द बाजीरावाने लिहिलेली अशीं शंभर असावी. वास्तविक पाहतां कारभारासंबंधानें बाजीराव, चिमाजी, नानासाहेब असा भेद पत्रात करणें युक्त नाही. मुख्यतः बाजीराव व चिमाजी दोघेही पूर्ण जबाबदारीने व बहुधा एकमेकांच्या विचारानें उपस्थित व्यवहार उलगडीत. दोघेही सारखे फिरतीवर असत, एकत्र असे फार थोडे राहिले. सर्व हिंदुस्थानभर त्यांची नजर हिंडत असे. पुण्यास जाग्यावर कोण आहे याची बाहेरच्या सरदारास, वकिलास व बातमीदारांस खबर नसे. म्हणून पुष्कळशी पत्रें उभयतांच्या नावें लिहिलेलीं आढळतात आणि कोणाच्याही

‡ सह्याद्रि बाजीराव अंक मे १९४०.

नांवचीं असली तरी जो कोणी हजर असे तो त्यांचा निकाल करी. सातार्‍यास छत्रपतींजवळ पुरंदरे किंवा दुसरा कोणी पेशव्यांचा हस्तक कायमचा असे, तो कागदांचे निकाल जबाबदारी सांभाळून करी. म्हणजे प्रत्यक्ष बाजीराव, चिमाजींच्या पत्राखेरीज आणखीही पुष्कळशीं पत्रें खुद्द त्यांचीच असें गणण्यास हरकत नाहीं, आणि अशी गणना केल्यास त्याच्या पत्रांची संख्या पांचशेंच्या वर सहज जाईल. मोठ्या राजकीय स्वरूपाच्या घडामोडी झाल्या त्यांचे तपशीलवार वृत्तान्त सरकारी रीत्या तपासांती तयार करून पाठविले असल्याचे उल्लेख दुसर्‍या पत्रातून येतात. एका मुख्य पत्राच्या पोटांत निरनिराळया बाबतींचीं पुरवणी पत्रें पाठविल्याचा उल्लेख आढळतो. पण हे मुख्य वृत्तान्त व सर्वच पुरवण्या आज आपणास मिळाल्या आहेत असें नाहीं. पुष्कळ महत्त्वाचे कागद अनेक कारणानीं गहाळ झाल्याचें निर्विवाद दिसून येतें.

वर सांगितलेली पत्रें रात्रीं, दिवसा, स्वारींतून, पालखीत, घोड्यावर किंवा पायीं फिरत असता जेथें जशी सवड झाली तशी लिहिलेली दिसतात. कचेरीची म्हणून स्वतंत्र वेळ ठरलेली नव्हती. पेशव्याचें जिणेंच सर्व राज्याचे कार्यास वाहिलेलें होते. इतका व्याप त्यानीं कसा सहन केला याचें आश्चर्य वाटतें. फौजेच्या व सरदाराच्या तरतुदा, त्याच्या पोटापाण्याची व्यवस्था, शत्रूवर नजर ठेवून त्या धोरणानें ठरवायचे संग्राम, वकिलांना व परदरबाराना द्यावयाच्या समजुती, हेरांकडून आणावयाच्या बातम्या अशीं नानाविध बाह्य कामें अंगावर असतांच, छत्रपतीची व त्याच्या हस्तकाची मर्जी राखणें, वाडे व किल्ले बांधणे, भाडणें मिटविणें, रुसवे काढणे, युद्धात जखमी झालेल्याची शुश्रूषा ठेवून मयताच्या कुटुंबांचा परामर्ष घेणें, छत्रपतीच्या आप्तेष्टाचे व आपल्या नातेवाइकाचे, सरदाराचे व परकीय राजपुरुषाचे लग्नकार्यादि सामाजिक व्यवहार वेळच्या वेळीं संभाळणें असा हा प्रचंड व्याप एकसमयावच्छेदें मनात आणिला म्हणजे या दोघां तरुणाच्या कर्तबगारीची हद्द वाटूं लागते; आणि ज्या महाराष्ट्रीय समाजास त्यांनी आपल्या कर्तृत्वानें भूषण आणिलें त्याच्या सामर्थ्याची साक्ष जगाला पटते. शत्रु पुढें उभा राहिला असता ज्याला पराभव माहीत नाहीं, यावज्जन्मात दुखणें आलें तें एकदाच आणि शेवटचें, या दृष्टीनेंही बाजीराव अद्वितीय भासतो. चिमाजी आपा मात्र प्रकृतीनें अशक्त व सदा दुखणेकरी. मातुश्री नेहमीं काळजींत असायची की हा निभावतो कसा. छत्रपतीचें बोलावणें आलें कीं पुष्कळदां काय करूं उठवत नाहीं, असें सांगण्याची पाळी येई. पण त्यानेंही कष्ट कांहीं

थोडे नाही केले. कित्येक बाबतीत बाजीरावावर त्याची ताण होती. आश्चर्य वाटतें ते हें कीं हे निजत असतील केव्हा किती, खेळ करमणूक, मनोरंजनादि व्यवसाय किंवा स्नानभोजनादि नित्यकर्मे केव्हां कशी उरकीत असतील. बरें लक्ष तरी किती ठिकाणीं फिरत राही ! इकडे दयाबहादूर व बंगश यांच्याशीं सामना चालू तर त्याच वेळीं पुण्यास शनिवार वाड्याची उभारणी, इकडे डभईवर दाभाड्याशीं प्राणांतिक युद्ध सुरू असतां पुण्यास त्या वाड्याची वास्तुशांत होते. मस्तानीला पुण्यात कोंडून ठेवून तिचा प्राण घेतात कीं काय अशा विवंचना मनास खात असताच, बाजीरावानें गोदावरीवर नासिरजंगाशीं संग्राम चालविला. असे शेकडो प्रकार चहूंकडचे लक्षांत आणले तरच या दोघां बंधूंच्या उद्योगाची योग्य अटकळ आपणास बांधतां येईल.†

पुष्कळांना वर सांगितलेलें साधार भाडार स्वतः वाचणें शक्य नाही सबब त्याची आणि वर सांगितलेल्या शाहूच्या कौटुंबिक राज्यपद्धतीची थोडीबहुत कल्पना येण्यासाठी कांही निवडक वेचे पुढें मुद्दाम देण्यांत येत आहेत, जेणें-करून तत्कालीन व्यवहारांची मांडणी जशी मनांत भरेल तशी नुसत्या शाब्दिक वर्णनानें भरणार नाही. या उताऱ्यांत नानाविध विषय आलेले आढळतील. त्याची व्यवस्थित विषय विभागणी करणें अवघड आहे. सर्व राज्यच एका कुटुंबासारखें असल्यामुळें छत्रपति, पेशवे, कामदार, अधिकारी व रयत या सर्वांचा एकजीव झालेला त्यात व्यक्त होतो.

'१ **शाहू-बाजीराव, राज्यतंत्र.**—एवढ्या मोठ्या राज्याच्या प्रपंचांत आनंद, दुःख, वैताग, पदाच्या घालमेली, तक्रारी, निवाडे असले प्रकार सारखे चालू असले तर नवल नाही. त्यातून ते युगच बारभाईच्या खेतीसारखें अव्यवस्थित व लहर लागेल तसे चालणारें होतें. वर पेशवे जबरदस्त होते म्हणूनच निभाव लागला आणि शाहू हे सर्वांना छाया देणारे छत्र होते म्हणून राज्याची वृद्धि झाली. अनेक राजकारणांची बहुविध चर्चा शाहूच्या दरबारांत चालून ती या पत्र-संभारात उतरलेली पहावयास सांपडते. गोरखोजी भापकर सयाजी गुजर, उदाजी पवार, अशा व्यक्तींच्या सरंजामाच्या भानगडी शाहूच्या दरबारात चालत, त्यात पक्षोपपक्ष व सवाल जबाब भरपूर होत. पुरंदरे वगैरे मंडळी पेशव्याची तरफदारी करीत, तर दुसरे कित्येक दरबारी पेशव्यांच्या

† पे. द. खं. ३, ७-१८, २२, ३०-३४ मिळून एकंदर १९ भाग निवळ बाजीरावाच्या काळाचे आहेत, हे अभ्यासकांनीं लक्षात ठेवावे.

कागाळ्या पुढें आणीत. मिळून शाहूचा दरबार म्हणजे एक प्रकारची हल्लींच्या पद्धतीचे वादविवाद व दोषाविष्करण करणारी दरबारी लोकांच्या उघड चर्चेची कौन्सिल सारखी सभा होती असें म्हणतां येईल. या सभेचे रिपोर्ट प्रसिद्ध झालेल्या पत्रात आपणांस वाचावयास मिळतात. §

पैसा हीच राज्याची मुख्य शक्ति आणि पैशाची पैदास सावकारीवर अवलंबून. सुव्यवस्थित कारभाराशिवाय सावकारी चालत नाही हा प्रकार शाहूच्या लक्षांत किती होता हें खालील उताऱ्यांत व्यक्त होतें. "मनोहरदास सावकार वसती सुरत यांस दिल्हे अभयपत्र ऐसे जे. तुम्ही साताऱ्यास येऊन सावकारी करावी ऐसी उमेद धरून भवानी शंकर व मेहेरमहंमद यांनीं हुजूर येऊन विदित केलें, ऐशास तुम्हा सावकार लोकांचा संग्रह करावा हें स्वामीस अगत्य आहे, तरी कोणेविशीं शंका न धरितां येथें सावकारी व्यवसाय करून सुखरूप राहणें. कोणे बाबें आजार लागणार नाही. स्वामी तुमचें चालवितील,' (ता. ११ मे स. १७२५). † यावरून बाजीरावाचा पुढाकार निदर्शनास येण्यापूर्वी शाहूनगरचें वैभव वाढविण्याचा प्रयत्न शाहूने कसा केला ते लक्षांत येतें.

या बाबतीचा पुरस्कार पुढें बाजीराव चिमाजींनीं विशेष केला. चिमाजीची नजर या बाबतींत जास्त तीक्ष्ण व सर्वांगनिरीक्षक होती. संग्राम उरकतांच द्रव्यप्राप्ति करून घेण्याचे उपाय ते बंधू लगेच अंमलांत आणीत. उत्तरेंतून दक्षिणेंत द्रव्यनदीचा प्रवाह सारखा चालू ठेवायचा संकल्प होता. सर्व ठिकाणच्या कमावीसदारांस तगादे लावून हिशेब ठरवून घोडे उंट इत्यादिकांवर खजिना लादून बंदोबस्तानें आणीत. फौजेंतील लोकांस वेळच्या वेळी तनखा देऊन हे दोघे बंधु संतुष्ट ठेवीत. म्हणून त्यांचे हस्तक जिवाभावानें त्यांची सेवा करीत. उत्तर मराठशाहींत ठिकठिकाणचे मराठे वकील तनखा मिळाला नाहीं म्हणून सारखे गिल्ला करीत, तो प्रकार बाजीराव चिमाजींचा आढळत नाहीं. ते नेहमीं कर्जात बुडालेले असत हा प्रवाद ब्रह्मेन्द्रस्वामीसारख्यांस सांगण्यापुरता होता. बाजीरावाची कर्जापायीं सदैव हीन स्थिति असल्याचें दिसत नाही.

शाहूचा सुमंत आनंदराव रघुनाथ म्हणजे परराज्य प्रधानकीचा मुख्य चालक, निजामाकडे वगैरे बोलणे करण्यांत तो अग्रेसर. दिल्लीस बादशहाकडे

§ पे. द. १७. ६५. पृ. ३८८ कलम ५ यात आगऱ्याचा कलह वर्णिला आहे तो याचाच मासला होय. † पे. द. ३०.३५८

टेखील त्याला जावें लागे. बाजीरावास पेशवेपद मिळाल्यावर या जुन्या मंडळीस बाजूस ठेवून परराष्ट्राचें राजकारण त्यानें आपल्याच हातीं घेतलें. त्याबद्दल मोठा गवगवा झाला. पुढें निजामास पालखेडावर पायबंद मिळतांच आनंदराव सुमंतास जवळ बोलणें करण्यास ठेवूं नये असें बंधन बाजीरावानें निजामास घातलें. ते निजामानें पाळलें नाहीं. सुमंतास पाठिंबा शाहूचा. असें होतां होतां बाजीरावानें आपल्याच मुखत्यारीवर मोठी प्रकरणें उलगडून राज्याची वृद्धि केली तेव्हां सुमंत त्याजपुढें सुतासारखा नरम आला. तो चिमाजी आपास लिहितो, ' आमचा हेत कीं पुनः स्वामींचे सेवेसी यावे, स्वकीय अर्थ निवेदन करावा, जैसी आज्ञा होईल तैसी जातीनें वर्तणूक करावी, सातान्यास हुजूरकडे जाऊन तरी काय जाबसाल करावा ! एकवेळ स्वामींच्या पायांचें दर्शन घेऊन मग आज्ञा होईल तसे वर्तू. विस्तार लिहावा तरी स्वामी सर्वज्ञ आहेत. " ¶ यावरून सुमंत किती निर्जीव बनला याची कल्पना होते. " तेजसांहि न वयः समीक्ष्यते, " हें कांहीं खोटें नाहीं. खुद्द शाहूलाटेखील हा प्रकार गैर वाटला नाहीं, हें खालील पत्रात व्यक्त होतें. पुरंदरे चिमाजी-आपास लिहितो, " राजश्री बोलले, नबाब सुमंतांस बोलावतात, पण त्यास पाठवावे हें आमच्या विचारास येत नाहीं. कां म्हणाल तरी प्रधान पंत उत्तर प्रांतें गेले ते तिकडे काय मनसबा करतील आणि इकडे याणी काय बोलावे ! पंतप्रधानांची व सार्वभौमाची भेट जाली तर नबाव सुमंतासी मुखें भाषण करणार नाहींत. एखादी अधिक उणी गोष्ट बोलल्यास सुमंतांस परम संकट प्राप्त होईल. यास्तव प्रधानपंतांकडील वर्तमान येऊं द्यावें, मग यास रवाना करूं. " सुमंतास साभाळून घेण्यांत शाहू किती दक्ष असे पहा.

पुरंदरे लिहितो, " सर्व लोकांस निरोप देऊन राजश्री स्वामी येकलेच बसले. आम्हास बोलले, आजकाल ईश्वर इच्छेनें प्रधानपंताचा सर्वोत्कर्ष आहे. यांची कीर्ति भूमंडलीं बहुत दिवस राहील. यश, कीर्ति, गार्हस्थ्य, स्वामिसेवा इत्यादिविशीं किमपि अंतर नाहीं. पण एक गोष्ट अनुचित करितात. द्रव्याची आशा धरून अर्जिले कीर्तीस कलंक लावितात. मागें **दादाजी कोंडदेव लहानसाच ब्राह्मण** झाला, पण **त्यानें इनसाफ केले ते औरंगजेब पातशाहासही वंद्य झाले,** तर एवढी गोष्ट न करीत जाणें. " § यावर बाजीरावाचे उत्तर

¶ पे. द. ३०.२९७, १७.५६.

§ पे. द. १७. ५२.

महाराजांस आलें तें असें. " आम्ही लेकरें. महाराजांवांचून आम्हांस ममता पुरःसर बुद्धिवाद कोण सांगेल ! पण गैरवाजवी इनसाफ महाराजांचे चित्तांत कोणते आले ,त्यांची आज्ञा करावी. " यावर महाराजांनीं प्रत्यक्ष नांवें सांगण्याचें टाळलें. राज्यकारभारांत असे प्रकार हंमेशा घडतात. शाहूकडे अन्यायाच्या तक्रारी पुष्कळ येत असत. परंतु त्या बाबतींत उगाच पेशव्यांस छेडीत बसण्याची त्याची वृत्ति नव्हती. दादाजी कोंडदेवाच्या न्यायाची स्तुति शाहूने बादशहाचे छावणींत असतांना ऐकिलेली असली पाहिजे.

जुन्या सरदारांस धाकात ठेवून त्यांजकडून काम घेणें अत्यंत अवघड होतें. हे सरदार छत्रपतीचे, ते पेशव्यांची हुकमत काय म्हणून पाळतील ? पण प्रत्यक्ष शाहूच पेशव्याचे तंत्रानें वागूं लागल्यावर तशा सरदारांचा नाइलाज झाला. अशा मासल्याची एक तक्रार मानाजी जाधवानें शाहूकडे केलेली नमुनेदार आहे, ती अशी. " चिमाजीपंतांनीं आम्हांस दबावाच्या गोष्टी सांगितल्या, आम्हांस भेटीस येऊन गेले. त्यांची आमची भेटी जाहली. त्यास तेथें जें आम्हांस बोलों नये तें बोलला, कीं तुम्ही महाराजांची पाट करून राहतां तर एक दिवस मारून ताराज करीन. त्रिंबकराव दाभाडा मारला, महाराजांनीं आमचें काय केलें ? तुम्ही बीट ( वाईट ) करून किती दिवस राहाल ! ऐसा आम्हांसी आकस लाविला आहे, कीं तमाम सरदार आमचे चाकर आहेत. तुम्हीही एकभावानें चाकरी करावी. त्यांस आम्ही जबाब देतों कीं महाराजांचे पाय सोडून दुसऱ्याची चाकरी करणार नाहीं. हे गोष्टीचें पारपत्य महाराजांनीं केलें पाहिजे, " ( ता. १७.११.१७३१ ). † राजाराम छत्रपतीचा जावई सिंधखेडचा रघूजी जाधव साखरखेडल्याच्या लढाईत मृत्यु पावला, त्याचा मुलगा हा मानसिंग शाहूच्या आश्रयाखालीं वाढला. एकतंत्री हुकमत पेशव्यानीं चालविली म्हणूनच राज्यवृद्धि झाली.

तोफखाना सिद्ध करण्याविषयीं बाजीरावानें प्रयत्न केलेला दिसत नाहीं. परंतु जवळ तोफा नसल्यामुळे आपण कसे लंगडे पडतों ही गोष्ट शाहूला पटली आणि आपण आपल्या हातें तोफा ओतवाव्या अशी त्यास उत्कंठा होती. धातूची मोड ( scrap iron ) पाठविण्याबद्दल शाहूनें पुष्कळदां फार आग्रह धरला.§ " मोडीविशीं तुम्हांस वरचेवर मांगतों पण अद्याप मोड येत नाहीं.

† पे. द. १७.३०.

§ पे. द. १७.३२,१३७, ८.३१.३०; १८.२४; २२.२१; १७.३४,४५; ३३.२०५.

मग पर्जन्यकाल आला, मग तोफेचा कारखाना कसा चालणार! दिवसांतून एक दोन वेळां बोलावून महाराज ताकीद करतात आणि श्रमी होऊन बोलतात. येथें स्वामींनी मुसा तयार केल्या आहेत आणि कळभूत ‡ मेणावलें आहे. या उपरि कळभुतावर मातीचें कळभूत दिलें कीं रस तयार पाहिजे. कारखाना थोर, पाऊस पडला म्हणजे काम बिघडेल. म्हणून हयगय एक घटका करूं नये, " (म. १७३५). गावांत थोरल्या गरनाळेचे गोळे टाकल्याची हकीकत एका पत्रात आहे. दुसऱ्या एक पत्रांत तोफेसाठीं मोड लवकर मिळत नाहीं म्हणून शाहूनें फार फार उद्वेग प्रगट केलेला आढळतो. तोफेचे गोळे वसईहून साताऱ्यास आणल्याची हकीकत लिहिलेली आहे. ‘स्वामी तोफ ओतीत होते ती फुटली म्हणून बहुत बेदम आहेत.’

शाहू महाराज आग्रही कांहीं कमी नव्हते. पुष्कळदा पेशवे किंवा दुसरे वजनदार गृहस्थ याजपासून आपलें म्हणणें खरें करवून घेत.¶ एकदां अधिकाऱ्यांनी इनाम तिजाईसंबंधीं हरकत घेतली, तेव्हां महाराज बोलले, "शहाजी व शिवाजी महाराज यांचीं पत्रें धारादत्ताचीं आहेत, यांत तुम्ही जाणाल ते करा. राजश्रींचा आग्रह जाणून कागदावर सिके करून दिले." आपल्या मर्जीप्रमाणें वाटेल तेव्हां बाजीरावास किंवा चिमाजीआपास निकडीनें आपल्या जवळ बोलावून घेत. मोठ्या राजकारणात पेशवे मुखत्यारीनें यश घेऊन वावरतात, त्यांत शाहूला बहुधा आपला आग्रह चालविता येत नसे, परंतु हुकमाची अवज्ञा कोणी केलेली त्यांस बिलकूल खपत नसे. त्यांच्या थोर मनाचा नैतिक दरारा एवढा मोठा असे, कीं त्याची उघड अवज्ञा करण्यास कोणी धजत नसे. तथापि शाहूचा हा उद्वेग क्षुल्लक बाबतीतच उत्पन्न होई. दूरदूरच्या स्वाऱ्या, लढाया, तह इत्यादि राज्याच्या प्रचंड उलाढालींत शाहूनें कधीं वेनाग दाखविला नाहीं कीं अडथळा आणला नाहीं. सामान्य धोरणें व तत्त्वें याचा समक्ष बोलण्यांत पूर्ण खल तो पेशव्यांशी करी. या धोरणांची प्रत्यक्ष बजावणी पेशवे व त्यांचे हस्तक योग्यायोग्य पाहून करीत.

कित्येक वेळां महाराज कांही तरी भलतेंच प्रतिपादूं लागले तर त्याचें लटकेपण सगळ्यांचे देखत पदरांत घालण्यास पुरंदरे कमी करीत नसत, अशींही उदाहरणें पुष्कळ आहेत. बाहेरचें सर्व कांहीं वर्तमान आपणास वेळेवर

‡ कशाचें भूत, साचा यांत्रिक, mould.

¶ पे. द. १७.४१ ; १८.९९.

कळवीत जा, महाराजांनीं विचारलें तर तें लगेच त्यांस आम्हीं सांगितलें पाहिजे, असा तगादा पुरंदऱ्यांचा पेशव्यांकडे असे. धन्याची बदनामी केव्हांही न व्हावी अशाविषयीं पेशवे विशेष जपत. वेळेवर सर्व प्रमुखांस पत्रें लिहून त्यांचें समाधान ठेवण्याला ते चुकत नसत. आनंदाची बातमी आल्याने शाहूस पेशव्यांबद्दल धन्यता वाटत असे. ' महाराज पत्र श्रवणें करून बहुत संतोषी झाले, फार उत्तम गोष्ट केली, असें बोलले. ' ' स्वामींनीं त्या प्रांतींचें सविस्तर वर्तमान लिहिलें त्यावरून महाराज बहुत समाधान पावले. ' तसाच नाजूक प्रसंग असला तर महाराजांचे भेटीस येतांना, फौज घेऊन किंवा सावधगिरीनें या अशी सूचना पुरंदरे पेशव्यास किंवा चिमाजी आपास वारंवार देत असत. §

पुढें पुढें तर खुद्द शाहूलाही पेशव्याची आर्जवें करणेच भाग पडूं लागलें. " आमच्या व दोन महालांच्या स्वाऱ्यांकडे गरीब हत्तिणी पाहिजेत. तुम्ही पेशवे आहा. आमच्या लायक दोन हत्तिणी मेळवून देणें. निदानी पैका मागाल तरी देऊं. † " असें पुरंदऱ्यांकडून शाहूनें पेशव्यास लिहविलें.

पुष्कळदां पेशवे बाहेर मोठ्या कामांत गुंतल्यामुळें शाहूची गैरसोय होऊन त्याचे क्लेश जवळच्यास देखील दुःसह वाटत. ताराबाईचें खालील पत्र पहा.

" मातुश्री आईसाहेब याणी बाजीराव पंडितप्रधान यांस आज्ञा केली यैसीजे. येथील मनोदय तुम्ही यावें आणि चिरंजिवास ( शाहूस ) व तुम्हांस उचित तेंच सागून ज्या गोष्टीनें राज्याची अभिवृद्धि व तुम्हास श्रेयस्कर असेंच चालविण्याविषयीं आज्ञा करून करवावें. परंतु तुमचें येणें काले करून घडणार आणि यास क्लेश भोगण्याची सीमा राहिली नाहीं. त्यापक्षीं याचे समाधान तेच रक्षून तुम्ही सर्व राज्यभार चालवावा हेंच तुम्हास योग्य आहे. चिरंजीवांचें लक्ष तुमचे ठायीं दुसरें नाहीं. तुम्हीही दुतर्फा किंतु वाढवूं नये. विस्तारें काय लिहावें, ( ता. १९ एप्रिल स. १७३९ ). ‡

पेशवे मुखत्यारीनें काम करूं लागतांच इतर प्रधानांच्या कामास महत्त्व राहिलें नाही. सुमंत म्हणजे परराज्यसंबंधी व्यवहार पहाणारा, किंवा सेनापति म्हणजे युद्ध खेळणारा असूनही, स्वतः पेशवेच सेनापतीचें काम करूं लागले आणि परदरबारात आपल्या निसबतीचे स्वतंत्र वकील ठेवून त्याच्यामार्फत

§ पे. द. १७. ५२, ६५, ६८, ७०, ७१, ७२, ७८, ९६. † पे. द. ३०. २१०.
‡ पे. द. ३०. २२७.

परराज्याचीं कामें आपल्या हुकमतीनें उरकूं लागले. असें होता होतां पूर्वीची अष्टप्रधान–व्यवस्था आपोआप निरुपयोगी बनली. थोडीबहुत ती पूर्वी ताराबाईच्या वेळींही मोडत चालली होती.

देशाच्या आबादानीकडे शाहूचें लक्ष किती होतें त्यासंबंधाचीं पत्रें विपुल आहेत. “ राजश्री स्वामी बोलिले कीं सालदरसाल शिवापुरच्या आंब्याच्या कोया लावावयास वीस हजार नेतां, त्यांची हकीकत कोणे गांवीं किती झाडें लाविलीं त्याबद्दल गावोगांवच्या पाटलांचे लेख आणवून जाबता रुजू करणें. पुणें देशांत अंबराया नाहीत. ताकीद करून ही गोष्ट करवणें. ” § असा मजकूर एका पत्रांत आहे. दुहीमुळें जाग्याचा विध्वंस कसा झाला, यासंबंधाचें सुंदर वर्णन एका पत्रांत आहे. रामचंद्र बल्लाळ भुस्कुटे लिहितो, “ कलहनदीप्रवाहीं आम्ही जन पडलों, त्यास एकही थडी हातास न ये, त्यास तरणोपाय ईश्वररूप खावंद म्हणून विज्ञापना लिहिली असे. ” पुण्यास उन्हाळयांत लोकांस पिण्यास पाणी मिळेना आणि पेठे यांच्या बागेस मोटानीं विपुल पाणी मिळे, त्याची तक्रार राधाबाईनें महाराजांपर्यंत पोंचवून पेठ्यांच्या मोटा बंद करविल्या. तुम्ही खुशाल आनंदांत राहा, आमची फिकीर करूं नका असें राधाबाईनें कितीकांना सांगितलें, तीं पत्रें आज विद्यमान आहेत.

“ श्रीमंत पंतप्रधान स्वामींनीं लष्करांतून रथ व दोन बैल पाठविले. आज्ञापत्र पाठविलें कीं रथाचे पटे वगैरे तुटले आहेत ते धड करून पुण्यास रवाना करणें. त्यावरून रथास नवे पटे चढऊन व बैलांस झुलां व घटाटोप पडदे खारव्याचे करून रथ सेवेसी रवाना केला आहे. ” ( पत्र औरंगाबादेहून ).

गोलंदाज आरब म्हणजे गोलंदाजीच्या विशिष्ट कामास आरब चांगले उपयोगी पडत. महार मांगही पेशव्याचे नोकरीत पायदळांत असून त्यांजकडून सर्व जातीना उत्तेजन मिळे.¶ पुष्कळदां सरदाराची एकच हाकाटी ऐकूं येई कीं माणसें टिकत नाहींत. मन लावून काम कोणी करीत नाहीत; आणीबाणीचा प्रसंग आला कीं उठून जातात, वाट चालूं लागतात. त्यांचीं आर्जवें करताना पुरेवाट होई. आरब, कोळी, मावळे, रांगडे, खलाशी, गोलंदाज अशी अनेक माणसें विशिष्ट कामास लागत; आणि जरूर पडे तेव्हां हवे ते हाताशीं असत असें नाहीं. लष्कर सुसज्ज संतुष्ट ठेवणें हें काम नेहमींच बिकट आहे. अलीकडे

§ पे. द. १८. १७, १८. ३९; १८. ९३.
¶ पे. द. १६.११५; १७.११५; ३३-३३९, ३०

कायद्याच्या साह्यानें लष्कर कबजांत राहतें तसा प्रकार मराठशाहींत नव्हता, त्यामुळें ऐन प्रसंगीं घात झाल्याचे प्रसंग पुष्कळ घडले. कोंकणांतील मोहिमा अंगावर घेण्यास चिमाजी नाखूष दिसला, त्यास शाहूनें कळविलें, "कोंकणच्या किल्ल्यांचा खर्च आपणांवर पडतो म्हणून तपशिलें लिहिलें, त्यावरून राजश्री स्वामी बोलले कीं संपूर्ण राज्यभाराची इमारत तुम्हांवरच आहे. सर्वांविशीं भरंवसा तुमचाच आहे. राज्यास संकट पडेल तें तुम्हांव्यतिरिक्त कोण निवारणार! नुसत्या कोंकणच्या किल्ल्यांची गोष्ट काय?"

सर्व असें सुरळित चालत असतांही क्षुल्लक कारणावरून शाहूस संतापही काही कमी येत नसे. तोफेसाठीं लोखंडाची मागणी, चाकरमाने पाटलाची तक्रार,† घराची दुरुस्ती, तेलातुपाची टाकी अशा किती तरी बाबतींत शाहूचा वैताग जगजाहीर होता. 'या हयगगीमुळें राजश्री स्वामी इतराज होऊन मुखावरी पाणी प्रवाह होऊन अब्रू घेतली. अलीकडे बेमुर्वत प्रसंग बहुतच धरला आहे," असें पत्र पुरंदऱ्याने लिहिलेलें आढळतें. अशाच मासल्याचें पत्र पे. द. १७.५५ चें वाचण्यालायक आहे. कांही कांहीं प्रकरणें तर कायमच्या धुसपुसीचींच बनलीं होतीं. शिकारीची तर्तूद, घोडे हत्ती वगैरे वाहनांची आबाळ, जवळच्यांच्या तक्रारी हे विषय सामान्य ... शाहूच्या दरबारांतही पुष्कळदां त्रासदायक बनत. मात्र भोजनाच्या किंवा सुखसोयींच्या बाबतींत एकही तक्रार आढळत नाहीं, यावरून शाहूची सांसारिक वृत्ति पूर्णपणे विरक्त होती असें दिसतें.

'कसें करूं, काय करूं' असें धन्याशीं रडगाणे गाणारा चाकर काय कामाचा! प्रतिनिधीचा असा लेख वारंवार नजरेस येतो तसा बाजीरावाचा येत नाहीं. एक मासला प्रतिनिधीच्या पुढील पत्रांत मिळतो. 'स्वामीचा जमाव अवघा ऊठउठोन गेला, खाया खर्चासही वखवख बहुत आहे, हें ऐकोन परम क्लेश सेवकास होतात. प्रसंग कठिणच येऊन पडला. रुका कोठून प्राप्त नाही, कर्जही मिळेना. पन्नास मोहरा सेवेसीं पाठविल्या आहेत.' § बाजीरावावर शाहूची मर्जी बसण्याचें बीज यांत आहे. शाहूनें सर्व मंडळींच्या परीक्षा केल्या, तेव्हांच बाजीरावावर संपूर्ण विश्वास टाकला.

† पे. द. ८.३१; १८.२४; ८.३०; ११.२१; १७.९९.

§ पे. द. १७.१ A.

प्रथम स्वपराक्रमानें, वेळेनुसार जबरदस्तीनें बाहेर शत्रुमुलुखांत हुकमत व दरारा बसवावयाचा, मुलुख बेचिराख करावयाचा, नंतर उद्योगधंद्याची व लोकपोषणाची कळकळ दाखवून मुलखांत स्थैर्य उत्पन्न करून व सावकारीसारखे धंदे चालू करून राज्य व पैसा मिळवावयाचा, हाच मराठ्याच्या मुलूखगिरीचा अर्थ मूळ बाजीराव चिमाजींनीं माळवा बुंदेलखंड इत्यादि ठिकाणीं अमलांत आणिला. पुढील उताऱ्यांवरून मराठ्याचें धोरण कळून येइल.

" श्री० आपा यांस. मोर सेटी करंजे दंडवत. नरसिंगराव ढमढेरे बुंदेलखंडांत पडले. त्यांचे भाऊ महादाजी गतवर्षी गुजरातेस गायकवाडाकडे होते. सांप्रतही जात होते. आम्हीं सांगितलें पंतस्वामीस पुसल्यावेगळे नवजाणें. त्यांनीं निरोप दिल्हा तरी जाणें. म्हणून राहवून सेवेसी पत्र लिहिलें आहे. याचेविशीं आज्ञा करणें ते केली पाहिजे. हुजूर बोलावलें तर सेवेसीं पाठवून देऊं." ता. ३ ऑक्टोबर स. १७३२.‡

" मातुश्रीबाई यात्रेस गेली ते समयीं सवाई जयसिंगानीं समागमें फौज दिली, त्यांत दिलीपसिंग अघाडीवर दीडशें स्वारांचा अंमलदार होता. बरा मातबर चतुर आहे. त्यांचा हेत आहे कीं आपला पुत्र शेंपन्नास राबतांनिशीं चाकर राऊ स्वामींनीं ठेवावे. आज्ञा होईल तर स्वार आणतील." असे पत्र ता. ५ मे स. १७३७ चें वेंकाजीरामाचे बाजीरावास आलें. ¶ यावरून उत्तरेतील लोकाना दक्षिणेत पेशव्यांच्या पदरीं नोकरी करण्याची इच्छा कशी उत्पन्न झाली होती हें दिसतें.

दमाजी थोरात व त्याचें घराणें कालान्तरानें शाहूशीं निष्ठा ठेवून राज्याच्या उद्योगांत दाखल झालें. राधाबाई, बहुधा दमाजीची बायको, इचें खालील विनम्र पत्र चिमाजी आपास लिहिलेलें या संबंधांत मासलेवाईक आहे. "आमचे खासे कैलासवासी जाले त्या तागाईत आपण आपत्तीखालीं आहों. त्या मागें वडील मायबाप स्वामी आहेत. आमची शरम लज्जा साहेबांस आहे. खाशांची जागीर चि. रणसिंग थोराताचे नांवें करून दिल्ही त्याचें साहित्य करणार साहेब आहेत. चि. मानसिंग थोरात साहेबांचे पदरीं पायांपाशीं आहेत, त्यांचें सर्व प्रकारें ऊर्जित केलें पाहिजे." §

‡ पे. द. ३०.८८, २३५. ¶ सातारा ऐ. ले. सं. २. २६२.
§ पे. द. १७.८५.

बाजीरावाची देशांत चलती वाढली, तेव्हां निजामाकडचे व परदरबारचे लोक त्याचे पदरीं येऊन नोकरी करण्यास उत्सुक झाले, अशीं उदाहरणें आणखीही आहेत. बाकी त्या काळांत एकानें दुसऱ्याचे नोकर फितवून आपया पक्षांत आणणें हा एक राजकारणी डावच बनला होता. शाहू व कोल्हापुरकर संभाजी यांजमध्यें अशी स्पर्धा सारखी चाले. ‡

गुन्हा केल्याबद्दल शासन करण्यात बाजीराव दयामाया ठेवीत नसला, तरी माणसांच्या नोकरीची कदर करून त्यांस भरपूर उत्तेजन देणें आणि त्याचा परामर्ष घेणें या गोष्टी बाजीराव अत्यंत आस्थेनें करी. अशा उत्तेजनाची पत्रेंही मुबलक आहेत. एक मासला पहा. बाजीराव महिपतराव सिंद्यास लिहितो. ' तुम्ही आपला अर्थ सांगोन पाठविला तो कळों आला. त्रिंबक गोपाळ तुम्हांस सांगतील ते वचनें आमचींच जाणोन कार्यभाग करून नक्ष राखणें. प्रसंग आहे तो तुम्हास कळतच आहे. ये समयीं दुष्टांस नतीजा देऊन आपला लौकिक करून घ्यावा हे गोष्ट तुम्हांस न कळेसी काय आहे. तुमचे वडिली या राज्यात श्रम करून नक्ष संपादन केला, त्यांजमागे तुम्ही निष्ठा धरून महत्कार्य केलीया तुमचेंच बरें आहे. फौज तोलदार धरून अमित्र दंतभग्न करून संतोषाचें वर्तमान वरच्यावरी लिहिणें. तुमचे ऊर्जित करावया अंतर होणार नाही. " असे हे राज्यकारभाराचे मासले सांगूं लागल्यास पार येणार नाही. § येथें थोडी कल्पना मात्र दाखविली आहे.

**६ शाहू-प्रवास, राहणी, व्यवसाय.**—शाहू छत्रपतीचें आयुष्य केवळ महाराष्ट्रात गेलें. [illegible] जाण्याचा त्याचा प्रसंग एकदां नर्मदेपावेतों अजमशहाबरोबर आला तेवढाच. जन्म कोंकणांत माणगांवजवळ, आठव्या वर्षी बादशहाच्या छावणीत दाखल झाल्यापासून सर्व प्रवास लष्कराबरोबर मिरज व अहंमदनगरच्या दरम्यान झाला. खानदेश वऱ्हाड एकदांच पाहिलें. सातान्यास छत्रपतिपदावर आल्यापासून पुढील बेचाळीस वर्षांत लांबचा प्रवास म्हणजे तुळजापुर मिरजचा. बाकी शिंगणापुर, जेजुरी, वाई, प्रतापगड, या ठिकाणच्या यात्रा वारंवार दरसाल एकदां तरी व्हायच्याच. नेहमींचें आवडतें ठिकाण माहुली व उंब्रज. पुणें, लोहगड, पालीपावेतों प्रसंगानुसार गेल्याचे उल्लेख आहेत. मुख्य व्यवसाय दोन. शिकारीनिमित्त

‡ पे. द. १७. १०६. १७०. § पे. द. ३०. ३०१.

रोजचा मोकळ्या हवेंतील फेरफटका व राज्यकारभार. शिकारींत रस्त्यांत प्रवासांत रात्रीं दिवसा कोणीही येऊन भेटावें, आपली हकीकत सांगावी, यांनीं शांतपणें ऐकून सर्वांचा परामर्ष घ्यावा, विशेष भानगड असली कीं पेशव्याकडे हवाला द्यावा. बाकी खासगी राहणी अगदीं साधी व निरिच्छ. जनानखान्याचा बडेजाव मात्र बादशाही धर्तीवर. मोठमोठ्या भानगडी व्हावयाच्या त्यांचा उगम बहुधा जनानखान्यांतून. दररोज दरबार भरून त्यांत सर्वांदेखत कारभाराची उघड चर्चा व्हायची. नाजूक प्रकरण असलें तर नेमक्या मंडळीस बाजूस घेऊन बोलणें व्हायचें. परंतु गुप्तता अशी नाहीच म्हटली तरी चालेल. औरंगजेबाचाच कित्ता शाहूनें आपल्या राहणींत उचलिला.

कुत्रे, पक्षी, घोडे, हत्ती, अशा जनावरांची पैदास, त्यांची निगा व निर्मिति यांत शाहूचें लक्ष भारी होतें. देवतार्चन किंवा कोटी होमासारखे प्रयोग जवळची मंडळी पुष्कळ करीत, पण अशा धार्मिक बाबतींत स्वतः शाहूचें लक्ष असल्याचा एकही उल्लेख नाहीं. कुत्र्यांचा छंद भारी, तसाच मासे मारण्याचा. गाणें नाच, यांची आवड त्यास विशेष नव्हती. करमणुकीकरितां गवई, नाचे वगैरे ठेवलेले होते, त्यांची यादी व पगार एका कागदांत दाखल आहेत. † आप्तांचा किंवा नोकरांचा संतोष राखणें, त्यांस दालदागिना देणें यांत मोठा आनंद. ' धाकट्या शिवाजीची कन्या दर्याबाई इला भेटीस आणून जवळ ठेविली. दहा सहस्रांचे अलंकार अंगावर घालून पोषाख व हत्ती देऊन संभाजी राजांबरोबर रवानगी केली, ' ( स. १७३६ ). मातुश्री बाईसाहेबांस आरोग्यता व्हावी म्हणून गजदान, उष्ट्रदान, अश्वदानें, म्हैशीदानें दोन, पांचसात गोदानें, कृष्णाजिनदान अशीं ब्राह्मणांस दिलीं.' जवळच्या मंडळीच्या मुली मुलगे यांचीं लग्नें आपण जुळवून तीं आपल्या खर्चानें आपल्या देखत करण्याचाही महाराजांस शोक फार. ' केदारजी केसरकराची कन्या वाड्यांतील लिंगाई यांचे पुत्रास नेमस्त करून लग्ननिश्चय केला, आपण खास त्यांचे घरास जाऊन हरिद्रालेपन करून आले. या गोष्टीमुळें पुष्कळ विपर्यासी भाषणें उभयपक्षी जालीं. परंतु चित्तांत गोष्ट आली तीच राजश्रींनीं अत्याग्रहें केली. कोणाचा उपाय चालला नाहीं. समस्त सरकारकून अश्वगजसहित समारंभानें लग्नास गेले. मातुश्री बाईसाहेबही गेली. खासा भोजनास गेले.'

† पे. द. ८. ३५. ३६

'स्वामी पहाटे शिकारीस जातात ते दोन तीन घटका रात्रीं परत येतात,' असा लेख मिरज स्वारींतला आहे. चाकरमाने पाटील वाघाच्या शिकारीस उपयोगी पडणारे होते, त्यांस ताबडतोब पाठवून देण्याविषयीं महाराजांनीं पेशव्यांस आज्ञा केली असतां ते वेळेवर आले नाहींत, म्हणून महाराजांचा रोष पेशव्यांवर अतोनात झाला, अशीं पत्रें पुष्कळ आहेत. 'दोप्रहरां वाघाची बातमी आली. स्वामी शिकारीस गेले. चाकरमाने पाटलांस सत्वर पाठवावें. नाहीं तर क्रोधास येतील. ते समयीं समस्ता देखतां काय बोलतील कळेना. हें पाटलांचें त्वष्ट सारखें आम्हांस लावलें आहे. दरबारीं भरले सदरेस बोलूं नये तें आम्हांस बोलतात,' असें पुरंदरे वारंवार लिहितात. ‡ "स्वामी चौघटका रात्री शिकारीस जातात, संध्याकाळीं येतात; दोनतीन घटका राज्यकारभार करावयाचा तो होतो. तीनचारशें माणसांचा स्वयंपाक सिद्ध करून रानांत न्यावा. भोजनें तेथेंच करावीं. बहुत संतोषरूप आहेत." कुत्र्यांचीं वर्णनें व भानगडी तर इतक्या आहेत कीं त्या मूळ पत्रांतच वाचल्या पाहिजेत. दुसऱ्या कोणाकडे चांगली जातवंत कुत्रीं किंवा पिलें असल्याचें ऐकलें कीं तीं लागोलग आपल्याकडे आणविण्याची उत्कंठा चालू व्हायची. 'कुत्रीं चाळीस आलीं, परंतु राजश्रींच्या चित्तास आलीं नाहींत,' ही रडकथा किती तरी पत्रांत आहे. तीच हकीकत घोड्यांची. एकदां महाराज बोलले कीं 'आम्ही बेवकूफीची गोष्ट केली कीं प्रधानपंतांकडे घोडा मागितला.' 'आतांपासून दसरा दिपवाळीपर्यंत माशांचे शिकारीचा हंगाम आहे, यास्तव जागजागां डाव घातले आहेत. नित्य जाऊन गळ टाकून बसावें. बऱ्हाणपुरी खानदेशचें बारीक सूत गळाचे दोरीस असावें, तरी पत्रें पावतील तेक्षणीं दीडशें रुपयांचें बारीक सूत चांगलें बऱ्हाणपुराहून खरेदी करून टाकोटाक पाठवावें.' लावे, बाज, जुरे इत्यादि पक्ष्यांची अशीच मागणी पत्रांत वारंवार आढळते. महाराजांचे व राण्यांचे वाडे बांधणें, दुरुस्ती करणें, नवीन जागा वाढविणें अशा अनेक बाबती पत्रांत मुबलक आढळतात. विरूबाईचा दरारा व जनानखान्यावरील देखरेख पदोपदीं व्यक्त होते. बाजीराव, चिमाजी आपा, हे राज्यांतील दोन कर्ते पुरुष व घरांतील कर्ती मालकीण विरूबाई हीं तीन माणसें स. १७४० त पांचचार महिन्यांच्या अवधींत दिवंगत झाल्यामुळें शाहूचें मन संसारांतून बहुतेक

‡ पे. द. ८. १३, ३०, ३१; ११. २१, १८. २४

निवृत्त झालें. ¶ तदुत्तर नाना पेशव्यानें मात्र पुत्रधर्म मानून अखेरपर्यंत महाराजांची सेवा मनोभावें केली.

आंगरे यांचेमार्फत विलायती सामान इंग्रजादि व्यापाऱ्यांकडून वारंवार मागविण्यांत येत असे. घड्याळें, तलवारी, सुऱ्या, शाला, शिसे, मेणबत्या, वेलदोडे अशा प्रकारचे जिन्नस बाहेरून येत. प्रवास व शिकार याची तजवीज मनाजोगती लावतांना सेवक लोकांची मोठी त्रेधा उडे. बहुधा कोणत्याही राजघराण्यांत पूर्वी काय व हाल्लीं काय हीच घरगुती बाबत मोठी जिकीरीची असते. मिळून शाहूच्या जीवनाचा मोठा व्याप घरगुती कारभाराचा असून मोठ्या बाहेरच्या राजकारणात त्याचें मन फारसें गुंतलें नाहीं, असें जें मागें सांगितलें आहे तेंच हे कागद वाचून प्रत्ययास येतें.

शाहूनगरची रचना व प्रतिष्ठा शाहू नजरेखालीं पुष्कळ वाढली. व्यापार उद्योग बळावला. नवीन सावकार निर्माण झाले. सुखानंद, सुमेरगिरी गोसावी, बनसीपुरी अशा परदेशी सावकाराची वसती सुरू झाली. पेशव्याचा बाह्योद्योग पसरत गेला, त्या बरोबर उत्तरेकडचे हिंदी लोक, वकील, रजवाडे, हुन्नरी, कलावंत अशी अनेक माणसे दक्षिणेंत आल्यामुळें देशातील दळणवळण वाढून महाराष्ट्राचें जीवन विस्तारलें. रमादेवी व रखमादेवी अशा दोन हिंदी स्त्रियास शाहूनें प्रवासाचें दस्तक दिलेलें आढळतें, † त्यावरून या उत्तर दक्षिण संसाराची कल्पना होते. यात वाईटापेक्षां चांगल्याचीच छटा विशेष उमटलेली दिसते. उत्तरेचे अनाचार इकडे फारसे आले नाहींत.

शाहूची रक्षासंतति मोठी बादशाही वळणार बनलेली होती. येसाजी व कुसाजी भोसले, तसेंच लक्ष्मीबाई, गुणवंतबाई, संतूबाई असे मुलगे मुली शाहूचे असल्याचीं नांवें आढळतात. गजराबाई व राजसबाई या मुली औरस होत्या. येसाजी व कुसाजी यांची प्रख्याति शाहूनगरात विशेष होती. 'राजश्रींनीं येसाजीस आणावयास हवालदार पाठविले. दादा येत नव्हते. हंमेश तीन भट्ट्या सडक चुवत असतात. तथापि बहुत प्रयत्नें करून आणले. प्रतिनिधीच्या घरावरून वाकडी वाट दाटून काढून आले. यांचा तमाशा सदरेस बहुत होत असतो. कांहीं ताळ नाहीं. इतकेंही राजश्री सोसतात.' ‡

¶ बाजीराव ता. २८ एप्रिल, चिमाजी आपा १७ डिसेंबर व बिरूबाई २४ डिसेंबर असे मृत्यु झाले. (पे द. ८-४८)

† शा. रो. ६९ ‡ पे. द. ६.९९

पण चैनीचे किंवा व्यसनाचे अनाचार शाहूनें स्वीकारलेले बहुधा आढळत नाहीत. खंडोजी माणकरास शाहूनें लिहिलें, "बटकीच्या पोरी दोन बहुत चांगल्या दहा अकरा वर्षांच्या निरोगी नाचावयालायक आणवणेविशीं महाराजांची एकांतीची फर्मास आहे." कोंकणांत अशा पोरी मिळत नाहींत असें माणकरानें उत्तर पाठविलें. §

**७ बाजीरावाचें अधिष्ठान उत्तरेंत.**—परिस्थितीनें पेशव्यांना उत्तराभिमुख कसें व कां बनविलें या मुद्याचें विवेचन प्रसंगानुसार ठिकठिकाणीं केलेंच आहे, पण ते मुद्दे संक्षेपानें एकत्र मांडणें इतिहासाच्या संगतीस सोयीचें होईल. बाजीरावाच्या दृष्टीपुढें पुढील प्रकार सदैव स्पष्ट दिसत होतेः—

१ औरंगजेबाच्या युद्धप्रसंगीं बादशाही खजिना काबीज करून त्यास हतवीर्य बनविण्यासाठीं मराठ्यांनीं नर्मदापार जाऊन माळव्याचें अधिष्ठान अगोदरच सिद्ध केलें होतें. दिल्लीपर्यंत चढाई करण्याचा कार्यक्रम स. १६९१ त आंखला गेला होता (पहा शि. च. सा. ले. ७६७)

२ बाळाजी विश्वनाथानें दिल्लीची स्वारी करून उत्तरेचा कार्यभाग बादशाही सनदांनीं निश्चित करून दिला तो पुढें चालविणें बाजीरावास अपरिहार्य होतें.

३ राजधानींत शाहूच्या जवळ प्रतिनिधि सुमंत यांच्यासारख्या विरोधकांचें प्राबल्य होतें, त्यापासून अलिप्त [illegible] बाजीरावास उत्तरेकडील दूरच कार्यभाग जास्त सुकर व सद्यःफलदायी वाटला.

४ मराठी राज्यसंस्थापनेचा मुख्य हेतु स्वधर्मप्रतिष्ठा वाढविण्याचा असल्यामुळें त्याची सांगता उत्तरेंतच विशेष होणारी होती.

उत्तरेंत बाजीरावाची सत्ता वाढत चालली तेव्हां त्याजबद्दल थोडेसें वैषम्य फत्तेसिंग भोसल्याचे मनांत उत्पन्न झालें. लोक त्याला राजपुत्र समजत. तो म्हणतो, "प्रधानपंत आपल्या फौजांचे मनमबे करितात, त्यामुळें त्यांचें नांवलौकिक आहे, फौज पदरीं आहे. तुम्ही आम्ही उगेच घरीं बसलों यामुळें फौज पदरची तुटली, सर्वांविशीं पदरीं पंगूपण आलें. याउपर दुसरा विचार न करितां खामखा बाहेर निघणें."

फत्तेसिंग भोसले शाहूचा मानीव पुत्र होता. विरूबाई त्याला जीव की प्राण करी. त्याची वृत्ति शाहूसारखीच नरम व पापभीरु होती. राज्यकारभारास

कठोरपणा लागतो तो अंगीं नसल्यामुळें तो मागें पडला. रघूजी भोसल्याबरोबर तो कर्नाटकचे स्वारींत असतां मागें साताऱ्यास विरूबाई २४ डिसेंबर, १७४० रोजीं मरण पावली, त्यासंबंधानें रघूजी शाहूस लिहितो, 'फतेसिंगबावांनीं अतिशय खेद करून परम शोक केला. समाधान करतां चित्ताचा खेद न टाकीत, तेव्हां स्वामींचें हस्ताक्षर दाखविलें. स्वामींनी आपले पायांची शपथ घालून लिहिलें, तरी मनःपूर्वक शोक सोडतील असें नाहीं. स्वामींचे चरणारविंदाचा निजध्यास बहुतच करितात. स्वामींवांचून आणिकाच्यानें शोक दूर होणें नाहीं." § फतेसिंगाचा सर्व सांभाळ विरूबाईनें केला, म्हणून असा शोक त्याला होणें साहजिक आहे. यांत त्याचे मनाचा हळवेपणाही व्यक्त होतो.

प्रतिनिधि सुमंत वगैरे कित्येक मंडळी वेळीं अवेळीं पेशव्यांस विरोध करीत, पण फत्तेसिग भोसले त्यांत कधी मिसळला नाही. पेशवे पराक्रमी आहेत ते धडाडीनें मोठीं अवघड कामें उरकतात, हें जाणून जसा शाहू त्यांस पाठिंबा देई, तोच शाहूचा कित्ता फत्तेसिंगानें चालविला. पुरंदरे पेशव्यास लिहितो, 'उत्तर प्रांतींचा मनसबा स्वामींचे पदरीं पडला हे गोष्टीचें वरकडांस तों असह्य आहे, परंतु फत्तेसिंगबावांस समाधान आहे. कां कीं, तिकडील विचारास त्यांहीं व स्वामींनीं मातबर फौजांनशीं जाऊन कुलपातशाहीचा बंदोबस्त करावा असे कितेक संकेत जातेसमयीं स्वामींशीं फत्तेसिंगबावा बोलले आहेत. व आतांही स्वदस्तुरची पत्रें लिहिलीं आहेत, तरी पूर्वील बोलीप्रमाणें त्यांस उत्तर पाठविलें पाहिजे. † पेशव्यांशीं सदैव आपली गोडी राखण्याविषयीं फत्तेसिंगाचा नेहमींचा रिवाज होता, तो दर्शविणारे कागद बहुत आहेत. दुसऱ्या एका पत्रांत फत्तेसिंग लिहितो, "उत्तरेकडील मनसबा करणें तो पंतप्रधान यांनीं व आम्ही एक विचारें करावा, त्यांच्या सांगितल्यावरून आम्ही फौज जमा करून बाहेर निघतों. तुम्हांखेरीज आमचा दुसरा विचार नाहीं. आपल्यास विस्तार लिहावा तरी आमचें अगत्य आपणास मनापासून आहे. ज्या प्रकारें आमची बाजू शेर होय तो अर्थ आपण पहिलेपासून करीतच आहेत. पत्रीं परिहार लिहावा तरी मनोमय साक्ष असे."

§ पे. द. ८. ४८.

† पहा पे. द. १७.१६७, २५.१६२, १४०, ९५; १४.३२; ३०.९२, ११२.

या व अशा प्रकारच्या इतर लेखांत उत्तरचा मनसबा व दक्षिणचा मनसबा असे विचार वारंवार येतात, पण त्यांपैकीं अमका चांगला की अमका वाईट, कोणता आधीं व कोणता मागाहून हातीं घ्यावा असा तौलनिक अंदाज जो, बुंध्यास घाव घालावा म्हणजे फांद्या आपोआप मरतील, या वाक्य-योजनेंत व्यक्त होतो, तसा एवढ्या तीनचार हजार कागदांच्या लेख-समुच्चयांत एकदांही आलेला दिसत नाहीं. उलट मुख्य भावना दिसते तीही अहमहमिकेची होय. बाजीराव-चिमाजीचा उद्योग अल्पावकाशांत यशस्वी होऊन फैलावत चाललेला पाहून इतर सरदारांस त्यांजबद्दल हेवा वाटूं लागला. पेशवे पुढें गेले, आपण मागें पडलों अशी उद्वेगकारी हाकाटी सुरू झाली. आपली बाजू शेर व्हावी असें प्रत्येकास वाटे. सावकारांकडून पैसा आणावा, फौज ठेवावी, मुलूखगिरी करावी म्हणजे झाली बाजू शेर, असें ज्याला त्याला वाटे. पण यांतला मुख्य भाग म्हणजे व्यक्तिगत पराक्रम ही चीज बाजारांत पैसा टाकून मिळत नसते, हें लोक विसरत. परमुलखात संचार करणें, वकिलाच्या व हेरांच्या मार्फत बातम्या आणणें, कारस्थानानें तिकडे आपला शह बसविणें, आलीच वेळ तर उघड संग्राम करून शत्रूंस जिंकणें, ही कामें शौर्य, साहस, बुद्धि, अक्कल इत्यादि गुणाशिवाय सहजासहजीं जर एकासारखी दुसऱ्यास करतां आलीं, तर प्रत्येक इसम शिवाजी किंवा बाजीराव होऊं शकला असता. वरील विशिष्ट गुण ज्यांच्या अंगीं होते तीं माणसें भराभर पुढें आलीं, ज्यांच्या अंगीं ते गुण नव्हते तीं तितक्याच वेगानें मागें पडलीं. म्हणून गुणवंतांच्या संगतींत राहून त्यांचें शहाणपण शक्य तितकें आपल्या ठिकाणीं उत्पन्न करणें एवढा एकच उन्नतीचा मार्ग या जगांत मनुष्यमात्रास शक्य आहे. पराक्रमी माणसाचा द्वेष किंवा हेवा करून कोणासही फायदा होणार नाहीं. बाजीरावाची मुलूखगिरी ही एक मोठी राष्ट्रीय शाळा होती, त्या शाळेंत मज्जाव असा कोणासच नव्हता. कृष्णराव चासकर असत्प्रवृत्तीचा म्हणून कैदेंत पडला, पण फत्तेसिंग भोसले सत्प्रवृत्तीचा गृहस्थ होता, म्हणून त्यानें पेशव्यांच्या कच्छपीं राहून शक्य तितकें यश संपादिलें. ' आत्मोत्कर्ष न मार्गेत परेषां परनिन्दया ' हें सुभाषित वचन सदैव सत्य ठरतें.

बाजीरावाच्या विरुद्ध कशा खटपटी चालत तें माहुली किल्ल्याच्या प्रकरणावरून चांगलें निदर्शनास येतें. ता. १६ ऑक्टोबर, स. १७३५ रोजीं पुरंदरे पेशव्यास लिहितो, " माहुली किल्ला पंतप्रधानांनी ( ता. ६. ९. १७३५

रोर्जा ) मोगलांपासून घेतला ही गोष्ट त्यांस जिरों न द्यावी असा मनसबा प्रतिनिधि करितात, निजामास पेडगांवपर्यंत आणावें, दबाब द्यावा, महाराजांस भय दर्शवून किल्ला खामखा परत देवावा, एविशीं सुमंतांशीं आपल्या कुटांत मेळवितात. कुचितास कोणी चुकत नाहीं. सुमंताचा विश्वास नाहीं. " कल्याण-जवळचा माहुली किल्ला म्हणजे कोंकणचें अधिष्ठान, तो पेशव्यानें घेण्यास प्रतिनिधीनें साह्य करायचें की विरोध करायचा ! शिवनेरी, त्रिंबक, त्रिगल-वाडी वगैरे नजिकचे किल्ले जर मोगलांचे ताब्यांत राहिले तर मग स्वराज्य तें काय मिळालें ! बादशहानें शाहूस स्वराज्य कागदावर लिहून दिलें, पण तें प्रत्यक्ष पदरात पडण्यास आपल्याच लोकांकडून व्यत्यय येत गेला. अशा कृत्यांमुळें बाजीरावानेंही प्रतिनिधीस सारखें अडविण्याचें धोरण ठेविलें. सुमंतास त्यानें कसें नरम आणिलें तें मांगितलेंच आहे. बाजीरावाचें तेज पाहून प्रत्यक्ष छत्रपति जर वचकून वागूं लागला, तर इतरांची कथा काय ? कोठल्याही राष्ट्रांत कर्तबगार पुरुषाची छाप सर्वांवर बसते तसाच प्रकार बाजीरावाचा झाला. कान्होजी आंगरे व खंडेराव दाभाडे यांची मात्रा बाजीरावापुढें चालली नाहीं, पण त्यांनी प्रसंग ओळखून आपला बोज राखिला. कान्होजी भोंसले तर कैदेंतच पडला. रघूजी भोंसले बाजीरावास बिचकून वागे, पण त्यानेंही पेशव्यांचें कर्तृत्व ओळखून स्वतंत्र पंथ पाहिला. फत्तेसिंग भोसले गोड स्वभावाचा पेशव्यांचे वाटेस गेला नाहीं. चंद्रसेन व उदाजी चव्हाण बाजीरावाचीं आर्जवें करूं लागले.

या दृष्टीनें पेशवाईवर दाखल झाल्यापासून बाजीरावानें नुसत्या मराठी दरबारांतच नव्हे तर समग्र हिंदुस्थानच्या राजकारणांत अग्रपद कसें मिळविलें हें लक्षांत येते. निजामाला कैक वेळां दाबलें; बादशहा, जयसिंग, खानडौरान याना आपल्या तंत्रानें वागण्यास लाविलें, सादतखानास तर बाजीरावापुढें तोंड दाखविण्याची सोय राहिली नाहीं. नादिरशहानें बाजीरावाचें तेज ओळखून सलगीच्या किंवा पोकळ धमकीच्या पत्राने आपला बोज राखिला. मिळून दीपसिंगानें जो अभिप्राय बाजीरावासंबंधानें प्रगट केला, तो सर्वथैव योग्य होता. पाटणा, बनारस, मथुरा, दिल्ली, अजमीर, अहंमदाबाद, सुरत, वसई, कल्याण, गोवा, कारवार, बंगलोर, तंजावर, हैद्राबाद, चांदा, बऱ्हाणपूर, नागपूर अशी हिंदुस्थानच्या सर्व प्रमुख वर्तुळांत बाजीरावाची दृष्टि सारखी टेहेळणी करीत होती. त्यानें जिवास जीव देणारे आपल्यासारखे पराक्रमी

सहायक निर्माण केले, सर्व प्रमुख सत्ताधीशांजवळ आपले वकील चतुरस्रपणें वागणारे ठेवून त्यांजकडून आपल्या राष्ट्रहिताचा पुरस्कार केला. प्रेम व धाक असे दोनही भाव त्यानें आपल्याबद्दल हिंदी जनतेंत उत्पन्न केले. शेंकडो ब्राह्मण व मराठे घराणीं त्यानें आपल्या हाताखालीं उदयास आणिली, असे किती तरी प्रकार बाजीरावाच्या कर्तृत्वाचे या ऐतिहासिक कागदांत व्यक्त होतात.

रणभूमीवर जशी बाजीरावाची कठोर शिपाईवृत्ति प्रकट होई तशीच ती प्रसंगानुसार त्याच्या वाणींत व लेखांतही व्यक्त होत असे. तिखट व झणझणित वाणीमुळें त्याजपुढें जाण्यास किंवा बोलण्यास लोकांस छाती होत नसे. बाजीराव लिहितो, "गुजरातेंत उदाजी पवार कंटाजी कदमाशीं कटकट करतात म्हणून कळलें तर या सरदाऱ्या मातबर आहेत, असले क्षुल्लक दावे यांनी करावे हें पाजीपणाचें कर्म आहे. शेवटीं पुरतें कार्य साधेल तेव्हां जें करणें तें करावें. परिच्छिन्न ताकीद करावी. हाच कागद त्यांस दाखवावा."† अशा प्रकारचा बाजीरावाचा दरारा घरांत व राज्यांत चहूंकडे भारी बसलेला होता. खुद्द चिमाजी आपा बाजीरावाच्या मर्जीचा शोध अगोदर घेऊन मग त्यास भेटत असे. मातुश्री व घरचीं माणसें त्याजपुढें जाण्यास व बोलण्यास वचकत असत. शाहूला देखील बाजीरावाच्या कलानें व्यवहार उलगडावे लागत. ज्यास शत्रू चळचळां कांपत अशी ही महाराष्ट्रांत एक असामान्य व्यक्ति होती. पुढें माधवराव पेशवा अशाच वळणावर गेला.

**८ अवज्ञा-प्रवाद.**—बाजीरावानें पुष्कळदां शाहूचा आज्ञाभंग केल्याचा प्रवाद सामान्यतः मशहूर आहे. राज्याच्या घडामोडींत असले प्रसंग पुष्कळदां उत्पन्न होतात. प्रत्यक्ष इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत निर्माण झालें तें देखील वरीष्ठांचे आज्ञेविरुद्ध झालें असें मोठे लेखक सांगतात. बाजीराव व शाहू यांच्या संबंधांत इचलकरंजीकर घोरपड्यांचें प्रकरण बरेंच वर्दळीस आलें. व्यंकटराव घोरपडे बाजीरावाचा मेहुणा, याचा बाप नारो महादेव संताजी घोरपड्याचा आत्मिक व साह्यकर्ता असल्यामुळें त्यास संताजीनें पुत्राप्रमाणें वागवून पदरीं ठेविलें. पुढें बाजीरावाची बहीण अनूबाई इचें लग्न व्यंकटरावाशीं होऊन तो पेशव्यांच्या नोकरींत सरदारी करूं लागला. शेजारधर्मामुळें व्यंकटराव व कोल्हापुरकर संभाजी यांचा कलह जुंपला, त्यांत पेशव्यांच्या पाठिंब्यामुळें व्यंकटरावाचा जोर वाढला. संभाजीचें बस्तान कधींच

† पे. द. ३०.५०.

चांगलें बसलें नाहीं. स. १७३५ च्या कार्तिकांत बाजीरावाबरोबर व्यंकटराव घोरपडे उत्तरेच्या स्वारीस गेला ही संधि साधून संभाजीनें व्यंकटरावाचें मुख्य स्थल इचलकरंजी काबीज केलें. तें परत घेण्यासाठीं चिमाजीनें शाहूची आज्ञा घेऊन रामचंद्र हरि पटवर्धन याची रवानगी केली. त्यानें संभाजीचा सडकून उच्छेद चालविला. संभाजीनें त्याबद्दल शाहूकडे तक्रारी केल्या. शाहूची त्या बाबतींत मोठी नाजूक स्थिति झाली. त्यानें पिलाजी जाधवास भेटीस बोलावून त्याचे मार्फत चिमाजीस खर्मरित हुकूम पाठविला तो असा. पिलाजी ता. ७ मार्च, स. १७३६ रोजीं चिमाजीस लिहितो,—

'काल रात्रौ राजश्री स्वामी दरबारांत बसले असतां संभाजी राजांचें पत्र आलें त्यांत मजकूर कीं पंत प्रधानांची फौज येऊन बहुत उपद्रव केला. पत्र वाचून महाराज बोलले, "पंत प्रधानांच्या आगळिकी किती सांगाव्या! एक आज्ञेखेरीज उत्तरेस गेले, सार्वभौमाचें दर्शन घेऊन मनसबे करणार म्हणून वर्तमान ऐकतों. पूर्वी जंजिऱ्याचे स्वारीत हबशाचें संरक्षण केलें. आंगऱ्याचे घरांत गृहभेद केला. सांप्रत फौज पाठवून आमचे बंधूशीं युद्ध करितात. तर मग हे प्रत्यक्ष आमच्याशीं युद्ध करण्यास अंतर करतील कीं काय?" असें भाषण दरबारांत, शिकारीत वारंवार करितात, जवळचे लोक त्यास अनुमोदन देतात.

'ऐशास आम्हींच पूर्वी आपणास लिहून रामचंद्र हरीस तिकडे पाठविलें, परंतु आतां येथें महाराजांची मर्जी अशी दिसते, तर फौज परत आणावी म्हणून लिहिलें, त्यावरून आपणही तिकडे परत येण्याविषयीं कळविलें. परंतु सांप्रत येथें हा प्रकार ऐकतों. तरी महाराजांचे मर्जीकरितां रामचंद्रपंतास अविलंबें परत आणविलें पाहिजे. तिकडे व्यंकटराव घोरपड्याचें जें होणार तें सुखरूप हो. या विशी अनमान करूं नये. महाराजांची मर्जी सांभाळावी.'‡

रामचंद्र हरीस मुद्दाम संभाजीचा उच्छेद करण्यासाठीं पाठविलेलें नव्हतें. उदाजी चव्हाणासारख्या बंडखोरांचा बंदोबस्त करण्यासाठी पिलाजी जाधवाच्या आग्रहावरून रामचंद्र हरीस पाठविण्यांत आलें. संभाजीचा तरी निश्चित कार्यक्रम कांहींच ठरलेला नव्हता. घटकेंत हें तर घटकेंत तें अशी त्याची वृत्ति जवळची

‡ पे. द. ११.२०, २३; १७.२८, ६१, ६७.

मंडळी बोलतील तशी क्षणोक्षणीं बदलत असे. शाहूचें व पेशव्यांचें नुकसान व्हावें अशी बुद्धि अंतःकरणांत बाळगून तो उदाजी चव्हाणास आश्रय देई. शाहूनें जाब विचारला कीं सांगे उदाजी मोठा बंडखोर, त्याचें पारिपत्य तुम्ही पाहिजे तसें करा. ती गोष्ट पेशवे करूं लागले म्हणजे संभाजीस धास्ती पडे कीं आपलें कसें होईल ! अशा या भानगडी या नाहीं त्या रूपांत कैक वर्षे सारख्या चालू राहिल्या. मुख्य राज्याचा उद्योग, जाग्यावर बसून कारभार हांकण्याची शाहूसंभाजीची वृत्ति, जवळच्या माणसांचे मतलब, अशी ही चक्रव्यूहाची अंतस्थ गुंतागुंत पेशव्यांना पदोपदी नडे व सारखी सहन करावी लागे. याच कारणास्तव त्यांनीं आपला स्वतंत्र पंथ उत्तरेकडे पाहिला. रामचंद्र हरीस चिमाजीनें लगेच परत आणून कोंकणच्या कारभारांत घेतलें. मेहुण्याची कड घेऊन संभाजीचा उच्छेद केला हा प्रकार बिलकुल खरा नाही.

वास्तविक वरील पत्रांतील शाहूचे दोषारोप हे खुद्द त्याचे नसून ते त्या व्यवहारांतील अव्यवस्थेचे दरबारांत चर्चिलेले लोकांचे ग्रह होत. शाहूनें निजामाकडून एक कोट लांच घेऊन बाजीरावास नाहींसा करण्याच्या हेतूनें निजामाचे भेटीस पाठविलें, हा जसा अवास्तव समज लोकचर्चेत दाट होता, त्याच तोडीचे वरचे प्रचलित समज होत. बाजीरावास अपयश असें बहुधा कोठें आलें नाही, तेव्हां जंजिरा स्वारी अपेक्षेप्रमाणें सिद्धीस गेली नाही याचें कारण काय, तर सीदीकडून लाच घेऊन बाजीरावानें त्याचें संरक्षण केलें, हा कोटिक्रम शाहूकडे पुष्कळांनी लढविला. दोन आंगरे बंधू एकमेकांचे वैरी बनले, त्यांचें सख्य बाजीरावानें घडविलें नाही, याचा अर्थ मुद्दाम त्यानें तसा दोघां बंधूंचा बेबनाव घडवून आणिला असा प्रवाद थोरा मोठ्यांचे चित्तात दृढ झाला. बाजीरावानें उत्तरेंत जाऊन बादशहास भेटून त्याची समजूत काढावी, उगाच त्यास उपद्रव देऊं नये ही शाहूचीच शिकवण बाजीरावास होती. बाजीराव शाहूच्या परवानगीनें जयसिंगाचे भेटीस गेला, पुढें बादशहाचे भेटीचा योग जुळला नाहीं, हा प्रकार वेगळा, परंतु हे सर्व प्रकार शाहूच्या आज्ञेनें होत होते, त्याला ते माहीत होते, त्यानें त्याबद्दल पेशव्यांचें वारंवार अभिनंदन केलें आहे, पेशव्यांबद्दल त्याला अत्यंत अभिमान वाटे, हे पराक्रमी आहेत, राज्य चालवितील तर हेच चालवितील, अशी शाहूची बालंबाल खात्री होती.

तथापि संभाजीच्या तक्रारी मिटेनात व दोघां छत्रपतीच्या भानगडींत पेशव्यांना पडतां येईना, म्हणूनच शाहूनें मिरजेची स्वारी स्वतः अंगावर घेऊन कित्येक गोष्टी निकालास लावल्या तो प्रकार अन्यत्र वर्णिला आहे. वास्तविक एखाद्या कुटुंबांतील घरगुती किरकोळ चडफडी पलीकडे अशा तक्रारींस किंवा लेखांस कांही एक महत्त्व नाही. कुटुंबांत पांच पंचवीस माणसें एकत्र नांदतात तिथें असले क्षुल्लक रागद्वेषाचे प्रकार हमेश घडतात. शाहूचा दरबार व शाहूचें राज्य हें एक प्रकारचें अवाढव्य विश्वकुटुंब होतें, त्यांत राग, लोभ, तक्रारी, प्रेम, संताप, अशा सर्व मनोविकारांचें प्रदर्शन प्रसंगानुसार भरपूर होई, पण तेवढ्यावरून त्या कुटुंबांत ऐक्य नादत नव्हते, किंवा पेशव्यानें अरेरावी गाजवून राज्यघात केला असें म्हणतां येत नाहीं. हालींच्या पार्लमेंटच्या ब्ल्यू बुक्सची किंवा शुभ्रपत्रकांची पद्धत मराठी राज्यास लावणें अप्रयोजक होईल. छत्रपतीच्या गादीवर शाहूचें अधिष्ठान असल्यामुळें त्याचा प्रत्येक उच्चार व आचार कागदावर नमूद झाला तो आज दोनशें वर्षांनीं आपणास वाचावयास मिळतो. अशा कागदांतला खरा मतलब योग्यायोग्यतेच्या संकलित विचारानें इतिहासाच्या साच्यांत दाखल व्हावयास पाहिजे. त्यांतला एखादाच उल्लेख निवडून त्यावर स्वतंत्र भाष्य रचूं लागल्यास इतिहासाची हानि होऊन सत्यस्वरूप लोपून जाईल. हल्ली पुष्कळाच्या चर्चेत असा अवास्तव प्रकार घडतो सबब ही इशारत द्यावी लागते.

९ **गुणदोषांचा समन्वय.**—शाहूच्या मुखातून आज्ञा, इच्छा किंवा उद्गार जे काही बाहेर पडत, ते जेव्हाच्या तेव्हां जसेच्या तसे लगेच पेशव्यांस पत्रानें कळविण्याची खबरदारी पुरंदरे घेत असत. मिळून साताराची खडान खडा बातमी पेशव्यांस ताबडतोब कळे. त्यामुळे शक्यतोवर महाराजांस खुष ठेवण्यास ते चुकत नसत. महाराजांची मर्जी संभाळण्यांतच आपलें व राज्याचें कल्याण आहे अशी पेशव्यांची भावना निरंतर कायम होती. 'वरचेवर स्वामींनीं महाराजांस पत्रें लिहिली म्हणजे ते संतोष पावतील' असें पुरंदऱ्यांचें पेशव्यांस कळविणें असे. शाहूला जाग्यावर बसून कारभार करायचा, स्वतः मोहिमांवर जायचें नाहीं, म्हणून कागदपत्रांवर भर देऊन त्यास आपलें धनीपण व हुकमत टिकवावी लागे. देशभर पेशवे व सरदार याचे उद्योग सदा चालू असल्यामुळें ठिकठिकाणची बातमी ठेवून प्रत्यक्ष भेटीनें व पत्रानें नानाविध घडामोडीवर नजर ठेवण्याचें काम शाहू छत्रपति

समबुद्धीनें व निष्पक्षपातानें करी. राज्य म्हणजे एक भलें मोठें कुटुंब आहे, त्या कुटुंबाचे मालक आपण आहों, चांगल्याला उत्तेजन देणें, वाइटाचा निषेध करणें हे आपलें कर्तव्य आहे अशी शाहूची भावना होती. अनुभवानें व वयानें वृद्ध असणारा गृहस्थ लौकिकांत मालक असला तरी घरांतला तरुण कर्ता पुरुष जबाबदारी अंगावर घेऊन सर्वांचे व्यवहार विल्हेस लावतो, तसा प्रकार शाहू व पेशवे यांचा बनला होता. अशा कारभारांत रुसवे, फुगवे, धुसपूस, चरफड, भांडाभांडी वेळेनुसार दिसून आली म्हणजे तेवढ्यावरून कुटुंबाचा संसार बिघडला असे होत नाही. वृद्ध माणसे संतापाच्या भरांत अधिक उणं बोलतात तें कायमचें नसतें किंवा तेवढ्यावरून कर्त्या तरुणावरील त्यांचा विश्वास उडाला असें होत नाहीं. शाहू व पेशवे यांच्या दरम्यान चाललेल्या व्यवहारांचा विचार या दृष्टीनेंच केला पाहिजे. एखाद्या क्षणिक उल्लेखावरून कायमस्वरूपाचें अनुमान बांधणें किंवा दुसरे शेकडो भलाईचे उल्लेख दृष्टिआड करून एखाद्या तिरस्कारी उल्लेखाला फाजील महत्त्व देणें युक्त नाही. शाहूनें पेशव्याला दूषण दिलेले उद्गार क्वचित् आहेत, त्याचे उलट शाबासकीचे उद्गार तर पुष्कळच आहेत. दोहोंचा संग्रह या विवेचनात ठिकठिकाणी केलेला आढळेल.

शाहूच्या संबंधानें सामान्य लौकिक समज पुष्कळसा अवास्तव होय. तो चैनी, भोळसट किंवा निर्बुद्ध नव्हता. पण त्या वेळची परिस्थितिच भिन्न होती. दिल्लीवरच्या किंवा भोपाळच्या स्वारीसारखीं प्रचंड प्रकरणें पेशव्यानें अंगावर घेतलीं तेव्हा हजारों मैलांच्या अंतरावर प्रत्येक व्यवहार उलगडतांना अगोदर त्याजबद्दल शाहूची आज्ञा घेणें त्यास शक्य नव्हतें. असले व्यवहार बनाव बनेल तशा धोरणानें आयत्या वेळीं स्वतःच्या जबाबदारीवर उरकावे लागतात. सादतखानानें मराठ्यांचा संहार केला अशी खोटी बातमी सर्वत्र उठली, शाहू व सगळें मराठमंडळ घाबरून गेलें, हे नसते उपद्व्याप बाजीरावानें अंगावर घेतले कशाला, अशी टीका लोक करूं लागले, ते प्रकारही पुढें कसे लटके पडले हें लोकांच्या निदर्शनास आलें. धनी म्हणून शाहूला पेशवे भरपूर मान देत, पण पावलागणिक तो जर त्यांस अडवूं लागला, तर पुष्कळदां ते शाहूच्या आज्ञेकडे जाणून बुजून कानाडोळा करीत. वृद्ध आजोबा जाग्यावर बसून पोरांस सारखा सांगत असतो, 'अरे दंगा करूं नका. पाय मोडून घ्याल.' तशाच मासल्याचा वरील प्रकार होय. जरा कांहीं अडचण आली कीं बोलवा

बाजीराव चिमाजीला, अशीं उठल्या सुटल्या वाटेल तशीं पत्रें पुरंदऱ्यांनीं व इतरांनीं शाहूच्या आज्ञेनें पेशव्यास लिहिलेलीं आढळतात. त्यांतल्या आज्ञा ते शक्य तितक्या पाळीत, पत्रोत्तरानें समजूत घालीत, तसाच प्रसंग आला तर स्वतः भेटून आक्षेपांचे निराकरण करीत, पण दुसऱ्या एखाद्या महत्त्वाच्या कामांत गुंतल्यामुळें नाइलाजानें किंवा एखाद्या वेळीं मुद्दामच शाहूच्या आज्ञा त्यांस लगोलग पाळतां येत नसत. असे हे प्रकार तत्कालीन कागदांत भरपूर दिसतात, म्हणूनच शाहूचा कारभार म्हणजे भलें मोठें कुटुंब-यंत्र बनलें होतें असे म्हणावें लागतें.

बाजीरावाचें अकालीं मरण व चिमाजी आपाची हैराण प्रकृति यांनीं मराठी राज्याचें अपरंपार नुकसान झालें. चिमाजीच्या प्रकृतीचीं पत्रें वाचून मन विव्हळ झाल्यावांचून राहत नाहीं. वसईची साद्यंत हकीकत चिमाजीच्या तोंडून ऐकावी म्हणून महाराजांनीं वारंवार साताऱ्यास बोलावलें, त्यावर ता. १७ जून रोजी तो पुण्याहून लिहितो, " महाराजांचें आज्ञापत्र आलें तें मस्तकीं वंदून सनाथ झालों. पत्रदर्शनीं स्वार होऊन येणें म्हणून आज्ञा, त्यास महाराजांचे आज्ञेविरहित सेवकास अधिकोत्तर काय आहे! स्वारींतून आल्यावर महाराजांचे पाय पहावे हाच निजध्यास आहे. तेथें महाराजांच्या आज्ञेची अथवा पत्राची वाट पहावी ऐसा अर्थ नाहीं. तथापि महाराजांचें पत्र शपथ घालून आलें असतां सेवकांनी उजूर करावा ऐसें काय होतें. परंतु काय करावें, व्यथेनें बहुत श्रमी केलें. घराबाहेर जाऊं द्यावयाची ताकद शरिरांत राहूं दिली नाहीं. महाराजांचे पत्र म्हणजे कोटिहुकूम सेवकास आहेत. तूर्त न यावयास कांहीं आड अथवा बहाणा नाहीं. केवळ शरीर अशक्त पडलें आहे. घराबाहेर निघून पालखींत बसायची देखील ताकद नाहीं. वैद्य आणून उपाय चालता केला आहे. शरीर सावकाश वाटतांच सेवेसी येतों. साताऱ्यास वैद्य प्रामाणिक कर्नाटकी आहेत, येथेंही व्यथेस उपाय होईल म्हणून आज्ञा, त्यास हें शरीर महाराजांच्या अन्नाचें वाढलें. महाराज मायबाप आहेत. सेवकाची चिंता महाराजांखेरीज दुसरा कोण करणार. प्रस्तुत येथें उपाय चालता केला आहे. महाराजांचे कृपेकरूनच आरोग्य होईल."¶ असा सेव्यसेवक भाव ज्या राष्ट्रांत असेल त्याचा भाग्योदय झालाच पाहिजे. न होईल तर आश्चर्य. म्हणूनच रागद्वेष, प्रेम, आवेश, कळकळ इत्यादि मनोविकार प्रसिद्ध कागदांत भरपूर

¶ पे. द. १७. ९८

उतरलेले दिसतात. रावापासून रंकापर्यंत सर्व नोकरांची व प्रजेची काळजी शाहूच्या मनांत सदैव समभावानें वागत असे.

स्वभावभेदांमुळेंही तत्कालीन राजकारणास कौटुंबिक स्वरूप आलें होतें. उदाहरणार्थ, परसोजी व कान्होजी भोसले, कान्होजी आंगरे, पिलाजी जाधव, खंडेराव दाभाडे हे लष्करी पेशाचें मुख्य सरदार शाहूचा पहिला जम बसविण्यांत सहायक झाल्यामुळें त्यांचें वजन बाजीरावाचे सुरवातीस राज्यांत विशेष होतें. पैकीं परसोजी तर आरंभींच मृत्यु पावला. बाकीचे दहा पांच वर्षांच्या कुचंबणेनें निःसत्त्व बनले. बाजीरावाच्या अंगची धडाडी त्यांच्यांत नव्हती, आणि बाजीरावाच्या आज्ञेंत वागणेंही त्यांना मानवलें नाहीं. शिवाय या सर्वांची भावना थोडी बहुत चंद्रसेन जाधवाच्या मासल्याची धरसोडीची होती. निजाम व कोल्हापुरकर संभाजी हे शाहूचे जबरदस्त प्रतिस्पर्धी सर्व सरदारांचा बुद्धिभेद करीत त्यामुळें, न जाणों, उद्यां शाहूचा पक्ष कमकुवत बनला तर आपली गत काय, हा विचार पदोपदीं त्यांस नडत असल्यामुळें त्यांच्या वर्तनांत नेट म्हणून कधीं उत्पन्न झाला नाहीं. याच्या उलट बाजीरावाचा वर्तनक्रम शाहूलाच चिकटवून राहवयाचे मग त्यांत आपलें सर्वस्व गमावलें तरी हरकत नाहीं, अशा निश्चयाचा होता. राजकारणांत धरसोड बिलकूल चालत नाहीं. स्वतःच्या हिंमतीवर कामें रेटून न्यावीं लागतात. अर्थात् या मंडळींना बाजीरावानें मुद्दाम निःसत्त्व बनविलें हा प्रकार खरा नसून ते आपल्या स्वतःच्या द्विधा वृत्तीनें निकामे झाले. त्यांतून खंडेराव दाभाडे दुखण्यानें कमकुवत होऊन आपलेंच घर आवरण्यास असमर्थ बनला. त्याचा पुत्र त्रिंबकराव कर्ता व पराक्रमी परंतु शाहूच्या विरुद्ध वागल्याचीं फळें पावला. तो चंद्रसेना इतका नेभळट मात्र नव्हता. कान्होजी भोसले युद्धकर्मांत निपुण पण धोरणी नव्हता. थोडासा लहरी व हट्टी स्वभावाचा दिसतो. राजकारणांत तडजोडीनें व दूरदृष्टीनें वागून आपलें हित साधावें लागतें तें धोरण त्यास साधलें नाहीं. त्यास संभाळून घेण्याचें सौजन्य शाहूनें दहपांच वर्षें विपुल दाखविलें, पण शेवटीं शाहूनेंच त्याजपुढें हात टेकले आणि नाइलाजानें कैद करून आपल्या जवळ मरेपर्यंत बंदींत ठेविलें. कर्तबगार मनुष्य पण आपल्या कृतीनें फुकट गेला. कान्होजी आंगरे महाधूर्त, अंतःकरणाचा थांग लागूं न देतां त्यानें आपला कार्यभाग अखेर पर्यंत यथायोग्य सांभाळिला. शिवाय घाटावरील खुष्कीच्या मोहिमांत त्याचा संबंध आला नाहीं. आणि दर्यावर्दी काम चोख

ठेविल्यामुळें त्याचा शेवट गोड झाला. पुढें मुलांच्या नालायकीमुळें आंगऱ्यांचें व पेशव्यांचें बिनसलें तो भाग आलाहिदा आहे. वरील सर्व सरदारांत पिलाजी जाधवच विशेष धूर्त समजला पाहिजे. सिंदे होळकरांप्रमाणें तो पेशव्याचे भजनीं राहिला नाहीं म्हणून इतरांच्या मानानें तो मागें पडला. शिवाय रणशौर्यापेक्षा चौकस धूर्ततेनें आपला बचाव करून मतलब साधण्याचा मार्ग तो स्वीकारी, म्हणून पेशव्यांचा इतबार त्याजवर पूर्ण असा कधीं बसला नाहीं. एकदां राज्याचें अवघड काम हातीं घेतलें म्हणजे त्यांत पूर्वींचीं माणसें मागें पडतात व नवीन पुढें येतात, तसाच प्रकार बाजीरावाचे वेळेस झाला. प्रतिनिधि, सुमंत व नारबा मंत्री हे आरंभीं बाजीरावाला मोजीत नसत, पण त्यांच्या अंगी लष्करी कसब नसल्यामुळें ते आपोआप मागें पडले, आणि शेवटीं नाइलाजानें बाजीरावापुढें मान वाकवूं लागले. ऐतिहासिक व्यक्तींचे हे स्वभावभेद व वर्तनभेद कसे परिणत होत जातात हें समजून घेणें अगत्याचें आहे. निदान त्या त्या व्यक्तींचे उपलब्ध कागद वाचून वरील निष्कर्ष मनात उतरतो.

१० **बाजीरावाचा दरारा व हुकमत.**—पेशवाईवर दाखल होतांना बाजीरावाला महाराजांची कृपा ऐवढा एक आधार. सभोवार वयस्क व अनुभवी अंमलदाराचा घेरा. अशा स्थितीत दोघा बंधूंनी व मुख्यः बाजीरावानें स्वकीय व परकीय मंडळीवर अल्पावधींत केवढी छाप बसविली तें त्यांच्या पत्रसंभारांत उत्कृष्ट व्यक्त होतें. त्या पत्रांतले औपचारिक व अलंकारिक भाग वर्ज्य केले तरी कित्येक वाक्प्रयोग सहज वाचताना बाजीरावाची ही छाप ठळक रीतीनें मनांत उतरते. ज्यांना ती पत्रें पाचण्याची सवड नाहीं, त्यांनीं त्यांतले खालीं दर्शविलेले भाग लक्षांत आणावे. युवर मोस्ट ओबीडिअंट सर्व्हंट, म्हणजे 'आपले अत्यंत आज्ञाधारक सेवक' हा इंग्रजींतला पत्राच्या शेवटचा भाग हल्लीं आपल्या परिचयाचा आहे. पण तद्व्यतिरिक्त अंतःकरणाची भावना व्यक्त करणारे असंख्य भिन्न भिन्न शब्दप्रयोग या मराठी कागदांतले वाङ्मय दृष्टीनेंही ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. त्यांची कांहीं उदाहरणें पुढें देतों.

१. सेवकाचें साह्य करावें, सेवकावर सदैव कृपादृष्टि ठेवावी.

२. सदैव आशीर्वादपत्र पाठवावयाविशीं आज्ञापिलें पाहिजे.

३. जालें वर्तमान सेवेसीं निवेदिलें आहे. निवारण करणार स्वामीं धणी समर्थ आहेत.

४. स्वामींच्या पायांखेरीज दुसरा अवलंब सेवक जाणत नाहीं. कूर्मदृष्टि करून सेवकाचा सांभाळ करीत असलें पाहिजे.

५. आतां पदरीं पडलों. धनी स्वामी आहेत. मी सेवक जास्त काय विनवूं ! आमचें सर्व संकट स्वामींसच आहे. जैसी स्वामी आज्ञा करतील तैसी सेवक वर्तणूक करील. येविशीं विस्तारें काय लिहिणें.

६. कृपा वर्धमान केली पाहिजे. उत्तर पाठवावयाविशी आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत.

७. साहेबांचे अन्नाचा प्रताप आहे तेथें चिंता नलगे.

८. कळेल त्या रीतीनें सांभाळ करून इजतीस चढवणार स्वामी समर्थ आहेत.

९. वडील मायबाप सर्व स्वामी आहेत. आमची शरम, लज्जा साहेबांस आहे. विशेष लिहावें तर सुज्ञ असा.

१०. आपण पदरींचे ठेवणाईत पूर्वीपासून आहों. ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत.

११. आपणांस स्वामींवांचून कोणाचा आसरा नाहीं. एकनिष्ठपणें चाकरी करतों. स्वामी सर्वजाण आहेत.

१२. स्वामी सर्वज्ञ आहेत, आपण सेवक आज्ञाधारक आहों. कृपेस अंतर केलें न पाहिजे.

१३. आपलें समाधानपूर्वक आशीर्वादपत्र आलें म्हणजे चित्तांतील हळहळ दूर होईल.

१४. स्वामींनीं बरा विचार चित्तांत आणून आज्ञा करणें ते करविली पाहिजे.

१५. सदैव पत्रार्थी स्नेहाभिवृद्धि केली पाहिजे.

१६. आमचे लाड आणि लिहिणें चालवितां म्हणोन इतकें लिहिलें. वरकड वर्तमान स्वामींचे कृपेनें यथास्थित आहे.

१७. पायांपाशीं चाकरी करून आल्यावर सेवकास सर्फराज करणार स्वामी समर्थ आहेत.

१८. निरंतर याच अन्वयें वडीलपणें परामर्ष करावा.

१९. आमचें म्हातारपण आहे. जो सांभाळ कराल तो थोडाच.

२०. सदैव पत्रीं साकल्यार्थ लेखन करून परामर्श घ्यावया अंतर न कीजे.

२१. तुम्ही प्रसंगीं असलेस म्हणजे आम्ही आहों. आम्ही आहों तेथे तुम्ही आहां. परस्परें ऐकममेकांचें न्यून न दाखवावें यांतच लौकिक आहे. त्याप्रमाणें आपण केलें ही उत्तम गोष्ट.

२२. आपण आमचा अभिमान धरला म्हणजे सर्व उत्तम होईल.

२३. हरघडीं स्वकीय कुशलार्थ लेखन करून संतोषवीत असावें.

२४. आमची इमारती आपणा उभयतांवरी आहे.

२५. जिवंत आहों तों यत्नास चुकत नाहीं. पोटास देणार स्वामी समर्थ आहेत, यश स्वामींचें आहे.

२६. आपणाखेरीज दुसरें आम्हास कोण आहे! वडीलपणें जें आमचें बरें तें करावें.

२७. सर्वाप्रकारें वडील आहां विशेषात्कारें लिहावे हा अर्थ नाही.

२८. चरणरजाची विनवावया प्रार्थना, कीं आम्ही स्वामींचे पदरचे स्थापित आहों.

२९. सेवक पुरातन पदरीचे आहों. आमचें हातें सेवा घेऊन उर्जित करणार स्वामीवांचून दुसरा कोण आहे? सुटले केश पाठीस शरण.

३०. ईश्वरी कृपा स्वामीवर आहे. आम्ही सर्वस्वे पदरचे आहों. परामर्श करीत गेलें पाहिजे.

३१. आपण भाग्याचे विभागी म्हणवितों. कृपेची वृद्धि करणें. आमचें स्मरण न टाकणें.

३२. स्वामींच्या उत्तराचा मार्ग चातकन्यायें लक्षितों.

३३. जें होणें तें स्वामींचें पुण्यप्रभावेंकरून होईल. विदित झाले पाहिजे.

३४. स्वामी सर्वविवेकी सुज्ञ आहेत. जालें वर्तमान सेवेसी श्रुत व्हावें म्हणून सेवकानें विनंतीपत्र लिहिलें आहे.

३५. एकाच दिक्शीं सर्व पृथ्वी गोळा करावी असें नाहीं. सर्वांशीं द्वेष कार्याचा नाहीं.

३६. स्वामींचे यशःकीर्तीचा ध्वज सामान्य लागला आहे असें नाहीं. स्वामींचा पुण्यप्रताप तसाच आहे.

३७. स्वामींनी मनसबा अविलंबें उरकून सेवकास दर्शनाचा लाभ या प्रांतें दिला पाहिजे.

३८. सेवकाची विनंती उदास न करावी. साहेबांचे आज्ञेपेक्षां येथील कार्य विशेष नाहीं.

३९. चरणारविंदापाशी चाकरीचें सार्थक आहे. आज्ञा होईल तेप्रमाणें वर्तणूक करूं.

४०. रघूजी भोसले लिहितो–राजश्री स्वामींचे पुण्यप्रतापें आणि आपले कृपेंकरून सुजायतखानास हतप्रभाव करून स्थळ हस्तगत केलें. त्याचा आक्रम लयातें पावविला. ऐतद्विषयीं विस्तारें लिहावेंसें नाहीं. सर्व प्रकारें आपले पदरींचे असों. यशाधिकारी आपण आहेती. या मामलियाचा मानाभिमान सर्वोत्कर्षें चित्तीं धरून ऊर्जित केलिया यशकीर्ति आपलीच असे. सुज्ञाप्रति विशेष काय लिहिणे. पिलाजी जाधव लिहितो, "महाराजांचे पुण्यप्रतापें आपण यशस्वी आहेत. चित्तावर धरतील तें सिद्धीस पाववितीलच."

अशा प्रकारचें आर्जवी लेखन प्रतिनिधि, सुमंत, मंत्री, राजपुत्र फत्तेसिंग भोसले, खंडेराव दाभाडे, सेनापति व इतर बुद्रूक मंडळी बाजीरावासंबंधानें करते, यावरून अल्प वयांत त्याची हुकुमत सर्वत्र कशी बसली होती तें व्यक्त होतें. इतर लहानलहान मंडळीचे लेख तर याहीपेक्षां विनम्र आहेत हें सांगणें नकोच.

मोठमोठे अनुभवी सरदार देखील बाजीरावापुढें किती नम्रभाव ठेवीत हें वरील शब्दांत व्यक्त होतें. बापासारखा शोभणारा अंबाजीपंत पुरंदरे बाजीरावाची कानउघाडणी करणें झाल्यास अत्यंत अदबीनें करी. 'सर्वाशीं द्वेष कार्याचा नाहीं,' एवढाच मृदु चिमटा घेऊन तो आपला भाव व्यक्त करितो.

राज्याबाहेरचे सत्ताधीश पेशव्यांशीं कशी नम्रता दाखवूं लागले पहा. नाग सावंत कुडाळकर ता. १६.१०.१७३० रोजी चिमाजीआपास लिहितो. ‡

'आपलें पत्र ममतापुरस्कर आलें, त्यावरून बहुत संतोष वाटला. आम्ही राव व आपण उभयबंधूंची जोड संपादिली आहे, त्यामुळें चित्ताचा दृढ निश्चय असोन समाधानेंच आहों. मुख्य गोष्ट जे उभयतांच्या दर्शनाची उत्कंठा विशेष आहे. दर्शन घडेल तो सुदिन. पंढरीचे यात्रोद्देशें येऊन दर्शन योग घडावा, म्हणून सर्व तयारी केली, तों आपलें आगमन स्वस्थळी न

‡ पे. द. ३०–७६, १११.

जालें याकरितां रहित केलें. आम्ही वंशपरंपरागत कोठें चालून जाऊन कोणाचें दर्शन घेतलें नाहीं, कोणाचे म्हणविलें नाही. श्रीनें उभयतांच्या दर्शनाची उत्कंठा लाविली, दर्शनाविरहित अन्य कांहीं सुचेना. आपण उभयतां स्वाभिमानी दिग्विजयी पुरुष आहां. अशा पुरुषांस पाहवें, त्यांशीं स्नेहभाव असावा हा निश्चय दृढ आहे. बहुत काय लिहिणें.' बाजीरावाला कुटुंबांत वापरण्याचें नांव 'बाबा' असें होतें. बाबा किंवा बाबासाहेब या नांवानें त्यास संबोधिलेलीं कित्येक पत्रें आहेत. ‡

११ **शनिवारवाडा, पुणें.**—सर्व सरदार आपापल्या वास्तव्याकरितां स्वतंत्र जागा व वाडे करूं लागले, त्याप्रमाणें बाजीरावानें पुणें येथें राहण्याचें ठरवून तेथें शके १६५१ माघ शु. ३ शनिवार ता. १० जानेवारी, १७३० रोजीं वाडा बांधण्यास सुरुवात केली. एक वर्षांत काम पुरें होऊन ता. २ फेब्रु० स. १७३१ रोजीं वास्तुशांत करून पेशवे त्यांत राहावयास गेले. § वाड्यास खर्च १६११० रुपये लागला होता. 'शके १६४३ त बापूजी श्रीपत, बाजीरावाचे तर्फेनें पुणें प्रांतास सुभेदार असतां, बाजीराव पुण्यास मोरो विश्वनाथ व गणेश नारायण धडफळे यांचे वाड्यांत येऊन राहिला. दोन तीन वर्षें येत जात होते. नंतर पुण्यांत वाडा बांधावयाची योजना केली. शके १६५० त पुरातन नदीकिनारा, कोटकिल्ले, हिसार मोगलाई ठाणें होतें, तो कोट बाजीरावांनीं पाडून मैदान केलें, आणि मुत्सद्दी वगैरे लोकांस घरें बांधावयास जागा दिली; आणि पूर्वेचे बाजूस दोन गांव होते ते मोडून कसबा केला. हा कसबा शाहूनें पेशव्यांस इनाम दिला. शके १६५१ त मावळवेसीजवळ जागा घेऊन वाडा बांधावयास आरंभ केला. नवबुरजी कुसूं वाड्यास घालून आंत इमारत केली. उत्तरेस थोर करीत होते त्यास छत्रपतींनीं मनाई केली सबब दरवाजाचें खिंडार राहिलें. पुणें आहे तों शहर करावें म्हणोन आज्ञा केली. वाड्यासभोंवार कोट बांधण्याची मनाई केली त्याचा उल्लेख शकावलींत आहे. 'चिरेबंदी कोट बांधावयास प्रारंभ केला. महाराजांनीं पत्रें व हुजरे पाठवून किल्ला गढी बांधण्याची मनाई केली. त्यावरून फिरून परवानगी घेऊन राहिलें काम तें वीटबंदी केलें.' स. १७३६ त नवीन दिवाणखाना बांधून त्यांत मुहूर्तानें राहवयास गेले. या वाड्यांत जयपुराहून कारागीर आणवून भिंतींवर

‡ पे. द. ३०. ४४, ६४; १७. ८०; ३३. १५३; पु. द. १. ७८

§ पे. द. २२.५९; ९.३,४

सुंदर चित्रें बाजीरावानें काढविलीं आणि मागाहून मस्तानीमहाल म्हणून स्वतंत्र जागा बांधिलो. हा पेशव्यांचा पहिला जुना वाडा होय. त्यांत प्रथम दोन मजले व दोन चाक होते. पुढें नानासाहेब पेशव्यानें त्यांत अनेक फेरफार करून तो विस्तीर्ण केला. त्याचे चौक चार व कांहीं भागाचे मजले सहा केले. चौक फरसबंदी असून मध्यें कारंजीं होतीं. शाहूनें कोट बांधण्यास प्रतिबंध केला, तो कोटही नानासाहेबानें स. १७५५ त मजबूद दगडी बांधिला तो अद्यापि आहे. या कोटास तीन दरवाजे व दोन लहान दिंड्या असून, मुख्य दरवाजा उत्तरेकडचा त्यास दिल्ली दरवाजा असें नांव होतें. बहुधा महाराष्ट्रांतील सर्व मोठमोठ्या सरदारांचे वाडे उत्तराभिमुख असून तिकडील मुख्य दरवाजास हें नांव असे. यावरून मराठे सरदारांची दृष्टि दिल्लीकडे असून त्यावरून दिल्ली पादाक्रांत करण्याची त्यांची भावना व्यक्त होते. शनिवारवाडा सागवानी लाकडांचा असून त्यांतील नक्षीचें काम प्रेक्षणीय होतें. सर्व चौकांस व दालनांस निरनिराळीं नांवें असून पेशव्यांच्या कचेरीची जागाही वाड्यांतच होती. इंदुरास होळकरांनीं बांधलेला वाडा शनिवारवाड्याचीच नक्कल होती असें कळतें. पण तो वाडा कांहीं वर्षांपूर्वी जळाला. शनिवारचे वाड्यास ता. २१ फेब्रुवारी, १८२८ रोजीं आग लागून तो पंधरा दिवस जळत होता. इतिहाससंग्रहांत या वाड्याचें निरनिराळ्या इसमांनीं वर्णन दिलें आहे. पेशव्यांचा वाडा शिवछत्रपतीच्या कसब्यांतील वाड्याजवळच बांधला.

‘ येथील शनवारवाडा इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध वाड्याचे बरहुकूम बांधला गेला असें म्हणतां येईल. शनवारवाडा शके १७४९ गुरुवार फाल्गुन शु. ६ ता. २१.२.१८२८ रोजीं अग्निनारायणाचे स्वाधीन झाला. पेशवेसरकारच्या या वाड्याचे सभोंवार उत्तम बागशाही असून, वाड्यांत व वाड्याचे सभोंवार कारंजांतून पाणी खेळविलेलें होतें, हें आतां दृष्टोत्पत्तीस येत आहे. या कारंज्यांपैकी कमळाकृतिकारंजें हिंदुस्थानांत सर्वांत मोठें असून या कल्पनेचा उगमहि आपल्याकडेसच झाला असल्याचें नुकतेंच जाहीर झालें आहे. या पुढें शनवारवाड्यांतील ही बाग पेशवा बाग या नावानें संबोधली जाऊन, दिल्लीदरवाज्यासमोरील चौक पेशवा चौक ( Peshva Square ) या नावानें ओळखला जावा, अशी कोणासही इच्छा होईल, यांत शंका नाहीं. शनवारवाड्याखेरीज पेशव्यांचे तीन वाडे होते, ते म्हणजे शुक्रवारवाडा, बुधवारवाडा, व विश्रामबाग. हे तीनही वाडे दुसरे बाजीराव साहेब यांच्या

अमदानींत बांधले गेले. शुक्रवारवाडा स. १८२० सालीं भस्मसात् झाला. बुधवारवाडा व विश्रामबागवाडा हे दोनही ता. १३ मे, स. १८७९ रोजी बुधवार वाड्यांतील सरकारी बुकडेपोमधील दोघां कारकुनांनी जाळले. याच वेळीं कै. वासुदेव बळवंत फडके याची धामधूम चालू असल्यामुळे हें कृत्यही त्याचेंच असावें असा त्या वेळीं वृथा समज झाला होता. स. १८७९ च्या मे महिन्यामध्यें विश्रामबागवाडा जळाल्यानंतर सरकारनें सार्वजनिक वर्गणीनें येथील म्युनिसिपालिटीच्या मदतीनें वाड्याचा पुढील जळालेला भाग दुरुस्त केला. हल्लीं बाहेर दिसत असलेले सुरूचे खांब, सोनेरी मुलामा दिलेला कळस व बाहेरील दर्शनी भाग ( Frontage ) हा सर्व अलीकडील म्हणजे वाडा दुरुस्त केल्यावेळचा भाग आहे. वाड्याचे आंतील चौकांत तुळशीवृंदावन वगैरे जुने अवशेष परवां परवांपर्यंत कायम होते. ते हायस्कूलचे माजी हेडमास्तर मि. डड्ले यांच्या कारकीर्दींत बुजविले असें म्हणतात. विश्रामबागेच्या इमारतीस स. १८०३ साली सुरुवात होऊन ती स. १८०९ साली पुरी झाली. §

पेशव्यांनीं पुण्यास आपली स्वतंत्र व्यवस्था केली हा प्रकार अप्रत्यक्ष रीतीनें राज्यास अपायकारक झाला. प्रधानांनीं नेहमीं राजाचे संनिध राजधानींत राहवयाचें, तें सोडून इतर सरदारांप्रमाणें त्यांनी स्वतंत्र व्यवस्था केल्याबरोबर मराठमंडळांतील फूट व्यक्त झाली. शाहूला हा प्रकार आवडला नाहीं. याचा परिणाम शाहूमहाराज मरण पावतांच राज्यकारभार हळू हळू पुण्यास चालू झाला, आणि महाराज तेवढे साताऱ्यास नामधारीसे राहिले. प्रतिनिधींनीं कऱ्हाडास, सचिवांनी भोरास, सेनापतींनी तळेगांवास अशा रीतीनें अनेक सरदार आपआपली स्वतंत्र ठिकाणें बांधूं लागले तोच कित्ता पेशव्यांनी उचलिला. पुणें सासवडकडील प्रांतावर बाजीरावाचें अत्यंत प्रेम असून लोकांस अभयपत्रें वगैरे देऊन रयतेची जोपासना करण्याकडे त्याचें लक्ष विशेष होतें.

**१२ बोधभाषा संस्कृत.**—दुसऱ्याला दुखवून आपला स्वार्थ साधण्याचा शाहूचा स्वभाव नव्हता. मुख्यतः औरंगजेबाच्या छावणींत जे अनेक राजपूत सरदार होते त्यांच्याशी त्यानें उत्तम स्नेह जोडला होता.

§ ध. या. ले. ८७; खं. २ पृ. ६६; शा. च. पृ. ४३; वि. ज्ञा. वि. १९२०, ऐ. स्फु. ले. ३ पृ. ५३ ; पे. ब. ; इ. वृ. १८३५ पृ. ४०२ ; केसरी २०-४-१९२० ; खं. ६. ७७. शनिवारवाडा व पुण्याची रचना यावर पुष्कळ साहित्य उपलब्ध आहे, त्याचा समावेश येथे करतां येत नाहीं.

जयपुरच्या राजघराण्याशीं मराठ्यांचें सख्य शिवाजीपासून दृढ होत आलें होतें. शाहूचें बस्तान महाराष्ट्रांत बसून माळवा गुजरात प्रांतांत मराठ्यांची सत्ता बळकट होण्यास जयपुर जोधपुर उदेपुर येथील राजपूत सत्ताधीश कारण झाले. बाजीराव व सवाई जयसिंग याचा तर विशेष घरोबा होता, ही गोष्ट त्याजमधील पत्रव्यवहारावरून स्पष्ट दिसते. हा पत्रव्यवहार कारणपरत्वें राजकारणाच्या व सोयीच्या दृष्टीनें संस्कृत भाषेंत होत असे, मात्र त्या वेळच्या प्रघातानुरूप त्या पत्रांत बाह्यतः कवित्व व पांडित्य भरपूर असून मुख्य मतलब त्यांतून झांकलेला नजरेस येतो. बाजीराव जयसिंग यांच्या पत्रव्यवहाराचे दोन श्लोक धारचे कै. लेले यांनी प्रसिद्ध केलेले अभ्यसनीय असून अद्यापि जयपुर दप्तराचें योग्य संशोधन होईल तर त्यांतून पुष्कळ नवीन माहिती उपलब्ध होईल. खालील श्लोकांत एक प्रकारचा धाकही बाजीरावानें दाखविलेला दिसतो. पीत्वा गर्जन्त्यपस्ते दिशि दिशि जलदास्त्वं शरण्यो गिरीणां। सुत्राम्णत्रासभाजा त्रिदशविटपिनां जन्मभूमिस्त्वमेव ॥ गांभीर्यं तच्च तादृक् त्वयि सलिलनिधे किन्तु विज्ञाप्यमेतत् । सर्वोपायेन मैत्रावरुणिमुनिकृपादृष्टयः काक्षणीयाः ॥ §

मराठ्यांचा संचार उत्तर हिंदुस्थानांत झाला, तेव्हां तिकडील लोकाशीं महाराष्ट्रीयांचे दळणवळण सुरू झालें. या दळवळणाची भाषा हिंदी व क्वचित् संस्कृतही होती. पुढें पुढें मात्र जसजसा मराठ्यांचा अंमल बाहेर भक्कम होत गेला, तसतशी तिकडे त्यांनी आपली मराठी भाषा उपयोगांत आणिली. अलीकडे जयपुरच्या संग्रहांत संभाजी महाराजांची संस्कृत पत्रें उघडकीस आलीं आहेत. गुप्त मजकूर बाहेर कळूं नये म्हणूनही संस्कृत भाषेचा अवलंब केला जाई. राज्यवृद्धीबरोबर मराठ्यांचे व्यवहार उत्तरेंतील सत्ताधीशांशीं व इतराशीं वाढत गेले. उदेपुरचा महाराणा संग्रामसिंह याचीं आलेली संस्कृत पत्रें कौतुकास्पद समजून मासल्यासाठीं खालीं देतों. त्यांवरून बाजीराव प्रतिनिधिसंबंधानें राजपुतांचा आदर केवढा होता तें दिसून येतें.

( १ ) श्रीएकलिंगः (ता. २३.३.१७३० )

स्वस्तिश्री महाराजाधिराज महाराणा श्री संग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकार्यैकनिष्ठान्तःकरणप्रवृत्तिषु मुख्यामात्य राजश्री बाजीरावजीबल्लाळेषु सुप्रसादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयमनिशमविच्छि-

§ त्रै. ११. १ पृ. १७

न्नमविरतसाधारणमेधमानमीहामहे । श्रीमतोऽत्रत्य भाविकेषिणोह्यकृत्रिमतया यादृगन्योन्यं प्रेम वर्तते तदधिकवृद्धिमुपयातु । अपरंच । चतुःशास्त्रिणो राजद्वारीयमुख्यपंडिता वीरेश्वरभट्टा विवाहार्थं दक्षिणप्रान्ते यास्यन्ति । भवन्मीलनानन्तरमेषां पथि निष्प्रत्यूहं गमनागमने भवन्तस्तथा विधास्यन्ति । श्रीमतः किमधिकं सुवित्सु । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मध्वमेचकपूर्णायां चन्द्रे प्रगे रचितोऽयं वर्णचरः ॥

(पत्त्यावर)–मुख्यामात्य राजश्रीबाजीरावबल्लाळेषु योग्यमदः पत्रम् ।

(२) श्रीएकलिंगः (ता. २३.३.१७३०)

स्वस्तिश्रीमन्महाराजाधिराजमहाराणासंग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकार्यैकनिष्ठान्तःकरणप्रवृत्तिषु राजश्री श्रीपतरावप्रनिधिषु सुप्रसादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयं वरीवर्धतां प्रत्यनेहसं । भवन्तोऽस्मदीयहितेच्छवः सन्ति । यादृगन्योन्यं प्रणयोऽस्ति तदधिकतरः समुल्लसतु । अन्यच्च । चतुःशास्त्रिणो राजद्वारीयमुख्यपंडिता वीरेश्वरभट्टाः कार्यार्थमस्माभिः श्रीमत्पार्श्वे प्रेपिताः सन्ति । वचनरचनाभिरस्मद्हृद्गतं सर्वं वृत्तान्तं श्रीमद्भ्यो निवेदयिष्यन्ति । परंतु कर्कस्थे सत्येव गुरावेते दक्षिणप्रान्ते विवाहार्थं यास्यन्ति । तदर्थं यथा तेषां निर्विघ्नं गमनागमने भवतस्तथा यत्ना विधेयाः । विवाहं विधाय पश्चाद् भूयोऽपि श्रीमत्पार्श्वे समागमनमेतेषां निश्चितमेव । तदासमातेरस्मद्युक्तकार्यस्य स्थित्वा श्रीमद्भिरतिप्रसन्नतया दत्तामनुज्ञामाधिगम्यास्मन्निकट आयास्यन्ति । तेऽस्माभिः प्रीत्यास्पदमिति मत्वा नियुक्ताः सन्ति । सगाभिः साभिर्वाङ्माधुर्य धाराभिः श्रीमन्त आनन्दयिष्यन्तीत्यलं सुज्ञेषु । पत्राणि भूयोभूयः प्रेष्याणि । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मध्वमेचकपूर्णायां चन्द्रे प्रगे रचितो वर्णचरः ।

(पत्यावर) राजश्री श्रीपतरावप्रतिनिधिषु योग्यमदः पत्रम् ।

सवाईजयसिंग व बाजीराव यांजमध्यें पुष्कळ पत्रव्यवहार झालेला असून तो जयपुर संग्रहांत अद्यापि सांपडूं शकेल असें कै. का. कृ. लेले धारचे यानीं लिहिलें असून त्या पत्रव्यवहारांतील कांहीं संस्कृत पद्यें त्यांनी नमुन्यादाखल प्रसिद्ध केली ती वर दिली आहेत.

श्री भास्करराय नांवाचा एक विद्वान संस्कृत पंडित बाजीरावाचे वेळेस महाराष्ट्रांत होऊन गेला. चंद्रसेन जाधवानें त्यास आपला गुरु केलें होतें.

देशांतील विद्वान ब्राह्मण पुण्यास आणून त्यांची संभावना करण्याचा बाजीरावाचा प्रघात असून एका प्रसंगीं त्यानें भास्कररायास पुणें येथें मोहरांचा एक हंडा बक्षीस दिला, अशी आख्यायिका आहे.

त्याचा काल स. १७००-१७६५ समजला जातो. यानें संन्यास घेऊन बनारस दिल्लीकडे ग्रंथलेखनांत आयुष्यव्यय केला. न्याय, व्याकरण, मीमांसा अशा अनेक विषयांवर त्याचे ग्रंथ सुमारें ४२ उपलब्ध झाले आहेत. तो शाक्तपंथी असून स. १७२९ त 'ललितासहस्रनाम' या ग्रंथावर त्यानें भाष्य लिहिलें. तंजावरकर राजांचे पदरीं देखील त्यानें कांहीं काल वास्तव्य केलें. यावरून अव्वल पेशवाईंत संस्कृत विद्येचा आदर सर्वत्र कसा होत होता हें लक्षांत येतें. §

**१३ फुटकळ पण उपयुक्त ग्राह्यांश.**—मराठशाहीच्या कारभाराचें सर्वांगीण सत्यस्वरूप केवळ तत्कालीन कागदांत पाहवयास मिळतें. हे कागद वाचून विषयवार पृथक्करणाच्या दृष्टीनें एकंदर मतलबाची गोठवण या ग्रंथांत ठिकठिकाणीं मूळ उतारे देऊन केली आहे. इतकें करूनही शेवटीं पुष्कळसा उपयुक्त ग्राह्यांश शिल्लक राहतो. लग्नकार्यादि मोठ्या प्रसंगासाठीं जमविलेलें साहित्य ज्या त्या वेळीं मुबलक वापरूनही थोडें बहुत फुटकळ स्वरूपांत शिल्लक राहतें, तेंही कोणी निरुपयोगी म्हणून फेकून देत नाहीं. तशा प्रकारचीं कांहीं महत्त्वाची टिपणें व व्यक्तिगत माहिती या स्वतंत्र सदरांत दाखल करण्यांत येत आहे. ती देखील वाचकांस पहिल्याइतकीच आदरणीय वाटेल असा भरंवसा आहे.

**१ मदनसिंग** हा संभाजीचा दासीपुत्र शाहूबरोबर बादशाही कैद भोगून त्याचे उपयोगी पडला. मोठा चतुर व विचारी होता. येसूबाईबरोबर दक्षिणेंत आला. शाहूनें त्याचा प्रतिपाळ अत्यंत आस्थेनें केला. स. १७२९ पावेतों त्याचा उल्लेख आढळतो. यास सभासिंग म्हणून एक पुत्र होता, तो पेशव्यांचे पदरी मुलुखगिरी करी. ‡

**२ कृष्णराव महादेव** चासकर जोशी बाजीरावाच्या बायकोचा भाऊ. याचा बाप महादाजी कृष्ण मोठा सावकार. शाहूच्या विपत्तींत त्यानें परामर्ष घेतला म्हणून शाहूची या घराण्यावर मेहरबानी. कृष्णरावाचीमातुश्री शिऊबाई ही सुद्धां दक्षतेनें सावकारीचा धंदा पाहत असे. इचीं पुष्कळ पत्रें पेशवे दप्तराच्या भागांत छापलेलीं आहेत. सावकारी देण्याघेण्यामुळें व पेशव्यांच्या

§ रा. गोडे, भां ओ. रि. इ० पुणें यांजकडून; पं. सं. वृ. ले. १३.

‡ पे. द. ३०. ५८, ३०८, ३६३ ; १७. १०३.

आप्तसंबंधामुळें या बाईचा संबंध राजकारणाशीं पुष्कळ आला. महादाजी कृष्ण वारल्यावर कृष्णराव मुखत्यार झाला आणि पेशव्यांचे पदरीं त्यास मुलूखगिरी प्राप्त झाली. कल्याण वसई पासून उत्तर कोंकणच्या भागांत त्याची नेमणूक होती. पण तो हेकट, अव्यवस्थित असून कर्तबगारी बेताचीच असल्यामुळें त्याचें कोणाशी पटलें नाहीं; आणि वारंवार तक्रारी येऊन कारभार बिघडल्यामुळें बाजीराव चिमाजीनीं त्यास घरी बसविलें. सावकारी बुडाली, नापत झाली यामुळें शिऊबाईला मोठें दुःख होऊन तिनें पेशव्यांकडे सारख्या तक्रारी चालविल्या, त्यांचे मासले खाली दाखविल्याप्रमाणें व्यक्त होतात. ता. २५.६.१७३९ रोजी बाजीरावानें त्याचा कल्याण भिवंडीचा जिल्हा काढून घेतला. कांही काळ त्यास पेशव्यांनीं अटकेंतही ठेविलें.

शिऊबाई बाजीरावास लिहिते: "कृष्णरावाचे अवगुण लिहिले तर अवघेच अवगुण आहेत असें नाहीं. एकदोन तसे आहेत. एकदोन बरे आहेत. आपण रुपये घ्यावयास आणि गालिप्रदान द्यावयास चुकलेत नाहींत. आम्हाकरितां तुम्ही सासुरवास फार सोसितां, त्यास पोटाचे संकट नाहीं. पोट सर्वांचें भरतें. ईश्वरें कोणास उपेक्षिलें नाहीं. परंतु तुमचे पदरी थोरपण, तुम्ही कृष्णरावाचें सांगोपांग करून वडिलाचें नांव रक्षावें. रुपयांवरच इमारत असली आणि तुमचे पदरींचा आमचा दाणापाणी तुलटा असला तर कोणाचा यत्न नाहीं. ईश्वरी इच्छाप्रमाण."

चिमाजी लिहितो. "स्वामींनीं विचारें करून कृष्णरायास सांगितल्यानें हें कार्य व्हावयाजोगें आहे. त्यांजवर रागें भरावें ऐसें नाहीं. समाधानें मायेनेंच कार्य करावें. मुचला अर्थ लिहिला आहे, यांत स्वामी वडील आहेत."—शिऊबाई लिहिते,—

"रुपयांचे वसुलीकरितां प्रधानपंताचे भेटीस येणें लागतें. तर एक घोडा बसावया योग्य पाठवून देणें. पाठवावयास अनमान कराल तर मी पाईंच येईन."

अशीं पत्रें इतकीं विपुल आहेत की त्यांचा अल्प गोषवारा देणेंही शक्य नाहीं आणि इतिहासांत त्यांचा तादृश उपयोगही नाहीं. भिन्न प्रकृतीचीं माणसें पदरीं बाळगून त्यांजकडून योग्य काम घेणें ही कला कठिण आहे. कृष्णराव चासकर हा भलत्याच उठाठेवी करून स्वतःस व यजमानास गोत्यांत आणणारा, अंगांत कर्तृत्व नाहीं पण घमेंड मोठी, अशा वृत्तीचा

गृहस्थ होता. स. १७४७ त तो बहिणीबरोबर काशीयात्रेस गेला असतां तेथील जमीनदार बळवंतसिंग याच्या प्रकरणांत हस्तक्षेप करून काशीबाईवर कुभांड आणिलें. 'कृष्णरावांनीं कागद गंगाप्रवाह करून मन मानेसीं भाषणें केलीं.' हा स. १७६० चे पुढें वारला. ‡

**३ आवजी कवडे.**—जोरानें मुसुंडी मारून वाटेल तिकडे गहजब उडवीत जाणारा निर्धास्त बंडखोर असें वर्णन आवजी कवड्याचें केल्यास तें वावगें होणार नाहीं. बाजीरावासारख्या विजिगीष्णु पुढाऱ्यास नानाप्रकारचीं माणसें हाताशीं निर्माण करावीं लागत. सिंदे होळकरांची प्रथा वेगळी, पिलाजी जाधवाची वेगळी व आवजी कवड्याची वेगळी. युद्धें करायचीं विजय मिळवायचे, परकीयांवर अंमल बसवायचा या कामांस निरनिराळ्या प्रकृतीचीं माणसें पाहिजे असतात. बंडखोरांचें व दंगेखोरांचें पारिपत्य करण्यास तशाच प्रवृत्तीचा मनुष्य हवा असतो. आवजी कवडे हा अशा प्रकारचा एक साहसी शूर व उपद्व्यापी सरदार होता. बाजीराव चिमाजीशीं मात्र त्यानें इमान राखलें. स. १७२५ पासून पुढील वीस वर्षांत त्यानें पेशव्यांच्या अनेक कामगिऱ्या सिद्धीस नेल्या. त्याच्या आगळिकीचीं पुष्कळ पत्रें छापलेलीं आहेत त्यांवरून त्याच्या उच्छृंखळ कर्तबगारीचा अंदाज होतो. वऱ्हाड खानदेशच्या बाजूस रघूजी व कान्होजी भोसले, दाभाडे, निजाम इत्यादिकांचा पेशव्यांस जाच होऊं लागला म्हणजे वेळीं अवेळीं ते आवजी कवड्यास त्यांजवर सोडून देत. त्याच्या दुष्ट कृत्यांच्या तक्रारी पेशव्यांकडे येत त्यांचें निरसन त्यांनीं केलेलें दिसत नाहीं. पुष्कळदां तो शाहूची देखील पर्वा ठेवीत नसे. शाहूनें व पेशव्यानें आवजीस वस्त्रें, बहुमान, पालखी, हत्ती, घोडे वगैरे देऊन त्याचा गौरव केलेला आढळतो. सर्व हिंदुस्थान त्याचें उद्योगक्षेत्र होते. मिरजपासून बुंदेलखंडपावेतों त्याचा संचार होता. भोपाळच्या संग्रामापूर्वी बुंदेलखंडचे संस्थानिक पेशव्यांचे अंकित असतां ते निजामास मिळाले, यास्तव त्यांची

‡ पे. द. १७-३३, ९०, ९२, १५०, १५६; ३०-१०४, १०५; पे. द. १-१, २; २.२; १८.१७८; २५.८५, ३६४.; २४. २६१.

पे. द. २४. २६१ वरून कृष्णराव महादेव स. १७६० पावेतों हयात असल्याचा पत्ता लागतो.

§ टीप पे. द. भा. १०, १२, १३, १४, १५, १७, ३०. ४४ यांतील सूची व भा. ३०, ले. ३६७, २०४. २३१. १५. पृ. ४३ ७४, व ४४, पृ. ६४. ३०

खोड मोडण्यासाठीं बाजीरावानें आवजीला बुंदेलखंडावर सोडून दिलें. एक रघूजी भोसले मात्र त्यास वस्ताद भेटला. स. १७३९ च्या एप्रिलांत उमरावती नजीक रघूजीनें आवजीवर एकाएकी हल्ला करून त्याचा खरपूस समाचार घेतला; सर्व सामान लुटून त्यास कफल्लक बनविलें, "आवजी कवडे मोडल्याचें वर्तमान ऐकून महाराजांनीं संतोष मानिला. परंतु रघूजीशीं विखर दाखविण्याचा हा समय नाहीं. त्यास लगामीं लावून घ्यावें. आवजीची वस्तभाव सोडून देतील म्हणजे भागलें. आवजी प्राक्तनवान आणि बरा धाडसी आहे. आम्हांस पुढें नादरशहाच्या उपमर्दाचा मनसुबा कतर्व्य, यास्तव गम खाऊन रघूजीचें समाधान करून लगामीं लावून घेऊं. प्रस्तुत आवजी कवडे गढे प्रांतांत गेले." आवजीनें महाराजांकडे आपल्या तक्रारी सांगितल्या त्यांचे सवाल जबाब मोठे खोचदार आहेत ते पु. द. १.१४० यांत वाचावे. आवजीचें स्वतंत्र जीवनवृत्त लिहिण्यासारखें आहे. तो ता. ११ सेप्टेंबर, स. १७४९ रोजीं मरण पावला.† पुत्र महिपतराव कवडे पेशव्यांचा विश्वासू सेवक होता.

सिंदे होळकरांसारखेच आणखी किती तरी विश्वासाचे सहायक बाजीराव व चिमाजी यांनीं तयार केले. किंबहुना अशा सहायकांमुळेंच त्यांना एवढें यश प्राप्त झालें. या सहायकांत बरीचशीं ब्राह्मण कुटुंबें नजरेस येतात, त्यांपैकीं खालील कित्येक नांवें बाजीरावाच्या वृत्तान्तांत स्मरणीय वाटतील:—

१ मल्हार दादाजी बर्वे; २ गणेश व सदाशिव बल्लाळ कुटे;
३ बाजी भीवराव रेटकेकर; ४ वासुदेव व नारायण जोशी;
५ अंताजी नारायण भानु; ६ गणपत भट मेहेंदळे;
७ विसाजी कृष्ण पेठे; ८ गोविंद कृष्ण देशमुख;
९ नारायण दीक्षित पाटणकर; १० महादेवभट हिंगणे;
११ अंताजी माणकेश्वर गंधे; १२ गोविंद पंत बुंदेले;
१३ रामचंद्र व कृष्णराव महादेव जोशी चासकर;
१४ बाबूजी नाईक जोशी; १५ इचलकरंजीकर घोरपडे;

हीं सर्व कुटुंबें पिढ्यानुपिढ्या पुढें मराठशाहींत उद्योग करीत राहिलीं. इतर सरदारांच्याही अशा याद्या तयार करितां येतील.

---

† पे. द. २७.३

# सूची.

[ आंकडे पृष्ठांचे ]